अरसिकेषु कवित्वनिवेदनं शिरसि मा लिख मा लिख मा लिख !

सुरसग्रंथमालेचें अकरावें पुष्प

# भयंकर स्वप्न.



लेखक,

श्रीयुत रामचंद्र नरसिंह इनामदार,

बी. ए. एल्. एल्. बी.; कारभारी, संस्थान कापशी.

( मराठी सत्तेचा उत्कर्ष इ० ग्रंथाचे कर्ते. )

प्रकाशक,

वालचंद रामचंद कोठारी, बी. ए.

प्रोप्रायटर—सुरसग्रंथप्रसारक मंडळी, १४६४ कसबा पेठ, पुणें.

मुद्रक,

केशव रावजी गोंधळेकर, ' जगद्धितेच्छु ' प्रेस

४३२ शनिवार पेठ, पुणें—सिटी.



आगस्ट १९१९.] किंमत २ रुपये. [ आवृत्ति पहिली.



प्रजापालनदक्ष क्षत्रियकुलावतंस

# श्रीमन्महाराज शाहू छत्रपति,

जी. सी. एस आय, जी. सी. आय. ई. जी. सी.
व्ही. ओ. एल. एल. डी.

इ. सरकार करवीर यांचे चरणीं सदरहू पुस्तक
ग्रंथकर्त्यानें निःसीम स्वामिभक्तिपूर्वक
हुजुरच्या खास परवानगीनें
अर्पण केलें आहे.

ग्रंथकर्ता.



# प्रकाशकाचे दोन शब्द.



या खेपेस श्रीयुत शहा यांची " छत्रसाल " ही ऐतिहासिक कादंबरी वाचकांस सादर करण्याचें अभिवचन आम्हीं दिलें होतें. पण अनेक अडचणींमुळें तें पुस्तक आम्हांस वेळेवर प्रसिद्ध करतां आलें नाहीं. पण त्या ऐवजीं आम्ही जी कादंबरी प्रस्तुत प्रसंगीं वाचकांस सादर करीत आहों तींत कोणत्याही दृष्टीनें न्यून नसून ती सर्वांस प्रिय होईल अशी आमची खात्री आहे.

Lord Oakburn's daughters. या अत्यंत लोकप्रिय व सर्वमान्य आंग्ल कादंबरीच्या आधारें ही कादंबरी लिहिली आहे. वरील कादंबरीचें मराठींत रूपांतर करणें जवळ जवळ अशक्य आहे, असेंच सामान्य वाचकांस वाटेल. पण श्रीयुत इनामदार यांनीं आपल्या बुद्धिकौशल्यानें आणि रचनाचातुर्यानें असें सरस रूपांतर केलें आहे कीं, तें वांचून विद्वानही थक्क होतील आणि त्यांच्या कृतीची तारीफ करितील यांत तिलप्राय संशय नाहीं.

सामाजिक कादंबरीस साजेशी साधी, सरळ व अंतःकरणास गुदगुल्या करणारी लेखकाची भाषा शैली प्रत्येक सहृदय वाचकांस प्रिय झाल्यावांचून रहाणार नाहीं. पुस्तक एकदां वाचावयास घेतलें म्हणजे कथानकाच्या चित्तवेधक स्वरूपानें मुग्ध झालेला वाचक भाषेच्या प्रवाहांत सारखा वहात जातो व पुस्तक संपेपर्यंत आपली गति थांबविणें त्याला अशक्य होतें.

एकंदरींत प्रस्तुत कादंबरी आमच्या वाचकांचें उत्कृष्ट मनोरंजन करील यांत शंका नाहीं.

प्रकाशक.

# शुद्धिपत्रक.

## पूर्वार्ध.

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १० | २१ | १९०० | १८९... |
| ११ | १९ | बरेंच | बरेंच मोठें |
| ११ | शेवटची | न पाहतांच... ...नाहीं | न पाहतांच घर t मला पसंत नाहीं. |
| १२ | २ | तुह्मीं...नाहीं | तुह्मीं सांगतां तें तर डलें नाहीं. |
| १२ | ६ | येई—संभाळाल | येईपर्यंत येवढी पे संभाळाल. |
| ४८ | १३ | दत्तापूर | दत्तापुराला. |
| ७७ | १ | खरें. | खरें का बरें ? |
| १३६ | २१ | बाकीचें | साकीचें |
| २०० | ४ | गिरीला | पंढरपुराला |

## उत्तरार्ध.

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ७ | ८ | गोड | थोर |
| ८ | १४ | दरबारांत | दरवाज्यांत |
| १७ | १९ | सारख्या | सख्ख्या |
| २४ | ४ | " तुझें आडनांव काय देशमुख होय ? " | " तुझें आडनांव काय ? " |
| ९१ | शेवटची | देवीची | तापाची |
| १२७ | वरील ओळ | इंदिरेचें कपट | इंदिरेचें स्वप्न. |
| १५२ | २५ | फोडूं नका | फोडूं या नको |
| १६२ | २२ | बाळंतपण | बाळंत |
| १६९ | ११ | अड्ळशाशेजारच्या | अड्डयाशेजारच्या |
| १७४ | १६ | खोकून | खोंचून |

# सुरसग्रंथमालेचें उद्देशपत्रक.

इतर ललितवाङ्मयांतील प्रख्यात लेखकांची व त्याबरोबर महाराष्ट्र भाषेंतील लेखकांचींही उत्कृष्ट पुस्तकें वाचावयास मिळून, त्यांच्या गुणावगुणांचा तुलनात्मक रीतीनें विचार करतां यावा, हाच ही **सुरसग्रंथमाला** सुरू करण्याचा उद्देश आहे. या मालेंतून मुख्यत्वें-करून मनोरंजक व बोधप्रद कादंबऱ्या व कधीं कधीं नाटकेंही प्रसिद्ध होतील. स्कॉट्, ड्यमास, रवींद्रनाथ टागोर, बंकिमचंद्र, मिसेस् हेनरी वुड, मिस् कॉरेली वगैरे प्रख्यात लेखकांच्या कादंबऱ्यांचीं भाषांतरें व रूपांतरें कायमच्या ग्राहकांस अति स्वल्प किंमतींत देण्याचा आमचा उद्देश आहे. हा उद्देश उदार आश्रयदाते मिळाल्यानेंच सिद्धीस जाणार आहे; ह्मणून कायमचे ग्राहक होण्याविषयीं सर्व महाराष्ट्रभाषाभिमानी बंधूभगिनींस विनंति आहे.

## वर्गणीदारांसंबंधीं नियम.

( १ ) आरंभीं फक्त एकदां एक रुपया प्रवेश फी भरणारांस कायमचे वर्गणीदार समजण्यांत येईल.

( २ ) कायमच्या वर्गणीदारांनीं दरसाल मालेंतून प्रसिद्ध होणारीं सहा पुस्तकें घेतलीं पाहिजेत. प्रत्येक पुस्तक दोन दोन महिन्यांनीं प्रसिद्ध होईल.

( ३ ) कायमच्या वर्गणीदारांस सर्व पुस्तकें निम्मे किंमतींतच मिळतील. ट. ख. मात्र निराळा पडेल.

( ४ ) नवें पुस्तक प्रसिद्ध होण्यापूर्वीं पंधरा दिवस आगाऊ आमच्या वर्गणीदारांस पुस्तकाचें स्वरूप व किंमत सार्वजानिक वर्तमानपत्रांतून अथवा पत्रद्वारें कळविली जाईल.

# आजपर्यंत या मालेंत प्रसिद्ध झालेलीं पुस्तकें.

(१) **गोषांतील सुंदर स्त्रिया.**—कथानक फारच चटकदार आहे. किं. १। रु. (२) **निशाचराचा प्रेमविलास.**—[ दुसरी आवृत्ति ] गोष्ट अद्भुतरसपूर्ण आहे. किं. १। रु. (३) **पति-पत्नीप्रेम**—जगद्विख्यात **रवींद्रनाथ टागोर** यांच्या "चोखेर वाली" नामक अत्युत्कृष्ट कादंबरीचें सरस भाषांतर. डेक्कन व्हरनॅक्युलर ट्रान्सलेशन सोसाइटीकडून बक्षीस मिळालेलें. किं. १॥ रु. (४) **सम्राट् अशोक**—श्रीयुत **शहा** यांनीं लिहिलेल्या सुप्रसिद्ध ऐतिहासिक कादंबरीसंबंधानें येथें विशेष लिहिण्याचें प्रयोजनच नाहीं. किं. १॥ रु. (५) **इंदिरा**—सामाजिक कादंबरी, स्वभावरेखन सूक्ष्म व हृदयस्पर्शी आहे. ही व **नीरजा** मिळून किं. १।= रु. (६) **दैवाची विचित्र लीला**—डॉ. रवींद्रनाथ यांच्या "नौका डूबी" नामक रसाळ कादंबरीचें रसाळ भाषांतर. किं. १॥ रु. (७) **चंद्रकांता** अरेबियन् नाइट्स्च्या पद्धतीवर लिहिलेली अद्भुतरसपूर्ण कादंबरी किं. २ रु. (८) **उषा व हाही पण एक जगांतलाच प्रकार**—पहिलें पुस्तक श्रीयुत **शहा** यांनीं एका उत्कृष्ट आंग्ल कादंबरीवरून लिहिलें आहे. दुसरें बंकिमचंद्राच्या एका कादंबरीचें भाषांतर आहे. किं. २॥ रु. (९) **जर्मन युद्धावरील मोहीम, गहनगूढ व प्रेमपरीक्षण**, किं. २।= रु. (१०) **सत्यमेवजयते** आणि **शैशवसहचरी**, किं. २ रु. **वरील सर्व पुस्तकें वर्गणीदारांस निम्म्या किं. मिळतात.**

१४६४ कसबा, पुणें. **सेक्रेटरी—सुरसग्रंथप्रसारक मंडळी.**



# भयंकर स्वप्न.

## पूर्वार्ध.

### प्रकरण १ लें.

#### ' कोण बरें असावी ही ? '




चकहो, कांहीं वर्षांपूर्वीं एका छोटेखानी शहरांत एक अत्यंत हृदयद्रावक प्रकार घडून आला त्याची हकीगत मी सांगणार आहें; ती लक्ष्यपूर्वक वाचण्याची आपण तसदी घ्यावी. अशा प्रकारचीं घोर कृत्यें आह्मां मनुष्यांच्या नैसर्गिक दुष्ट मनोवृत्तीपासूनच उद्भवत असल्यामुळें त्यांचें गोष्टीच्या रूपानें वर्णन करणें फारसें आल्हादकारक नाहीं. तथापि पुष्कळ लोकांना त्यापासून बरीच

मौज वाटत असते व मन थक्क होऊन जातें, हें मात्र नाकबूल करितां येणार नाहीं. खालील गोष्टीपासून अशा प्रकारची करमणूक आपणांस होईल अशी माझी समजूत आहे.

दत्तापूर हें त्या लहानशा शहराचें नांव. येथून दोन मैलांवर दुसरें एक बरेंच प्रसिद्ध शहर असून तेथें आगगाडीचें स्टेशन आहे. या स्टेशनापासून दत्तापुरापर्यंत रेल्वेचा फाटा नसल्यानें तेथें जाणाऱ्या येणाऱ्या उतारूंना टांग्यांतून अगर बैलगाडींतून जाणें भाग पडे.

ह्या दोन मैल रस्ता अगदींच खराब होता. ह्या रस्त्यावरून टांगा अगर एक्का खडखड करीत निघाला कीं दत्तापूर गांवच्या अगदीं मध्यभागीं येऊन दाखल होई. हें गांव सडकेच्या दोन्ही बाजूंस वसलेलें होतें. ह्या रस्त्याला बाजारपेठ असें ह्मणत; कारण दोन्ही बाजूंस भुसारी, किराणा वगैरे मालांचीं बरींच दुकानें असून व्यापारही चांगला चालत असे. ह्या रस्त्यावर अलीकडे पुष्कळ नव्या नव्या इमारती झाल्या होत्या. पैकीं एका बाजूला कांहीं कांहीं घरांस सज्जे असून तीं घरें एकमेकांपासून अंतरावर अशीं होतीं. ह्या भागाला ‘ गंगावेस ’ अशी संज्ञा होती. कारण तेथून जवळच गंगेचें पात्र असून घाटानजीक धर्मगुरूंचा मठ होता. दुसऱ्या बाजूचा प्रदेश बराच उंचवट्याचा असल्याकारणानें तेथील हवा चांगली असे; यामुळें येथेंही बऱ्याच नवीन इमारती झालेल्या होत्या. ह्या इमारती म्हणजे बहुतेक लहान मोठे असे स्वतंत्र बंगलेच ह्मणावयाचे. ह्या हवाशीर भागाला ‘ रावपुरा ’ असें नांव दिलेलें होतें.

सन १९०० माहे मार्च तारीख १० शुक्रवार रोजीं तिसऱ्या प्रहरीं ह्या रस्त्यानें एक बैलाची एक गाडी खडखड करीत आली. ह्या गाडीच्या पुढें दत्तापूर शहर लांबच्या लांब पसरलेलें दिसत होतें. पेठेंत आल्यानंतर ती गाडी थोडीशी पुढें डावीकडे वळली आणि एका मोठ्या दरवाज्या-समोर येऊन उभी राहिली. हाच नेहमींचा तिचा उरण्याचा आड्डा. गाडी उभी राहतांच कोण आलें हें पाहण्याकरितां जवळच्या घरांतून एक पोक्त बाई बाहेर आली. ही बाई दिसण्यांत मोठी चटपटी; आनंदी व अगत्य-वान् अशी होती. ती बाहेर येऊन पाहते तर गाडींत दुसरें कोणी

नसून एक अल्पवयस्क स्त्री बसलेली तिला दिसली; तिच्या बरोबरचें सामानही तुजबी–फक्त एक ट्रंकच होती. ती स्त्री रूपानें सुंदर होती. इतका सुरेख चेहरा त्या बाईनें आजन्मांत कधीं पाहिला नव्हता.

"तुह्मांला कुठें जायचें ?" असें त्या बाईनें तिला विचारिलें.

" मला होय ? मी येथेंच राहण्याकरितां आलें आहें. गाडी किती मेली हादरते हो ! मी अगदीं थकून गेलें आहे व माझा जीव फार कासावीस झाला आहे. " असें बोलत बोलत ती तरुणी खालीं उतरूं लागली. तिचा आवाज, बोलण्याचालण्याची ढब व तिची एकंदर वागणूक अगदीं घरंदाज, सभ्य व सुशिक्षित स्त्रीची दिसत होती. खालीं उतरल्यावर तिच्या अंगयष्टीकडे जरा लक्ष्यपूर्वक पाहून त्या बाईला थोडें आश्चर्य वाटलें. तिला घेऊन ती बाई आपल्या घरांत गेली.

बाई ह्मणालीः–" खरेंच, ह्या रस्त्यानें गाडी भारी हादरते. तशांतून तो हादरा सोसण्यासारखी तुमची प्रकृति नाहीं. शिवाय तुह्मी फार लांबून आलां आहांत वाटतें. आतां इथें बसून घटकाभर विसावा घ्या नि मग जा कुठें जायचें असेल तिकडे. तुह्मी गाडींत बसलां होतां तेव्हां मला वाटलें एक मुलगीच बसली आहे. "

थोड्या वेळानें त्या तरुणीनें विचारलें:–" ह्या गांवांत भाड्यानें मिळण्यासारखीं कांहीं घरें आहेत काय ?

बाईनें उत्तर दिलें:–" इथें नाहींत फारशीं. हें कांहीं मोठें शहर नाहीं. तरी पण पूर्वींपेक्षां आतां बरेंच झालें आहे. " नंतर आठवल्यासारखें करून ती ह्मणाली:–" हो, बरी आठवण झाली. माझ्या एका मैत्रिणीचें घर भाड्यानें द्यावयाचें आहे. चार पांच दिवसांपूर्वींच त्या मला भेटण्यास आल्या होत्या. त्या वेळीं कोणी भाडेकरी असल्याबद्दल मला विचारीत होत्या. घर बरें सोयिस्कर आहे. मालकीणबाईही स्वभावानें गरीब आहे. मी त्या घराबद्दल तपास करवूं काय ?"

" नको नको. मीच जातें. तुह्मांस उगीच तसदी काय ह्मणून !–– शिवाय स्वतः न पाहतांच.........नाहीं. आपण मला आपल्या मैत्रि-

णीचें नाव व त्यांच्या घराचा पत्ता सांगा ह्मणजे झालें. आणखी असें कीं तुह्मीं......नाहीं तर लागलीच मला दुसऱ्या जागेचा तपास केला पाहिजे.

"तें घर गंगावेशींत पहिल्याच आळींत आहे. उजव्या हातचें चवथें घर. माझ्या मैत्रिणीचें नांव--नांव काय ? त्यांना सर्वजण मावशीबाई या नांवानें ओळखतात. आपणही त्याच नांवानें तपास करा ह्मणजे झालें."

"बरें तर. पण मी परत येई—संभाळाल कां ?"

"हो हो, न संभाळायला काय झालें ! आपलें नांव काय ?"

"कलावती."

बाईनें दरवाजापर्यंत येऊन त्या तरुणीला पोंचविलें व बरोबर रस्ता दाखवून दिला. घराची खूणखाण ही बरोबर सांगितली. मावशीबाईचें घर गंगावेशींत पाहिल्याच ओळीला होतें. पांच सहा मिनिटांत ती तेथें पोंचली. 'आपणास राहण्याकरितां जागा पाहिजे आहे; ती इथें मिळेल काय ?' असें तिनें मावशीबाईला विचारिलें. मावशीबाई 'हो' ह्मणाल्या. त्यांनीं भाडेंही बेताचेंच सांगितलें; जागा दुसऱ्या मजल्यावर असून त्यांत दोन खोल्या होत्या. त्या लहानच पण हवेशीर व स्वच्छ असून त्यांत सर्व सोयी होत्या व एकींतून दुसरींत जातां येत होतें. त्यामुळेंच (?)थींतच कलावतीला त्या फार पसंत पडल्या.

कलावतीः—"मी लवकरच बाळंत होईन असें मला वाटूं लागलें आहे. तुमची कांहीं हरकत नाहीं ना ?"

मावशीबाई जरा विचारांत पडल्याः—"छे छे! हरकत कशाची ? पण सुइणीची, औषधपाण्याची वगैरे सर्व व्यवस्था आपली आपण करून घ्या ह्मणजे झालें. त्याची जबाबदारी माझ्यावर नको."

"मुळींच नाहीं मी माझी सर्व करून घेतें." नंतर सर्व व्यवहार ठरला. महिनेमहा आपण भाडें देऊं, कारण आपणास येथें कायमचें राहावयाचें नाहीं, असें कलावतीनें सांगितलें. तुम्ही माझ्या घरीं आहांत तोपर्यंत मी माझ्या हातून होईल तितकी मदत करीन, असें मावशीबाईनीं आश्वासन दिलें. नंतर आपली पेटी ह्या बिऱ्हाडीं आणण्याकरितां कलावती आड्ड्याकडे निघून गेली. आजपर्यंत रिकामी पडलेली आपली जागा आतां निदान

कांहीं महिने तरी भाड्यानें गुंतली याबद्दल मावशीबाईंना बराच आनंद झाला, असें दिसलें.

कलावती पेटी घेऊन परत आली. नंतर तिनें ह्मटलें:—

" या, अशा मजजवळ बसा. घरचें काम थोडा वेळ राहूं द्या. मला कांहीं माहिती पाहिजे आहे तेवढी सांगा. येथें डॉक्टर कोण आहेत.

मावशीबाई:—" डॉक्टर का ? विश्राम, या आडनांवाचे दोघे भाऊ डॉक्टर आहेत."

कलावती त्यांच्या तोंडाकडे पहात राहिली. आणखी कांहीं नांवें निघतील असें तिला वाटलें; पण मावशीबाई पुढें बोलेनात असें पाहून ती म्हणाली:—

" कोण ? डॉक्टर विश्राम ?"

" होय. विश्वासराव विश्राम व प्रतापराव विश्राम. त्यांचा आणखी एक तिसरा भाऊ होता. तो गेल्या वर्षीं वारला. हे तिघेही भाऊ स्वभावानें किती चांगले ह्मणून सांगूं ? त्यांचा धंदाही फार सुरेख चालला आहे. त्यांचा बाप व चुलता हे देखील डॉक्टरच होते."

" मग तुमचें म्हणणें यांच्याशिवाय दुसरा कोणी डॉक्टरच इथें नाहीं तर ! एवढ्या मोठ्या गांवांत अशी स्थिति असेल असें मला वाटलें नाहीं ! " कलावती आश्चर्यानें ह्मणाली.

" दत्तापूर गांव अलीकडेच इतकें वाढलें आहे. पूर्वीं अगदीं लहान होतें. डॉक्तर विश्रामबंधु लोकांना फार आवडतात. कुणाला ह्मणजे नकोत असें नाहीं. हो पण बरी आठवण झाली. आणखी एक नवीन डॉक्टर इथें नुकतेच येऊन राहिले आहेत. त्यांचें नांव आनंदराव."

" हे कोण, कुठले राहणारे ? "

" तें नाहीं मला माहीत. बहुतेक ते मुंबईहून आलेले असावेत. भा[illegible] हुषार व तरतरीत आहेत. वयानें तरुण, फार झालें तर त्यांचें व[illegible] वीस वर्षांचें असेल; या गांवांत त्यांची कुण्णाची ओळख नाहीं की[illegible] नाहीं. त्या टोंकाला एक घर भाड्यानें घेऊन त्यांनीं आपला डॉक्टर[illegible] धंदा सुरू केला आहे. रावपुऱ्यांत जे लोक राहतात त्यांच्याकडे त्[illegible]

पुष्कळ वळण आहे. कारण तेही त्यांच्याप्रमाणें नवखेच आहेत. आनंदरावांनीं एक शिग्राम गाडी सुद्धां ठेविली आहे बरं का ? विश्राम बंधूंची देखील अशी गाडी नाहीं. कोणी ह्मणतात आनंदरावांची खासगी इस्टेट पुष्कळ आहे; आणि कोणी ह्मणतात आपला धंदा चांगला चालावा ह्मणून ते नसती ऐट दाखवीत असतात.",

" बरें पण ते तसे हुषार तरी आहेत का ? "

" लोक आपले बोलतात कीं विश्राम डॉक्टरांपेक्षां देखील आनंदरावांची हुशारी कांकणभर जास्त ह्मणून. पण काय ह्मणतात ना ' तेरड्याचा रंग तीन दिवस ' तशांतली गत. ते नवीनच आहेत, धंदाही त्यांना चालवायचा आहे; तेव्हां असेल नसेल तेवढी हुषारी दाखवितात झालें."

हें ऐकून कलावतीला हंसूं आलें:—" पण मी ह्मणतें मूळची हुषारी अंगांत असल्याशिवाय त्यांना ती दाखवायला कशी येईल ? "

" तसे ते हुषार आहेत. नाहींत असें नाहीं. कसें कां असेना ? आनंदरावांचा धंदा चांगला चालला आहे एवढी गोष्ट खरी. रावपुऱ्यांत एक बंगला आहे तिथें ते वरचेवर जात असतात; मीं मघाशीं सांगितलेंच. ते घरवालेही त्यांना फार मानतात हो. त्या बंगल्यांत कोणी ' सर्जेराव ' या नांवाचे अंमळ वयातीत झालेले जहागिरदार रहात असतात. त्यांना संधिवाताचा विकार कायमचा जडला आहे ह्मणे. हे लोक लांबचे; हवेसाठीं ह्मणून इथें येऊन राहिले आहेत. पण किती गर्विष्ठ आणि एकलकोंडे ह्मणून सांगूं ! या जहागिरदारांना तीन मुली आहेत. रूपानें एकीपेक्षां एक वरचढ ! आनंदराव डॉक्टर नेहमीं तिकडे जात असतात. कारण त्या ह्यातान्याचें—अगबाई ! काय झालें ? अशा काय करितां हो ? "

[illegible] मावशीबाईंचा स्वभाव फार भितरा होता. त्यांनीं ओरडून दंगा करावा [illegible]च स्थिति झाली. ती तरुण, अशक्त झालेली स्त्री एकाएकीं बेशुद्ध [illegible] पडली व तिचा चेहरा उतरला. तिची मान सुद्धां तिला [illegible]. मावशीबाईंनीं तिची मान सांवरून धरण्याचा प्रयत्न केला, [illegible]यर्थ. आतां मात्र त्यांचा धीर सुटला व त्या थरथर कांपू[illegible] त्या. त्यांना कांहींच सुचेनासें झालें. त्या जिन्यांतून धाड धाड करीत

खालीं आल्या व मधघरांतून ओरडत परसांत गेल्या आणि तेथून शेजा-ऱ्याच्या घराच्या मागील दारानें आत शिरल्या. त्या घरांत दोन बाया होत्या. एक भांडीं घाशीत होती व दुसरी चुलीजवळ बसली होती.

"अहो बाई, कोणी तरी एकजण माझ्याबरोबर चला हो. मी तुह्मांला मघाशीं बोललें ती पाहुणी बाई एकाएकीं आपली मेल्यासारखी निपचित पडली आहे !"

इतकें बोलून उत्तराची वाट न पाहतां त्या लगेच परत फिरल्या. चुलीजवळ बसलेली बाई दचकून उठली. तिच्या चेहऱ्यावर मूर्तिमंत भीति दिसत होती. दुसरी बाई मात्र स्वस्थपणानें आपलें काम करीत होती. ती ह्मणाली:—"सारजे, तूं अशी घाबरूं नकोस. मावशीबाईचा स्वभाव तुला माहीत नाहीं. नाचरी मेली ! एखादें पाखरूं जरी मरून जमिनीवर पडलें तरी देखील ती दुसऱ्याला हाका मारीत राहील. प्रथम प्रथम मला वाटे कीं असें ती मुद्दामच करीत असेल. पण आतांशा मात्र माझी खात्री होत चालली आहे कीं, तिचा स्वभावच तसा भितरा आहे. तिचा तरी काय इलाज ! तरी पण पाहिजे तर पाहून ये जा काय हकीगत आहे ती."

सारजा घाईघाईनें मावशीबाईच्या माडीवर आली. ती मोठी चाणाक्ष व हुषार असून वयानें सुमारें सतरा अठरा वर्षांची होती. मावशीबाई तिच्या पूर्वींच येऊन पोंचल्या होत्या व हातांत एक सूत घेऊन त्यांनीं तें पाहुणीबाईच्या नाकाजवळ धरिलें होतें. सारजेनें त्यांच्या हातांतून तें काढून घेऊन म्हटलें:—"मावशीबाई, तुह्मांला वेड तर लागलें नाहीं ? याचा काय उपयोग होईल बरें ? थोडेंसें पाणी आणा जा."

मावशीबाई पाणी घेऊन आल्या. सारजेनें तें पाहुणीच्या डोळ्यास लावून डोक्यावरही थोडें थापलें. तेव्हां ती तरुण स्त्री शुद्धीवर आली. मावशीबाईची घाबरलेली मुद्रा पाहून ती बोलली:—"इतकें कांहीं घाबरायला नको होतें मावशीबाई. अलीकडे कांहीं महिने माझी प्रकृति अगदीं नाजुक झाली आहे. वरचेवर मला अशी मूर्च्छा येत असते व ती अमुकच वेळेला येईल याचाही नेम नसतो. हें मी तुह्मांला अगोदरच सांगून ठेवायला पाहिजे होतें, तेवढें चुकलें."

ती चांगली सावध झाल्यावर त्या दोघीजणी तेथून निघून खालीं आल्या. जाण्यापूर्वी मावशीबाईनीं त्या पाहुणीच्या सांगण्यावरून तिची ट्रंक उघडून तींतून एक लहानशी पेटी काढून तिच्याजवळ दिली.

खालीं आल्यावर मावशीबाई फार काकुळतीस येऊन ह्मणाल्याः—"सारजाबाई, तूं आतां जाऊं नकोस, इथेंच रहा. तिला आणखी केव्हां मूर्च्छा येईल कोणास ठाऊक. वरचेवर तिला असें होत असतें हें तूं आतांच ऐकलें आहेस आणि आजारी माणसाजवळ माझी कशी तिरपीट उडते तीही तूं पाहिली आहेस; कसेंही करून माझ्या सोबतीला रहा. तूं आतांशा मोकळीच आहेस."

"बरें तर. मी घरीं जाऊन गिरजाक्काला कळवून येतें व हातांतील शिवणकामही तेवढें घेऊन येतें."

सारजा जाऊन परत आली व तिनें आपलें शिवणकाम सुरू केलें; पण तिचें सर्व लक्ष्य त्या माडीवरील पाहुणीकडे गुंतलेलें होतें. "कोण बरें असावी ही ?" असें ती मध्येंच मोठ्यानें ह्मणाली.

"कोणी तरी परस्थ अनोळखी आहे. बिचारीला त्या अड्ड्याशेजारच्या बाईनें माझें घर दाखवून दिलें. तिसऱ्या प्रहरीं तूं बाहेर गेली होतीस, त्या वेळीं ती आल्याचें मी तुझ्या आक्काला कळविलें होतें. वयानें ती अगदीं लहान नाहीं दिसत ?"

सारजा ह्मणालीः-—"किती तरी लहान ! पण मोठी सभ्य व चांगल्या स्वभावाची दिसते हो. परंतु ती अगदीं एकटी आली, आणि वयानें अशी लहान पडली; ह्मणून जरा मला विपरीत वाटतें. तिचा नवरा कुठें असतो ?"

"मीं तिला विचारलें. तो कुठें दूर देशीं गेला आहे ह्मणे."

"ती या गांवांत कां आली आहे ?"

"कुणाला ठाऊक ! मला चमत्कारिक दिसतें तें हेंच. ती ह्मणाली, आतांच आपण इथें आलों, यापूर्वी कधींही आलों नव्हतों व आपलें इथें कोणी ओळखीचेंही नाहीं ह्मणून. ह्या गांवांत डॉक्टर कोण कोण आहेत याचा ती तपास करीत होती—"

सारजा कांहीं ऐकल्यासारखें करून मध्येंच ह्मणाली:—" तिनें हाक मारली वाटतें. तिला कांहीं तरी पाहिजे असेल. जा लवकर."

मावशीबाई वर गेल्या. पाहुणीबाईनें एक बंद केलेलें पाकीट पुढें करून म्हटलें:—" मावशीबाई, माझ्याकरितां एवढी तसदी घ्या नि हें पत्र कोणाबरोबर तरी पाठवून द्या. इतक्यांतच डाक्टरांची गरज लागेल असें मला वाटत नव्हतें. पण थकवा फार आला आहे व मला कसेंसेंच होत आहे ह्मणून डाक्टरची आवश्यकता वाटते. मला आराम पडेल असें एखादें औषध ते पाठवून देतील."

" बरें तर. विश्राम डाक्टर इथें शेजारींच राहतात. पण बाई, तुह्मी इतक्यांतच अंथरूण धरणार नाहीं असें मला वाटत होतें. "

कलावती हांसली:—"तुह्मी ह्मणतां त्या अर्थानें मी नाहीं अंथरूण धरणार. त्याला अजूनी दोन महिने अवकाश आहे. तरी पण मला पुनः मूर्च्छा आली ह्मणजे तुह्मी घाबराल. मी एक औषध नेहमीं घेत असतें, त्यापासून मला गुणही आहे. पण निघण्याच्या धांदलींत तें औषध मी बरोबर घ्यावयाचें विसरलें ह्मणून डॉक्टरांना बोलवावें असें मला वाटतें. पण काय हो मावशीबाई, आतां वर आली होती ती तुमचीच का मुलगी? मोठी छान पोर आहे. "

या प्रश्नानें मावशीबाईंना बरें वाटलें नाहीं. आपण अजून तारुण्याच्या भरांत आहोंत अशीच त्यांची समजूत होती. आणि सारजेची तर विशी येऊन ठेपली होती. त्या नाक मुरडून ह्मणाल्या. "छे! ती नव्हे माझी मुलगी बरें. मला मूलबाळ कांहीं नाहीं. तिचें नांव सारजा. शेजारींच तिच्या बहिणीचें घर आहे तिथें ती असते. तिला मी तुमचें पत्र घेऊन जावयाला सांगतें. "

मावशीबाईंनीं 'पत्र कोणास द्यावयाचें ?' असें विचारल्यावर 'मुंबईहून नवीन डॉक्टर आले आहेत ते, त्यांना ! ' असें कलावतीनें सांगितलें. पण मावशीबाईंना तें रुचलें नाहीं. त्या कपाळास आंठ्या घालून म्हणाल्याः—" आनंदरावांना कां ! यापेक्षां विश्राम डॉक्टरांना बोलाविलें

असतें तर मुळींच काळजी नव्हती. त्यांच्याकडेच पुष्कळ लोक औषधें घेतात."

कलावती म्हणाली:—"मघांशीं तुम्हीं मला डॉक्टरांचीं नांवें सांगितलींत, तेव्हांच ह्या डॉक्टरांना बोलवावें असें आपलें माझ्या मनानें घेतलें. ज्या हुषार व होतकरू गृहस्थांनीं नवीन धंदा सुरू केला असेल त्यांना उत्तेजन मिळावें असें मला वाटतें. त्यांतून त्यांना न बोलावण्यास एखादें विशेष कारण असेल तर मात्र गोष्ट निराळी. तसें असेल तर सांगा."

"छे छे! तसें कांहीं नाहीं. शिवाय तुमच्या मनांत जर आनंदरावांना बोलवावें असें आहे तर मीं हरकत घेणें बरोबर नाहीं. त्यांच्यासंबंधानें मीं कांहीं वावगें कधींही ऐकलें नाहीं; ते तसे हुषार आहेत असेंही लोक बोलतात, पण विश्राम डॉक्टरांबद्दल माझें आपलें मत चांगलें आहे. त्यांचे वडील होते तेव्हां त्यांचेंच औषध नेहमीं मी घेई. त्यांच्या मागें त्यांचे चिरंजीव विश्वासराव हेच मला औषध देत असतात. जाऊं द्या तें, हें पत्र आनंदराव डॉक्टरांकडे पाठवून देतें."

"हो, तावडतोब पाठवा. संध्याकाळींच येऊन त्यांनीं प्रकृति पहावी अशी माझी इच्छा आहे."

मावशीबाईनीं खालीं जाऊन त्या पाकिटावरील पत्ता वाचण्यास सारजेला सांगितलें. डॉक्टर आनंदराव देशमुख यांना देणें, असें सारजेनें वाचलें. तें ऐकून मावशीबाईंना फारच आश्चर्य वाटलें. त्या म्हणाल्या:— "त्यांचें आडनाव देशमुख हें हिला काय माहीत? मीं कांहीं तिला सांगितलें नाहीं, आणि मलाही तें माहीत नाहीं. आनंदरावांचें आडनांव देशमुख होय ग!"

सारजेनें उत्तर केलें:—"देशमुखच असेल हो, तेंच. त्यांच्या दरवाज्यावर पाटी आहे, तिजवर तेंच नांव आहे. कदाचित् त्या अड्ड्याशेजारच्या बाईनें त्यांचें नांव तिला सांगितलें असेल. बरें, तें राहूं दे. डॉक्टरांना तिनें बोलावणें पाठविलें आहे त्या अर्थीं तिची तब्येत जास्त बिघडली आहे कीं काय! ती अगदींच अशक्त व निस्तेज दिसते खरी."

मावशीबाई:—" त्याबद्दल भ्यायला नको. आणखी दोन महिने तरी कांहीं काळजी नाहीं. पण त्या भिकार गाडीनें मात्र तिला पुरे पुरे केलें बरें. तशांत तिला मूर्च्छा आली. झालें. खरेंच ह्या रस्त्यानें गाडी किती हादरते ग ? माणसांच्या हाडांची तिला कांहीं तरी काळजी ! बरें, पण एवढें पत्र घेऊन जातेस काय ? मीच गेलें असतें, पण न जाणों ती हाका मारीत राहील. हं चल, हें घे. कशी शहाणी पोर आहे ! थंडी पडली आहे. माझी चौघडी घे पांघरायला. तेवढ्याकरितां आणखी घरीं नको जाऊं."

सारजा प्रसंग जाणणारी होती. तिनें चटृदिशीं उठून ती चौघडी पांघरली व पाकीट घेऊन आनंदराव डॉक्टरांच्या घरचा रस्ता धरला.

आनंदरावांचें घर त्या गांवच्या दुसऱ्या टोंकाला होतें. तेथूनच रावपुऱ्याच्या चढणीस आरंभ झाला होता. तें घर रस्त्याच्या डाव्या बाजूस असून अगदीं अलग असें होतें. घरास पांढराफेक चुना लाविलेला असून सभोंवार हिरवा रंग दिलेला लोखंडी कठडा होता. पुढच्या बाजूस आगाशी होती. तेथून पायऱ्या चढून वर जाऊन सारजेनें दारावर थाप मारली. त्याबरोबर ऐटबाज पोषाख केलेल्या एका मुलानें येऊन खाडकन् दरवाजा उघडला. त्याला तिनें विचारिलें, " डॉक्टर या येळीं भेटतील काय ?

स्वारी जरा ताठ्यानें उभी राहून म्हणाली:—" धंद्याच्या संबंधानें गांठ घ्यावयाची आहे कीं खाजगी ? "

" धंद्याच्या संबंधानें. "

"तर मग त्या दवाखान्याच्या दरवाजानें आंत जा.तो पहा दरवाजा." असें म्हणून त्यानें तिकडे ऐटीनें बोट दाखाविलें.

सारजा तिकडे वळली पण जातां जातां ती म्हणाली:—

" मी विचारूं कां ? आपणाला पगार किती मिळतो ? "

" कां बरें, माझ्या पगाराशीं काय करावयाचें आहे ? "

" विचारायचें कारण इतकेंच कीं, कपड्याकरितां इतका पगार व तोऱ्यानें वागण्याकरितां इतका पगार हें मला त्यायोगानें समजलें असतें."

इतकें बोलून ती झपाझप पायऱ्या उतरून खालीं आली. प्रत्युत्तरादाखल त्या मुलानें कांहीं शब्द उच्चारिले, मण ते तिला ऐकूं गेले नाहींत. तेथून ती ' दवाखाना ' अशी पाटी मारलेल्या दारासमोर आली, व आंत शिरून एका बाटल्या ठेविलेल्या खोलींत गेली. तेथें एका बाकावर एक मुलगा तोंडानें कर्कश शीळ घालीत पडला होता. कोणी आंत आल्याची चाहूल ऐकतांच तो दचकून उठला. बरें तर बरें, पडतच होता. अंधार पडला असल्यामुळें चौघडी पांघरलेल्या सारजेला प्रथम त्यानें ओळखलें नाहीं. पण लवकरच ओळखून तो म्हणाला: " ओहो ! कोण; तुह्मी का सारजाबाई ? "

"होय बरें,त्याच.आनंदराव आहेत कां ? मला त्यांना भेटायचें आहे."

" ते घरीं नाहींत. "

" तर मग त्यांना बोलावून आण. हें पत्र त्यांना ताबडतोब पोंचलें पाहिजे.आत्तांच्या आत्तां एका बाईची तब्येत पहाणें अगदीं जरूर आहे."

तो उद्दाम मुलगा म्हणाला: "जरूर असेल पण उपयोग काय,सारजाबाई ? कदाचित् हें पत्र तारायंत्राच्या तारेला बांधून पाठविलें तर जाईल. दुसरी कांहीं तोड दिसत नाहीं. डॉक्टरसाहेब आज सकाळींच मुंबईला गले. "

त्या मुलाचे कान उपटून त्याच्या हातांत द्यावे असें सारजेला वाटलें. पण ती राग आवरून ह्मणाली:—

" मुंबईला गेले ? येणार कधीं ? "

डोकें खाजवीत खाजवीत मुलानें उत्तर केलें:—

" कधीं होय ? त्यांचे पाय त्यांना आणतील तेव्हां. " नंतर थट्टेचें भाषण बंद करून तो ह्मणाला:—

" खरें सांगूं सारजाबाई ? येतील दोन दिवसांत. त्यांचे वडील आजारी आहेत. तिकडून तार आली ह्मणून ते गडबडीनें निघून गेले. आतां तरी समजलें ? "

थोडा विचार करून सारजा ह्मणाली:—

" बरें तर, हें पत्र घे. नीट संभाळून ठेव हो आणि ते परत आले म्हणजे त्यांच्यांकडे दे. समजलें नाहीं ? चुकूं नकोस. आणि हें पहा. जीभ इतकी सैल सोडीत जाऊं नये. एखादे वेळीं त्याचें प्रायश्चित्त तुझ्या गालाला नाहीं तर कानाला मिळायचें." असा टोमणा मारून सारजा तेथून परतली.





# प्रकरण २ रें.

——:*:——

## ‘ निभावलें ! ’





या वेळीं रस्त्यावरील कंदील लावलेले होते. सारजा परत येतांना अड्ड्यासमोरून चालली. तेथली बाई दरवाजांत होती ती ह्मणाली:—“ कोण ग तूं ? सारजे, तूंच कां ? इश्श, असला भुतासारखा वेष घेऊन कुठें गेली होतीस ती ? ”

सारजा हसली. मावशीबाईची चौघडी आपण कां पांघरली, आपण कोठें जाऊन आलों हें सांगून ती ह्मणाली:—

“ एकंदरींत माझा हेलपाटा व्यर्थ गेला. आनंदरावांची गांठ पडली नाहीं ती नाहींच. ते मुंबईला गेले असें त्यांच्या त्या द्वाड पोऱ्यानें सांगितलें.”

“ तुला इथून जातांना पाहिलें असतें तर मीं सुद्धां सांगितलें असतें आणि तुझा हेलपाटा वांचविला असता. त्यांचा गाडीवाला सकाळीं त्यांना स्टेशनवर पोंचवून परत जातांना मला भेटला, त्याच्याकडून मला कळलें. बरें, काय ग ? ती पाहुणीबाई आजारी का आहे ? ”

“ तिची प्रकृति बरी दिसत नाहीं. मघाशीं एकाएकीं ती बेशुद्ध झाली, ह्मणून डॉक्टरांनीं येऊन आपली तब्बेत पहावी असें तिला वाटतें.”

“ आणि ह्मणून कां मावशीबाईनीं आनंदरावांकडे तुला पाठविलें ? विश्राम डॉक्टरांनीं त्यांचें मांजर मारलें आहे वाटतें ? ”

" ह्मणजे ? आनंदरावांची शिफारस तुह्मींच तिच्याजवळ केली असावी, असें आम्ही ह्मणत होतों. तिनें आनंदरावांना चिठी लिहिली, तेव्हां आह्मांला वाटलें कीं तुह्मींच तिला त्यांची माहिती दिलीत."

" कोणी ? मीं ? भलतेंच. कोणत्याही डॉक्टरासंबंधानें एक चकार शब्द मीं तिच्याजवळ काढला नाहीं. मीं माहिती दिली असती तर विश्राम डॉक्टराबद्दलच दिली असती. त्यांचा आमचा किती दिवसांचा तरी घरोबा आहे ! तरी पण आनंदराव सुद्धां कांहीं वाईट नाहींत हो. परीक्षा चांगली आहे, काळजीनें औषध देतात. आणखी काय पाहिजे ? सारजे, ती पाहुणीबाई नीटपणानें बाळंत झाली. ह्मणजे मला कळीव बरें का त्या बापडीची मला दया येते. ती रूपानें आणि स्वभावानें किती चांगली आहे ह्मणून सांगूं ?"

" कळवीन बरें," असें ह्मणून सारजा तेथून निघाली. दरवाजांत पाय ठेवते इतक्यांत मावशीबाई जिन्यावरून गडबडीनें खालीं आल्या व त्यांनीं सारजेला घट्ट मिठी मारली.

" सारजे, आलीस बाई एकदाची ? आतां काय गत करूं ? तिची तब्बेत पुनः बिघडली. खरोखर तुझ्या गळ्याची शपथ. कुठें आहेत ? आनंदराव डॉक्टर कुठें आहेत ! "

सारजा कांहीं बोलली नाहीं. मावशीबाईची मिठी कशीबशी सोडवून ती दूर झाली व अंगावरील चौघडी काढून टाकून ती धांवत माडीवर गेली. कलावतीला अत्यंत वेदना होत होत्या व ती फार घाबरलेली दिसत होती. तिचे सुंदर कुरळे केश विसकटून इतस्ततः तिच्या मानेवर लोळत होते. तिनें अश्रुपूर्ण नेत्रांनीं मोठ्या काकुळतीनें सारजेकडे एकवार पाहिलें. तिचे ते हरिणासारखे विशाळ, काळेभोर व पाणीदार डोळे, तिची त्या वेळची दुःखमय व केविलवाणी परंतु नाजुक व सुकुमार मुद्रा आजन्म सारजेच्या आठवणींतून गेली नाहीं.

सारजा ह्मणालीः—" बाई, अशा घाबऱ्या होऊं नका. मला टेंकून बसा ह्मणजे तुह्मांला बरें वाटेल."

कलावती आपली मान सारजेच्या खांद्यावर टेंकून अगदीं हलक्या स्वरानें ह्मणाली:—“ डॉक्टरांना यायला इतका का उशीर ? कोणी तरी जाऊन त्यांना घेऊन नाहीं का येत ? ”

सारजेनें उत्तर दिलें:—‘ बाई, आतां आनंदराव येणें शक्य नाहीं. ते आज सकाळींच मुंबईला निघून गेले.”

कलावती अगदीं निराश होऊन स्फुंदस्फुंदून रडूं लागली. तिची समजूत घालावी ह्मणून सारजा ह्मणाली—“ मी ह्मणतें, इथले सर्व लोक जर तुह्मांला अनोळखी, तर मग इतकी पंचाईत कां ? आनंदरावांप्रमाणें विश्राम डॉक्टरही तुह्मांला पसंत पडतील असें मला तरी वाटतें. कुणाला ह्मणजे ते आवडत नाहींत असे नाहीं. आनंदरावांनाच बोलवावें असें तुमच्या मनानें इतकें कां घेतलें आहे ? ”

कलावतीनें वर पाहिलें. तिचे डोळे पाण्यानें भरले होते. ती सारजेच्या कानांत पुटपुटली:—‘ मीं आनंदरावांना चिठी पाठविली आहे. आतां दुसऱ्या डॉक्टरांना बोलाविलें तर दोघांची फी देणें माझ्यानें होणार नाहीं, ह्मणून ह्मणतें.”

सारजा ह्मणाली:—“ दोघांची फी ! छे. दोघांना फी कशाला द्यायला पाहिजे ? आनंदराव इथें नाहींत ह्मणून त्यांच्याबद्दल विश्राम डॉक्टर औषध देतील. मिळून कोणाला तरी एकाला फी दिली ह्मणजे झालें. डॉक्टर लोकांना हें सारें समजतें. बरें, त्यांतूनही आनंदरावांचेंच औषध घ्यायचें असें तुमच्या मनांत असलेंच तर ते मुंबईहून आल्याबरोबर औषध सुरू करतील. मग विश्राम डॉक्टर देणार नाहींत.”

“ आनंदरावांकडूनच औषध घ्यावें असें माझ्या मनांत फार होतें व आहेही. माझ्या कांहीं मैत्रिणींची व त्यांची चांगली ओळख आहे. ते फार हुषार आहेत; त्यांना परीक्षा चांगली आहे असें त्या ह्मणत होत्या व त्यांनींच त्यांची शिफारस मजजवळ केली.”

“ तरीच ! ” सारजा मनांतल्या मनांत ह्मणाली. आनंदरावांचें आडनांव ‘ देशमुख ’ असल्याचें ह्या बाईला काय माहीत, तिनें ह्यांनाच

कां चिठी पाठविली वगैरे शंका सारजेच्या मनांत आल्या होत्या; पण आतां तिची समजूत पटल्यासारखें दिसलें.

मावशीबाई जवळच उभ्या होत्या. कलावतीची स्थिति पाहून त्या वरचेवर घाबऱ्या होत "आतां काय करूं?" असें त्या मध्येंच ह्मणाल्या.

सारजेनें उत्तर केलें:—"काय करूं? प्रथम असला हा वेडेपणा करायचें सोडून द्या आणि दुसरें असें करा—विश्राम बंधूंपैकीं कुणाला तरी लवकर घेऊन या. समजलें?"

कलावती जरा त्रासून ह्मणाली:—"मी कांहीं विश्राम डॉक्टराचें औषध घेणार नाहीं, स्पष्ट सांगतें. तेव्हां त्यांना बोलावण्याचें मुळींच कारण नाहीं. मला त्यांची जी माहिती आहे तेवढ्यावरून मी ह्मणतें ते कांहीं हुषार नाहींत."

सारजेला अत्यंत आश्चर्य वाटलें:—"विश्राम डॉक्टर! आणि ते हुषार नाहींत!!!"

इतक्यांत कलावती ह्मणाली:—"आतां मला कोणीच डॉक्टर नको. उगीच वाटाघाट कशाला? मला किंचित् बरें वाटत आहे आणि इथें जरा निवांत होईल तर थोडी झोंपही लागेल."

नंतर त्या दोघींनीं तिच्या गिर्द्या, उशा नीटनेटक्या ठेविल्या व त्या खालीं गेल्या. तेथें दोघींचें जुंपलें. मावशीबाई घाबरल्या ह्मणून सारजा त्यांना नांवें ठेवूं लागली. त्या म्हणत—जन्मापासूनच जर स्वभाव भितरा तर त्यांत आपला तरी काय दोष? असें चाललें, इतक्यांत माडीवरून कोणी ओरडल्याचें ऐकूं आलें. त्याबरोबर सारजा वर गेली व लागलीच परत आली:—"विश्राम बंधूंपैकीं कुणाला तरी आणणें अगदीं भाग आहे. कसेंही होवो. मी जाऊन त्यांना घेऊन येतेंच. कलावतीला जरा जास्त आहे." असें ती बाहेर जात जात ह्मणाली.

मावशीबाईनीं उत्तर केलें:—"मग इकडे पहा, ए सारजे, अग ऐकून तरी घे. ती ह्मणते आपण विश्राम डॉक्टरचें औषध घेणार नाहीं ह्मणून. आणि तूं तर त्यांना आणायला निघालीस. पण त्यांच्या फीचे पैसे कोण देणार? नाहीं तर तूं माझ्याकडे मागशील."

सारजा ह्मणाली:–"काय हो मावशीबाई ! तुमच्यापुढें तर शर्थ झाली ! एखादी बाई अशी आजारी पडून अत्यवस्थ झाली तर मी नाहीं तुमच्या-सारखी पैशाकडे पाहणार. बरें, मी जातेंच. तुह्मी माडीवर जाऊन तिच्या-जवळ बसा. तेवढें तरी करा, जा."

सारजा भराभर पावलें टाकीत निघाली. विश्राम बंधूंचीं घरें एका शेजारीं एक अशीं असून मावशीबाईचें घर व गाड्यांचा अड्डा यांच्या मधोमध होतीं. वडील बंधूचें नांव विश्वासराव. ते मोठ्या घरांत राहत असत. ह्या घरांतच शस्त्रक्रियेचीं हत्यारें, यंत्रें, व औषधोपयोगी सामान ठेविलेलें होतें. ह्या घरास लागूनच दुसरें एक लहान घर होतें, त्यांत धाकटे बंधु प्रतापराव राहत. विश्वासरावांना बरींच मुलेंबाळें होतीं, पण प्रतापरावांना मात्र एकच मुलगा होता.

विश्वासरावांच्या घराचा दरवाजा उघडाच असून समोर एक लख्ख दिवा टांगलेला होता. सारजा लगबगीनें दवाखान्यात गेली. तेथें एक तेरा चौदा वर्षांचा सुकुमार तरतरीत मुलगा खलबत्त्यांत कांहीं औषधें कुटीत उभा होता. त्याचा चेहरा म्हणण्यासारखा सुंदर नव्हता. तरी त्याचें तें रुंद व विस्तीर्ण कपाळ, चेहऱ्यावर दिसून येणारी बुद्धीची चलाखी व विशाळ आणि पाणीदार डोळे यायोगानें त्याची मुद्रा फारच मोहक दिसत होती. हाच प्रतापरावांचा एकुलता एक मुलगा वसंत.

सारजा आंत येतांच तिच्याकडे वळून तो म्हणाला, "कोण, सारजाबाई, तुह्मी कां ? अशा एकाएकीं गुपचूप कां आलांत ? मला वाटलें भूतच आलें !"

"मी घाईघाईनें आलें रे वसंत. डाक्टरसाहेब आहेत का घरीं ?"

"बाबा आहेत, काका मात्र नाहींत."

"कोणाची तरी गांठ पडली पाहिजे. लवकर त्यांना बोलावून आण."

वसंत उड्या मारीत गेला व लवकरच प्रतापरावांना घेऊन आला. प्रतापरावांचा स्वभाव फार विनोदी, व त्यांची मुद्रा नेहमीं आनंदी असे. ज्या रोग्यांना ते औषध देत त्यांना ते कधींही दुःखी होऊं देत नसत.

नेहमीं उल्हासवृत्तींत राखीत. ही एक औषधयोजनेची मख्खीच आहे ते थट्टेनें ह्मणालेः—

" काय, सारजाबाई, आपलें काय ह्मणणें आहे? एखादा दांत उपटून काढावयाचा ? "

" आपणांस कांहीं सांगावयाचें आहे."

वसंताला इतकी सूचना पुरेशी होती. बाहेर जाण्यास सांगण्याची वाट न पाहतांच तो दवाखान्यांतून बाहेर गेला. नंतर सारजेनें कच्ची हकीकत सांगितली. ती ऐकून प्रतापराव कांहीं वेळ स्वस्थ बसले. ते मुळींच बोलले नाहींत. त्यांची मुद्रा गंभीर झाली. नंतर ते ह्मणालेः—"सारजाबाई, तुला सांगतों. आनंदरावांचे रोगी आपण सहसा पतकरणार नाहीं. हें पहा, त्यांना असें वाटेल कीं अगोदरच आपणाकडे फारसे रोगी येत नाहींत आणि जे येतात त्यांतही आह्मी खो घालतों. पण आमचा तसा हेतु बिलकुल नाहीं. आम्हा सर्वांचा धंदा चांगला चालेल इतका हा गांव मोठा आहे."

" तें सगळें खरें; पण त्या बिचारीची काय वाट? ती मरणार तर!"

" मरणार! छे छे छे! देव तिचें भलें करो!"

" पण आपण किंवा विश्वासराव कुणीच जर तिला पहायला येत नाहीं तर ती खास मरणारच. आनंदरावांचा तिला उपयोग होणें शक्य नाहीं. कारण ते या वेळीं इथें नाहींत. मुंबईला गेले आहेत."

सारजेचें ह्मणणें रास्त आहे असें आतां प्रतापरावांना वाटूं लागलें. येथून शंभर सव्वाशें मैलांवर मुंबईत जर आनंदराव आहेत तर दत्तापुरांतील रोग्याला त्यांचा कसा उपयोग होईल? ते मान हालवून ह्मणाले "सारजाबाई, तूं ह्मणतेस तें बरोबर आहे. चल, मी तुझ्याबरोबर येतों, वयानें अगदीं लहान, असें ह्मणतेस नाहीं का? तिचा नवरा कोठें असतो?"

तिचा नवरा कोठें दूर देशीं असतो वगैरे हकीकत मावशीबाईनीं सारजेला सांगितली होती, तीच तिनें प्रतापरावांना सांगितली. नंतर ती ह्मणालीः— " एखादी सुईण नाहीं का मिळणार? मावशीबाईसारखी वेडी बायको

मीं नाहीं कुठें पाहिली. आजारी मनुष्य पाहिलें कीं त्या अगदीं घाबऱ्या होतात."

"सुईणींना काय तोटा? हव्या तितक्या मिळतील. पण त्याला अजून पुष्कळ अवकाश आहे." असें ह्मणत ह्मणत प्रतापराव दवाखान्यांतून बाहेर पडले. "वसंत, काका बाहेरून आले ह्मणजे त्यांना सांग मी मावशीबाईच्या घरीं गेलों ह्मणून. त्यांच्या बिऱ्हाडीं कोणी पाहुणीबाई आली असून ती अजारी आहे असें सांगून ते निघाले.

सारजा पुढें झाली व प्रतापरावांच्या पूर्वींच ती घरीं येऊन पोंचली. माडीवर जाऊन पाहते तर कलावती कायसें लिहीत बसली होती. सारजेनें आश्चर्यानें ह्मटलें:—"बाई, तुमची तब्येत आतां जरा बरी दिसते."

"छे! बरी कशाची? जास्तच आहे. एकाएकीं मला आठवण झाली ह्मणून उठलें. माझ्या ओळखीच्या एक बाई आहेत त्यांना मला आत्तांच पत्र लिहिलें पाहिजे."

तिला वेदना होतच होत्या, त्यामुळें तिच्या अंगाला एकसारखा घाम येत होता. तिनें दोन तीन ओळीच लिहिल्या व पत्र एका पाकिटांत घालून पोस्टांत टाकण्याकरितां सारजेकडे दिलें. पत्र घेऊन सारजा ह्मणाली, "मी हें पत्र नेऊन टाकतें. पण आतां डाकेची वेळ होऊन गेली वाटतें."

"हरकत नाहीं. पण कसेंही करून पत्र आतां पोस्टांत पडूं दे ह्मणजे झालें; आणि हें पहा, तूं म्हणत होतीस त्या विश्राम डाक्टरांपैकीं कुणाला तरी येतांना भेटून इकडे यायला सांग. मला फार घाबरेपणा वाटूं लागला आहे."

सारजा आनंदानें ह्मणाली:—"मी त्यांच्याकडे जाऊन आलें. ते माझ्या मागोमाग येत आहेत. विश्वासराव घरीं नव्हते; म्हणून प्रतापरावांना घेऊन आले. दोघेही भाऊ फार संभावीत आहेत. प्रतापरावांचा स्वभाव किती पण छान आहे! ते तुह्मांला खास पसंत पडतील."

सारजा पत्र घेऊन निघाली. जातां जातां तिनें त्या पाकिटावरील पत्ता वाचला. मुंबईतील कोणा 'दर्याबाई'चें नांव वर लिहिलें होतें. दरवाजांत

प्रतापरावांची गांठ पडली. त्यांना ती ह्मणाली: "बाईनीं एक पत्र पोस्टांत टाकण्यास दिलें आहे. पण आतां उशीर नाहीं कां झाला ? "

खिशांतील घड्याळ पाहून प्रतापराव म्हणाले:—" डाक बंद होण्यास अजून थोडा अवकाश आहे. जलदीनें गेलीस तर डाक साधेल, पहा."

सारजा चपळ होती. ती झपाझप पावलें टाकीत पोस्टांत जाऊन पोंचली. डाक बंद होण्यास दोन मिनिटेंच अवकाश होता.

इकडे प्रतापराव डॉक्टर जिना चढून माडीवर गेले; मावशीबाईनीं त्यांना कलावतीकडे नेलें. कलावतीची मुद्रा चिंताक्रांत असून तिचे डोळे दरवाजाकडे लागले होते. डॉक्टर आंत आल्याचें पहातांच तिला बरीच हुषारी वाटली. ते तिच्याजवळ जाऊन नाडी पाहूं लागले. ती वयानें इतकी लहान असलेली पाहून त्यांना आश्चर्य वाटलें. " बाई, तुम्हांला काय होतें तें मला सर्व सांगा, " ते म्हणाले.

कलावतीच्या डोळ्यांतून अश्रुधारा चालल्या. ती हळूंच ह्मणाली, "मला फार वेदना होत आहेत, सोसवत नाहींत. मी यांतून जगेन काहो ? का मरणार ? "

प्रतापराव विनोदानें म्हणाले:—"मरणार ? छे. त्याला अद्याप पन्नास साठ वर्षें तरी गेलीं पाहिजेत. मग मरणाची गोष्ट बरें. थोड्याशा शांत होऊन काय होत आहे तें मला नीट सांगा."

ती ह्मणाली, "माझ्यावर आपले फार उपकार आहेत. आपण मोठे दयाळू दिसतां. तरी पण, मला अगोदर—माझ्या बोलण्याचा राग येऊं देऊं नये,——मला अगोदर इतकें सुचवून ठेविलें पाहिजे कीं, त्या मुंबईहून आलेल्या आनंदराव डॉक्टरांचें मी औषध घेणार आहें. कारण ते इथें नाहींत हें मला समजण्यापूर्वींच मीं त्यांना इकडे येण्याबद्दल चिठ्ठी पाठविली. या गांवांत माझें कुण्णी ओळखीचें नाहीं. हे डॉक्टर हुषार आहेत असें माझ्या मैत्रिणीकडून समजलें होतें. "

" ठीक आहे. तसें कां होईना. ते परत येईपर्यंत मी औषध देतों. ते आले ह्मणजे मी तुह्मांला त्यांच्या स्वाधीन करीन. मग तर झालें कीं नाहीं ? पण बाई, तुम्ही अशा एकट्या कशा आलां ? "

" आल्यें एवढें खरें. माझ्या दुर्दैवानें मी इथें एकटीच आलें. पण माझ्या एक ओळखीच्या बाई आहेत त्यांना येण्याबद्दल मीं आतां नुकतेंच पत्र घातलें आहे. त्या आल्या म्हणजे मग मला कांहीं काळजी नाहीं. अजून दोन महिने तरी जातील असें मला वाटत होतें."

प्रतापरावांनीं उत्तर केलें:—" आणि बहुतकरून जातीलही. ईश्वरी सूत्र ! त्याचा काय नेम आहे ? बाई, तुमच्यासभोंवतीं चार मुलेंबाळें खेळूं लागतील, तेव्हां तुम्हांला वाटेल कीं, आपणांला पूर्वीं व्यर्थ भीति वाटत होती. तुमचे यजमान कोठें प्रवासांत आहेत म्हणे. खरें का ?"

' होय ' असें कलावतीनें मानेनेंच दाखविलें. पण तिची भीति निष्कारण नव्हती. तिला जास्तच वेदना होऊं लागल्या व तिची तब्येत क्षणोक्षणीं जास्तच बिघडत चालली. इतक्यांत सारजाही पोस्टांत पत्र टाकून परत आली. प्रतापराव खोलीच्या बाहेर येऊन तिला म्हणाले:—

" सारजाबाई, आतां तुझाच कांहीं तरी मला उपयोग होईल, मावशीबाई अगदीं निरुपयोगी. पहा. त्या बाईची ट्रंक उघड. आंत कांहीं मुलाचे कपडे वगैरे जिन्नस आहेत असें ती म्हणत होती. हं, आटप."

सारजा ह्मणाली:—" मी काय पाहिजे तें करायला तयार आहें, पण मावशीबाईपुढें मात्र हद्द आहे ! मला त्यांचा असा राग येतो ! "

" ह्या नाहीं तर त्या रीतीनें मी त्यांच्याकडून काम करून घेतों. कुठें आहेत त्या ? आत्तां येथें होत्या."

" जिन्याच्या अगदीं खालच्या पायरीवर चिंताक्रांत होऊन बसल्या आहेत. "

प्रतापराव बाहेर येऊन मोठ्यानें ओरडले; "मावशीबाई, अहो मावशीबाई, तुह्मांला तो पिंवळा वाडा माहीत आहेना ? तेथें जाऊन मैनाई सुइणीचा शोध करा आणि तिला सांगा, प्रतापराव डॉक्टरांनीं तुला असेंच बोलावलें आहे ह्मणून. ऐकूं आलें का ? जा तर लवकर. इथली हकीकतही तिला सांगा. चला." त्या गांवांतील आणखी कांहीं सुईणींचीं नांवें प्रतापरावांच्या लक्ष्यांत आलीं. पण मैनाईशिवाय या वेळीं दुसरी कोणी मिळेल असें त्यांना वाटलें नाहीं.

घरांतून बाहेर जावयास सांपडलें ह्मणून मावशीबाईंना बरें वाटलें. त्या लागलीच बाहेर पडल्या आणि थोडक्याच वेळांत एक खुजी, गलेलठ्ठ व मध्यम वयाची बाई बरोबर घेऊन आल्या.

तिला पाहून प्रतापराव ह्मणाले:—" मैनाई, मी तुला बोलावणार नव्हतों, पण नाइलाज ह्मणून बोलावणें पाठविलें. तुझी काय खोड आहे तुला माहीत आहेना ? या वेळीं जर पुनः त्याचप्रमाणें करशील तर मी किंवा दादा तुला पुनः ह्मणून कधींही बोलावणार नाहीं. ध्यानांत ठेव. एरव्हीं तूं फार हुषार आहेस, मनावर घेतलेंस तर कामगिरी कशी सुरेख करशील, पण बेतानें राहशील तेव्हां ! "

मैनाई आपणास वाईट वाटल्यासारखें दाखवूं लागली. तिनें डोळे चोळून चोळून कसेबसे एक दोन थेंब काढले व आपण फाजील कैफ घेण्याचें मुळींच सोडून दिलें आहे असें मोठ्या आर्जवानें सांगितलें.

त्या रात्रीं मावशीबाईंच्या घरीं स्वस्थता ह्मणून नव्हतीच. उजेडल्यावर मात्र जिकडे तिकडे सामसूम झालें. कारण पहाटेच्या वेळीं कलावतीची नीटपणें सुटका होऊन मुलगा झाला.

रात्रभर सारजा कलावतीच्या बाजेजवळून किंचित् सुद्धां हालली नाहीं. कलावतीला ज्या यातना झाल्या त्याबद्दल सारजेचें मन खरोखरच कळवळत होतें. हें पाहून कलावतीच्या मनांतही सारजेविषयीं प्रेमभाव उत्पन्न झाला.

सकाळीं प्रतापराव जावयास निघाले, तेव्हां सारजेनें त्यांना विचारिलें:— " डॉक्टरसाहेब, आतां तिला बरें वाटेल नाहीं ? "

प्रतापरावांनीं उत्तर केलें:—" हो हो, विचारतेस काय ? निभावलें; आतां काळजी करण्याचें कांहींच कारण नाहीं. पण त्या मैनाईकडे मात्र लक्ष्य असूं दे बरें का ? ती माझ्यासमोर आहे तोंपर्यंत बेतावर असते. दोन तासांच्या आंत मी परत येतों."

तो दिवस चांगला गेला. मैनाईनें बाळबाळंतिणीची व्यवस्था उत्तम ठेविली. सारजा तर बाजेजवळ बसूनच राहिली होती. तिसऱ्या प्रहरच्या सुमारास कलावती सारजेला ह्मणाली:—

" सारजाबाई, हें घे. हें यापुढें तुझें आहे."

" हें काय बाई ? इतका बहुमोल दागिना घेऊन मी काय करूं ? तो माझ्या उपयोगी नाहीं व मला तो शोभणार देखील नाहीं. मला नको तो."

" का बरें ? हा दागिना तुला चांगला शोभेल व तो तुला द्यावा असें मला मनापासून वाटत आहे. यापेक्षांही माझ्यावर तुझे जास्त उपकार आहेत. तूं नसतीस तर माझी काय अवस्था झाली असती कोण जाणे. सारजाबाई, हें मंगळसूत्र तूं आपल्या पेटींत नेऊन ठेव जा."

तिचे उपकार स्मरून सारजा ह्मणालीः—

" बाई, मी तुमची फार ऋणी आहें. याची फेड कशी करतां येईल मला समजत नाहीं. हा दागिना मी मरेपर्यंत माझ्याजवळ बाळगीन; क्षणभर सुद्धां त्याला विसंबणार नाहीं."





# प्रकरण ३ रें.

——:o:——

## ‘ स्टेशनावर भेट. ’



मुंबईहून ह्या स्टेशनावर एक आगगाडी संध्याकाळीं पावणेसात वाजतां येई. ह्याच गाडींतून, कलावतीनें काल ज्या बाईंना पत्र पाठविलें होतें, त्या बाई येणार होत्या; म्हणून तिचें सर्व लक्ष्य तिकडे लागलें होतें. स्टेशनावरून दत्तापूर गांवांत यावयास अर्धा पाऊण तास लागे. तीही वेळ होऊन गेली. रात्रीचे आठ वाजले, तरी येणाऱ्या बाईंचा पत्ता नाहीं. दहाचे ठोके पडले तरी देखील ठिकाण नाहीं. आतां मात्र कलावतीला चैन पडेना. काल पाठविलेलें पत्र त्या बाईंना आज सकाळीं पोंचलें असेल; त्या ताबडतोब निघाल्या असत्या तर आतांच्या गाडीनें यायला पाहिजे होत्या, मग कां बरें राहिल्या ? हेंच तिला गूढ पडलें. पत्र वेळेच्या आंत टपालांत पडलें नसावें अशी एक शंका तिला आली, म्हणून तिनें सारजेला विचारलें. पण ‘ पत्र वेळेवर टपालांत पडलें, त्याची काळजी नको, रात्रींही एक गाडी मुंबईहून निघते. कदाचित् त्या गाडीनें त्या निघून सकाळीं येतील. ’ असें सारजा तिला धीर देऊन म्हणाली.

कलावती थोडासा विचार करून म्हणाली, “ सारजाबाई, माझें हें तान्हें बाळ जगेल वांचेल काय ग ? ”

" इश्श ! हें काय विचारणें ? मूल अगदीं लहान आहे खरें, पण निरोगी आहे. तुम्ही त्याला दाईच्या स्वाधीन न करतां अंगावरच घ्याल तर मग मुळींच भीति नाहीं. "

कलावतीनें उत्तर केलें, " तसें करतां यायचें नाहीं हें मीं तुला सांगितलेंच आहे; तसें करणें मला हितकर होणार नाहीं. दर्याबाई आल्या म्हणजे त्या सर्व व्यवस्था करतील. म्हणूनच मी त्यांच्या येण्याबद्दल इतकी उतावळी झालें आहें. खरेंच सारजाबाई, माझी नीटपणें सुटका झाली आणि मुलगा झाला याचा मला केवढा आनंद वाटत आहे म्हणून सांगूं ? "

" बाई, फार बोलायचें नाहीं, असें डॉक्टरनीं सांगितलें आहे. "

" कां बरें ? मला आतां पुष्कळ बरें वाटत आहे. प्रतापराव डॉक्टरचें मीं औषध घेतलें हें किती चांगलें झालें ? ते फार मायाळू आहेत; आल्यापासून जाईपर्यंत एकसारखे माझ्या मनाला धीर देत असतात. "

" प्रतापराव लोकांना इतके आवडतात त्याचें कारण हेंच. "

" यांत कांहीं संशय नाहीं. ते मुंबईचे आनंदराव डॉक्टर आले असते तर त्यांनीं तरी असें जास्त काय केलें असतें ? "

ती रात्र निघून गेली. दुसरे दिवशीं ( म्हणजे रविवारीं ) सकाळीं दर्याबाई येऊन दाखल झाल्या. दर्याबाई दिसण्यांत रासवट, वयानें अर्धी अधिक झालेली, स्वभावाची भारी तुसड अशी बायको होती. येणार येणार म्हणून गाजत होतें त्या ह्याच बाई. असें सर्वांना वाटलें. कलावती कांहींच बोलली नाहीं; पण दर्याबाईना आंत बोलावून खोलीचें दार मात्र त्यांच्याकडून तिनें घट्ट लावून घेतलें.

पूर्वीं सांगितलेंच आहे कीं एका खोलींतून दुसऱ्या खोलींत जाण्यास आंतून दार होतें. शिवाय त्या प्रत्येक खोलीस पुढच्या बाजूनें ग्यालरींत येण्यास एक वेगळें दार होतें. घराच्या मानानें ही ग्यालरी बरीच मोठी होती. ह्या ग्यालरींत दोन्ही खोल्यांच्या दरम्यान भिंतींत एक लहानशी चोर खोली होती.

बाहेरच्या खोलींत मैनाई सुईण व सारजा अशा दोघी होत्या, व आंतील खोलींत बाळंतीण व ती नवखी आलेली दर्याबाई अशा दोघीजणी

बोलत बसल्या होत्या. आंतून त्यांच्या बोलण्याचा आवाज बाहेर ऐकूं येत होता. जणू काय त्यांचें भांडणच जुंपलें आहे असें त्यांना वाटलें. दर्याबाईंच्या आवाजावरून त्या कसलें तरी गाऱ्हाणें गात होत्या, रडत होत्या व मनाची समजूत घालीत होत्या असें वाटलें. बाळंतिणीचे रागाचे शब्द प्रत्युत्तरादाखल येत होते. मैनाईचा स्वभाव थंड असल्यानें तिला त्या भांडणाचें कांहींच वाटलें नाहीं; पण सारजेला मात्र भीति पडली. ह्या भांडणानें कदाचित् अगोदरच आजारी असलेल्या बाळंतिणीची तब्येत जास्त बिघडेल असें तिला वाटलें. परंतु आंत जाऊन तंटा मिटविण्याची तिची छाती होईना. कारण कीं आम्ही दोघी आंत असेपर्यंत कोणींही आंत येऊं नये असें कलावतीनें त्यांना अगोदरच बजाविलें होतें. थोडक्याच वेळानें खोलीचें दार खाडकन् उघडलें व दर्याबाईंची स्वारी एकदाची बाहेर येऊन धडकली.

मैनाई त्या तान्ह्या मुलास घेऊन हालवीत बसली होती, व सारजेनें हातांत एक कातरी घेऊन टोपीची झालर कातरण्याला आरंभ केला होता. दर्याबाईंनीं चट्दिशीं त्या मुलाला उचलून घेतलें व उजेडांत जाऊन त्याजकडे त्या निरखून पाहूं लागल्या. बाळंतिणीच्या खोलीकडे आपली मान करून त्या सारजेला म्हणाल्याः—

" तिच्यासारखा कांहीं याचा तोंडावळा नाहीं. "

" इतक्यांतच कसें बाई तुम्हांला समजलें ? मूल किती तरी लहान आहे ! "

" लहान तर खरेंच. मांजराचें पिलूं दिखील याहून मोठें असतें. पण म्हणून कांहीं ओळखायला येत नाहीं असें नाहीं. " मैनाई खोलींत जात होती ती मध्येंच म्हणालीः " दिवस भरायच्या आधीं उपजलेलें मूल पैलवान् का असेल ? चमत्कार आहे बाई ! "

दर्याबाई संतापल्याः—" खरेंच ! याचे दिवस पुरे भरले नाहींत ! मग सांगितलें होतें कुणीं हिला इकडे निघून यायला, नि त्या भिकार गाडीचे धक्के खायला ? माझें डोकें तर त्या हादऱ्यानें एकसारखें ह्या बाजूवरून त्या बाजूस आदळत होतें. मग त्या बिचाऱ्या सुकुमार पोरीची

काय बरें अवस्था झाली असेल ? एक मैलभर खळगेच खळगे, तर दुसऱ्या मैलांत सर्व दगडच. मला वाटतें, रस्तादुरुस्तीकडील कामगार खुशाल बिछान्यावर घोरत पडले असावेत."

सारजा म्हणाली:—"रस्ता खराब म्हणून लोकांची एकसारखी ओरड चालली आहे. मी असें ऐकतें कीं पहिल्यानें आनंदरावांनींच अर्ज केला; ह्या रस्त्यापासून सर्वांसच व विशेषतः घोड्याच्या गाडीस अपाय होत आहे; सबब रस्ता लवकर दुरुस्त व्हावा म्हणून. नंतर हे दगड रस्त्यावर येऊन पडले आहेत. त्या योगानें रस्ता जास्तच वाईट झाला आहे."

"आनंदराव कोण ?"

"ते इथें मुंबईहून आलेले एक नवीन हुषार डाक्तर आहेत."

"तर मग त्यांची सुद्धां तक्रार त्यांनीं ऐकली नाहीं ?"

"तें कां ? त्यांच्या तक्रारीचा विचार झाला आणि म्हणून तर हे दगड इथें येऊन पडले आहेत. त्यानंतर मात्र रस्त्याची कांहींच दुरुस्ती झालेली नाहीं."

नंतर मैनाईस उद्देशून दर्याबाई म्हणाल्याः—

"मला त्या मेलीचें तोंड पाहूं नये असें वाटतें."

"म्हणजे ? तोंडावरूनच का लोकांची परीक्षा करायची ? तिचा स्वभाव कांहीं वाईट नाहीं. जरा थट्टेखोर आहे. ती जर बेतावर असली तर मात्र तिच्यासारखी सुईण मिळायची नाहीं. लोकांना ही तिची खोड माहीत आहे म्हणून तेवढ्यापुरते ते तिच्याशीं जपून असतात." असें सारजा बोलली.

"तूं कोण ? दुसरी सुईणच का ?"

"नाहीं बाई; मी शेजारीण आहें. बाळंतीण बाईला माझ्याशिवाय करमत नाहीं. आणि मींही म्हटलें कांहीं दिवस तिच्याजवळ रहावें म्हणून. माझें घर अगदीं शेजारीं लागूनच आहे. म्हणून मला पाहिजे तेव्हां येतां जातां येतें. बाई मात्र फार चांगली आहे बिचारी.

"हो, ती मोठ्या कुळांतली, गर्भश्रीमंताची मुलगी आहे. पण तिचें

लग्न झालें तें झालें नसतें तर फार बरें झालें असतें. पण मजा ही कीं नवऱ्याविरुद्ध कोणी ब्र काढलेला तिला खपत नाहीं.

" तो येईल का इथें ? "

" येईल किंवा न येईल. त्याच्या मर्जीची गोष्ट. ती पंचाईत कुणालाच करण्याचें कारण नाहीं. मुलाचीं दुपटींबिपटीं कुठें आहेत ? त्यांचें मला एक बोचकें बांधलें पाहिजे. बाटलींत दूध भरून घेतलें पाहिजे. "

" म्हणजे ? मुलाला तुम्ही आपल्याबरोबर नाहीं ना घेऊन जात ? " सारजेनें आश्चर्यानें विचारिलें.

" मी बरोबर घेऊन जाणार. संध्याकाळीं गाडी निघते त्या गाडीनें मी जाईन. मूल चांगलें दुपट्यांत गुंडाळून घेतलें व डब्यांत बसून दारें लावून घेतलीं ह्मणजे मुलाला कांहीं होणार नाहीं. ही खोली व गाडी सारखीच."

कलावतीनें केलेल्या व्यवस्थेसंबंधानें आक्षेप घेणें किंवा त्या पाहुणी बाईला विशेष चौकस प्रश्न करणें आपलें काम नव्हे असें सारजेला वाटून ती उगी राहिली.

मैनाई बाळंतिणीच्या खोलींतून बाहेर येऊन म्हणाली:—" बाई, तुम्ही काल येणार होतां ना ? आम्हीं किती वाट पाहिली ? "

" हो, काल येणार होतें, पण यायला झालें नाहीं म्हणून आलें नाहीं. "

इतक्यांत प्रतापराव डॉक्टरांचीं पावलें जिन्यांत वाजलीं. ते माडीवर येऊन परभारेंच बाळंतिणीच्या खोलींत गेले. कलावतीला त्रास झाल्यामुळें तिचा चेहरा संतप्त झाला होता. हें पाहून डॉक्टरांना आश्चर्य वाटलें. कारण ते सकाळीं निघून गेले तेव्हां ती शांत व हुषार दिसत होती. ते जरा मोठ्यानें म्हणाले:—" तुम्हीं आपल्याशीं कसला विचार चालविला आहे ? "

कलावती म्हणाली:—" माझें आंग थोडें तापलें आहे असें वाटतें. आपणाला सांगत होतें त्या बाई आल्या आहेत. मी इकडे एकटीच निघून आलें, म्हणून त्यांनीं मला उपदेशाचें व्याख्यान दिलें. याकरितां मी त्यांच्यावर रागावलें. "

प्रतापराव जरा त्रासल्यासारखे दिसले:—" सकाळीं तुम्हांला किती

हुषारी वाटत होती बरें ? पण अशानें तुमची तुम्हींच प्रकृति बिघडून घेत आहांत. बरें असो. मी तुम्हांला आतां एक दुसरेंच औषध पाठवून देतों. परंतु एवढें मात्र लक्षांत ठेवा कीं अजून एक दोन दिवस तरी कोणाशीं फार बोलण्याची किंवा त्रास करून घेण्याची तुम्हांला बंदी आहे, समजलें ? ”

कलावतीनें ती गोष्ट कबूल केली. नंतर मुलाला दाईच्या स्वाधीन करणार असें तिनें डॉक्टरांना सांगितलें. परंतु ते म्हणाले कीं तुम्ही स्वतः-च त्या मुलाला अंगावर ध्याल व संभाळाल तर तुम्हांलाही चांगलें व त्या मुलालाही चांगलें. पण कलावतीस तें रुचलें नाहीं. ती म्हणाली, मूल आपणाला संभाळतां येणार नाहीं अशीच स्थिति आहे. शिवाय ही गोष्ट आपल्या यजमानासही पसंत पडणार नाहीं. डॉक्टर यावर कांहींच बोलले नाहींत. फक्त ‘तुम्ही आपल्या मनाला त्रास करून घेऊं नका. त्यानें प्रकृति बिघडेल,’ इतकें सांगून ते निघून गेले.

बैलगाडी त्या दोन मैल भिकार रस्त्यानें स्टेशनावर पोंचण्यास एक तास लागे. आदुल्यांत सांगून ठेविलें म्हणजे उतारूंच्या दारासमोर ती गाडी वेळेवर येऊन उभी राही. दर्याबाई संध्याकाळीं साताच्या गाडीला जाणार म्हणून वर्दी गेली होतीच. त्याप्रमाणें सहा वाजल्याबरोबर गाडी येऊन मावशीबाईच्या घरासमोर उभी राहिली. लागलीच दर्याबाई मूल घेऊन गाडींत चढल्या. एका बोजक्यांत त्यांचीं लुगडीं, मुलाचीं दुपटीं वगैरे बांधलेलीं होतीं.

त्या दिवशीं गाडींत दुसरे कोणीही उतारू नव्हते, फक्त दर्याबाई एकट्याच होत्या. गाडींत पुरेसें ओझें नसल्याकारणानें ती आतां जास्तच हादरूं लागली. त्यामुळें दर्याबाईचीं हाडें न हाडे खिळखिळीं झालीं. कोठें धरतील म्हटलें तर हात सुद्धां रिकामे नव्हते. एका हातांत त्यांनीं त्या मुलाला घेतलें होतें, व दुसऱ्या हातानें बोजकें वगैरे सामान त्या संभाळीत होत्या. त्यांनीं त्या गाडीवानाला शिव्यांची लाखोली वाहिली. ‘मेल्या, गाडी सावकाश हांक, माझें डोकें आपटलें, पाठीचीं हाडें सैल झालीं, तूं कोण माणूस कीं, जनावर ?’ पण एक ना दोन. गाडीवान

तिकडे लक्ष्य कशाला देतो ? स्वारी आपल्याच तारेंत. गाडी हादरूं दे किंवा नको, उतारूंना असल्याच गाडींतून जाणें भाग. नाहीं तर स्वतःची गाडी त्यांनीं बाळगली पाहिजे, ही गोष्ट त्याला पुरतेपणीं कळून चुकली होती, म्हणून तो बराच बेफिकिर झालेला होता. गाडी कशीबशी एकदाची स्टेशनावर पोंचली आणि दर्याबाई खालीं उतरल्या. त्या संतापानें तांबड्या लाल झाल्या होत्या. गाडीची व गाडीवानाची पक्की खोड मोडली पाहिजे, त्याच्यावर फिर्याद केली पाहिजे, असें म्हणून त्या ताड ताड निघाल्या. फिर्याद कोणाकडे करवयाची हें सुद्धां भान त्यांना राहिलें नाहीं. स्टेशनावरील एक हमाल तेथें उभा होता. त्याला दर्याबाईनीं खरडलेलें अंग दाखविलें. पण तो म्हणाला, ' त्या तुमच्या गाडीशीं किंवा गाडीवानाशीं आपला कांहीं संबंध नाहीं. ' हें ऐकतांच दर्याबाई हिरमुसल्या व त्यांना जास्तच चिरड आली. पण उपयोग काय ? दर्याबाईची दाद घेणारा तेथें कोणीच नव्हता. त्या मुकाट्यानें आपलें सामान घेऊन एका बाकावर जाऊन बसल्या.

इतक्यांत मुंबईची गाडी भक् भक् करीत स्टेशनांत येऊन दाखल झाली व चटाचट् उतारू बाहेर पडून निघून गेले. एक गृहस्थ मात्र थोडा वेळ इकडे तिकडे हिंडून बाकावर बसावें म्हणून तिकडे निघाले. पण लांबूनच तेथें कोणी बसलेलें आहे असें पाहून ते तोंडानें शीळ घालीत रस्त्याकडे पहात उभे राहिले.

हे गृहस्थ कोण असावें बरें. अंधारामुळें लांबून जरी अस्पष्ट दिसतें तरी आपणाला जवळ जाऊन पाहिलें म्हणजे समजेल. हं हं, हेच आनंदराव डॉक्टर. त्या बाळंतिणीनें प्रथम ज्यांना चिठी पाठविली तेच हे ' डॉक्टर आनंदराव देशमुख शस्त्रवैद्य. ' हे गृहस्थ मध्यम उंचीचे, अंगानें सडपातळ, वयानें तरुण, चोवीस पचवीस वर्षांचे होते. नाक, डोळे, ठसटसीत असून एकंदर चेहरा मोठा मोहक होता. दिसण्यांत सुद्धां ते फारच सभ्य दिसत.

ते शीळ घालीत रस्त्याकडे पहात कां उभे राहिले होते बरें ? त्यांनीं आपली शिग्राम गाडी स्टेशनावर मागिवली होती. पण त्याप्रमाणें ती अ-

चाप आली नसल्यानें ते वाट पहात उभे होते, व वेळ जावा म्हणून त्यांनीं तोंडानें शीळ घालण्याचा सपाटा चालविला होता. चार दोन मिनिटें वाट पाहून आनंदरावांची स्वारी पुनः त्या बाकाकडे वळली, व तेथें बसलेल्या बाईकडे त्यांनीं नीट न्याहाळून पाहिलें. परंतु तिनें मात्र त्यांच्याकडे ढुंकून सुद्धां पाहिलें नाहीं. ती रागानें चरफडत होती. चांगला उजेड नसल्यानें एकमेकांस चेहरा स्पष्ट दिसेना. पण तीं दोघेंही अनोळखी असल्यामुळें त्याचें त्यांना कांहीं वाटलें नाहीं. पुनः आनंदराव जाऊन आपल्या शिग्राम गाडीची वाट पहात उभे राहिले. इतक्यांत एक गाडीवान तेथें आला. त्यांची शिग्रामगाडी आली नाहीं असें समजतांच तो मोठ्या अदबीनें आनंदरावांना म्हणालाः– " व्हयजी डाक्टर साब, बसा कीं माज्या गाडींत; मोकळीच हाय. अकशी फुलावाणी न्हेतु बघा. "

" नकोरे बाबा, मी एकदां तुझ्या गाडींतून गेलों होतों, तेव्हां माझी कणीक तूं चांगलीच तिंबलीस. आतां पुनः नको माझ्यावर मेहेरबानी करूं. "

" न्हाईजी तवा तुमीबी नव, मीबी नवा, अन् माझी गाडी बैलबी नवी हुती, म्हन तसं झालं. पुन आतां बसून तरी बगा, हामच्या दत्तापुराला येणार जाणार समद साहब अंमलदार माज्याच गाडींमंदी बसत्यात, तवा बगा वाऱ्यासारकी गाडी न्हेतु वाऱ्यासारकी. "

" नको नको. ते आले तर त्यांनाच घेऊन जा. माझी गाडी आली नाहीं तर मी आपला चालत जाईन. पायच काय दुखतील ते दुखतील; सगळीं हाडें नकोत आणखी खिळखिळीं व्हायाला. "

आतां आपणास कोणी उतारू मिळत नाहींत अशी खात्री झाल्यामुळें गाडीवान आपली गाडी घेऊन गेला. मुंबईला जाणारी गाडी यावयास आतां दहा मिनिटें होतीं, सबब तिकीट काढावें म्हणून दर्याबाई तिकडे गेल्या. मूल दुपट्यांत गुंडाळलेलें तसेंच बाकावर ठेवलें होतें. इतक्यांत आनंदरावही शीळ घालीत पुनः बाकाजवळ आले. बाकावरून एक बारीक रडका आवाज त्यांना ऐकूं आला, त्याबरोबर त्यांची शीळ थांबली व तेही थांबले. रडण्याचा पुनः आवाज त्यांनीं ऐकला. कोणी लहान मूल रडत आहे असें वाटून ते बाकाजवळ आले व चाचपून पाहूं

लागले. त्यांच्या हाताला कांहीं मऊ व गरम असें लागलें. त्यांना कांहीं दिसेना म्हणून त्यांनीं आपल्या खिशांतील काड्यांची पेटी काढून एक काडी ओढिली व तिचा उजेड त्या मुलाच्या तोंडावर पाडला. इतकें लहान मूल आनंदरावांनीं आजपर्यंत कधीं पाहिलें नव्हतें. दर्याबाई तिकीट घेऊन आल्या तेव्हां मूल रडतच होतें. त्याबरोबर त्यांनीं तोंड सोडलें. दर्याबाई म्हणजे खडकावरला गाडा. त्या म्हणाल्याः—" तुम्हींच त्या मुलाला जागं केलंत. होय ना ? कांहीं अडलें होतें कीं काय ? रिकामी उठाठेव म्हणतात ती हीच. त्या मेल्या बैलगाडीचा त्रास तुम्ही लोक मुकाट्यानें सोसतां याचें मला राहून राहून आश्चर्य वाटतें. येरे माझ्या चिमुकल्या. अजूनी गाडी यायला थोडा अवकाश आहे. "

आनंदरावांनीं शांतपणानें उत्तर केलें, " कपड्याचें बोचकें दिसलें आणि त्यांतून माणसासारखा आवाज निघाला. जवळ तर कोणी नाहीं. मला वाटलें इथें कांहीं भुताटकीच आहे. खरोखरीच मूल आहे कीं, मांजराचें पिलूं आहे हें पहावें म्हणून मीं काडी ओढली. "

" मांजराचें पिलूंच तर काय. इतकें लहान मूल मीं नव्हतें कधीं पाहिलें. "

" दिवस पुरे भरावयाच्या आधीं हें मूल उपजलें असें वाटतें. "

दर्याबाईचा संताप कमी न होतां जास्तच वाढला. त्या म्हणाल्याः— " असें वाटतें का तुम्हांला ? आणखी काय काय वाटतें ? तुम्ही कोण हो टेकूजी आपलें मत देतां तें ? मुलाच्या संबंधानें आपल्याला काय काय माहीत आहे सांगा पाहूं. "

आनंदराव शांतपणानें ह्मणालेः—" बाई, तुम्हांला जितकी माहिती आहे तितकी तरी निदान मला आहे, खात्रीनें सांगतों. मीं किती तरी मुलांना सुरक्षितपणानें या जगांत आणलें आहे. "

" तर मग आपण डाक्तर आहांत वाटतें ? "

" होय. मी डॉक्टर आहें आणि डॉक्टर या नात्यानें मी तुम्हांला सांगतों कीं हें मूल अशा प्रकारें थंडीवाऱ्यांत नेण्यास योग्य नाहीं. "

दर्याबाई ह्मणाल्याः—" योग्य आहे असें मलाही वाटत नाहीं. पण

कित्येक गोष्टी योग्यायोग्यतेकडे न पाहतां कराव्या लागतात. समजलें कां डाक्तरसाहेब ? "

" हें मूल केव्हां उपजलें ? "

" काल सकाळीं. कायहो, ह्या बाजूला तुमचें कांहीं वजन नाहीं का ? विचारण्याचें कारण एवढेंच कीं जर असेल तर बैल-गाडीला अगदीं बंदी करून टाका. ती आदळते काय ! नि हिसके किती बसतात ! आंत बसणाराची अगदीं प्राणांतिक अवस्था होते. आज सकाळीं मी त्या गाडींत बसून दत्तापुरास गेलें. आणखीही माणसें होतीं. किती भिकार गाडी आहे याची तीं सुद्धां साक्ष देतील. पुन्हां संध्याकाळीं मी परत आलें मला वाटलें मी कांहीं आतां जिवंत रहात नाहीं. एकदां ह्या बाजूला डोकें आदळे तर एकदां त्या बाजूला आदळे. एकदां सर्व अंग नि अंग सुबके. खरेंच आतां आठन् आठ दिवस माझें आंग ठणकत राहील. गाडीवान तरी काय मेला दुष्ट चंडाळ ! मी जशी जशी ओरडें तशी तशी गाडी तो जास्तच जोरानें हांकी. तशांत हें लहान मूल संभाळायचें. तुह्मीच सांगा, कसें बरें माणसानें करायचें तें. "

" खरेंच. ही मोठ्या शरमेची गोष्ट आहे. आणि मला आश्चर्य वाटतें तें हेंच कीं या गांवचे लोक ह्याबद्दल अगदीं तक्रार कशी ती करीत नाहींत. एखादे दिवशीं भयंकर परिणाम होईल तेव्हां समजेल. "

दर्याबाई ह्मणाल्याः—" झालाच नाहीं तरी भयंकर परिणाम. परवांचे दिवशीं म्हणजे शुक्रवारीं एक अगदीं नाजुक व सुकुमार पोर त्या गाडींतून दत्तापुरला गली. आणि त्याचा परिणाम हें इतकें लहान मूल उपजलें ! "

" खरें कीं काय ? पुढें तिची काय हकीकत झाली ? "

" हकीकत कसली व्हायची ? ती सध्यां बरी आहे ह्मणा. पण कांहीं विपरीत झालें असतें तर ? "

आनंदराव मान हालवून ह्मणालेः—" हं हं. तिला विश्राम डॉक्टर औषध देतात तीच नव्हे काय ? त्या रावपुऱ्यांतील यादवांची मुलगी ना ? "

"छे. ती नव्हे. कुणी कां असेना. राजाची राणी असो अगर खाद्या गरीबाची मुलगी असो. व्हायचें तें तर झालें ना! पण त्या ाडीच्या मालकाला त्याचें काय! म्हणून म्हणतें त्याची चांगली खोड ोडली पाहिजे."

इतक्यांत मुंबईला जाणारी गाडी येऊन धडकली, व दर्याबाई लाला घेऊन डब्यांत जाऊन बसल्या. गाडी निघून गेली व आनंदरावही ाहेर येण्यास निघाले. त्यांच्या शिग्राम गाडीच्या चाकांचा व घोड्याच्या ापांचा आवाज लांबून त्यांना ऐकूं येऊं लागला.





# प्रकरण ४ थें.

—:o:—

## अपघात.





आनंदरावांची शिग्रामगाडी स्टेशनाच्या आगाशींत येऊन दाखल झाली. गाडी हाकण्यास एक झुबला व टोपी घातलेला पोऱ्या बसला होता. सारजा आनंदरावांच्या घरीं गेल्या वेळीं तिच्याशीं उद्दामपणानें ज्यानें वर्तन केलें तोच हा मुलगा खंडू. गाडी यावयाला उशीर लागला म्हणून आनंदरावांनीं त्याची चांगली खरडपट्टी काढली. नंतर ते गाडीवर चढून स्वतःच हाकावयास बसले. घोड्यास कमची मारल्याबरोबर गाडी बऱ्याच वेगानें चालूं लागली. साधारण निंमी मजल चालून आले असतील नसतील इतक्यांत घोडा एकाएकीं कशालासा बुजून गर्रकन् फिरला व ठोकरून खालीं पडला. त्याबरोबर आनंदरावांची स्वारीही खालीं आली. गाडीच्या दांड्या मोडल्या. खंडूजीही मागच्या बाजूला लांबलचक होऊन पडला.

इतकें सर्व कृत्य एका क्षणांत झालें. तत्पूर्वीं ते मोठ्या मजेंत वायुगतीनें येत होते आणि आतां त्यांनीं रस्त्यावर लोटांगण घातलें. आनंदरावांस फारसें लागलें नाहीं. फक्त एका पायास थोडेंसें खरडलें. ते चटक-

न् उठून उभे राहिले. घोडा कां बुजला असावा हें त्यांना समजेना. त्यांनीं आजूबाजूस न्याहाळून पाहिलें पण कांहीं दिसलें नाहीं. घोड्याजवळ जाऊन त्यास उठविण्याचा त्यांनीं प्रयत्न केला, पण व्यर्थ. त्यांनीं खंडूला हाक मारली परंतु तो ' ओ ' देईना. म्हणून ते इकडे तिकडे पाहूं लागले. तर खंडूजी बेशुद्ध होऊन पडला होता व त्याची हालचाल अगदीं बंद झाली होती. हा सर्व प्रकार पाहून आनंदराव मोठ्यानें म्हणाले: " आतां मात्र मोठी गंमत आहे खरी ! "

" काय झालं जी, अन गंमत कसली म्हनता ? " असे शब्द मागच्या बाजूनें त्यांच्या कानावर आले. त्यांनीं मागें वळून पाहिलें तर एक म्हातारा शेतकरी शेतांत उभा असलेला दिसला. त्याला आनंदराव म्हणाले:— " तिथें आणखी कोणी माणसें आहेत काय ? मला त्यांची मदत पाहिजे आहे. "

शेतकऱ्यानें नकारार्थी उत्तर दिलें:—" हत कोन जी असनार ? मी एकलाच है. अन माझी बायकू त्या खोपटांत पडली या. अक्शी जाळानं भाजतीया बगा. " नंतर जवळ येऊन तो म्हणाला:—" काय, झालं काय ? घोडं बुजलं जणु अन त्ये कोन पडल्यावानी दिसतया ? "

आनंदरावांनीं सांगितलें:—" बाबा, मला कोणाची तरी मदत पाहिजे आहे. या घोड्याला व त्या गाडीवानाला उठविलें पाहिजे. "

शेतकऱ्यानें जवळ जाऊन घोड्याचें अंग चाचपून पाहिलें, " घोड्याला तर कुठं लागल्यालं दिसत न्हाई. मंग असा का मेल्यावाणी निपचित पडलाया ? मकऱ्या हाय जणूं ? पायबिय तर मुरगळला नसल ? गाडीमंदी वज्जबी न्हाई. मंग इचीमन पडावा कां ? "

" माझा तर कांहीं तर्क चालत नाहीं. आजपर्यंत तो कधीं देखील असा ठोकरला नाहीं. तो कसा पडला याचेंच मला कोडें पडलें आहे. "

शेतकरीही विचारांत पडला. घोड्यास सोडून तो आतां त्या पोऱ्याकडे गेला. पण खंडू तसाच निपचित पडलेला होता. त्यालाही चाचपून पाहून शेतकरी म्हणाला:—" लई वंगाळ जी, लई वंगाळ !

असं होनं लई वंगाळ ! म्होर काय बी अरिष्ट येनार असलं म्हंजी असं हातया. तुमी जपून असा बरं कायजी ? ”

शेतकऱ्याचा तो भोळसरपणा पाहून आनंदराव गालांतल्या गालांत हांसून म्हणाले:-“माझें काय वांकडे होईल म्हणतोस ? ”

“ काय वाकडं हुईल, अन कस हुईल त्ये न्हाई सांगायला यायचं. पन हुईल इत्तं मातुर खर. मला लईदी असा अनुभव हया. तुमी कुटल्या गांवाला निगाला जणु. कुटंका जाइनासा खर. पन आतां हतच ऱ्हावा.

आनंदराव:–“ उगीच कांहीं तरी बडबडूं नकोस. ”

शेतकरी:–“ न्हाईजी. मी बडबडत न्हाई. दिसऱ्या लोकाकिंती मला जास्ती समजतया. ऐका उगच माजं म्हाताऱ्याचं. ह्ये चिन्न चांगलं न्हव, म्हतलं. असं झालं म्हंजी फुड अरिष्ट अगदीं ठेवल्यालं बगा. कोनत्या गांवाला निगालासा ? ”

“ दत्तापूर इथून एक मैल सुद्धां नाहीं. ”

“ अस ना. एक मैल असूंदे न्हाई तर तिकडं अर्धा मैल असूंदे. पन तुमी आतां जाऊं नका. माज्या खोपटांत चला. निवाऱ्याची जागा देतों. अन सकाळीं उठूनशेनी जावा. ”

आनंदरावांना हांसूं आवरेना. ते म्हणाले: “ म्हातारबावा, पुढें अरिष्ट येईल किंवा चांगलें होईल हा प्रश्न सध्यां नसून, मला मदत कशी व कोठून मिळेल ही पंचाईत येऊन पडली आहे. तेव्हां तूं असें कर. गांवांत जाऊन माझ्या दवाखान्यांत ही सर्व हकीगत कळीव, आणि एक गाडी व दोन माणसें पाठवून द्यायला सांग. जा लवकर. तुझी बायको आजारी आहे, नाहीं का ? मी तिकडे जाऊन तिची तब्येत पाहतों, जा. ”

हे कोणी तरी डॉक्टर असावेत असें वाटून शेतकऱ्यानें आनंदरावांस तसा प्रश्न केला. त्यांनीं होय म्हणून सांगितलें. त्यामुळें शेतकऱ्याला थोडी उमेद आली. तो दत्तापूर गांवांत जाऊन थोड्याच वेळांत जरूर ती मदत घेऊन आला. आनंदरावांनीं घोड्यास उठविलें. त्याचा एक पाय दुखवला होता. खंडू अद्याप बेशुद्ध पडला होता. त्यासही आनंद-

रावांनीं उठून बसविलें. नंतर वेळांत वेळ काढून ते खोपटांत जाऊन त्या शेतकऱ्याच्या बायकोला पाहून आले. तिला ताप येत होता. उद्यां सकाळीं आमच्या दवाखान्यांत ये म्हणजे चांगलें औषध देतों असें आनंदरावांनीं त्या शेतकऱ्यास सांगितलें. नंतर तो लंगडणारा घोडा, ती मोडलेली गाडी, तो बेशुद्ध पडलेला खंडू असें सर्व लटांबर घेऊन आनंदराव एकदाचे दत्तापुरांत येऊन दाखल झाले.

आनंदरावांनीं घर पसंत केलें त्या वेळीं दर्शनी भागाचें महत्व काय असतें हें त्यांच्या पूर्णपणें लक्ष्यांत होतें. घर मोठें भपकेदार व अगदीं नाक्यावर होतें. नवीनच धंदा सुरू करण्यास अशा घराची विशेष जरूर असते. ओसरीवर दोनी बाजूंस दोन खोल्या असून माडीवर जाण्याचा जिना मोठा मजेदार होता. दुसऱ्या मजल्यावर सुंदर दिवाणखाना असून प्रशस्त अशा कांहीं खोल्याही होत्या. पण ह्या खोल्या किंवा दिवाणखाना शृंगारलेला नव्हता हें कसें? त्याची इतक्यांत जरूर नव्हती हेंच कारण.

आनंदराव खंडूस कांहीं औषध देऊन आंत गेले. चहा पिऊन झाल्यावर त्यांनीं बंडूला हाक मारिली. शुक्रवारीं सकाळीं सारजेबरोबर जो मोठ्या तोऱ्यानें बोलत होता तोच हा बंडू. औषधें पोंचविणें, दवाखान्यांत हजर असणें, कोणी आल्यास त्याची डॉक्टरसाहेबांकडे वर्दी देणें वगैरे कामें या मुलाकडे सोपविलेलीं होतीं. बंडू, गाडीवाला खंडू, व एक स्वयपाकीण बाई एवढीच काय तीं आनंदरावांच्या घरचीं माणसें. बंडू आल्यावर त्यांनीं पत्रें कांहीं आहेत काय?' म्हणून विचारलें. बंडूजीचा सर्व तोरा अजीबात जाऊन तो ह्या वेळीं गरीब गाय होत्सता आपल्या धन्यापुढें उभा होता. तो म्हणालाः—" साहेब, पत्रें कांहीं नाहींत. पण दोन तीन गृहस्थ मात्र आपणांस भेटायला आले होते. ' नाहींत घरी ' असें सांगतांच ते परत गेले. काल सर्जेरावांकडून निरोप आला होता. आजही सकाळीं आला होता. त्यांची तब्येत थोडी बिघडली आहे असें त्यांच्या नोकरानें सांगितलें. आपण गेल्यामुळें सर्जेराव फार रागावले आहेत व त्या माणसाबरोबर त्यांनीं असें सांगून

पाठविलें आहे कीं आज जर आपण आला नाहीं तर विश्राम डॉक्टरांना बोलावणार. ”

“ खुशाल बोलावूं देत. ” आनंदराव रागानें म्हणाले. आनंदरावांची विचारमग्न संतप्त मुद्रा पाहून बंडूजी तेथून बाहेर आला. आनंदराव विचार करीतच दिवाणखान्यांत गेले व खालीं यावयास निघाले. इतक्यांत जेवणाची तयारी आहे म्हणून वर्दी आली. पण मी बाहेर जाऊन येतों, इतकेंच बोलून आनंदराव लगबगीनें घराच्या बाहेर पडले व रावपुऱ्याकडे निघाले. आनंदरावांना राग येण्यासारखा निरोप ज्यांनीं पाठविला त्या सर्जेरावांची गांठ घेण्याच्या उद्देशानें ते निघाले होते. सर्जेरावांची तब्येत इतकी कांहीं भयंकर बिघडली नव्हती. हें समजल्यावर दुसरा कोणीही डॉक्टर अशा रात्रीच्या वेळीं तिकडे गेला नसता. तशांत आनंदरावांसारखा मानी स्वभावाचा मनुष्य तर खचित गेला नसता. मग आनंदराव इतक्या लगबगीनें तिकडे कां बरें निघाले ? ह्या वेळीं तिकडे जाण्यांत डॉक्टरच्या धंद्याशीं संबंध नाहीं असा दुसराच हेतु त्यांच्या मनांत होता. ओघाओघानें तो वाचकांस समजून येईल.

येथें वाचकांस सर्जेरावांची थोडी ओळख करून दिली पाहिजे. सर्जेरावांना लष्करांत नोकरी होती. परंतु संधिवाताचा विकार अंगीं जडल्यामुळें ते निमपगारी रजा घेऊन पुण्यास आले व तेथून हवा पालटण्याकरितां म्हणून तीन महिन्यांपूर्वीं ह्या गांवांत येऊन राहिले होते. त्यांच्या बंगल्याला ‘ फुलबन बंगला, असें म्हणत असत. बंगल्याची इमारत लहानशीच पण टुमदार असून सुखवस्तु कुटुंबाला राहण्यास सर्व प्रकारें सोयीस्कर अशी होती. हा बंगला दिसण्यांत फारच रमणीय असून रस्त्यापासून बऱ्याच अंतरावर एका बागेंत होता. ह्या बागेंत वृक्षांची, वेलींची व फुलझाडांची इतकी समृद्धि होती कीं, त्यास ‘ बाग ’ म्हणण्यापेक्षां ‘ वन ’ हें नांव जास्त शोभलें असतें. पण वनांत झाडांचा जितका अव्यवस्थितपणा असतो, तितक्या व्यवस्थेनें ह्या बागेंतील झाडें लावलेलीं होतीं. सर्जेराव मोठे व्यवस्थेशीर होते. कोणतीही वस्तु जेथल्या तेथें नीटनेटकी ठेवण्याकडे त्यांचें लक्ष फार असे. मग त्याकरितां थोडे पैसे जास्त

खर्च झाले तरी ते काळजी करीत नसत. पण त्यांचा प्रपंच मोठा, नांवाप्रमाणें खर्च ठेवावा लागे, व उत्पन्न त्या मानानें कमी. यामुळें त्यांची गृहस्थिति फार ओढघस्तीची झाली होती.

हल्लीं सर्जेरावांच्या तीन मुली त्यांच्या घरीं होत्या. वडील मुलीचें नांव इंदिरा, दुसरीचें मोहना, व धाकटीचें लीला. पण त्यांच्या प्रत्येकीच्या वयांमध्यें बरेंच अंतर होतें. ह्या मुलींचें जास्त वर्णन पुढें क्रमाक्रमानें येईल.

सर्जेरावांना संधिवाताचा विकार वरचेवर होई. आधींच त्यांचा स्वभाव तापट; त्यांत ह्या रोगामुळें तर ते जास्तच संतापी व चिडखोर झाले होते हा विकार उद्भवला कीं त्यांचा चिडखोरपणा जास्तच दिसून येई. सर्जेराव आनंदरावांचें औषध घेत होते ते कांहीं हेतूनें नव्हे, तर तसा योगच जुळून आला होता. प्रथम सर्जेराव दत्तापुर गांवांत आले तेव्हां ते आजारीच होते. म्हणून कोणा तरी डॉक्टरांना घेऊन ये असें त्यांनीं आपला पिढीजाद व विश्वासूक नोकर हैबती याला सांगून पाठवून दिलें. तोही बिनमाहीतगारच. तपास करीत करीत तो विश्रामबंधूच्या घरीं गेला. पण दोघांपैकीं घरीं कोणीही नव्हतें. एक नोकर होता त्यानें सांगितलें कीं संध्याकाळीं डॉक्टरसाहेब घरीं येतील, आल्याबरोबर पाठवून देतों. हैबतीनें तो निरोप यजमानास कळविला. त्याबरोबर सर्जेरावांची स्वारी गरम झाली. ' बस्स बस्स आत्तां डॉक्टराला आणलें पाहिजे ! आणलेंच पाहिजे. ! तो नाहीं तर त्याचा काका दुसरा आण जा. " असा सक्त हुकूम सुटला. त्याबरोबर पुनः तपास करीत हैबती निघाला, तो आनंदरावाच्या घरीं गेला. आनंदराव घरांतच होते. त्या वेळेपासून आनंदराव तिकडे जाऊं लागले. अलीकडे तर संधिवाताचा विकार वरचेवर उद्भवे, यामुळें आनंदरावांना पुष्कळ वेळां तिकडे जावें लागे. ह्यायोगानें सर्जेरावांच्या घरच्या मंडळीची व आनंदरावांची बरीच दाट ओळख झाली होती.

रावपुऱ्याच्या अगदीं मध्यभागीं सर्जेरावांचा बंगला होता. आनंदराव लगबगीनें निघाले ते बंगल्याच्या कंपाउंडाच्या दारांतून आंत शिरले व

त्या गर्द झाडींतील नागमोडी रस्त्यानें बंगल्याच्या दरवाजाजवळ येऊन पोंचले. माडीवरील दिवाणखान्यांत दिव्याचा लख्ख प्रकाश दिसत होता. आनंदराव आंत जातात तों सर्जेरावांचा इमानी नोकर हैबती त्यांच्या दृष्टीस पडला. आनंदरावांना पाहतांच हैबती सानंद मुद्रेनें म्हणालाः—

" आपण आलां हें फार उत्तम झालें. नुकतेंच धनीसाहेबांनीं मला सांगितलें कीं विश्राम डॉक्टरांना तरी घेऊन ये जा. " हे शब्द कानीं पडतांच आनंदरावांना राग आला. पण ते तसेच सर्जेरावांच्या दिवाणखान्यांत गेले.

सर्जेराव या वेळीं बिछान्यावर पडले होते. लष्करांत त्यांचें आयुष्य गेलें असल्यामुळें त्यांचा बांधा कसलेला व पिळदार होता. डोळे मोठे व पाणीदार असून पयपरत्वें त्यांच्या डोकीचे व भिंवयाचें केश शुभ्र झालेले होते.त्यांची मधली मुलगी मोहना ही तेथेंच त्यांचे पाय चेपीत बसली होती. वाडिलांप्रमाणें तिचेही डोळे विशाळ व तेजःपुंज असून एकंदर चेहरा मोठा मोहक होता. आनंदरावांचीं पावलें जिन्यांत वाजतांच ती उठून निघून गेली.

थोड्या दिवसांपूर्वीं सर्जेरावांची तब्येत बरीच बिघडली होती तेव्हां आनंदरावांनींच त्यांना औषध देऊन बरें केलें होतें. हल्लीं त्यांची प्रकृति विशेष बिघडलेली नव्हती. खरोखर म्हटलें तर आतां आनंदरावांनीं अगर दुसऱ्या कोणत्याही डॉक्टरानें येऊन त्यांची तब्येत पाहणें जरूर होतें असें नाहीं. पण सर्जेरावांचा स्वभाव फार हेकड होता. आपण बोलावणें पाठविलें असून ते आले नाहींत, याचा त्यांना फार राग आला होता. आनंदरावांस पहातांच सर्जेराव संतापानें लाल झाले. पण ते कांहीं बोलले नाहींत. तब्येत थोडी शांत झाल्यावर आनंदरावांनीं त्यांच्या प्रकृतीसंबंधानें विचारपूस करण्याला सुरवात केली. नंतर ते ह्मणाले, " साहेब, माझा अगदीं नाइलाज झाला. माझ्या वडिलांकडून मला अगदीं जरूरीची तार आली, कीं मी फारच आजारी आहें, ताबडतोब निघून ये, तरच भेट होईल. ह्मणून मला जाणें भाग पडलें.

मीं आपणास गडबडीनें चिठी पाठविली त्यावरून आपण जाणलेंच असेल."

"तुमचें ठीकच आहे. मी मात्र इकडे मेलों असतों!" सर्जेराव गुरगुरले.

"साहेब, आपण मेलां तर नसतांच पण यत्किंचतही भीति बाळगण्याचें कारण नव्हतें. जर मला तसें वाटलें असतें तर मी जातेवेळीं विश्राम डॉक्टरांना येथें येऊन तब्येत पहात जा ह्मणून सांगून गेलों असतों."

सर्जेरावांनीं सणसणीत उत्तर केलें:—"तें कशाला? आज रात्रीं तुह्मी जर आलां नसतां तर मींच त्यांना बोलावणें पाठवून आणलें असतें. मीं अशा स्थितींत यातना सोशीत पडावें व माझ्याजवळ कोणीही डॉक्टर अ.ूं नये म्हणजे केवढी भयंकर स्थिति!"

"पण साहेब, मला वाटतें कीं आपणाला मागें जशा वेदना होत होत्या तशा आतां खात्रीनें होत नाहींत. आज आपण जरा हिंडत फिरत होतां कीं नाहीं?"

"नाहीं. मी या बिछान्यावरून हाललों सुद्धां नाहीं व हालण्याची माझी इच्छाही नाहां." सर्जेराव त्रासून ह्मणाले.

"बरें आहे. मी आतां औषध देतों. उद्यां आपण हिंडूं फिरूं लागाल व त्यापासून आपणाला बरेंही वाटेल." असें आनंदराव हलकेच म्हणाले. सर्जेराव कितीही रागावोत, त्रासोत, पण आनंदराव आपली वृत्ति बाह्यतः तरी नेहमीं शांत राखीत.

सर्जेरावांनीं विचारिलें:—"कायहो डॉक्टर, तुह्मी गेलां, पण वडिलांची भेट झाली का?"

"झाली साहेब. त्यांनीं मला तार केली त्या वेळीं त्यांची तब्येत जशी होती, त्यापेक्षां मी गेलों तेव्हां जरा चांगली होती. पण मला वाटतें कीं ते आतां फार दिवस टिकाव धरणार नाहींत. कारण त्यांची प्रकृति फारच क्षीण झाली आहे. त्यांची तार आल्याबरोबर निघणें,

त्यांचा अंतकाळ होण्यापूर्वीं त्यांची भेट घेणें मला अगदीं जरूर होतें. त्यांच्यामध्यें व माझ्यामध्यें किती दिवस तरी बेबनाव होता ! ते माझ्याशी वडिलाप्रमाणें बिलकुल वागत नसत. माझी आईही मी लहान असतांनाच वारली. ती असती तर मी हल्लीं आहें त्यापेक्षां फार निराळा झालों असतों."

सर्जेराव जरा जोरानें म्हणाले:—"डॉक्टर, या जगांत मनुष्य करील त्याप्रमाणें त्याला स्थिति प्राप्त होत असते. आईबापांकडे विशेष संबंध असत नाहीं."

आनंदराव:—"तें खरें. पण मी माझ्या सुखास अनुलक्षून म्हणतों माझी आई नव्हती म्हणून माझे बाळपणाचे दिवस कशा प्रकारें गेले हें आपणास माहीत नाहीं. ती जिवंत असती तर किती तरी फरक पडला असता !"

"आपले वडील अगदीं गरीब स्थितींत आहेत कां ?"

"नाहीं नाहीं. ते चांगले श्रीमंत आहेत. जवळ पैसा मुबलक आहे व मी त्यांचा एकुलता एक मुलगा आहें. दुसरें मूल नाहीं बाळ नाहीं."

"मला वाटतें आतां तें औषध बदलून दुसरें घ्यावें." असें सर्जेराव म्हणाले. डॉक्टरसाहेब जरा वहात चालले होते. ते वरील उद्गार ऐकतांच शुद्धीवर आले. चटकन् उठून सर्जेरावांनीं दाखविलेली बाटली त्यांनीं घेतली व थोडा वेळ प्रकृतीसंबंधानें विचारपूस करून आनंदराव घरीं जाण्याकरितां निघाले. सर्जेरावांनीं हैबतीस मोठ्यानें हाक मारून डॉक्टरसाहेबांबरोबर कंदील घेऊन जाण्यास सांगितलें.

दिवाणखान्याचे दार ओढून घेऊन आनंदराव बाहेर ग्यालरींत आले. तेथें जवळच दुसऱ्या खोलीच्या दारांत एक सुस्वरूप युवती मोठ्या उत्कंठेनें तिकडे पहात उभी होती. तिच्या चेहऱ्यावर मूर्तिमंत औत्सुक्य दिसत होतें. जणू काय इतक्या उत्कंठेनें ती कोणाची तरी वाटच पहात होती. खरेंच, तें पहा, आनंदरावांची व तिची दृष्टादृष्ट होतांच तिचें हृदय आनंदभरानें उचंबळूं लागलें, आणि तिच्या त्या सुकुमार मुखावर मंद हास्य चमकूं लागलें. त्यांत त्यांची तिजविषयींची प्रेमबुद्धि स्पष्टपणें दिसत होती. वाचकहो, ही तरुणी कोण हें तुम्ही

ताडलेंच असेल. वडिलांचे पाय चेपीत बसलेली मोहना ती हीच. दिवाणखान्यांतून बाहेर पडून आनंदरावांची गांठ घेण्याच्या उद्देशानें ती ग्यालरींत येऊन उभी होती. मोहना आनंदरावांची अगदीं प्यार होऊन बसली होती. आनंदरावांचें मोहनेवर जितकें प्रेम होतें तितकें प्रेम कोणाही पुरुषानें कोणत्याही स्त्रीवर आजपर्यंत केलें नसेल.

"मोहने, मला वाटलें नाहीं तुझी या वेळीं गांठ पडेल असें. त्या उद्देशानें मात्र मी ह्या वेळीं इकडे आलों खरा. कोणी नसतां, अशारीतीनें तुझी गांठ पडावी हें ईश्वरी प्रसादाचें दर्शकच म्हणावयाचें," असें ह्मणत ह्मणत ते अगदीं मोहनेजवळ गेले. इतक्यांत हैबतीच्या कंदिलाचा उजेड दिसूं लागला. त्याबरोबर मोहना झट्दिशीं दूर झाली व आनंदराव जिना उतरूं लागले. मोहनेचें सर्व लक्ष त्यांच्याकडे लागलेलें होतें. खालच्या दिवाणखान्याचें दार लागलेलें तिनें ऐकलें. बागेंतील वाळू घातलेल्या रस्त्यावरून त्यांच्या पावलांचा आवाज ऐकूं येऊं लागला. तो आवाज म्हणजे तिच्या त्या आतुर झालेल्या कानांना सुस्वर गंधर्व-गायनच वाटलें. तो आवाजही बंद झाला. तेव्हां तिनें एक सुस्कारा टाकिला, व तिच्या मनाला तळमळ लागून राहिली. कांहीं वेळानें ती आपल्या वडिलांच्या खोलीकडे निघून गेली.

आनंदराव बंगल्याच्या आवारांतून बाहेर पडून रस्त्यावर आले. या वेळीं चंद्राचें स्वच्छ चांदणें पडलें होतें. पण आनंदरावांचें लक्ष त्या मनोरम चंद्रम्याकडे मुळींच नसून दुसऱ्याच विचारांत गढून गेलें होतें. सर्जेरावांबरोबर त्यांचें जें थोडें संभाषण झालें त्यायोगानें त्यांचें मागचें सर्व आयुष्य त्यांच्यापुढें येऊन उभें राहिलें. पूर्वींचीं बरींवाईट कृत्यें, ओढवलेले दुर्धर प्रसंग, पूर्वींचा निष्काळजीपणा, पूर्वींचीं पापें सर्व कांहीं त्यांच्यासमोर दिसूं लागलीं. आनंदरावांचे वडीलसुद्धां नामांकित डॉक्टर असून त्यांनीं पैसाही पुष्कळ कमाविला होता. परंतु त्यांचें आचरण अगदीं एककल्ली; अगदींच बेमुर्वतखोरपणाचें होतें. अर्थातच आनंदरावांना चांगलें वळण लागलें नाहीं. ते ह्मणाले त्याप्रमाणें त्यांची मातुश्री जिवंत राहती तर त्यांचा पुष्कळ उपयोग झाला असता. पण

ती लवकरच वारल्यामुळें आनंदरावांस अडपतें दडपतें कोणींच राहिलें नाहीं. लहानपणापासून मनास वाटेल तसें वागण्याची संवय, पुढें तरुणपणींही तीच स्थिति, कोणाचा दाब किंवा देखरेख ह्मणून बिलकूल नाहीं, वडिलांची भीति तर काडीइतकी नाहीं; अशा स्थितींत आनंदरावावर पुष्कळ संकटें व कठीण प्रसंग आले, यांत अगदीं आश्चर्य नाहीं. याचा परिणाम असा झाला कीं, वडिलांचे व चिरंजिवांचें पटेना. आनंदराव स्वैर वृत्तीनें वागूं लागल्यामुळें त्यांना कर्ज फार झालें. कर्जाची लांबलचक यादी पहातांच वडिलांच्या तळपायाची आग मस्तकाला गेली व 'आपण कांहीं हें कर्ज देणार नाहीं,' असें त्यांनीं चिरंजिवांस स्पष्ट सांगितलें. पुढें कांहीं काळ लोटल्यावर चारचौघांच्या मध्यस्थीनें थोडी तडजोड झाली. कांहीं तरी कर्ज आपण देऊं असें वाडिलांनीं कबूल केलें ह्मणून चिरंजिवांनीं दत्तापूर गांवांत आपला दवाखाना सुरू केला. परंतु बापलेकांत असणारें प्रेम नाहींसें झालें होतें व त्यांचें अद्याप चांगलेंसें जुळत नव्हतें. तथापि हल्लीं ही स्थिति बदलत चालली होती. आनंदरावांचे वडील आतां अत्यंत आजारी असून अंथरुणास अगदीं खिळून राहिले होते. आनंदरावांशिवाय खऱ्या मायेचें व कळकळीचें आपणास दुसरें कोणी नाहीं असें वाटून त्यांनीं त्यांना ताबडतोब निघून येण्यास तार केली होती. त्यांनीं मृत्युपत्र करून तें चिरंजिवांस दाखविलें. त्यांत आपल्या जिनगीचा सर्व वारसा त्यांनीं आनंदरावांस दिला होता. त्यांचीं बँकेंतही बरीच मोठी रक्कम होती, तीही आनंदरावांनाच मिळावयाची होती. हेच विचार मनांत येऊन आनंदराव आपलें मनोराज्य करीत रस्त्यानें निघाले होते. मोहनेशीं आपला विवाह होऊन आपण सौख्यसागरांत केव्हां एकदां पोहूं लागूं हेंच मनोराज्य त्यांचें चाललें होतें.

आनंदराव घरीं येऊन खुर्चीवर बसले व खिशांतून पांच चार पत्रें बाहेर काढून त्यांची व्यवस्था लावण्याच्या हेतूनें ते तीं वाचून पाहूं लागले. एक पत्र पाकिटांत घालून ते ह्मणालेः—'हें पत्र मला जपून ठेविलें पाहिजे. आणि हीं फाडून जाळून टाकावींत झालें.—हो, पण अगोदर जेवण करून घेऊं. असें ह्मणून ते खालीं जाऊन जेवावयास

बसले. इतक्यांत बंडूजी हातांत एक चिठी घेऊन आला व ह्मणालाः— " साहेब, माफी असावी. आपण मघांशी विचारिलें तेव्हां ही चिठी देण्याचें मी विसरलों. मला तिची आठवण नव्हती. साहेब गेले त्याच रात्रीं ही चिठी येथें आली. " असें ह्मणून बंडूनें तें पत्र आनंदरावां-जवळ दिलें व तो बाहेर गेला. आनंदरावांनीं पाकीट फोडून आंतील पत्र वाचलें, नंतर बंडूस हाक मारून त्यांनीं विचारिलें, " कोणीं आणून दिलें हें पत्र ? "

"एक बाई एक मोठीशी चौघडी पांघरून आली होती तिनें दिलें."

आनंदरावांनीं तें पत्र पुनः एकवार लक्षपूर्वक वाचलें. मग त्यांना जेवण सुचेना व ते तसेच उठले आणि माडीवर जाऊन टेबलावर पांच चार पत्रें होतीं तेथेंच त्यांनीं तेंही ठेविलें. ते थोडे विचारांत पडले व कसलासा विचार करीत एका खुर्चीवर बसले. त्यांची दृष्टि अगदीं स्थिर होती पण त्यांचे हात मात्र टेबलावरील पत्रें चाळण्यांत गुंतले होते. थोड्या वेळानें आनंदराव एकदम उठले. त्या पत्रांपैकीं एक जपून ठेवावेंसें वाटलें तें त्यांनीं तेथेंच बाजूस सारलें व बाकीचीं सर्व नेऊन विस्तवांत टाकलीं. जपून ठेवलेल्या पत्रास उद्देशून ते आपल्याशीं ह्मणाले: " हें पत्र मला खालीं नेऊन ठेविलें पाहिजे. ह्मणजे तें सुरक्षित राहील. दाखल्याकरितां मीं हें जपून ठेवलें नाहीं तर ते वृद्ध कपि पुढें बरें झाल्यावर ह्मणतील कीं आपण असें पत्रच कधीं पाठाविलें नव्हतें. "

आनंदरावांनीं ' वृद्ध कपि ' म्हटलेले गृहस्थ हे त्यांचे वडीलच होत. आनंदरावांनीं तें पत्र खालीं तळघरांत नेलें व एका लोखंडी पेटीमध्यें घालून ती बंद केली. पुनः माडीवर परत येऊन बंडूनें दिलेली चिठी ते पाहूं लागले. त्यांनीं आपले खिसे चाचपले पण ती सांपडेना, टेबलावर पाहिलें तेथेंही नाहीं. मग गेली तरी कोठें ? आनंदरावांनीं पुष्कळ हुडकून पाहिलें पण व्यर्थ. बाकीच्या पत्रांबरोबर आपण ती विस्तवांत टाकली असाच शेवटीं आनंदरावांचा ग्रह झाला. ते मोठ्यानें ह्मणाले: " केवढा मूर्खपणा मीं केला हा ! बरें, काय त्या घराचा नंबर ? तेरा काय ? बाजारपेठेंतील घरनंबर तेरा ? हो तोच तोच. "

असें ह्मणून अगदीं विलंब न करितां आनंदराव पोषाख करून घराच्या बाहेर पडले. धनीसाहेब जेवतां जेवतां उठून गेल्याचें पाहून स्वयंपाकीणबाई संतापून ह्मणालीः—"जळ्ळी मेली ही डाक्तरकी! आमच्या धनीसाहेबांना ज्या रोग्यांची गांठ पडते तसे मीं कुठें पाहिले नसतील. मेले त्यांना स्वस्थपणानें जेवूं सुद्धां देत नाहींत हो!"





# प्रकरण ५ वें.

## आनंदरावांची मुलाखत.



मध्यरात्रीचा सुमार झाला होता. अशा वेळीं आनंदराव झपाझप पावलें टाकीत पेठेंतून तेरा नंबरच्या घराकडे निघाले होते. त्या घराजवळ येतांच त्यांनीं दारावर थाप मारली. त्याबरोबर एका बाईनीं येऊन दार उघडलें. 'मावशीबाई येथेंच असतात नव्हे काय ?' असें आनंदरावांनीं विचारिलें. 'होय, माझेंच नांव मावशीबाई' असें त्यांनीं सांगितलें. नंतर आनंदराव म्हणाले:—"मी नुकताच मुंबईहून आलों. घरांत एक दोन दिवसांपूर्वी एक चिठी येऊन पडली होती ती मला मिळाली. येथें कोणी बाई आजारी असून त्यांनीं मला प्रकृति पहावयाकरितां येणेबद्दल लिहिलें आहे. काय नांव त्यांचें ?" मावशीबाईनीं उत्तर केलें: 'त्यांचें नांव कलावतीबाई. पण आतां त्यांची तब्येत ठीक आहे. त्यांची नीटपणें सुटका झाली.' आनंदरावांना आश्चर्य वाटलें: "सुटका झाली! म्हणजे ? त्यांनीं पाठविलेल्या चिठींतील मजकूर माझ्या चांगला ध्यानांत आहे. अजून दोन महिने तरी अवकाश होता असें त्यांचें मत होतें." मावशीबाई म्हणाल्या: "होय, त्यांनाही तसेंच वाटलें होतें. पण त्या बैलगाडींतून आल्या. गाडीचे हादरे बसून त्यांचें पोट दुखूं लागलें व त्यांची अगदीं प्राणांतिक अवस्था झाली. ह्या

गांवांत तर त्यांची कुण्णाची ओळख नाहीं. आडुथाशेजारच्या बाईनें माझें घर त्यांना दाखवून दिलें. इथें आल्या, त्या व मी घटकाभर बोलत बसलों नि मग त्यांना कसेंसेंच वाटूं लागलें. गाडीच्या हादऱ्यानें त्यांचीं हाडें-हाडें सगळीं खिळखिळीं झालीं होतीं. त्यांना आराम पडावा म्हणून आम्हीं पुष्कळ उपाय केले. पण व्यर्थ. त्या आपला जीव जास्तच कासावीस करून घेऊं लागल्या आणि शेवटीं काल पहाटेच्या सुमारास एकदाच्या नीटपणानें बाळंत झाल्या. त्या वयानें किती लहान आहेत म्हणून सांगूं? जणूं मुलगीच. त्यांच्याप्रमाणेंच त्यांचें मूल. खेळांतल्या बाहुल्या सुद्धां यापेक्षां मोठ्या असतात! आज सकाळीं कोणीशी एक बाई येऊन त्या मुलाला घेऊन गेली."

संध्याकाळीं स्टेशनावर जें चिमुकलें मूल आपण पाहिलें तेंच हें असावें अशी आनंदरावांची खात्री झाली. त्यांनीं विचारिलें:—"बरें, पण त्यांना औषध कोणाचें सुरू आहे?"

"प्रतापराव विश्राम यांचें. आपणालाच बोलावण्याचें त्या बाईच्या मनांत होतें. पण आपण नव्हतां म्हणून प्रतापरावांना बोलावून आणलें. आपली शिफारस कोणींशी त्या बाईजवळ केली होती म्हणे."

"माझी शिफारस?"

"होय, त्या तसें म्हणत होत्या. लांब कशाला? त्या आपण होऊनच सर्व सांगतील. पण हा सर्व प्रकार मात्र फारच चमत्कारिक! आतां त्यांना पुष्कळ बरें वाटत आहे. आपण वर येतां ना?"

हें सर्व बोलणें दवाजांतच चाललें होतें. कारण आनंदराव अजून बाहेरच उभे होते. आंत येण्याकरितां त्यांनीं एक पाऊल उंबऱ्याच्या आंत ठेविलें. पण तेथेंच थांबून ते म्हणाले.

"आतां फार रात्र झाली. कदाचित् त्यांना झोंप लागली असेल. जागें केलें तर त्रास होईल."

"नाहीं, त्यांना झोंप लागली नसेल. मी नुकतीच त्यांच्याजवळून खालीं आलें. त्या आपली सारखी वाट पहात होत्या. आपण मुंबईहून

परत आलांत व त्यांची प्रकृति पाहण्याकरितां मुद्दाम अगत्यानें आलांत असें समजलें म्हणजे तितकें त्यांना बरें वाटेल. ”

आनंदराव आंत आले. पण माडीवर दिवा नव्हता. दिव्याच्या उजेडानें आपणास त्रास होतो म्हणून बाळंतिणीनें तेथील दिवा मालविला होता. तेव्हां मावशीबाईंनीं आंत जाऊन एक दिवा लावून आणला व त्या प्रकाशांत आनंदरावांस घेऊन त्या माडीवर गेल्या. बाळंतिणीच्या खोलीजवळ जातांच आनंदरावांनीं मावशीबाईच्या हातांतून दिवा काढून घेतला व हळूंच म्हटलें: “ बाई, तुह्मी जा आतां. त्यांना त्रास होईल. मी आंत जाऊन सगळी हकीकत विचारून येतों. ”

मावशीबाईंना तेंच पाहिजे होतें. आनंदरावांनीं दारावर थाप मारली त्या वेळीं त्या नुकत्याच फराळाला बसल्या होत्या. संध्याकाळीं त्या कुठेंशा बाहेर गेल्या होत्या, तिकडून यायला बरीच रात्र झाली होती ह्मणून त्यांना फराळाला आज उशीर झाला होता. पान तसेंच ठेवून त्या दरवाजा उघडण्याकरितां आल्या होत्या. आनंदरावांची सूचना मिळतांच त्या खालीं गेल्या व फराळावर यथेच्छ ताव मारूं लागल्या.

इकडे आनंदरावांनीं हलकेंच बाळंतिणीच्या खोलीचें दार उघडलें. आंत जास्त प्रकाश पडूं नये ह्मणून त्यांनीं एक हात दिव्याच्या आड धरला. खोलींत अगदीं सामसूम होतें. त्यांना वाटलें खोलींत कलावती एकटीच आहे. परंतु वास्तविक स्थिति अशी होती कीं पडद्याच्या अगदीं पलीकडील बाजूस सारजा येऊन बसली होती, पण ती दिसत नव्हती. आनंदराव हलकेंच आंत आले, पण तेवढ्यानें कलावती जागी झाली. ती मान वर करून दचकून चोहोंकडे पाहूं लागली. आनंदरावांनीं दिवा तेथेंच एका कोनाड्यांत ठेविला व ते तिच्याशीं बोलूं लागले. थोडा वेळ बोलणें होतें न होतें इतक्यांत पलीकडे कसलासा आवाज त्यांनीं ऐकला. याबरोबर ते एकदम म्हणाले:—“ कोण आहे तें ? ”

“ कुठें कोण आहे ? ” कलावतीनें विचारिलें. ती आपल्याच यातनेंत असल्यामुळें तिला कांहीं तो आवाज ऐकूं आला नव्हता.

आनंदरावांनीं त्या खोलींत चहूंकडे पाहिलें, पण त्यांना कोणी दिसलें

नाहीं. ‘ इथें कोणी आहे काय ? ’ असें त्यांनीं विचारिलें. पण कोणी ‘ ओ ’ देईना. तेव्हां कोणी नसावें असें त्यांनाही वाटलें. पडद्याच्या पलीकडील बाजूस एक दार होतें तें त्यांना उजेडांत दिसलें. तें दार लावलेलें होतें परंतु थोडीशी फट राहिली होती. आनंदरावांनीं तें दार उघडून बाहेर पाहिलें. ग्यालरींत चंद्राचा स्वच्छ प्रकाश पडला होता. तेथेंही कोणी नव्हतें. जवळच जिना होता तेथेंही कोणी त्यांना दिसलें नाहीं. तेव्हां आपणांस निवळ भास झाला अशीच त्यांची कल्पना झाली. ते खोलींत परत येऊन म्हणाले:—“ मला वाटलें इथें कोणी तरी होतें. ”

बाळंतीण म्हणाली:—“ कोण असणार ? कुण्णी नाहीं. सुईण असायची, पण मावशीबाईनीं हाक मारली म्हणून ती खालीं गेली. त्या पलीकडच्या घरांतील आवाज ऐकूं आला असेल. तिथें कांहीं आवाज झाला कीं अगदीं इथें झाल्यासारखा ऐकूं येतो. ”

“ तर मग तेंच खरें. ” आनंदराव म्हणाले.

वाचकहो, आनंदरावांना कसला आवाज ऐकूं आला हें तुह्मीं जाणलें काय ? बाळंतिणीजवळ बसावें म्हणून सारजा त्या खोलींत आली होती, पण कलावतीचा डोळा लागला होता म्हणून कांहीं हालचाल न करितां ती स्वस्थ बसली होती. आनंदराव आंत आले व बाळंतिणीशीं बोलूं लागले. त्या दोघांचें संभाषण चाललें असतां तेथें आपण ऐकत उभें राहणें योग्य नाहीं असें वाटून ती घाईनें तेथून दुसऱ्या दारानें निघून गेली. तिचीच चाहूल आनंदरावांना ऐकूं आली. आपण गेल्यामुळें मागें काय गोंधळ झाला याची तिला कल्पनाही नव्हती. सारजा जिना उतरून थेट स्वयंपाक घरांत गेली. तेथें मावशीबाई व मैनाई सुईण ह्या दोघीजणी फखळ करीत बसल्या होत्या. सारजेला पाहतांच मावशीबाई म्हणाल्या:—“ सारजे, तूं अशी एकाएकीं कुठून उत्पन्न झालीस ती ? ”

“ मी माडीवरून खालीं आलें. ”

“ मग आम्हीं नाहीं तुला आंत येतांना पाहिलें तें ? तुझी आक्का बाहेर गेली आहे, तेव्हां आम्हांला वाटलें तूं घर राखीत बसली असशील. ”

“ मी बसलेंच होतें घर राखीत. पण आक्का नुकतीच आली. तेव्हां

कांहीं काम असलें तर पहावें ह्मणून इकडे आलें. तर तुह्मी दोघीही फराळाला बसण्याच्या तयारींत होता. मीं मनांत म्हटलें, इथें न थांबतां वर जावें. वरती गेलें तर कलावतीबाईचा डोळा लागला होता. इतक्यांत आनंदरावही तिथें आले. ”

मावशीबाई म्हणाल्याः—“ काय ग सारजे, गाडी वाटेंत पडली, दांड्या मोडल्या, अंगाला लागलें, यासंबंधानें कांहीं हकीकत तुला आनंदरावांनीं सांगितली का ? ”

“ नाहीं सांगितली. मी तिथें होतें हें त्यांना माहीतच नव्हतें. त्यांनीं मला पाहिलें नाहीं. ते आलेत असें समजतांच मीं मुकाट्यानें तेथून निघून खालीं आलें. काय झालें त्या गाडीला ? ”

“ गाडी मोडली, आनंदरावांनाही लागलें म्हणतात. मोठेंच्च अरिष्ट गुदरलें बाई. मघांशी मी दुकानांत कायसें आणायला गेलें होतें तिथें लोक बोलत होते. तें मीं ऐकलें. ”

“ आनंदरावांना लागलें ? ”

मावशीबाईंच्या तोंडास या वेळेस बोलण्यास मुळींच फुरसत नव्हती. म्हणून सारजेच्या प्रश्नास त्यांनीं नुसतें मान हालवूनच होकारार्थी उत्तर दिलें. थोड्या वेळानें त्या म्हणाल्याः—“ आनंदराव येणार म्हणून त्यांचा गाडीवाला स्टेशनावर गाडी घेऊन गेला होता. आनंदराव येत असतां गाडी उलटली. तिचे तुकडे तुकडे झाले, घोडा व गाडीवाला दोघेही ठार मेले असें मीं ऐकलें. मी हीच हकीगत मघांशीं मैनाईला सांगत होतें इतक्यांत दारावर थाप ऐकूं आली, म्हणून मीं जाऊन दार उघडलें तर आनंदराव आपले दारांत उभे. त्यांना पाहिल्याबरोबर, सारजे, मला बाई फारच आश्चर्य वाटलें. आनंदराव सुद्धां प्राणाला मुकले असेंच मी समजत होतें. कारण दुकानांत मीं त्यांच्यासंबंधानें हकीगत विचारली पण कुणीच मला नीट सांगेना, आणि हे तर आपले दारांत दत्त म्हणून उभे. बरें, त्यांना विचारावें म्हटलें तर माझा धीर होईना. कारण हीं मानी माणसें; कुणीं कांहीं विचारलें तर त्यांना खपावयाचें देखील नाहीं. कसें कां असेना ? आनंदराव खुशाल आहेत एवढी गोष्ट खरी. बरें,

काय हो सुईणबाई, डाक्टर वर येऊन बसले आहेत. मग तुम्हांला नको का तिकडे जायाला ? "

मैनाई कसचें उत्तर देणार ? मावशीबाईसारखी तीही खादाडच होती. कपाळाला आंठ्या घालून ती पुटपुटली:— " गरज लागली तर मला हाक मारतील. " नंतर ती म्हणाली:—"सारजाबाई, तुझ्या तोंडाचें आज कसें काय आहे ? "

" संध्याकाळपासून फार दुखत आहे. आतां घरीं जाऊन निजावें म्हणजे बरें वाटेल "

असें म्हणून सारजा गडबडीनें निघून गेली. ह्या एक दोन दिवसांत तिची दाढ फार दुखत होती व सर्व तोंड सुजलें होतें. ती गेल्यावर त्यांनीं पुनः फराळास सुरवात केली. इतक्यांत आनंदरावही खालीं आले. ते फार वेळ माडीवर बसले नाहींत. ' बाईची तब्येत आतां बरी आहे, जातों ' असें सांगून ते बाहेर पडले.

कोणतीही बातमी असो, एकीचें बेक होऊन ती जलद चोंहोंकडे कशी पसरते हें सर्वांना माहीत आहेच. त्यांतून वाईट बातमीची तर कांहीं सोयच नाहीं. त्या रात्रीं सर्व गांवांत जी बातमी पसरली होती तीच मावशीबाईनीं सांगितली—काय तर—आनंदराव डॉक्टरांची गाडी मोडून तिचा खुळखुळा झाला. त्यांचा घोडा दगावला, गाडीवाला ठार झाला, खुद्द आनंदरावांसंबंधीं सुद्धां लोक बरें वाईट बोलूं लागले. पण उजेडल्यावर मात्र समजून आलें कीं, प्रसंग भयंकर तर खराच, पण इतकें कांहीं नुकसान झालें नाहीं. गाडीवाल्यास थोडी दुखापत झाली होती, घोड्याच्या पायासही बरीच सूज आली होती, पण आनंदरावांनीं दोहोंवरही चांगले उपचार केले होते त्यामुळें विशेष भीति बाळगण्याचें मुळींच कारण नव्हतें.

अर्थातच त्या दिवशीं रोगी पाहाण्याकरितां आनंदरावांना पायींच जावें लागलें. दोनप्रहरीं त्यांची व प्रतापरावांची रस्त्यांत सहज गांठ पडली. त्यांची दोघांची चांगली ओळख होती, पण आजपर्यंत ते रस्त्यावर बोलण्याकरितां म्हणून कधींच उभे राहिले नव्हते. कधीं गांठ पडली तर ' कसें काय, बरें आहे; ' हें ठरीव प्रश्नोत्तर अगर नुसती ' हास्तिदंती '

होऊन ते निघून जात. पण आज मात्र दोघांची दृष्टादृष्ट होतांच ते दोघेही उभे राहिले.

गेल्या शुक्रवारीं सारजेची गांठ पडल्या वेळीं प्रतापरावांनीं म्हटल्याप्रमाणें, आनंदरावांचा व दोघां विश्राम बंधूंचा धंदा चांगला चालेल अशी ह्या गांवाची स्थिति होती. वस्तीही भराभर वाढत होती. यामुळें त्या दोघा विश्राम बंधूंनीं आपल्या हाताखालीं एक मदतनीस ठेविला होता. तरी त्या तिघांना सुद्धां झेंपेना इतकें काम त्यांना येई. अर्थातच आनंदरावांनीं नवीन धंदा सुरू केला त्याबद्दल त्यांना बिलकूल वाईट वाटत नसे, कीं ते त्यांचा अगदीं हेवा करीत नसत. हे दोघेही विश्राम बंधु मोठे संभावीत, सचोटीचे व सरळ अंतःकरणाचे गृहस्थ होते. द्वेषभाव व नीचपणा यांचा त्यांच्या ठायीं गंध सुद्धां नव्हता.

कलावतीच्या तब्येतीसंबंधानें बोलण्याकरितां प्रतापराव उभे राहिले. ते म्हणाले:—" मीं मोठ्या आनंदानें तिला औषधोपचार केले. आतां आपण आलांत, तेव्हां तिला आपल्या स्वाधीन करून मी मोकळा होतों. तिची तब्येत आतां चांगली आहे. "

आनंदराव म्हणाले:—" हें पहा, प्रतापराव, मेहेरबानी करून आज संध्याकाळपर्यंत अगर उद्यां संध्याकाळपर्यंत तुमचेंच औषध सुरू असूं द्या. काल रात्रीं माझी गाडी उलटून पडल्यामुळें मला थोडेंसें लागलें आहे. शिवाय माझा मुक्काम कांहीं दिवस येथें नसल्यामुळें आमचे रोगी आमच्यावर जरा गरम झाले आहेत. एकदां जाऊन भागावयाचें तेथें आतां दोन दोन तीन तीन खेपा कराव्या लागतात. यामुळें मला आज इतकें काम आहे कीं कांहीं सुचेनासें झालें आहे. त्या बाईला मी आपल्या ताब्यांत घेण्यापूर्वीं—काय, काय त्या बाईचें नांव ? "

" कलावती. "

" हो हो, कलावती. नांव कांहीं इतकेंसें कठीण नाहीं पण तोंडाला येतच नाहीं. तिला माझ्या ताब्यांत घेण्यापूर्वीं तुमची माझी निवांतपणें गांठ पडून कांहीं खुलासा झाला पाहिजे, व तसा करून घेण्यास मला आतां फुरसत नाहीं. काल रात्रीं घरीं आल्यावर मीं तिची चिठी पाहिली.

चिठी शुक्रवारींच आली होती. त्याप्रमाणें मी तिला पाहण्याकरितां गेलों, पण मला जायाला फार रात्र झाली. ती जरा गुंगींत असल्याचें दिसलें म्हणून मीं तिला विशेष हकीगत विचारिली नाहीं. आज संध्याकाळीं किंवा उद्यां सकाळीं मी आपणांला भेटेन."

"जशी सवड होईल तसें. केव्हांही आलां तरी सारखेंच."

आनंदराव म्हणाले:—"तर मग आजच संध्याकाळीं सात वाजतां—कांहीं कारणानें त्या वेळीं यायला मला नच जुळलें तर उद्यां सकाळीं दहा वाजतां येईन. अगदीं खास. तरी पण आज संध्याकाळीं मी एकदा तिकडे जाऊन येईनच. पण काय हो, ती बाई वयानें अगदीं लहान दिसते, नाहीं ?"

"किती तरी लहान! ती म्हणते कीं आपणांस अठरा एकोणीस वर्षें आहेत म्हणून. परंतु इतकीं वर्षें तिला असतील असें नाहीं वाटत."

नंतर गाडी कशी उलटली, घोडा कां बुजाला, कितपत दुखापत झाली वगैरेसंबंधीं दोघांचें थोडेंसें बोलणें होऊन दोघे आपआपल्या रस्त्यानें निघून गेले.





# प्रकरण ६ वें.

—:०:—

## हें घर बाधिक आहे काय !





संध्याकाळीं बरोबर सात वाजतां प्रतापराव कलावतीच्या बिऱ्हाडीं येऊन आनंदरावांची वाट पहात बसले. कलावतीस ताप आला होता यामुळें तिचें तोंड तांबडें लाल दिसत होतें. पुढील खोलींत सारजा बसलेली होती, तिला प्रतापरावानें विचारलें:—" आज बराच वेळ गप्पा चालल्या होत्या वाटतें ? " सुईण कुठें आहे ?

" आतां इथें होती. कांहीं तरी आणण्याकारितां खालीं गेली असेल. "

प्रतापरावांनीं हाक मारिली. त्याबरोबर मैनाई धापा टाकीत वर आली. तिचें अंग स्थूल असल्यानें कितीही सावकाश जिना चढूं लागली तरी तिला दम हा लागावयाचाच.

" मैनाई, हें काय ? तुझ्या ताब्यांतील मनुष्यास तूं इतकें बोलूं द्यावें हें बरें नाहीं. "

मैनाईनें उत्तर केलें:—" पण त्याला माझा काय इलाज डाक्टरसाहेब ? त्यांना थोडें बरें वाटत आहे, तेव्हां त्या बोलणारच. त्यांची तब्बेत आतां छान आहे. संध्याकाळपासून आंग जरा ऊन झालें आहे पण कांहीं हरकत नाहीं. थोडें बोलल्या म्हणून त्यानें कांहीं अपाय नाहीं होणार.

प्रतापराव बोलले:—"मैनाई, तुझें लेक्चर पुरें कर. त्यांच्या अंगांत चांगली शक्ति येईतोंपर्यंत त्यांना बोलावयास मी परवानगी देणार नाहीं.

त्या बोलूं लागल्या तर तूं बंदी करीत जा, समजलें काय? मी आतां जातों व कालच्याप्रमाणेंच आजही झोंपेचें औषध पाठवून देतों."

प्रतापराव साडेसात वाजेपर्यंत आनंदरावांची वाट पाहून नंतर निघून गेले. सारजेची दाढ दुखत होती. म्हणून तीही घरीं निघून गेली. मैनाई बाळंतिणीजवळ जाऊन बसली. सारजा घराच्या बाहेर पडते इतक्यांत कलावतीनें तिला हाका मारण्याला सुरवात केलीः—" सारजाबाई, अग सारजाबाई, इकडे ये. थोडें काम आहे."

मैनाईला फावलेंचः—" हं हं, बाई तुम्हीं बोलावयाचें नाहीं. मी तुम्हांला बोलूं देतें म्हणून प्रतापराव मला मघांशीं नाहीं नाहीं ते बोलले. मी का तुम्हांला बोला म्हणून सांगते?"

असें बोलतां बोलतां मैनाईचा कंठ दाटून आला, व तिचे डोळे पाण्यानें भरले. हा प्रकार पाहून कलावतीला मनापासून हसूं आलें. मैनाईला खरोखरी वाईट वाटल्याचें पाहून ती म्हणालीः—" बरें बाई मी नाहीं बोलत. पण सारजेकडे माझें थोडें काम आहे. ती नाहीं का इथें?"

" नाहीं. ती केव्हांच घराकडे निघून गेली. बाई, तीच तुमच्याशीं फार बोलते. खरें म्हटलें तर प्रतापरावांनीं तिची खरडपट्टी काढायला पाहिजे होती. तें सगळें सोडून मलाच रागें भरले. मऊ लागलें म्हणून अगदींच कांहीं कोंपरांनीं खणूं नये. बरें असा. बाई, तुम्ही स्वस्थ निजा. सारजा नाहीं तर मी आहें तिच्याऐवजीं."

आठ वाजण्याच्या सुमारास मावशीबाईनीं मैनाईला हाक मारली म्हणून ती खालीं गेली. थोड्याच वेळानें आनंदरावही आले. वास्तविक म्हटलें तर त्यांनीं ठरलेल्या वेळेला यायला पाहिजे होतें. पण संध्याकाळीं ते रावपुऱ्यांत सर्जेरावाच्या बंगल्यांत गेले होते. तेथें मोहनेशीं गप्पा गोष्टी करण्यांत सात केव्हां वाजून गेले हें त्यांना समजलें सुद्धां नाहीं. प्रतापराव वाट पाहून गेले असें समजतांच त्यांनीं खेद प्रदर्शित केला व मला यायला उशीर झाला, आतां बाईची तब्येत पाहून जातों, असें ते म्हणाले. मावशीबाईनीं त्यांना वर पोंचविलें व त्या खालीं आल्या. आनंदरावांचें बाळंतणीशीं थोडा वेळ बोलणें होतें इतक्यांत खालील दरवाजा उघ-

ढून जिना चढून कोणी येत आहे असें आनंदरावांना वाटलें. त्याबरोबर ते बाळांतिणीच्या खोलींतून बाहेर आले व पाहतात तों मैनाई सुईण हुश्श हुश्श करीत वर येत असून तिच्या हातांत एक लहानशी बाटली असलेली त्यांना दिसली. बाळंतणीला आज बोलून बोलून त्रास झाला आहे, म्हणून झोंपेचें औषध पाठवून देतो, तें तिला द्या, असें प्रतापराव सांगून गेले होते, त्यांच्याकडूनच हें औषध आलेलें आहे, हें घ्या असें मैनाई आनंदरावांना म्हणाली. त्यांनीं ती बाटली तिच्या हातून घेतली, भोंवतीं गुंडाळलेला कागद काढून टाकिला व बूच काढून ती बाटली नाकास लाविली. ते म्हणालेः—" याला कडू बदामासारखा वास येत आहे. " नंतर त्यांनीं ती बाटली मैनाईच्या नाकाला लाविली. पण ती म्हणालीः-- ' असेल, पण मला थोडी सर्दी झाली आहे. मला नाहीं वास येत. ' नंतर आनंदरावांनीं पुनः बाटलीचा वास घेतला व एक बोट आंत घालून त्यांनीं तें औषध किंचित जिभेवर ठेवून चाटून पाहिलें. नंतर ते म्हणालेः-- " हें फार विलक्षण दिसतें! प्रतापरावांनीं असलें औषध ह्या बाईला कां बरें द्यावें? " नंतर त्यांनीं म्हटलेंः—"सुईण बाई, हें ठेवा नेऊन तिकडे. निजते वेळीं द्यायचें." असें बोलत बोलत ते बाळंतिणीच्या खोलींत गेले. मैनाईनें ती बाटली नेऊन इतर बाटल्या वगैरे जिन्नस ज्या फडताळांत होते तेथेंच तीही ठेविली. नंतर तिनें खोलींत वांकून पाहिलें तर आनंदराव बाळांतिणीशी बोलत उभे असल्याचें तिला दिसलें. तिनें विचारिलेंः—

" बाई, आणखी कांहीं पाहिजे आहे का! " कलावतीनें उत्तर केलें— " सध्यां कांहीं नको. तुम्हा पाहिजे तर खालीं जा. "

मैनाईला पडत्या फळाची आज्ञाच पाहिजे होती. ती तेव्हांच निघून खालीं गेली. थोड्या वेळानें आनंदरावही बाळांतिणीचा निरोप घेऊन निघाले व पुढील खोलींत आले. नंतर तेथून निघून बाहेर जिन्याजवळ आले. तेथें येतांच ग्यालरींतून बाळांतिणीच्या खोलींत जाण्याचें जें दार होतें त्या दाराजवळ भिंतीस टेंकून त्यांच्याकडे डोळे वटारून पहात कोणी उभें असल्याचा त्यांना भास झाला. चेहरा पुरुषाचा असून त्याला काळेभोर

कळे होते. चांदणें पडलें असल्यामुळें तो चेहरा पांढरा फटफटीत, रागीट व तिरस्कारयुक्त असा मोठा चमत्कारिक दिसला. आनंदराव जात्या मोठे धीट, शूर व बेफिकीर होते, पण तो चेहरा पाहतांच ते अगदीं भयभीत झाले. त्यांतल्या त्यांत धीर करून त्यांनीं विचारिलें:—" तूं कोण ? येथें कां आलास ? " त्यांच्या बोलण्यांत गंभीरपणा दिसत होता. त्यांनीं पाहिलेला चेहरा मानवी प्राण्याचा दिसला नाहीं. त्यांच्या प्रश्नास कांहींच उत्तर आलें नाहीं, हालचाल नाहीं, आवाज नाहीं कीं कांहीं नाहीं. कदाचित् चांदण्याच्या अस्पष्ट प्रकाशामुळें असा भीतिकारक भास होत नसेल ना, असें वाटून आनंदराव पुनः आंत गेले व तेथला दिवा आणून त्यांनीं चोहोंकडे पाहिलें. पण तेथें कोणीचि नाहीं. पुरुष नाहीं, स्त्री नाहीं, भूत नाहीं, पिशाच्च नाहीं, कांहीं नाहीं. तरी पण आनंदरावांना वाटलें कीं येथें कोणी तरी उभें होतें. आदले रात्रींही त्यांना असाच भास झाला होता. आज तर प्रत्यक्ष आकृतीच दिसली. यामुळें त्यांचें मन चलबिचल झालें व त्यांना भीति वाटूं लागली. त्यांचें सर्वांग थरथर कांपूं लागलें. ग्यालरींत त्यांनीं दिव्याचा प्रकाश पाडिला, जिन्यांत पाहिलें, पण त्यांना कोठें कांहींच दिसेना. चोहोंकडे अगदीं शांत व सामसूम होतें. दिवा तसाच घेऊन ते बाळंतिणीच्या खोलींत गेले. कलावती आश्चर्यानें म्हणाली:—" दिवा घेऊन काय चाललें आहे इतकें ?"

आनंदराव म्हणाले:—" नाहीं, कांहीं विशेष नाहीं. मी जातों आतां. "

पुनः ते पुढील खोलींत आले. कोंपरान कोंपरा त्यांनीं धुंडाळून पाहिला, पण त्यांना कोणीच दिसलें नाहीं. नंतर खिशांतील दस्तरुमाल घेऊन त्यांनीं घामानें डबडबलेला आपला चेहरा पुसून काढिला आणि जिना उतरून ते खालीं गेले. ' आपणास केवळ भास झाला ' असेंच ते आतां आपणाशीं म्हणूं लागले, ते स्वतःशीं पुटपुटले:-" किती मूर्ख मी ! मला आज झालें तरी काय ? हें घर बाधिक आहे काय ? "

आणि खरोखर लवकरच, रात्रीं दहा वाजले नाहींत तोंच, त्या घरांत बाधाही झालीच. समंदाची नव्हे तर—मृत्यूची. हें पुढें समजेलच.



# प्रकरण ७ वें.

———::———

## झोंपेचें औषध.





आनंदराव जाण्याकरितां निघाले तेव्हां मावशीबाईही आं· तून बाहेर आल्या. त्यांच्याबरोबर एक दोन मिनिटें बोलून ते निघून गेले. मावशीबाई दरवाजा बंद करून पुनः स्वयंपाकघरांत आल्या. तेथें त्यांचें व मैनाईचें गप्पाष्टक सुरू झालें. इतकी बारीकसारीक सुद्धां माहिती दिलेली पाहून वाचकांना थोडें आश्चर्य वाटेल. पण ह्या यमरात्रीच्या—हो, यमरात्रच ती—प्रसंगीं घडलेली प्रत्येक गोष्ट बरीच महत्त्वाची आहे असें त्यांना आढळून येईल.

मावशीबाई चैनींत एका पाटावर बसल्या होत्या. जवळच चहाचें भांडें असून मधून मधून चहाचे घोंटावर घोंट चालले होते. मैनाई फतकल मारून तेथेंच कायसें करीत बसली होती. त्यांच्या गप्पा अगदीं ऐन रंगांत आल्या होत्या, इतक्यांत स्वयंपाकघराच्या खिडकीवर एक जोराची थाप पडली. त्याबरोबर ‘ अगबाई ! ’ ह्मणून दोघीही दचकून उठल्या व अतिशय घाबरून गेल्या. थोडासा विचार केला असता तर त्यांना तेव्हांच समजलें असतें कीं, नेहमींप्रमाणें सारजेनेंच ती थाप मारिली. कारण केव्हांही यावयाचें झालें तरी सारजा अशीच दारावर थाप मारी.

आणि खरोखरच सारजेनें ती थाप मारली होती. नंतर ती स्वयंपाकघरांत आली व तेथें येऊन हांस हांस हांसली त्यामुळें मावशीबाईंना. फारच राग आला. त्या ह्मणाल्याः–" सारजे, तूं आतां अगदीं लहान नाहींस, अशा रीतीनें दुसऱ्यांना फसवितेस ती ? मुकाट्यानें यायला काय झालें ?"

सारजाः—" तुह्मीं दोघींनीं जी दचकून उडी मारली ती पाहून मला खरोखरच मोठी गंमत वाटली. माझी दाढ दुखत आहे ह्मणून मी निजणार होतें. पण ह्मटलें कलावतीबाईंना भेटून कांहीं काम असलें तर पहावें ह्मणून आलें. अजुनी कांहीं त्यांना झोंप लागली नसेल ? "

" नसेल. आतांच आनंदराव वरून येऊन बाहेर गेले, पाहिजे तर वरती जाऊन त्या बाईंनाच विचार कांहीं काम आहे का ह्मणून. " असें मैनाई ह्मणाली. मावशीबाई अद्याप रागानें फुणफुणत होत्याच. मैनाईची सारजेवर जरा मर्जी होती. कारण ती तिचें पुष्कळ काम करी व बाळंतिणीजवळ नेहमीं बसून राही. नाहीं तर हें सर्व तिला एकटीला करावें लागलें असतें.

सारजा माडीवर गेली. ती अगदीं थकलेली दिसत होती, कारण शुक्रवारपासून तिला जागरणच झालें होतें. रविवारीं तिला निजावयाला थोडी सवड सांपडली, पण दाढ दुखत असल्यानें तिला चांगलीशी झोंप मिळाली नव्हती. थोडें उष्ण झालें कीं हा विकार तिला नेहमीं होत असे.

सारजा बाळंतिणीबरोबर थोडा वेळ बोलत बसली. इतक्यांत मैनाई सुईण एका हातांत दिवा व एका हातात तरवणाचें भांडें घेऊन वर आली. दिव्याच्या प्रकाशांत सारजेचें सुजलेलें तोंड पाहून कलावतीला हांसू आलें. ती ह्मणालीः—" सारजाबाई, तुझे गाल किती सुजले आहेत ग हे ! वाटोळे गरगरीत दिसतात. "

सारजेनें उत्तर केलेंः—" सुजले तर सुजले. मी नाहीं त्याची काळजी करीत. सूज काय, जाईल मेली आज नाहीं उद्यां. ठणका कमी झाला ह्मणजे झालें. " असें ह्मणून सारजा तेथून निघून गेली. मैनाईनें तरवणीचें भांडें कलावतीच्या पुढें केलें. तरवणी खाऊन झाल्यानंतर कलावती ह्मणालीः—

" अतां तें माझें झोंपेचें औषध द्या."

मैनाई:—" आतांच तरवणी घेतली आहे. इतक्यांत औषध घ्यायचें नाहीं."

" काय होतें घेतलें म्हणून ? आणलें आहे कीं नाहीं ?"

" हो, आनंदराव इथें होते तेव्हांच आणलेलं आहे. खालून मीच वरती घेऊन आलें. त्यांनीं तें चाखून सुद्धां पाहिलें. सगळ्या डाक्तरांची मेली हीच संवय. एकमेकांचें औषध आपलें त्यांनीं चाखून पहायचें. त्यांत त्यांना काय मिळतें त्यांचें त्यांनाच माहीत !"

कलावती म्हणाली:—" डॉक्टर म्हणाले कीं आपण उद्यां दहा वाजतां प्रतापरावांची गांठ घेणार. मग तेव्हांपासून आपलें औषध सुरू करूं."

मैनाई:—" मीं दिखील असेंच कांहीं ऐकलें आहे."

इतक्यांत मावशीबाईही खालचें कामधाम आटपून माडीवर आल्या. त्यांनीं व मैनाईनें आपआपलें अंथरूण वगैरे घालून निजण्याची तयारी केली. पावणेदहा वाजण्याच्या सुमाराला कलावतीनें मैनाईस पुन्हा हाक मारून झोंपेचें औषध घेण्यास सांगितलें. औषधाची बाटली फडताळांत होती. ती घेऊन मैनाईनें तींतील औषध एका कांचेच्या ग्लासांत ओतून कलावतीला दिलें. मावशीबाई जवळच उभ्या होत्या. औषधाचा वास त्यांच्या कपाळांत भरला. त्याबरोबर शिसारी आल्यासारखें करून त्या म्हणाल्या:—

" इश्श. काय जळली घाण तरी !"

मैनाई हळूच म्हणाली:—"आनंदराव सुद्धां असेंच म्हणाले. डॉक्तरांचीं नाकें तरी किती तिखट असतात हो !"

मावशीबाई:"—ही घाण येण्याला नाक कांहीं तिखट नको."

इतक्यांत कलावतीनें ग्लास तोंडाला लावला व त्यांतील औषध पिऊन टाकिलें. अर्धें मिनीट सुद्धां झालें नसेल तोंच तिनें एक मोठ्यानें किंकाळी फोडली व बाजेवर अंग टाकलें. तिला भयंकर वेदना होत असाव्यात, ती अतिशय घाबरलेली असावी असें दिसलें. त्यामुळें खोलींत एकच

घाबरून उडून गेली. बाळंतिणीच्या प्रकृतीला एकाएकी इतकें काय झालें ? तिला मूर्च्छा आली, का फेंपरें आलें, कां तिचें देहावसान झालें, झालें तरी काय ? हें कोणासच कांहीं समजेना.

मैनाई अशा कामांत बरीच निरडलेली होती, व तिला अनुभवही बराच आलेला होता म्हणून कलावतीचें प्राणोत्क्रमण झाल्याचें तिनें जाणलें. त्यामुळें तिला फारच भीति वाटली. ती मावशीबाईंना म्हणाली:—"मावशीबाई, बाळंतिणीचा प्राण गेला बरें. यांत कांहीं शंका नाहीं. त्या औषधांत विष असलें पाहिजे खास. आतां आमची गत कशी होईल हो ! असलें विषारी औषध दिल्याबद्दल आमची दोघींची चौकशी करतील, आमच्यावर खटला करतील, आणि आम्हांला शेवटीं फांशीं देतील. काय झालें हो हें !"

मावशीबाईंनीं तर अगदीं आकांत करून सोडला. त्या धाडधाड करीत जिन्यांतून खालीं आल्या. भीतीनें त्यांची अगदीं गाळण उडून नेली होती. मैनाईनें म्हटलेले भावी परिणाम त्यांच्या डोळ्यासमोर दिसूं लागले. पुढील दरवाजा उघडून त्या रस्त्यानें एकसारख्या पळत सुटल्या. प्रतापरावांना बोलावून घेऊन यावें असा कांहीं विचार त्यांच्या डोक्यांत आला होता असें दिसलें वाटेंत त्यांना आनंदराव भेटले. परंतु त्यांच्या तोंडांतून शब्दच उमटेना; आनंदरावांनीं त्यांना थांबवून धीर दिला व त्यांच्याकडून, बाळंतीणबाई एकाएकीं मेल्याची हकीगत, त्यांनीं कशीबशी काढून घेतली. ती ऐकून आनंदरावही त्या घराकडे पळत निघाले, मावशीबाईही आनंदरावांच्या पाठोपाठ आल्याच. येतांना मठांतील दिक्षितांची वाटेंत गांठ पडली तेही तिकडे गेले.

मैनाई बाजेशेजारीं उभी असून तिची मुद्रा भयभीत दिसत होती. आंत गेल्याबरोबर आनंदरावांनीं बाळंतिणीच्या अंगावरील पांघरूण बाजूस सारून तिची छाती तपासली व तिचा एक हात धरून ते नाडी पाहूं लागले. नंतर ते मागें वळून म्हणाले:—" फार वाईट प्रसंग ! नुकताच एक तासापूर्वी मी येऊन गेलों, तेव्हां हिची तब्येत चांगली होती. ऐकलें दिक्षित !"

" मग आतां काय अगदींच आशा नाहीं ? " दिक्षितांनीं विचारिलें.

" छेः, बिलकूल नाहीं!" नंतर आनंदराव जरा जोरानें मैनाई सुइणीला म्हणालेः—" हिला तुम्हीं आणखी कांहीं खायाला दिलें काय ? "

आपणावर पुढें काय प्रसंग येणार याची ही प्रस्तावनाच आहे असें मैनाईला वाटलें. ती डोळ्याचें पाणी पुसत म्हणालीः—" डाक्टर, तिला मीं प्रथम तरवणी दिली नि मग तें झोंपेचें औषध दिलें. नाहीं म्हणून काय उपयोग ? "

"तें—तें औषध कां? मी जातांना तें बरोबर घेऊन गेलों नाहीं ही मोठी चूक झाली. " असें आनंदराव हळूच पुटपुटले; पण दिक्षितांनीं ते शद्ब ऐकले. त्यांनी विचारिलें:—

" काय हो आनंदराव ! औषधांत विष होतें ! आणि त्यापासून ती मेली ? "

" होय, खात्रीनें विषापासून. दुसऱ्या कशापासून असें एकाएकीं मरण येणें शक्यच नाहीं. " असें बोलत आसतांना आनंदराव खालीं वांकून बाळंतिणीच्या तोंडाचा वास घेत होते. ते पुढें म्हणालेः—" दिक्षीत, औषधांचे गुण त्यांच्या वासावरून सुद्धां समजतात, तसे आपणांस समजत नसतील, नाहीं ? "

" डॉक्टरसाहेब, मला औषधांची बरीच माहिती आहे. माझे वडील चांगले नामांकित वैद्य होते. माझें अर्धेअधिक बाळपण त्यांच्या जवळच गेलें. इंग्रजी औषधांची सुद्धां मला थोडी माहिती आहे. "

" अरे वा ! तर मग खालीं वांकून एवढा वास घ्या व काय आहे तें सांगा. "

दिक्षितांनीं वास घेतला, त्याबरोबर त्यांनीं आपलें तोंड मागें घेऊन म्हटलें:-" विष, खरेंच विष. "

' तेंच ' असें आनंदरावांनीं मान हालवून दर्शविलें. नंतर मैनाईकडे वळून ते म्हणालेः—" तिनें काय काय घेतलें म्हणालां ? तरवणी ? आणि नंतर औषध ? प्रथम तरवणी, होय ना ? "

घांदल उडून गेली. बाळंतिणीच्या प्रकृतीला एकाएकी इतकें काय झालें ! तिला मूर्च्छा आली, का फेंपरें आलें, कां तिचें देहावसान झालें, झालें तरी काय ? हें कोणासच कांहीं समजेना.

मैनाई अशा कामांत बरीच निरडलेली होती, व तिला अनुभवही बराच आलेला होता म्हणून कलावतीचें प्राणोत्क्रमण झाल्याचें तिनें जाणलें. त्यामुळें तिला फारच भीति वाटली. ती मावशीबाईना म्हणाली:—"मावशीबाई, बाळंतिणीचा प्राण गेला बरें. यांत कांहीं शंका नाहीं. त्या औषधांत विष असलें पाहिजे खास. आतां आमची गत कशी होईल हो ? असलें विषारी औषध दिल्याबद्दल आमची दोघींची चौकशी करतील, आमच्यावर खटला करतील, आणि आम्हांला शेवटीं फांशीं देतील. काय झालें हो हें ! "

मावशीबाईनीं तर अगदीं आकांत करून सोडला. त्या धाडधाड करीत जिन्यांतून खालीं आल्या. भीतीनें त्यांची अगदीं गाळण उडून नेली होती. मैनाईनें म्हटलेले भावी परिणाम त्यांच्या डोळ्यासमोर दिसूं लागले. पुढील दरवाजा उघडून त्या रस्त्यानें एकसारख्या पळत सुटल्या. प्रतापरावांना बोलावून घेऊन यावें असा कांहीं विचार त्यांच्या डोक्यांत आला होता असें दिसलें वाटेंत त्यांना आनंदराव भेटले. परंतु त्यांच्या तोंडांतून शद्बच उमटेना; आनंदरावांनीं त्यांना थांबवून धीर दिला व त्यांच्याकडून, बाळंतीणबाई एकाएकीं मेल्याची हकीगत, त्यांनीं कशीबशी काढून घेतली. ती ऐकून आनंदरावही त्या घराकडे पळत निघाले, मावशीबाईही आनंदरावांच्या पाठोपाठ आल्याच. येतांना मठांतील दिक्षितांची वाटेंत गांठ पडली तेही तिकडे गेले.

मैनाई बाजेशेजारीं उभी असून तिची मुद्रा भयभीत दिसत होती. आंत गेल्याबरोबर आनंदरावांनीं बाळंतिणीच्या अंगावरील पांघरूण बाजूस सारून तिची छाती तपासली व तिचा एक हात धरून ते नाडी पाहूं लागले. नंतर ते मागें वळून म्हणाले:—" फार वाईट प्रसंग ! नुकताच एक तासापूर्वी मी येऊन गेलों, तेव्हां हिची तब्येत चांगली होती. ऐकलें दिक्षित ! "

" मग आतां काय अगदींच आशा नाहीं ? " दिक्षितांनीं विचारिलें.

" छेः, बिलकूल नाहीं!" नंतर आनंदराव जरा जोरानें मैनाई सुइणीला म्हणालेः—" हिला तुम्हीं आणखी कांहीं खायाला दिलें काय ? "

आपणावर पुढें काय प्रसंग येणार याची ही प्रस्तावनाच आहे असें मैनाईला वाटलें. ती डोळ्याचें पाणी पुसत म्हणालीः—" डाक्टर, तिला मीं प्रथम तरवणी दिली नि मग तें झोंपेचें औषध दिलें. नाहीं म्हणून काय उपयोग ? "

"तें—तें औषध कां? मी जातांना तें बरोबर घेऊन गेलों नाहीं ही मोठी चूक झाली. " असें आनंदराव हळूच पुटपुटले; पण दिक्षितांनीं ते शब्द ऐकले. त्यांनी विचारिलें:—

" काय हो आनंदराव ! औषधांत विष होतें ! आणि त्यापासून ती मेली ? "

" होय, खात्रीनें विषापासून. दुसऱ्या कशापासून असें एकाएकीं मरण येणें शक्यच नाहीं. " असें बोलत आसतांना आनंदराव खालीं वांकून बाळंतिणीच्या तोंडाचा वास घेत होते. ते पुढें म्हणालेः—" दिक्षीत, औषधांचे गुण त्यांच्या वासावरून सुद्धां समजतात, तसे आपणांस समजत नसतील, नाहीं ? "

" डॉक्तरसाहेब, मला औषधांची बरीच माहिती आहे. माझे वडील चांगले नामांकित वैद्य होते. माझें अर्धेअधिक बाळपण त्यांच्या जवळच गेलें. इंग्रजी औषधांची सुद्धां मला थोडी माहिती आहे. "

" अरे वा ! तर मग खालीं वांकून एवढा वास घ्या व काय आहे तें सांगा. "

दिक्षितांनीं वास घेतला, त्याबरोबर त्यांनीं आपलें तोंड मागें घेऊन म्हटलें:-" विष, खरेंच विष. "

' तेंच ' असें आनंदरावांनीं मान हालवून दर्शविलें. नंतर मैनाईकडे वळून ते म्हणालेः—" तिनें काय काय घेतलें म्हणालां ? तरवणी ? आणि नंतर औषध ? प्रथम तरवणी, होय ना ? "

" होय साहेब, आपण निघून गेल्यावर थोड्याच वेळांत तरवणी दिली. तें—भांडें पहा पाहिजे तर. मी अजूनी खालीं दिखील नेलें नाहीं. "

आनंदरावांनीं तें भांडें घेऊन तरवणीचा वास घेतला व नंतर 'यांत कांहीं नाहीं,' असें ते म्हणाले. मैनाईनें पुढें सुरुवात केली:—" तरवणी दिल्यावर अर्ध्या पाऊण तासानें मीं तिला झोंपेचें औषध दिलें. देऊन बाजूला सुद्धां झालें नसेन हो, तोंच—"

नंतर आनंदरावांनीं औषधाची बाटली कोठें आहे म्हणून विचारिलें. बाटली तेथेंच फडताळांत होती. आनंदरावांनीं ती घेऊन बूच काढून वास घेतला व पुनः बूच घालून ती तशीच्या तशीच फडताळांत ठेवून दिली. त्यांचा चेहरा रागानें लाल झाला. 'त्यांत कांहीं विशेष आहे काय ?' असें दिक्षितांनीं विचारलें. आनंदरावांनीं कांहीं एक उत्तर न देतां ती बाटली आणून त्यांच्या हातांत दिली. वास घेतल्यावर दिक्षितांचीही खात्री झाली. " हें औषध कोणीं पाठवून दिलें ! " असें ते विचारणार इतक्यांत त्यांची नजर बाटलीवरील कागदाकडे गेली. त्यावरून विश्राम डॉक्टरांच्या दवाखान्यांतून औषध आल्याचें त्यांना समजलें. आनंदरावांनीं नंतर ती बाटली घेऊन फडताळांत ठेविली, व मावशीबाईकडे वळून ते म्हणाले:—" मावशीबाई, आतां अशाच प्रतापरावांकडे जाऊन त्यांना येथपर्यंत घेऊन या. " मावशीबाई घरांतून बाहेर पडल्या त्या तडक विश्राम डॉक्टरांच्या घरीं गेल्या. विश्वासराव दारांत उभे असल्याचें त्यांनीं लांबूनच पाहिलें. मावशीबाईंना रडें आवरेना. त्या हुंदके देत म्हणाल्या:—" प्रतापराव कुठें आहेत ? त्यांनीं संध्याकाळीं औषध पाठवून दिलें त्या औषधानें ती बाई मेली. "

विश्वासरावांना कांहींच उमज पडेना. ते म्हणाले:—" कोण बाई ? कुठलें औषध ? काय बडबडता तुम्ही ? नीट सांगा. "

" माझ्या घरीं कलावती नांवाची एक परस्थ बाई येऊन बाळंत झाली. तिला प्रतापराव औषध देण्याकरितां येत असतात. त्यांनीं तिला एक झोंपेचें औषध पाठवून दिलें. तें घेतल्याबरोबर तिचा प्राण गेला. त्या औषधांत विष असलें पाहिजे. म्हणून आनंदरावांनीं प्रतापरावांना

आत्याच्या आत्ता घेऊन येण्याकरितां मला इकडे पाठवून दिलें. कुठें आहेत ते ?"

विश्वासरावांनीं दरवाजा बंद केला व ते प्रतापरावांच्या घरीं गेले. ओसरीवर वसंत उभा होता, त्याला त्यांनीं विचारलें, "वसंत, बाबा आहेत कारे आंत ?" "नाहींत, पण इतक्यांत येतील. आतां फार वेळ लागणार नाहीं. काका, आज संध्याकाळीं आजीकडून पत्र आलें आहे. तुम्हांला कळलें काय ?" असें वसंत आनंदानें म्हणाला. वसंतानें ही आनंदाची बातमी सांगितली खरी, पण विश्वासरावांचें तिकडे लक्ष्य नव्हतें. ते म्हणाले:—"वसंत, बाबांनीं संध्याकाळीं त्या कलावती बाई-कडे एखादें औषध तयार करून पाठविलें कायरे ?"

"होय होय, काका, पाठविलें. मला माहीत आहे. त्यांनीं तयार केलें तेव्हां मी तिथेंच दवाखान्यांत होतों. झोपेचें औषध पाठविलें होतें खरें."

मावशीबाई झडझडल्या:—"कां म्हणजे ? तें औषध घेतलें म्हणूनच ती मेली. कुणी कुणी म्हणतात कीं त्या औषधांत विष होतें. आणखी पुनः विचारतो कां बरें म्हणून !"

वसंतला तें खरें सुद्धां वाटेना. तो काकांच्या डोळ्यांकडे टकामका पाहूं लागला. त्याला विश्वासराव म्हणाले:—"बाळ, मी आतां तिकडेच निघालों. मावशीबाई म्हणतात कीं कलावती मेली. बाबा घरीं आले कीं त्यांना तिकडेच दे पाठवून." इतकें बोलून विश्वासराव व मावशीबाई अशी दोघें तेथून निघालीं.

वसंत वयानें लहान पण फार समजूतदार व चाणाक्ष होता. ही हकी-कत ऐकून त्यास चैन पडेना. तो आपला त्यांच्याकडे पहात उभा राहि-ला. त्याच्या डोक्यांत हजारों विचारतरंग येऊन त्याचें चित्त अगदीं अस्वस्थ झालें. लागलीच त्यानें अंगांत कोट घातला व डोकीस टोपी अडकाविली आणि 'काका मावशीबाईच्या घरीं गेले आहेत. मीही ति-कडेच निघालों. बाबा घरीं परत आल्याबरोबर त्यांना तिकडेच पाठवून द्या. बाळंतिणीचा प्राण घोटाळला आहे म्हणे.' असें घरांत सांगून तो

पळत सुटला. विश्वासराव कलावतीच्या खोलींत जाऊन पोंचतात तों वसंतही दाखल झालाच. कलावतीची नाडी तपासून ती खरोखरच मेली आहे अशी विश्वासरावांनीं आपली खात्री करून घेतली. मग त्यांनीं इतर विचारपूस करण्यास सुरवात केली. आनंदरावांनीं ती बाटली त्यांना दाखवून म्हटलें:—" विश्वासराव, ह्या बाटलीचें बूच काढून वास घ्या. विनाकारण कोणीं कोणावर दोषरोप करणें बरें नव्हे. म्हणून मी म्हणतों कीं कांहीं तरी भयंकर चूक झाली असली पाहिजे खास. ह्या औषधांत, कसें कां होईना, विष गेलेलें आहे व त्या विषापासूनच ती मेली आहे."

विश्वासरावांनीं बाटलीचा वास घेतला. त्यांत विष असल्याबद्दल त्यांना शंकाच राहिली नाहीं. पण 'असलें औषध आपल्या बंधूंनीं पाठविलें असेल हें शक्य नाहीं' असें तें म्हणाले. आनंदरावांनीं उत्तर केलें:— "त्यांनीं स्वत: तें औषध तयार केलें नसेल. बरें, बाटलीवरील कागद पहा. हें अक्षर तरी त्यांचेंच काय? 'कलावतीबाई—झोंपेचें औषध— निजतेवेळीं घेणें.'"

"होय. हें अक्षर त्यांचेंच. आंतलें औषधही त्यांनींच तयार केलेलें आहे असें मला वाटतें. पण त्यांत त्यांनीं विष घातलें असेल हें मला तरी खरें वाटत नाहीं."

आनंदराव म्हणाले:—" विश्वासराव, औषध आलें त्या वेळीं मी येथेंच होतों. मला त्याच वेळीं वास आला, प्रथम मला वाटलें कीं बदामाचा अर्क घातला असेल, पण मागाहून माझी खात्री झाली कीं त्यांत विष आहे. तथापि अगदीं सूक्ष्म प्रमाणांत असेल, तेवढ्यानें कांहीं अपाय होणार नाहीं असें मला वाटलें. तरी पण असलें विष प्रतापरावांनीं त्या औषधांत कां घातलें हें मला समजेना. तो वास अजून माझ्या नाकांतून नाहींसा झाला नाहीं. परवां टाइम्समध्यें 'भयंकर चूक' या मथळ्याखालीं एका डॉक्टरची गोष्ट लिहून आली होती; त्याप्रमाणें हीही चूक झाली असेल कदाचित्. मी काय म्हणतों ध्यानांत आलें ना!"

विश्वासरावांनीं मान हालविली.

आनंदराव पुढें म्हणाले:—" नंतर मी जातेवेळीं बाळंतिणीला बजावून गेलों कीं प्रतापरावाकडे निरोप पाठवून त्यांच्याकडून उत्तर आल्यानंतर मग औषध द्यावें. पुनः घरीं जातांना मीं प्रतापरावांचा शोध केला, पण ते घरीं नव्हते. औषधाला विषाचा वास येत होता तो कां हें त्यांना विचारावें असें माझ्या मनांत होतें. 'कांहीं हरकत नाहीं' असें त्यांनीं सांगितलें असतें तर मग भीति बाळगण्याचें कारण नव्हतें. अलीकडे डॉक्टर लोकांच्या हातून बऱ्याच चुका होत आहेत तेव्हां सर्वांनींच जपून असावें हें चांगलें."

"तें कांहीं खोटें नाहीं." एवढेंच विश्वासराव म्हणाले.

आनंदरावांनीं पुढें सुरवात केली:—"प्रतापरावांची आतां गांठ पडत नाहीं अशी जेव्हां माझी खात्री झाली तेव्हां मी घरीं गेलों व दुसरें एक झोंपेचें औषध तयार केलें आणि तें कलावतीला द्यावें म्हणून निघालों. इतक्यांत एका रोग्याला पहावयास येण्याबद्दल अगदीं निकडीचें बोलावणें आलें. तें घर वाटेवरच होतें. तेथें जाऊन होईल तितक्या लवकर मी निघालोंच. पण उशीर झालाच आणि असा परिणाम झाला!"

वसंत तेथें उभा असून मोठ्या उत्सुकतेनें व लक्षपूर्वक आनंदरावांचें बोलणें ऐकत होता. तो मध्येंच पुढें येऊन म्हणाला:—"तुम्हीं जें औषध तयार केलें म्हणतां तें आहे काय तुमच्याजवळ?" "हो, आहे. हें पहा. यांत विषाचा वास तुला येणार नाहीं." असें आनंदराव खिशांतील बाटली पुढें करून म्हणाले. यःकश्चित मुलानें याप्रमाणें मध्येंच तोंड घालावें हें आनंदरावांना बरें वाटलें नाहीं. वसंतानें ती बाटली घेऊन तिचें बूच काढलें, वास घेतला व थोडेंसें औषध जिभेवर ठेविलें. वसंताला डॉक्टर लोकांची संवय लागली होती. कारण तो आपले वडील व चुलते यांच्या हाताखालीं नेहमीं दवाखान्यांत कांहीं ना कांहीं तरी काम करीत असे. तो म्हणाला:—"यांत कांहीं विष नाहीं. बाबांनीं औषध तयार करून पाठविलें त्यांतही विष नव्हतेंच. तयार करते वेळीं मी जवळच उभा राहून पहात होतों."

तिकडे प्रतापराव बाहेरून घरीं आले. त्यांना सर्व हकीकत कळली.

परंतु माधवीबाईंचा स्वभाव त्यांना पूर्ण माहीत होता; एवढेसें कांहीं झालें तरी त्या मोठा बाऊ करून दाखवीत; म्हणून प्रतापरावांना वाटलें कीं ती बाळंतीणबाई मेली नसून तिला फक्त मूर्च्छा येऊन ती बेशुद्ध पडली असावी. विश्वासराव गेल्याचें समजतांच तेही तिकडे जावयाकरितां निघाले. तेथें गेल्यावर सर्व प्रकार नजरेस पडला; त्यांना फारच आश्चर्य वाटलें. असें कसें झालें असावें, हें त्यांना उमजेना. परंतु आपल्या हातून औषध तयार करण्याच्या कामीं कांहीं चूक झाली असेल ही गोष्ट मात्र ते कबूल करीनात.

दिक्षीत त्यांना म्हणाले:—" प्रतापराव, याचा कांहीं बरोबर उलगडा होत नाहीं."

प्रतापराव शांतपणानें व गंभीर स्वरानें म्हणाले:—" दिक्षीत, तुमच्या विचारण्याचा झोंक मला कळला. पण त्या सर्वसाक्षी परमेश्वराला स्मरून शपथपूर्वक मी सांगतों कीं, संध्याकाळीं ह्या बाईकरितां जें झोंपेचें औषध मीं पाठवून दिलें त्यांत कोणत्याही प्रकारचें विष मीं घातलें नाहीं. यांत कांहीं तरी लबाडी झालेली असावी अगर कांहीं तरी भयंकर प्रकार न समजतां झालेला आहे. आनंदराव, ह्या गोष्टीचा पक्का तपास लावण्याच्या कामीं आपण शक्य तेवढे प्रयत्न केले पाहिजेत. आपण या कामांत मला मदत करालच."

परंतु आनंदरावांनीं हे शेवटले शब्द ऐकले नाहींत. त्यांचें चित्त दुसरीकडे गुंतलेलें होतें. कदाचित् त्या रात्रीं ज्या ज्या गोष्टी घडून आल्या त्यांची ते सांगड घालीत असावेत. समोर पडलेल्या त्या हतभागी स्त्रीच्या प्रेताकडे त्यांचें लक्ष्य नव्हतें. तिचा निरोप घेऊन जातेवेळीं जिन्यांत जो चेहरा त्यांनीं पाहिला, अगर आपणाला दिसला असें त्यांना वाटलें, त्या मनुष्याकृतीकडे त्यांचें लक्ष गुंतलेलें होतें. त्यांची आतां खात्री होऊन चुकली कीं ती आपल्या मनाची नुसती कल्पना नव्हे, तो केवळ भास नव्हे, कीं ती अमानुष योनींपैकीं नव्हे, तर ह्या मृत्युलोकांत राहून श्वासोच्छ्वास करणारा कोणी तरी मानवी प्राणीच होता. त्यानंतर थोडक्याच वेळानें जो अनन्वित प्रकार घडून आला त्या प्रका-

राशीं त्या चेहऱ्याचा संबंध आनंदरावांनीं जोडला काय ? तो चोरटा मनुष्य, मग तो कोणी कां असेना, तेथें छपून बसून तिचा प्राण घेण्याची संधि पहात बसला होता असा त्यांना संशय आला काय ? पण हें कांहीं सध्यां सांगतां येणार नाहीं. इतकें मात्र खरें कीं, त्या चेहऱ्याची आनंदरावांना अत्यंत भीति वाटूं लागली. तो चेहरा ह्या मृत्युलोकापैकीं नसून इतर योनींपैकीं असावा असें त्यांना कितीदां तरी वाटलें—नव्हे—तशी त्यांची इच्छाच दिसत होती !





# प्रकरण ८ वें.

—:o:—

## विषाचा शिसा.



आतां पुढें काय करावें ? प्रतापरावांनीं म्हटल्याप्रमाणें ह्या भयंकर कृत्याचा कसा तपास लागणार ? सर्वच कांहीं गूढ पडलें. तें निर्जीव व अचल शरीर बाजेवर तसेंच पडलेलें होतें, व सभोंवतीं माणसें आश्चर्य करीत उभी राहिलीं होतीं. वैद्य अगर डॉक्टर लोकांना मनुष्य जन्मल्यापासून तों मरेपर्यंतच्या आयुष्यक्रमांतील दिसून येणाऱ्या वेगवेगळ्या स्थितींचा नेहमीं अनुभव येतो. परंतु येथें जे थोडे वैद्य व डॉक्टर जमले, होते त्यांना आजपर्यंत जे जे चमत्कारिक प्रसंग त्यांनीं पाहिले, त्या सर्वांत हल्लींचा प्रसंग अत्यंत चमत्कारिक हें कबूल करणें भाग पडलें.

आनंदराव बाजेच्या पलीकडील बाजूस उभे होते, ते एकदम दाराजवळ आले व खोलींत मावशीबाई व मैनाई अशा दोघीजणी बायका होत्या त्यांना बाहेर जाण्यास त्यांनीं खुणावलें, त्याबरोबर त्या बाहेर गेल्या. आनंदरावांनीं वसंतालाही खूण केली. पण तो जागेवरून हालला नाहीं. तो खोलींत भिंतीस टेंकून उभा होता तेथूनच म्हणालाः—" मी येथेंच राहतों, बाहेर जाण्याचें काय कारण ! " वसंतानें बाहेर जावें असें आनं-

दरावांच्या मनांत फार होतें. पण त्याचें हें धिटाईचें भाषण ऐकतांच ते गुळमुळ करूं लागले. नंतर ' हा मुलगा समजूतदार आहे ना ? ' असें त्यांनीं विश्वासरावांना विचारिलें. विश्वासरावांनीं ' होय ' असें म्हणतांच आनंदरावांनीं खोलीचें दार लावून घेतलें व म्हटलें:—" यांत कांहीं तरी लबाडी झाली असावी असें मघाशीं, प्रतापराव, आपण बोललां. पण लबाडी झाली असें मानण्यास कारणें आहेत काय ? मी काय म्हणतों समजलें ? त्या दोघी बायांचा स्वभाव व वर्तन माझ्यापेक्षां आपणांला जास्त माहीत. त्यांपैकीं एकीनें किंवा दोघींनींही—"

प्रतापराव एकदम म्हणाले:—" छे छे छे छे! मैनाई सुइणीचा किंवा मावशीबाईचा मला संशय आला असें तुम्ही बिलकुल समजू नका. मैनाईला थोडें कैफ घेण्याचें व्यसन आहे ही गोष्ट खरी, आणि मावशीबाई ही अतिशय मूर्ख व भितरी आहे हेंही खरें. परंतु जसा मी किंवा आपण कधीं कोणाचा जीव घेणार नाहीं, तसेंच त्याही घेणार नाहींत हें खास. आनंदराव, तुम्हांला असें कां वाटलें ? " आनंदरावांनीं उत्तर केलें:—" प्रतापराव, माफ करा, तुमच्याच बोलण्यावरून मीं तसें अनुमान काढलें. त्या दोघींचा संशय घेण्यास कांहीं कारण नाहीं असें मला सुद्धां खात्रीनें वाटतें. परंतु त्या दोघींशिवाय इथें तिसरें कोणी नव्हतें म्हणून—"

" कोणावरच दोषारोप करण्याची माझी इच्छा नाहीं. हें गूढ काय आहे समजेना म्हणून मीं तसें म्हटलें. लबाडी झाली असावी असें म्हणण्याचा उद्देश एवढाच कीं माझें घर व हें घर यांच्या दरम्यान तें औषध कोणीं तरी बदललें असलें पाहिजे किंवा त्यांत कांहीं तरी कमजास्त केलें असलें पाहिजे. "

विश्वासराव बोलले:—" असें होणें संभवनीय नाहीं. आमचा पोऱ्या औषधें अगदीं बंदोबस्तानें नेतो. माझ्या मनांत निराळाच विचार आला आहे. प्रतापराव, ह्या बाईची तुम्हांला आमच्या सर्वांपेक्षां माहिती जास्त. मी तर आतांच तिला पाहतों. दिक्षितांचीही स्थिति तीच. आनंदरावांनीं सुद्धां तिला एकदांच पाहिली—"

आनंदराव मध्येंच म्हणाले:--" दोनदां दोनदां; काल रात्रीं एकदां व आज संध्याकाळीं एकदां. माझी व प्रतापरावांची भेटीची वेळ ठरली ती केव्हांच निघून गेली हें मला कळलें असतें तर मी संध्याकाळीं येथें आलोंच नसतों. मी रावपुऱ्यांत एक मनुष्य आजारी होता त्याला पाहण्याकरितां गेलों होतों. तिकडे बोलण्याच्या नादांत भेटीची वेळ केव्हां निघून गेली हें मला समजलें सुद्धां नाहीं."

विश्वासराव म्हणाले:-"कसें कां असेना ? तुम्हांला जास्त माहिती नाहीं एवढें खास. तुमच्यापेक्षां प्रतापरावांना जास्त माहिती, कारण तेंच तिला औषध देत. त्यांना मी असें विचारतों कीं, तिनें आपण होऊनच त्या औषधांत विष मिसळलें नसेल ना ? प्रतापराव, ती दुःखीकष्टी, आपल्या जिवाला त्रासलेली अशी दिसे काय ?"

प्रतापराव:-" छे, बिलकूल नाहीं. ती अगदीं आनंदांत व मजेंत असे. शिवाय मैनाई सुईण नेहमीं तिच्याजवळच असावयाची. तिला न कळत औषधांत कांहीं सुद्धां तिला मिसळतां आलें नसतें. आणि सुईण तर सांगते कीं, तें औषध खोलींत फडताळांत ठेविलें होतें, त्याच्यावर आपली नजर होती, व आपणच तें तिला दिलें म्हणून."

आनंदराव म्हणाले:--" दुसरें असें कीं, जर औषध येथें पोंचल्यानंतर त्यांत विष मिसळलें म्हणावें तर औषध येथें आल्याबरोबर त्याला विषाचा वास कसा यावा ?"

" हं, हाच तर मोठा चमत्कार आहे. मोठें गूढ पडलें आहे तें हेंच. औषध येथें येतांक्षणींच त्याला विषाचा वास कां यावा ?" असें प्रतापराव म्हणाले. त्यावर विश्वासराव बोलले:-" जर त्यांत विष असलें तर तसा वास येणारच. यांत मोठेंसें नाहीं. प्रश्न एवढाच कीं, त्यांत विष कसें व केव्हां गेलें असावें ! माझ्या मतें ह्या बाईच्या मरणाची गोष्ट जरी बाजूला ठेविली तरी तिजविषयीं सर्वच मोठें गूढ आहे असें दिसतें. ही बाई कोण ! कोठून आली ! येथें तिची कोणाची ओळख नाहीं तर ती इकडे आली कां ! बरें, वयानें किती लहान ! तशांत गरोदर ! साराच चमत्कार नव्हे काय ?"

आणि खरेंच, ती अगदीं लहान दिसत होती. चेहरा फिकट पण फारच सुंदर व मोहक होता. तिचे काळेभोर तुळतुळीत केश मानेवर लोळत होते. तोंड किंचित् उघडें राहिलें असल्यामुळें तिचे ते मौक्तिकासारखे सुरेख दांत क्षणमात्र पाहणाऱ्याच्या चित्तास आल्हाद देत होते.

एकामागून एक सर्व मंडळी तेथून बाहेर निघून गेली. आनंदराव मात्र कांहीं जास्त माहिती मिळते कीं काय तें पाहण्याकरितां म्हणून एकटेच मागें राहिले. त्यांनीं आपल्या हातानें कलावतीची ट्रंक उघडली, व आंतील सर्व जिन्नस पाहिल्या. पेटींत फक्त कपडेच होते. पत्रें, कागद, चिठ्ठ्या कांहीं एक नव्हतें. ही बाई कोण, कोठली राहणारीण वगैरे जें कोडें पडलें होतें तें उकलण्यास कांहींच साधन त्या पेटींत मिळालें नाहीं. 'ह्या बाईचें आणखी कांहीं सामान आहे कां?' असें आनंदरावांनीं मैनाईस विचारिलें, तेव्हां तिची फणी करंड्याची पेटी तिच्या उशाशीं होती ती मैनाईनें आणली. आनंदरावांनीं तीही लक्षपूर्वक तपासून पाहिली. आंत एक हस्तीदंती फणी, चांदीचा कुंकवाचा करंडा, काजळाची डबी, कांहीं विणण्याच्या सुया, थोडेंसें विणलेलें जाळीचें कापड, वगैरे सटरफटर जिन्नस होते. पण ती कोण, तिचें घर कोठें वगैरे हकीकत समजण्याजोगें त्यांत कांहींच सांपडलें नाहीं. उशाला तिचें पोलकें होतें. त्याच्या खिशांत एक पैशाची पिशवी होती. पैसे फारसे नव्हतेच. किल्ल्या तेथेंच जवळपास होत्या. आनंदरावांनीं तें पोलकें व ती फणीकरंड्याची पेटी ट्रंकमध्यें घातली व ट्रंकेस कुलूप लावून त्यावर त्यांनीं आपली मोहर केली. ते म्हणाले:—" अशा कामाची आपणांस विशेषशी माहिती नाहीं. तरी पोलीस येईपर्यंत सर्व बंदोबस्त करून ठेवणें योग्य आहे. ते आल्यानंतर त्यांना वाटेल तर तें माझी मोहर फोडतील."

इतक्यांत बुटांचे खाड खाड आवाज ऐकूं येऊं लागले. पोलीस ठाण्यांत बातमी गेली होतीच. खुद्द जमादारसाहेबांची स्वारी येऊन दाखल झाली. त्यांची अंगलट लांबलचक व स्थूल असून सशक्त होती; गाल मांसल असून त्यांत जाड कल्ल्यांची भर पडल्याकारणानें एकंदर चेहरा मस्त बोकडासारखा

दिसत होता. आनंदरावांनीं मैनाईनें सर्व हकीगत व सांगितली ती त्यांनीं स्वस्थपणानें ऐकून घेतली. नंतर तस्वणीचें भांडें व औषधाची बाटली असे जिन्नस त्यांनीं आपल्या ताब्यांत घेतले. मग दिवा घेऊन त्या खोल्या जमादारांनीं लक्षपूर्वक पाहिल्या. तपासाच्या कामीं त्यापासून काय मदत होणार होती हें त्यांचें त्यांनाच माहीत. ग्यालरींत त्यांनीं दिवा नेऊन पाहिलें. तेथील भिंतीकडे त्यांनीं जरा निरखून पाहून एकदम विचारिलें:—" तेथें दार आहे काय ? " नंतर उत्तराची वाट न पाहतांच जमादारांनीं त्या बाजूला जाऊन दार ढकललें. भिंतीला व दाराला सारखाच रंग दिला असल्यानें भिंतीचाच तो एक भाग आहे असें वाटे, व सहज पाहणाऱ्याच्या एकाएकीं दार लक्षांत येत नसे. त्या दारास एक खटका होता. तो दाबला कीं दार उघडतां येत असे. त्या जमादाराचें लक्ष्य ह्या खटक्याकडे गेलें. मावशीबाई तेथें देऊन उभ्या होत्या त्या म्हणाल्या:—' केरसुण्या, घमेलीं, बारड्या वगैरे ठेवण्याची ही एक लहानशी खोली आहे. ' जमादारांनीं आंत पाहिलें तों खरोखरच दोन केरसुण्या व घमेलें असें त्यांना दिसलें. नीट पाहून आपली खात्री झाल्यावर जमादारांनीं तें दार लावून घेतलें. पण तें दार पाहतांच आनंदरावांचें मन चलबिचल झालें, व त्यांना अस्वस्थता वाटूं लागली. त्या ठिकाणीं चोरखोली आहे ही गोष्ट त्यांना माहीत नव्हती. थोड्या वेळापूर्वीं भिंतीला टेंकून जी आकृति आपणांस दिसली त्या आकृतीला—तो केवळ भास नसेल तर, कल्पनातरंग नसेल तर—चटदिशीं दडून बसायाला ही चांगली जागा आहे, या ठिकाणींच ती दडून बसली असावी, असें त्यांना वाटूं लागलें.

आनंदराव आपल्या घरीं जाण्याकारितां निघाले. पण रस्त्यावरून जात असतां त्यांच्या दृष्टीसमोरून तो चेहरा हालला नाहीं. वाचकहो, आपण कदाचित् असा प्रश्न कराल कीं—आनंदरावांनीं या चेहऱ्याची हकीकत पोलीस जमादारांना कशी कळविली नाहीं ? त्या मृत स्त्रीच्या सभोंवतीं जीं माणसें जमलीं होतीं त्यांना सुद्धां आनंदरावांनीं ती कां सांगितली नाहीं? प्रश्न बरोबर आहे. पण आनंदराव सांगणार तरी काय ? आपणास एक विचित्र चेहरा, कांहीं भुतासारखा, कांहीं मनुष्यासारखा, असा दिसला.

जिन्यांत चंद्राचा अस्पष्ट प्रकाश पडला होता, त्या प्रकाशांत तो चेहरा दिसला, दिवा आणून पाहिलें तर कांहीं नाहीं. हेंच सांगावयाचें कीं नाहीं ? खरोखरच जर चालताबोलता मनुष्य तेथें उभा असता तर आनंदरावांच्या दृष्टीस न पडतां व कांहीं आवाज न करितां जिन्यांतून त्याला जातां आलें नसतें हें अगदीं खास. झालें. बाळंतिणीच्या खोलींत तो मनुष्य दडून बसला नाहीं याची आनंदरावांनीं खात्री करून घेतलींच होती. आतां एवढें खरें कीं ह्या ठिकाणीं ही चोरखोली आहे हें त्यांना आतांच प्रथम समजलें. तरी पण आंत जाऊन दिवा घेऊन येण्याच्या आंत तो मनुष्य ह्या खोलींत शिरून त्याला त्या खोलीचें दार बेमालूम रीतीनें बंद करून घेतां आलें असतें हेंही आनंदरावांना संभवनीय वाटेना. म्हणूनच त्यांनीं या आकृतीसंबंधानें कोणाजवळ चकार शब्द काढला नाहीं. बरें, इतक्यावर आनंदरावांनीं ही हकीकत कोणास सांगितली असती, तर दहांपैकीं नऊ असामी म्हणाले असते—'तुम्हांला निवळ भास झाला, तुम्हांला वेड तर लागलें नाहीं ?' असें सर्टिफिकेट मिळविण्यापेक्षां आनंदराव गप्प राहिले हेंही एका अर्थी बरेंच.

आपणाला भास झाला नाहीं, खरोखरीच तेथें कोणी तरी मनुष्य उभें होतें, अशी ही आनंदरावांची खात्री होईना. हातांत दिवा घेऊन चोहोंकडे पाहिल्यानंतर जिना उतरून ते खालीं गेले तेव्हां मावशीबाईचें व त्याचें थोडेंसें बोलणें झालें हें वर सांगितलेंच आहे. त्यांना आनंदरावांनीं सहज विचारिलें होतें कीं 'जिन्यांतून माडीवर किंवा निदान या घरांत तरी कोणी अनोळखी मनुष्य आला होता काय ?' मावशीबाईनीं उत्तर केलें कीं आपल्या घरांत कोणी परकी मनुष्य आला नाहीं व येण्याचा संभवही नाहीं. यावर आनंदरावांनीं जास्त विचारपूस केली नाहीं. आपणाला भास झाला असेंच त्यांना वाटत होतें. परंतु ती चोरखोली पाहिल्याबरोबर त्यांची त्यांनाच शंका येऊं लागली, व तो चेहरा त्यांच्या डोळ्यांपुढें दिसूं लागला. ते नीट आपल्या घरीं गेले व बिछान्यावर जाऊन निजले, किंवा पडले, कारण झोंप अशी त्यांना मुळींच लागली नाहीं.

उजाडेपर्यंत ते तसेच बिछान्यावर लोळत होते. पहाटेस थोडीशी डुकली लागली तेव्हांही तो चेहरा स्वप्नांत त्यांना दिसलाच.

वाचकहो, आपण आतां विश्राम बंधूंकडे वळूं. मावशीबाईंच्या घरांतून विश्वासराव, प्रतापराव, दिक्षीत व वसंत असे चौघे बाहेर पडले. दिक्षीत मठांत जाण्याकरितां दुसऱ्या रस्त्यानें निघून गेले. नंतर त्या दोघां बंधूंचें ह्या भयंकर प्रसंगासंबंधानें संभाषण सुरू झालें. विश्वासरावांचा प्रतापरावावर पूर्ण विश्वास होता. औषधाच्या कामांत प्रतापरावाकडून कधींही दुर्लक्ष, हयगय, किंवा चूक होणार नाहीं अशी विश्वासरावांची अगदीं खात्री होती. परंतु त्यांना एकदां वाटें, न जाणो, मनुष्य आहे, एखादे वेळीं मन दुसरीकडे गुंतून न समजतां औषधांत विष मिसळलें असेल, असें वाटून त्यांनीं प्रतापरावास प्रश्न केला:—" प्रतापराव, माझ्या बोलण्याचा राग येऊं देऊं नका. मनुष्याच्या हातून चूक होणें साहजिक आहे. मन दुसरीकडे गुंतल्यामुळें त्या औषधांत तुम्ही चुकून विष मिसळलें नाहीं अशी तुमची खात्री आहे काय ?" प्रतापरावास हा प्रश्न ऐकून फार वाईट वाटलें. त्यांचा कंठ सद्गदित होऊन ते म्हणाले:—" दादा, मी आतां सुमारें दहा बारा वर्षे औषधें तयार करीत आहें, पण माझ्याकडून कधींही चूक झाली नाहीं. तें औषध मी काळजीनें व लक्षपूर्वक तयार केलें होतें. " चुलत्यास आपल्या बापाचा संशय आला हें पाहून वसंतालाहि फार खेद झाला. तो म्हणाला:—"काका, बाबांनीं औषध तयार केलें त्या वेळीं मी तेथें उभा होतों. बाबांनीं चुकून औषधांत विष मिसळलें असेल हें मुळीं शक्यच नाहीं. कारण विष ज्या शिशांत आहे तो शिसा उंच जागीं असून शिडी लावल्याशिवाय तो काढतांच येत नाहीं. आणि आज सबंध दिवसांत तर दवाखान्यांत शिडीच नेली नाहीं. औषध तयार करीत असतांना आपले मुकुंद शेटजीही आले होते. त्यांना सुद्धां विचारा पाहिजे तर. "

" मुकुंद शेटजी आले होते ? " असें विश्वासरावांनीं आश्चर्यानें विचारिलें.

प्रतापराव म्हणाले " होय, आले होते. तो सांगतो तें बरोबर आहे. त्या बाळंतिणीची प्रकृति पाहून संध्याकाळीं साडेसात वाजल्यावर मी घरीं

येत होतों. तेव्हां वाटेंत मुकुंदशेटजी आपल्या दरवाजांत उभे होते. त्यांनीं बोलाविल्यावरून मी आंत गेलों. नंतर त्यांनीं व मीं मिळून थोडा-सा फराळ केला. मग दोघेही इकडे दवाखान्यांत आलों. ते असतांनाच मीं औषध तयार केलें."

" बरें, नंतर ती बाटली लागलीच त्या पोऱ्याकडे दिली काय ?"

वसंत म्हणाला:-" लागलीच नाहीं दिली. त्या पोऱ्याचें जेवण व्हायचें होतें, ह्मणून मीं ती बाटली तशीच टेबलावर ठेविली. पण माझें लक्ष्य तिकडे होतेंच. पोऱ्या जेवून आल्यावर त्याच्याजवळ मीं ती बाटली दिली."

घरीं येऊन पोचल्यानंतर पाहिलें काम त्या पोऱ्याला हकीगत विचारण्याचें. तो पोऱ्या ओसरीवर एका कोंपऱ्यांत जाऊन निजला होता. त्याला उठवून आणून विश्वासरावांनीं हकीगत विचारिली. तेव्हां तो म्हणाला:—" मावशीबाईच्या घरीं पोंचविण्याकरितां एक औषधाची बाटली वसंतरावांनीं मजकडे दिली. ती घेऊन मी मावशीबाईच्या घरीं गेलों. दार उघडा, म्हणतांना ती लक्ष्मेश्वर बाई---मैनाई नाहीं का ? —आली आणि तिनें दार उघडलें. मीं तिच्या स्वाधीन ती बाटली केली आणि निघून आलों."

विश्वासरावांनीं विचारिलें:—" पण कायरे, तूं थेट तेथेंच गेलास कीं रस्त्यांत कोठें खेळत बसून बाटली हातांतून खालीं ठेविली होतीस ?"

" नाहीं नाहीं; मी थेट तेथेंच गेलों. रस्त्यावर कोठेंच रमलों नाहीं. अशी हातांत धरून गेलों. कां बरें? मीं ती बाटली आणून दिली नाहीं, किंवा वाटेंतच फोडून टाकली असें ती मैनाई म्हणते कीं काय ?—" कारण त्याला वाटलें इतकी ज्या अर्थीं उलटतपासणी चालली आहे त्या अर्थीं आपणांवर कांहीं तरी किटाळ येणार हें खास—" तसें ती म्हणत असेल तर मात्र पक्कीच गप्पीदास म्हटली पाहिजे. ती निव्वळ खोटें बोलते."

विश्वासराव म्हणाले:-" छे रे, तसें तिनें कांहींच सांगितलें नाहीं. तुझ्याजवळ जशी बाटली दिली तशीच, कोणीही तुझ्याजवळून न घेतां,

ती तूं मावशीबाईच्या घरीं नेऊन पोंचविलीस कीं नाहीं एवढेंच विचारायचें होतें. "

" होय, अगदीं तश्शीच्या तश्शी नेऊन पोंचविली. " त्या पोऱ्यानें तत्काळ उत्तर दिलें. त्याच्या एकंदर सांगण्यावरून तो खरेंच बोलत आहे अशी त्यांची खात्री झाली. त्याला निजावयाला जाण्यास सांगून ते पुनः दवाखान्यांत गेले.

दवाखान्यांतील दिवा कमी करून ठेविला होता, तो प्रतापरावांनीं चढविला व बाहेरच्या बाजूस कोपऱ्यांत शिडी होती ती ते आंत घेऊन आले. कपाटाच्या अगदीं वरच्या खणांत एका कोपऱ्यांत एक कांचेचा शिसा होता. ' प्रसिक ॲसिड ' अशा अक्षरांची त्यावर चिठी लाविली होती. शिडीवर चढून प्रतापरावांनीं तो शिसा खालीं काढिला व ते मोठ्यानें म्हणालेः—" दादा हा पहा शिसा, यावर बुचाच्या टोंकापासून तों खालीं गळ्यापर्यंत कोळ्यानें जाळीं विणलेलीं जशींच्या तशीं आहेत या शिशावर धुरळाही किती बसला आहे पहा. यावरून इतकें तरी उघड दिसत आहे कीं या महिन्या दोन महिन्यांत तरी या शिशाला कोणींही हात लावलेला नाहीं. "

एवढेंच काय तें विष त्यांच्या दवाखान्यांत शिल्लक होतें. शिशाची ती स्थिति पाहतांच विश्वासरावांना बंधूच्या हलगर्जीपणाबद्दल जो थोडासा संशय आला होता तो पार नाहींसा झाला व प्रतापरावांनीं विष खचित उपयोगांत आणलें नाहीं अशी त्यांची खात्री झाली. तरी पण औषधांत विष कसें गेलें असावें ही शंका राहिलीच. तिचें निरसन होईना. ते दोघे भाऊ ह्या गोष्टीचा खल करीत बसले. त्यांनीं तो शिसा टेबलावर ठेवून दिला.

ते बोलण्याच्या नादांत गुंतले असल्यामुळें वसंताकडे त्यांचें लक्ष्य नव्हतें वसंत स्वभावानें भारी तिरतिरा, कधींही रिकामा बसावयाचा नाहीं— त्याच्या वयाचीं मुलें बहुधा अशींच असतात—त्यानें जवळच खुंटीवर असलेलें एक फडकें घेतलें व शिसा स्वच्छ पुसून काढला. त्याचें पुसणें

संपतें इतक्यांत विश्वासरावांचें लक्ष्य तिकडे गेलें. त्याबरोबर ते ओरडले:-- "अरेरे, वसंत, काय केलेंस हें ?"

चुलत्याचे हे शब्द ऐकतांच वसंत कावराबावरा झाला. "कांहीं नाहीं, काका, शिशावर धुरळा व कोळ्यांचीं जाळीं माजलीं होतीं तीं मीं पुसून काढिलीं." विश्वासराव संतापले:--"कारट्या, तुला सांगितलें कोणीं ही नसती उठाठेव करावयाला ? ह्या तुझ्या करण्यानें तुझ्या बापाच्या प्राणावर बेतेल, निदान त्यांच्या अब्रूस तरी धक्का पोंचेल हें तुला समजत नाहीं काय ?"

वसंताचा चेहरा तत्काळ उतरला व त्याचे डोळे पाण्यानें भरले. तो कांहीं एक बोलला नाहीं.

विश्वासराव पुढें म्हणाले:--"वसंत, या शिशावर धुरळा साठला होता त्यावरून तो शिसा आतां बरेच दिवस कोणींही काढला नाहीं हें सिद्ध करून दाखविण्यास तो बळकट पुरावा होता. त्याच्या बुचापासून गळ्यापर्यंत असलेलीं कोळ्याचीं जाळीं तूं पाहिलीं होतींस ना ? काय रे शिशाचें बूच सुद्धां कोणी काढलें नाहीं हें शाबीदकरावयास यापेक्षां जास्त खात्रीलायक पुरावा दुसरा कोणता मिळणार ? खरोखरच त्या जाळ्यांनीं तुझ्या बापाचा जीव वांचविला असतारे ? पण तूं काय करून टाकलेंस हें ?"

वसंताला किती तरी वाईट वाटलें ! त्याचा गळा दाटून आला. आपण जो अविचार केला त्याबद्दल सर्व जन्मभर आपणास प्रायश्चित्त भोगावें लागणार असें त्याला वाटलें. तो एवढेंच म्हणाला:--"माझ्या बाबांचा कोणाला संशय येणार नाहीं व त्यांच्यावर कोणी दोषारोपही करणार नाहीं."

विश्वासराव संतापून म्हणाले:--"तर मग लोक कोणाचें नांव घेतील असें तुला वाटतें ? औषध ह्या आमच्या दवाखान्यांतून नेलें; जसेंच्या तसें मैनाईजवळ दिलें, आणि तिनें तें मग बाळंतिणीला प्यावयास दिलें एवढेंच आपण म्हणूं. पण आनंदरावांसारखा आमच्याप्रमाणें डॉक्टरचा धंदा करणारा, वजनदार माणूस म्हणतो कीं सुइणीनें तें

औषध आपल्याजवळ दिलें त्या वेळीं त्याला विषाचा वास येत होता. ही गोष्ट त्यांनीं त्याच वेळीं सांगितली, याबद्दल सुईण सुद्धां साक्षीदार आहे. तर मग औषध ज्यानें तयार केलें त्याचा वहीम लोक घेणार नाहींत तर दुसऱ्या कोणाचा घेणार ? तुझा बाबावर विश्वास आहे तशीच त्यांच्याबद्दल मलाही खात्री आहे. झोंपेचें औषध तयार करीत असतांना त्यांत विष घालण्याइतका गाफिलपणा ते करणार नाहींत हें खरें परंतु प्रतापरावांची ज्यांना माहिती नाहीं, अशा लोकांची खात्री त्या कोळ्याच्या जाळ्यांनीं वेष्टिलेल्या त्या शिशानें केली असती. पण ती संधि तूं आपल्या कृतीनें घालवून टाकलीस. गुलामा, जा आतां निजायला, आज रात्रीं तूं बराच घोंटाळा करून ठेविलास. "

हे शब्द वसंताच्या हृदयाला फारच झोंबले. आपण केलेल्या अविचाराबद्दल त्याला पश्चात्ताप होऊं लागला. त्याला दुःखाचे उमाळे येऊं लागले. त्यायोगानें त्याच्या तोंडांतून शब्द उमटेना. आतां सर्वांच्या दृष्टिआड होऊन पोटभर रडून घ्यावें, आपणाकडून झालेल्या चुकीची दुरुस्ती करण्यास कांहीं तरी युक्ति काढावी, व या चुकीमुळें उद्भवणारें संकट टळण्याबद्दल देवाला नवस करावे, त्याला अनन्यभावानें शरण जावें, असें त्याला वाटलें. ' माझ्या हातून चूक झाली ' असें मोठ्या विनयशीलपणानें म्हणून त्यानें आपल्या काकांची माफी मागितली व नंतर आपल्या वडिलांच्या शेजारीं येऊन तो उभा राहिला.

प्रतापरावांना त्याची काकळुत आली. ते त्याला जवळ घेऊन म्हणाले:-- " बाळ, तूं कांहीं मुद्दाम चूक केली नाहींस. वाईट वाटूं देऊं नको. उगी रहा. देव आमच्यावर दया करील. माझ्या निर्दोषीपणाबद्दल मला खात्री आहे. व माझा निर्दोषीपणा सर्व जगाला दाखविण्यास मला त्या परमेश्वरावरच भरंवसा ठेविला पाहिजे. "

वसंत तेथून जाऊन अंथरुणावर पडला पण एकसारखा स्फुंदस्फुंदून रडत होता. त्याचें समाधान करणारें घरांत कोणीही नव्हतें. येऊन जाऊन त्याची आई असावयाची, पण तीही प्रकृतीसाठीं हवा पालटण्याकारितां आबोलीं गेली होती.

दवाखान्यांत विश्वासराव व प्रतापराव दोघेच होते. त्यांनीं झाल्या गोष्टीबद्दल पुष्कळ ‘ भवति न भवति ’ केली; सर्व बाजूंनीं त्या प्रकरणाचा त्यांनीं विचार केला. पण औषधांत विष कसें गेलें असावें याजबद्दल त्यांचा कांहींच तर्क चालेना. शेवटीं “ कालांतरानें सर्व उलगडा होईल. खऱ्याला मरण नाहीं. सत्यमेव जयते ईश्वरावर हवाला ठेवावा ” अशीं समाधान करणारीं वाक्यें बोलून ते दोघेही निजावयाकरितां गेले.

---

# प्रकरण ९ वें.

—:o:—

## गांवांतील लोकमत.




गळवारचा दिवस—ह्मणजे कलावतीचें प्राणोत्क्रमण झाल्यानंतर दुसरा दिवस—उजाडला. दत्तापूर गांवांत ह्या टोंकापासून त्या टोंकापर्यंत मोठी चळवळ उडून राहिली. प्रत्येकजण त्या भयंकर व दुःखकारक प्रसंगासंबंधानें चर्चा करण्याकरितां घराच्या बाहेर पडला. ठिकठिकाणीं माणसांचे थवे जमूं लागले. तिकटीवर, भर रस्त्यामध्यें, दुकानांच्या ओसरीवर, आपल्या घराच्या दरवाज्यांत असे लोक जमून गप्पा सुरू झाल्या. हें सर्व प्रकरण आपल्या बंधूच्या माथीं येऊन आदळणार असें विश्वासरावांनीं भाकित केलेलें अखेर खरें ठरलेंच. गांवांतील बहुतेक लोकांचें असें ह्मणणें पडलें कीं, झोंपेचें औषध तयार करितांना प्रतापरावांचा हलगर्जीपणा होऊन त्यांच्या हातून औषधांत विष मिसळलें गेलें. आजपर्यंत त्यांनीं हजारों औषधें तयार

केलीं होतीं. पण कधीं त्यांच्या हातून चूक झाली नाहीं; ते नेहमींच मोठे दक्ष असत; फार जपून व काळजीपूर्वक औषधें तयार करीत, या गोष्टीचें त्या लोकांना कांहींच वाटलें नाहीं. किंबहुना तिकडे कोणीं लक्ष्यच पुरविलें नाहीं.

गाड्यांच्या अड्ड्यांतही पुष्कळ लोक जमून त्यांची वाटाघाट चालली होती. त्यांत सर्व दर्जाचे व धंद्याचे लोक होते. पांढरपेशे, व्यापारी, मजूरदार, शेतकरी वगैरे सर्व वर्गांतील माणसें तेथें जमलेलीं होतीं. लहानशा गांवांत सर्वांची सर्वांना माहिती असते. एखाद्या स्थानिक विषयासंबंधानें ते एकमेकांबरोबर वाटेल तसें खुशाल बोलत असतात; कांहीं आडपडदा राखीत नाहींत, कीं, उच्च नीच भाव मनांत आणीत नाहींत.

त्या अड्ड्यांत एक भाड्याचा टांगा येऊन उतरला होता. टांगेवाला ह्मणूं लागलाः—" अव राव, तुमी वाईच माज ऐका. ह्यो टांगा बाळगून मला आज बगा पंदरा वर्सं झालीं पंदरा. पन् इक्त्या वर्सांत ह्या गब्रून पाशिंजरच्या केसाला का नक्काला का कशाला इक्ता इक्तासुद्दां धका लागून दिला न्हाई. अक्शी फुलावाणी जपून न्हेलं. पन् आतां पुडबी तसंच चालल असा भरुसा कुणी त्येकानं सांगावा ? एकांदा दिस बंगाळ बी लागतो. त्या परतापरावाच बी असच झालं असल. आजपावतर त्येनीं वक्कद तयार करन्यांत कंदीबी चूक केली न्हाई, का कंदी कसूर केली न्हाई. समद खर. म्हून अक्रेरीला चूक झाली नसल असं न्हाई. कुनींबी लई लई शाना—न्हव मी म्हनतो, शान्याचा बा झाला, म्हून चूक व्हायची न्हातीया ? आं ? कंदीबी होनारच्च, कां जी, घुड्डबाव, मीं म्हनतो त्ये खरं का न्हाई ? "

घुड्डू नालबंद मान हालवून म्हणालाः—" हां जी, तुमारी बात सच्च है. हमारीच गोष्ट लेव तो, लंबे काय कू जाते ? बीस तीस बरस हुवी, मै नालबंदी करताहूं, फेर कभी बी हमारे हातसे चूक नही हुवी. तोच आठ दिन पीछे क्या बात हुई देखो. मैने एक खिला ठोक दिया वो अगदीं घोडेके शीरपर. क्या करना ? घोडा लंग खानेकू लगा, फेर क्या ! ऐसा बखत बहोत बुरा लगा. खुदाकी मरजी ! तोबा ! तोबा ! "

दगडू हजाम काखेस धोगटी लावून मोठ्या ऐटीनें इकडे तिकडे करीत होता. तो ह्मणालाः—" अन् त्यो आमचा वाल्या अंबीजी ? आजपावतर होडी नदीच्या अल्याडपल्याड न्हेऊन न्हेऊन त्याच्या हाताला घट्ट पडल्याती घट्ट. एक दिसबी होडी कदी आपली हद्द सोडून भाईर गेली न्हाय. अक्शी सूत मारल्यावाणी न्ह्याचा. पन् ह्या कल्ल्याच्या सुकीरवारी ! जी गपघ्यान् कलंडली ती पार गेली बगा खाली, अन् ह्योबी त्यांत सांपडला. मेलान् काय ? अस हाय, ईळ कवा कशी ईल त्ये काई इचारू नगा."

इतक्यांत एक गृहस्थ ह्मणालेः—" मीं असें ऐकलें आहे कीं तें विष घातलेला शिसा त्यांच्या दवाखान्यांत तेवढा एकच होता व त्याला कोणीं सुद्धां हात लावलेला नाहीं."

दुसरा एक जण ह्मणालाः—" खुद्द. विश्वासरावांची व माझी मघाशीं गांठ पडली होती. तेंव्हां ते ह्मणाले, शिशाला कोणीं हातसुद्धां लावला नव्हता. ह्याला पुरावा हाच कीं त्या शिश्यावर कोळ्यानें बांधलेलीं जाळीं जशींच्या तशींच होती, ती बाई मेल्यानंतर सुद्धां तशींच होतीं पण वसंतानें तीं पुसून काढिलीं."

ही हकीकत ऐकतांच मंडळींत जरा सामसूम झालें; आतांपर्यंत ही बातमी ह्यांच्या कानावर आलेली नव्हती. ह्मणून ते जरा विचारांत पडले. घेलाभाई ह्या नांवाचा एक—वाणी भला मोठा धिप्पाड तेथें उभा होता. विश्रामबंधु त्याचे गिऱ्हाईक नव्हते; ते त्याच्याकडून माल न नेतां दुस. दुकानांतून नेत असत, ह्मणून अर्थातच त्यांच्यासंबंधानें घेलाभाईचें मन सरळ नव्हतें. तो खोंचून बोललाः—" असें होतें तर त्यांनीं ती जाळीं तशीच राहू दिलीं असतीं तर बरें झालें असतें. फौजदारसाहेबांच्या व मॉजिस्ट्रेटसाहेबांच्या तीं नजरेला तरीं पडलीं असतीं. भावाचा बचाव करण्यासाठीं कोण काय करतील हें कांहीं सांगतां येत नाहीं बोवा ! फार वेळ झाला नाहीं. ह्यांचा पोरगा वसंत माझ्या दुकानासमोरून चालला होता. मीं त्याला हकीकत विचारली, तेंव्हां तो म्हणाला ' बाबांनीं औषध अगदीं बरोबर तयार केलें, मीं प्रत्यक्ष पाहिलें आहे. मी कधीं

खोटें सांगणार नाहीं.' तेव्हां त्याला बोलण्यांत पकडावें म्हणून मीं म्हटलें; तूं हें आईची शपथ घेऊन सांगतोस काय ? तेव्हां तो मान वांकडी करून, उद्धटपणानें डोळे वटारून, मला म्हणाला ' हो हो, तुम्हांला पाहिजे तर शपथेवर सुद्धां सांगेन. पण शपथ व माझें बोलणें सारखेंच,' असें म्हणून तोंडाला खीळ घातल्यासारखा तो पार निघून गेला."

आणखी एकजण इतका वेळ स्वस्थ बसला होता, त्याची आतां पाळी आली. ह्यानें आपलें चर्‍हाट सुरू केलें:—" पण मी म्हणतों औषध तयार करतांना जर त्यांत विष गेलें नाहीं तर मग तें गेलें तरी केव्हां ? गेलें नव्हतें म्हणावें तर आनंदरावांना त्याचा वास कसा यावा ? त्यांत विष होतें हें अगदीं निर्विवाद आहे. एरव्हीं ती बाई मेली असती का ? विश्राम डॉक्टरच्या दवाखान्यांतून तें औषध थेट मावशीबाईच्या घरीं गेलें, तेव्हांच त्याला विषाचा वास येत होता, असें ती मैनाई सुईण व आनंदराव डॉक्टर म्हणतात. शिवाय ह्या औषधापासून काहीं अपाय होईल असें वाटून आनंदराव प्रतापरावाकडे गेले होते; पण त्यांची गांठ पडली नाहीं. म्हणे, औषध आपण जातांना बरोबर नेलें नाहीं तेथेंच ठेवलें, याबद्दल आनंदरावांना फार वाईट वाटत आहे."

" त्यांनीं तें जातेवेळींच कां बरें नेलें नाहीं ?" मध्येंच कोणींसें खोंचून विचारिलें.

" कां म्हणजे ? त्यापासून इतका भयंकर परिणाम होईलसें त्यांना वाटलें नाहीं म्हणून. शिवाय जातांना ' तुम्ही हें औषध घेऊं नका' निदान प्रतापरावांना पुन्हां एकवार कळवून त्यांनीं सांगितलें तर घ्या, असें आनंदरावांनीं त्या बाळंतिणीला सूचवून ठेवलें होतें म्हणे."

यावर एकजण म्हणालाः—" मिळून यापासून एवढें निष्पन्न होत आहे कीं, विश्राम डॉक्टरांच्या दवाखान्यांतून औषध बाहेर पडलें त्या वेळींच त्यांत विष असलें पाहिजे; आणि औषध तर प्रतापरावांनींच तयार केलें होतें. तेव्हां ते आपल्यावरून हा दोष कसा घालवून टाकतात हेंच पहावयाचें आहे."

" छे, छे, छे. हें तर शक्यच नाहीं. औषध तयार केलें तेव्हां प्रता-

पराव अगदीं सुस्तींत होते. त्यांनीं व त्या मुकुंदशेटजींनीं यथेच्छ फराळ केला होता. फराळ झाल्यावर मुकुंदशेटजीही प्रतापरावांबरोबर दवाखान्यांत गेले होते. औषध तयार होत असतांना शेटजी तेथें होते. त्यांना सर्व हकीकत माहीत आहे. " असेंही एक जण म्हणाला.

इतक्यांत शेटजीची अगडबंब स्वारी हालतडुलत येत असलेली त्या मंडळींना दिसली. शेटजींचा चेहरा मोठा आनंदी होता. पण ते फारच अस्ताव्यस्त व गाबाळग्रंथी दिसले व तसे होतेही. चालूं लागले म्हणजे ते आपल्या धोतराच्या सोग्यांनीं रस्त्यावरील केरकचरा काढून टाकण्याच्या कामीं बरीच मदत करीत असत. यावरून ' म्युनीसिपल कामिशनर ' असें लोकांनीं त्यांचें नांव ठेविलें होतें. त्यांच्याकडून कांहीं माहिती मिळेल असें मंडळींना वाटून त्यांनीं त्यांचें फार उत्तम स्वागत केलें. शेटजी आल्यामुळें सर्वांना आनंद झाला. त्या पैकीं एकजण म्हणाला:—

" यावें, यावें, शेटजी साहेब; असें बसावें इकडे. काल संध्याकाळची काय हकीगत आहे ? आपल्या फराळानें प्रतापरावांची बरीच खोड मोडली म्हणे. झोंपेच्या औषधांत सरबत घालण्याऐवजीं त्यांनीं विषच घातलें म्हणतात. पण काय हो शेटजी ? काल फराळाला बोलावण्याचें विशेष कारण कोणतें ? कां एरव्हींच चैनीनें ? "

शेटजींनीं उत्तर केलें:—" हां हां. च्यालूं दे च्यालूं दे. तुमच्या बोलायाची संपली म्हंजी हामी बोलते—संपली ? हमी बोलूं आतां ? बोलते. नीट धेणामंदी घ्या, हं. कल्ह हामच्या गरांत हामची पावणा आली होती. तेच्या सार्टी फराळाच्या केली होती, फराळाच्या, समदली ? हामी भाईर आली तर पतापरावबी ते बाजूंनीं आले. त्येना गेऊन शेनी हामी आतमंदी गेले. पन् त्येनी फराळबी चांगला केली नाहीं बूक लागला न्हाई झटलें. मंग हामी आनि त्ये मिळूनशी दवाकाण्यांत गेले. "

" तर मग त्यांनीं औषधांत विष घातलें नाहीं याबद्दल तुमची साक्ष होईल ? "

" हामची ! हामी न्हाई तशी साक्शा देनार. अरे हमाला तशी कशी सांगेला यील ? ते आवशामंदी बीश होती म्हणतात, तर तेची उलट हमी

कशी सांगेल ? दोन तीन पानी एका बाड्यामंदी गातली. हामी पाईली पन् तेमंदी वीष गातला की न्हाई ए-कसा समजेल ? ते बाटल्याबी हमा ला कशी वलकेल ? हामी आपलें हासत बोलत दवाकाण्यामंदी हुबा होतों त्ये आवशदांकड हमचा लकशबी न्हवता. आज सकाळीं हमी ते दवाकाण्याकड गेली होती. विशाची मोठी शिसा ठेवण्याची जागाबी त्येनी हामाला दावली. तेवरून हामी कात्रीशी सांगते की इत्त्या उंचाची शिसा परतापरावांनीं कंदीबी काडूनशी गेतली न्हाई. "

" साराच चमत्कार ! तर त्या औषधांत...... " इतकें एकजण बोलतो इतक्यांत ' चलाव, चलाव, बाजू , ए ' असे कर्कश शब्द ऐकूं आले. त्याबरोबर लोकांची अगदीं तारांबळ उडून गेली. उतारूंनीं अगदीं गच्च भरलेल्या दोन तीन गाड्या स्टेशनावर जाण्याकरितां निघाल्या होत्या. गाडी हांकणाऱ्यांचें लक्ष्य रस्त्यांतील गर्दीकडे नसून वेळेच्या आंत स्टेशनावर जाऊन कसें पोचतां येईल याकडेच जास्त होतें. अर्थातच गाड्या बेफाम सुटल्या होत्या. त्यायोगानें रस्त्यांतील गर्दी एकदम मोडली, व लोकांची फांकाफांक होऊन ते चोहोंकडे पसरले.

खरोखरच आतां प्रतापरावावर गुन्हा शाबीत होणार असा रंग दिसूं लागला. लोकांचें ठाम मत होऊन गेलें. बुद्धिपुरःसर, समजूनउमजून नाहीं तरी हलगर्जीपणानें, चुकून, प्रतापरावांनीं औषधांत विष मिसळलें असें लोक बोलूं लागले. दुसऱ्या कोणीं मनुष्यानें हें कृत्य केलें असावें हें कोणासच खरें किंवा संभवनीय वाटेना. बहुजनसमाजाचें जरी असें मत बनून गेलें तथापि प्रतापरावांची बाजू घेणारे मुळींच कोणी नव्हते असें नाहीं, कांहीं होते. प्रतापरावांनीं औषधांत विष खात्रीनें घातलें नाहीं, तो तसा दुष्ट किंवा निष्काळजी मनुष्य नाहीं, असें त्यांनीं किती वेळां तरी म्हटलें. पण व्यर्थ. प्रतापरावांचा मुलगा वसंत, यानेंही उरस्फोड करून, गयावया करून, जीव तोडून तोडून कितीं सांगितलें कीं औषध तयार करते वेळीं आपण हजर होतों, मिश्रण काळजीपूर्वक बरोबर रीतीनें तयार करण्यांत आलें, चूक अगदीं झाली नाहीं. पण त्या पोराचें सांगणें जुमानणार कोण ? लोकांचें एकदां मत बनलें ते बनलेंच.

प्रतापराव आपल्या मुलास म्हणाले:-बाळ, लोकांचें हें असेंच चालायचें. दहाजण दहा प्रकारानें बोलणार. त्यांच्या तोंडाला कोण हात लावूं शकेल ! तूं स्वस्थ रहा. कांहीं काळजी करूं नकोस. आज नाहीं उद्यां, केव्हां तरी खरी हकीगत बाहेर येईल, मग त्यांची खात्री होईल."

वसंताला गहिंवर आला. "पण तोंपर्यंत ...... !" एवढेंच तो बोलला. हाय हाय ! या अवधींत त्याच्या बापाची काय स्थिस्ति होईल बरें !

---

# प्रकरण १० वें.

## सारजेचा घोंटाळा.



कलावतीच्या आकास्मिक मरणामुळें इतरांपेक्षां सारजेच्या मनाला फार मोठा धक्का बसला. त्या रात्रीं सारजेच्या बहिणीच्या घरीं लवकर निजानीज झाली. कलावतीचें प्राणोत्क्रमण झालें त्या वेळीं सर्व मंडळीस झोंपा लागल्या होत्या. गिरजाबाईला सुद्धां ही बातमी उजाडेपर्यंत कळली नव्हती. उजेडल्यावर कळली, पण सारजेला जागी करून ती बातमी कळवावी असें गिरजाबाईंना वाटेना. सारजेची दाढ फार सुजलेली होती, व ठणकाही बराच होता, यामुळें गेले दोन तीन दिवस तिला स्वस्थपणानें झोंप लागली नव्हती म्हणून गिरजाबाईंनीं तिला उठविलें नाहीं. सकाळीं दोन तास दिवसाला सारजा जागी झाली. रात्रीं झोंप चांगली लागल्यामुळें तिला हुषारी वाटत होती व दाढेचा ठणका व सूजही कमी झाली होती. गिरजाबाईनीं तिच्याकरितां लवकर भात

टाकिला. पण सारजेचें सर्व लक्ष्य त्या बाळंतिणीकडे लागलेलें होतें. ' कलावतीबाईचें आज कसें काय आहे कोण जाणे ' असें ती आपल्या बहिणीला ह्मणाली. सारजेवर कलावतीचें केवढें प्रेम होतें, कलावतीच्या प्रकृतीसंबंधानें सारजेला किती काळजी वाटे हें गिरजाबाईला पूर्णपणें माहीत होतें. कलावती मेल्याची हकीकत इतक्यांत सांगितली तर तिच्या मनाला धक्का बसेल असें गिरजाबाईस वाटलें. ह्मणून तिनें टाळाटाळीचें उत्तर दिलें. " बाळंतिणीची तब्येत रात्रीं जास्तच बिघडली ह्मणे. कोणी ह्मणतात तिला चुकून भलतेंच औषध दिलें त्यापासून परिणाम भयंकर होईल, ती मरेलसुद्धां ! पण ती वाटाघाट आपल्याला कशाला हवी ? सारजे, तूं आपला थोडा भात खा ह्मणजे तुला जरा बरें वाटेल." असें गिरजाबाई ह्मणाल्या. पण तें ऐकल्यापासून सारजेला चैन पडेना. तिनें कसाबसा थोडासा भात गिळला आणि हात धुऊन ती गडबडीनें कलावतीकडे जाण्याकरितां निघाली. ' तूं तिकडे जाऊं नको, जाऊन कांहीं उपयोग होणार नाहीं. ' असें तिची बहीण ह्मणाली, सारजेनें उत्तर केलें:—" आक्का मी जातेच. तिची तब्येत जास्त बिघडली असेल तर माझा उपयोग होईल. त्या दोघीजणी तिथें आहेत पण असून नसून सारख्याच. माझाच कांहीं उपयोग झाला तर होईल." तेव्हां गिरजाबाई तिची समजूत घालूं लागल्या:—" सारजाबाई, अशी उतावळी होऊं नकोस. खालीं बैस. मी तुला सर्व सांगतें. तिकडे जाऊन कांहीं उपयोग नाहीं समजलें काय ? कां यापेक्षां जास्त फोड करून सांगितलें पाहिजे ? " इतकें सांगूनही सारजेची समजूत पडेना. ती टकमका बहिरटासारखी आपल्या आक्काच्या तोंडाकडे पाहूं लागली. तिचा कांहींच तर्क चालेना. गिरजाबाईंना वाटलें आतां खरी हकीकत सांगण्यास कांहीं हरकत नाहीं. ह्मणून त्या ह्मणाल्या:—" सारजे, सर्व कांहीं मागलें बरें, रात्रीं दहा साडेदहा वाजण्याच्या सुमाराला सर्व ग्रंथ आटपला. प्रतापरावांनीं रात्रीं निजतेवेळीं घेण्याकरितां ह्मणून झोंपेचें औषध पाठवून दिलें तें प्यायल्याबरोबर ती मेली. त्यांच्या हातून कशी चूक झाली असेल न कळे. त्यांनीं आपलें विषच पाठवून दिलें."

ही हकिकत ऐकतांच सारजेची मुद्रा पालटली. ती कावरीबावरी झाली, तिचा चेहरा पांढरा निस्तेज झाला, व ती विचारांत पडली. लगेच तिचा चेहरा पालटला, आणि तिच्या लक्ष्यांत कांहीं आल्याचें, तिला थोडें ज्ञान झाल्याचें दिसलें. पण तिला फार भीति वाटली. ती ह्मणाली, " आक्का, प्रतापरावांनीं औषधाऐवजीं विष पाठवून दिलें ? मी खात्रीनें सांगतें ते नाहींत असें विष पाठवावयाचे. ती केव्हांशी मेली ? "

" मला वाटतें त्या वेळीं रात्रीचे दहा साडेदहा वाजले असतील. आनंदराव डाक्तर तिथें कायसे संध्याकाळीं आले होते ह्मणे. औषध आणलें त्या वेळीं ते तिथें होते. त्यांना त्या औषधाला विषाचा वास आला. औषध बरोबर तयार केलें आहे कीं नाहीं हें विचारण्याकरितां ते प्रतापरावांच्या घरीं गेले होते. पण तिकडून परत येण्यापूर्वींच त्या बाईनें तें औषध पिऊन टाकलें. "

" पण आनंदरावांना विषाचा संशय आला होता, तर हें औषध देऊं नका अशी त्यांनीं तिथें ताकीद का दिली नाहीं ? "

" मावशीबाई ह्मणतात कीं त्यांनीं ताकीद दिली होती ह्मणून. त्या अगदीं उजेडतांच इथें आल्या होत्या. फार घाबरल्या आहेत बिचाऱ्या. मैनाईची तर पांचावर धारण बसली आहे. मीं त्या दोघींनाही ह्मटलें कीं, तुह्मी कांहीं इतक्या भिऊं नका. तुमच्याकडे कांहीं चूक दिसत नाहीं. "

सारजा इतका वेळ खालीं बसली होती. पण आतां तिला राहवेना. मावशीबाईच्या घरीं जाऊन सर्व प्रकार समजून घेण्याची तिला उत्कंठा झाली म्हणून आपल्या बहिणीस विचारून ती त्या घरीं गेली. स्वयंपाकघरांत मावशीबाई व मैनाई अशा दोघी बसल्या होत्या. सारजेला पहातांच त्या दोघींनींही रडून आकांत केला. मग त्यांनीं रात्रीची इत्थंभूत हकीकत तिला सांगितली. ती सारजेनें शांतपणानें व लक्षपूर्वक आपल्या हृदयांत सांठवून ठेविली. तिनें तडाक्यासरशी त्यांना सांगून टाकिलें कीं, प्रतापरावांनीं त्या औषधांत विष मिसळलें असेल ही गोष्ट अगदींच संभवनीय नाहीं, आपला तरी निदान या गोष्टीवर विश्वास बसत नाहीं.

नंतर ती माडीवर गेली. बाळंतिणीच्या खोलीभोंवतीं पोलिसांचा पहारा होता. त्यांच्या परवानगीनें ती खोलींत गेली. कलावती प्रेत होऊन बाजेवर तशीच पडलेली होती. तिची ती शोचनीय स्थिति पाहून सारजेला रडें कोसळलें.

सारजा माडीवरून खालीं येते तों आनंदराव त्या घरांतून बाहेर पडले. पण त्यांची व तिची गांठ पडली नाहीं. आनंदराव तेथें येऊन त्यांचें व पोलिसांचें थोडेंसें बोलणें झालें. ती नवखी बाई कोण असावी या गोष्टीचा तपास लावण्याच्या कामीं आपण शक्य ती खटपट करूं असें आनंदरावांनीं पोलिसाजवळ कबूल केलें व त्याप्रमाणें त्यांनीं मुंबई येथील मित्र-मंडळींत त्या बाईची कांहीं माहिती असल्यास कळवावी ह्मणून पत्रेंसुद्धां लिहिलीं. मैनाई सुइणीवर आनंदरावांचा जरा राग दिसला. कदाचित् काल रात्रीं ती शुद्धीवर नसावी असा त्यांना संशय आल्याचें त्यांच्या बोलण्यावरून दिसत होतें. ते ह्मणाले—"मैनाई, औषध घेऊं नका असें मीं त्या बाईला सांगितलें होतें, मग ही हकीकत तिनें तुह्मांला कशी कळविली नाहीं ? तिनें तुह्मांला कळविली नसेल असें नाहीं मला वाटत. तथापि तुह्मीं तिला तें औषध दिलेंच शेवटीं !"

हें ऐकतांच मैनाईचा नुसता जळफळाट झाला. ती संतापून म्हणाली:—"मी शपथ देऊं का ? खरोखरच तिनें मला कांहीं कळविलें नाहीं. उलट तरवणी खल्ल्याबरोबर ती तें औषध मागूं लागली. मीं दिलें असतें तर तिनें त्याच वेळीं घेऊन टाकलें असतें. डोळे नकोत कांहीं इतके वटारावयाला, मी खोटें नाहीं सांगत, समजलें !"

"मैनाई, तुम्हांला रात्रींची चांगली आठवण आहे ना ?" आनंदरावांचें हें खोंचदार बोलणें ऐकून तर मैनाई रागानें नुसती लाल झाली. "हो हो, डाक्तरसाहेब, आपणाला जितकी आहे तितकी मला आहे. मी रात्रीं कांहीं गैरशुद्धींत नव्हतें. इतकें नको मला घालूनपाडून बोलायला. आज दिसेल तें औषध द्या असें मला कोणीं सांगितलें तर मी देईन. तें माझें कामच आहे. असा परिणाम त्या औषधाचा होईल असें मला

स्वप्न का पडलें होतें ! कां हो, डाक्तरसाहेब, आतां मुकाट्यानें कां चालला ? बोला, बोला. ”

मैनाईचा तोफखाना सुरू होतांच आनंदरावांनीं तेथून मुकाट्यानें पाय काढला.

यानंतर कांहीं वेळानें शारजा कोठेंशी जात असतां वाटेंत तिची व वसंताची गांठ पडली. वसंत तिला म्हणालाः—“ काय सारजाबाई, तुला तरी याबद्दल काय वाटतें तें सांग ? ”

“ काय सांगूं बाबा ? मला काय वाटतें हेंच मला समजत नाहीं. साऱ्या जन्मांत मीं असला प्रकार कधीं पाहिला नाहीं. सगळाच मेला चमत्कार ! ”

“ सारजाबाई, तुला माझे बाबा चांगले माहीत आहेत. त्यांचा गाफिलपणा होऊन त्यांनीं त्या औषधांत विष मिसळलें असेल ही गोष्ट संभवनीय आहे काय ग ? ”

“ वसंत, तुझ्या बाबांच्या हातून विष मिसळलें असेल हें मला तरी नाहीं खरें वाटत. ”

“ दुसरें असें. औषध तयार केलें त्या वेळीं मी तिथें समक्ष हजर होतों. बाबांनीं औषधांत काय काय घातलें तें मीं ह्या माझ्या डोळ्यांनीं प्रत्यक्ष पाहिलें आहे ग. त्यांनीं अगदीं बरोबर मिश्रण तयार केलें. मी पाहिजे त्याची शपथ घेऊन सांगतों. मी दवाखान्यांत सहज उभा होतों, इतक्यांत बाबा व ते—मुकुंदशेटजी—असे दोघे मिळून आले. बाबांनीं मला इंग्लिश पुस्तकांतले धडे करावयास जा म्हणून सांगितलें, पण मी लवकर न जातां तसाच टंगळमंगळ करीत तिथें राहिलों. आता मला वाटतें कीं, मी तिथें राहिलों हें चांगलें झालें. तें जाऊं दे. बाबांनीं औषध अगदीं बरोबर तयार केलें, त्यांत त्यांनीं विषारी पदार्थ बिलकुल घातला नाहीं, असें असून त्या बाळंतिणीच्या घरीं तें औषध गेलें तेव्हां त्याला विषाचा वास येत होता म्हणतात ! ती तें घेते आणि तात्काळ मरते ! हें कसें ? याचा उलगडा कोण करील ! याजबद्दल जबाबदार तरी कोणाला धरावयाचें ? ”

सारजेनें कांहींच उत्तर दिलें नाहीं. तिचें मन गोंधळून गेलें होतें असें

तिच्या गंभीर मुद्रेवरून दिसत होतें. वसंत पुढें म्हणालाः—" आणि सर्व गांवभर माझ्या बाबांच्या नांवानें विनाकारण डंका ! ते म्हणतात—मी नाहीं आता तें सर्व सांगत बसत. पण सारजाबाई, बाबांकडे चूक नाहीं असेंही कांहीं लोक म्हणतात."

ती म्हणालीः—" मी त्यापैकींच एक आहें."

वसंत थोडासा थांबला. नंतर एकाएकीं आपली मान पुढें करून तो सारजेच्या कानांत कांहीं पुटपुटला. त्याबरोबर सारजा म्हणालीः—" वसंत, असें बोलूं नये, गप्प बैस."

" कां गप्प बैस ! मला कोणाची भीति आहे ! मी मोठ्यानें बोलणार." वसंत त्वेषानें म्हणाला.

" बोलेनास बापडा. माझ्याजवळ मात्र बोलूं नकोस म्हणजे झालें." सारजा म्हणाली. पण तिला धीर निघेना. वसंत मोठ्यानें बोलतो कीं काय, रस्त्यांत कोणी ऐकेल कीं काय अशी तिला भीति पडली, म्हणून तिनें तो विषयच चट्दिशीं बदलून टाकिलाः—" वसंत, आतां याची चौकशी होईल, नाहींरे ?"

" हो. होईल तर. आणि झालीच पाहिजे. पण जर कदाचित् बाबांवर गुन्हा शाबीद झाला तर तो माझ्याच चुकीमुळें होणार." असें वसंत म्हणाला. नंतर विषाच्या शिशाच्या तोंडाभोंवतालचीं जाळीं व धुरळा आपण कसा पुसून काढला वगैरे हकीकत वसंतानें सारजेला सांगितली नंतर तो म्हणाला—" सर्वांत वाईट गोष्ट ही कीं त्या बाईचे आसइष्ट कोठें आहेत, कोणी आहेत कीं नाहींत, हे सुद्धां कोणाला माहीत नाहीं. त्या बाईचें एक पत्र तूं पोष्टांत टाकलेंस असें बाबा म्हणत होते."

" होय, मीं टाकलें. पोलिसांनीं दिखील ही हकीकत मला विचारिली. परंतु त्या पत्रावरील सबंध पत्ता मीं वाचला नाहीं. फक्त वरती 'मुंबई' असें लिहिलें होतें तेवढें वाचलें. कोण एक दर्याबाई नांवाची बाई येऊन तिचें मूल घेऊन गेली. तिलाच तें पत्र पाठविलें होतें."

" त्या बाईचाच आतां ते शोध करीत आहेत. आनंदरावांचें म्हणणें

असें आहे कीं शक्य तर त्या बाईचाच तपास लावला पाहिजे. कारण तिच्याकडून कलावती कोण, कोठली वगैरे माहिती लागेल. त्या बाईची चेहेरेपट्टी सुद्धां आनंदरावांनी पोलिसांना दिली आहे म्हणे. रविवारीं संध्याकाळीं ह्या आपल्या स्टेशनावर त्यांनीं तिला पाहिलें. ते पोलिसाजवळ सांगत होते, मीही तिकडेच निघालों. जातों आतां, उशीर होईल. "

वसंत तेथून घाईनें निघून गेला. सरजा त्याजकडे एकसारखी पहात राहिली. तिचें चित्त विचारमग्न झालें, व ती घोंटाळ्यांत पडल्यासारखी दिसूं लागली.

---

# प्रकरण ११ वें.

—:o:—

## ' खटल्याची चौकशी. '





कलावती अकस्मात् मेल्याची बातमी पोलीस ठाण्यांत पोंचतांच जमादार येऊन मयत स्त्रीची स्थिति वगैरे पाहून गेल्याचें मागें सांगितलेंच आहे. त्यानंतर दुसरे दिवशीं सकाळीं त्या तालुक्याचे फौजदार, बरोबर पोलीस शिपाई, त्या गांवचें पाटीलकुलकर्णी, पंच वगैरे लोक घेऊन मावशीबाईच्या घरीं येऊन दाखल झाले. कलावतीची ट्रंक, फणीकरंड्याची पेटी, तरवणीचें भांडें व औषधाची बाटली असे जिन्नस फौजदारसाहेबांनीं आपले स्वाधीन करून घेतले. प्रेताच्या एकंदर स्थितीचा बारीक रीतीनें तपास करून पंचांनीं पंचनामा लिहिला. नंतर प्रेताची फाड करून मरणास काय कारण झालें हें समजण्याकरितां पोलिसांनीं प्रेत सरकारी दवाखान्यांत पाठवून दिलें. तिकडून रीतीप्रमाणें तपासणी वगैरे होऊन

लिहून आलें कीं मयत स्त्रीच्या पोटांत प्रसिक ॲसिड नांवाचें विष प्रमाणापेक्षां जास्त गेल्यानें तिला मरण आलें. पंच याहीपेक्षां पुढें गेले होते. मयतेच्या पोटांत विष गेलें:—प्रसिक ॲसिड कीं ब्रुसिक ॲसिड त्यांना कसें समजणार ? झोंपेचें औषध ज्या बाटलींत होतें त्या बाटलीला विषाचा वास येत होता; तें औषध प्रतापरावांच्या दवाखान्यांतून आलें होतें; तेव्हां प्रतापरावांनींच असलें विषारी औषध पाठवून दिलें; सबब या गोष्टीचा विचार करितां प्रतापरावांनीं पाठवून दिलेल्या औषधापासून बाईचा प्राण गेला, असा पंचांनीं आपला अभिप्राय ठोकून दिला. प्रतापरावांचा लौकिक, त्यांचा सालस स्वभाव, धंद्यांत दिसून येणारें त्यांचें प्रावीण्य, त्यांची शांत व सात्त्विक वृत्ति, इत्यादि लक्ष्यांत घेतां बुद्धिपुरःसर त्या बाईच्या औषधांत प्रतापरावांनीं विष घातलें ही गोष्ट संभवनीय नाहीं, तथापि चुकून, दुर्लक्ष्य होऊन, न समजतां, त्यांच्या हातून औषधांत विष पडलें हें खास, असें पंचांनीं ठरविलें. डॉक्टरचा अभिप्राय, पंचांचें मत, मावशीबाई व मैनाई यांचे जबाब; आनंदरावांची साक्ष; इतकी सामुग्री मिळाल्यावर पोलिसांना आणखी काय पाहिजे; त्यांनीं प्रतापरावास आरोपी करून खटला इन्साफाकरितां माजिस्ट्रेटाकडे पाठवून दिला. सरकार खर्चानें प्रेताची पुढील व्यवस्था लावण्यांत आली.

आज गुरुवार. चौकशी आजच सुरू होती. म्हणून कोर्टांत व कोर्टाच्या बाहेर प्रेक्षकांची अत्यंत गर्दी होऊन गेली होती. त्या गांवांतील रिकामटेकडे लोक, चौकसखोर वाणीउदमी, गलिच्छ गांवगुंड व गांवांतून हिंडणारीं टारगीं पोरें सुद्धां त्या ठिकाणीं जमलीं होतीं. बंदोबस्ताकरितां पोलीसशिपाई ठिकठिकाणीं उभे होतेच. बरोबर अकराचा ठोका पडतांच मॅजिस्ट्रेटसाहेबांची स्वारी येऊन दाखल झाली. आरंभीं मयत स्त्री ज्या घरांत बाळंतीण झाली तें मावशीबाईचें घर, त्यांतील बाळंतिणीची खोली वगैरे मॅजिस्ट्रेटसाहेब समक्ष पाहून आले. नंतर इनसाफास सुरवात झाली. दोन तीन साक्षीदारांचींच साक्ष आपण समजून घेऊं, बाकीच्यांची जरूर नाहीं. कारण त्या योगानें आपणांस जी हकीगत माहीत आहे तिचेंच चर्वितचर्वण होऊन कंटाळा येईल.

प्रथम त्या आड्डयाशेजारच्या बाईची साक्ष झाली. तिनें सांगितलें कीं गेल्या शुक्रवारीं एका गाडींतून ती बाई आली व तिला आपण पेठेंतील मावशीबाईची घरजागा दाखवून दिली. नंतर मैनाई सुइणीला पुकारण्यांत आलें. मैनाईची साक्ष फारच मजेची झाली. मजकूरही मजेचाच होता. शिवाय तिचें प्रस्थ बरेंच स्थूल असल्यानें तिच्या यत्किंचित् हालचालीनें तिचे मांसल अवयव लटालटा हालत, यामुळें प्रेक्षकांना हांसू आवरत नसे. तशांतून साक्ष चालू असतांना होय साहेब, नाहीं साहेब, माफ करा साहेब, वगैरेंचा जो सपाटा चालला होता त्यायोगानें तर फारच हंशा उडाला.

मॅजिस्ट्रेटनीं प्रतिज्ञा दिल्यानंतर विचारलें:—

" तुमचें नांव मैनाई काय ? "

" होय साहेब; मला मैनाई म्हणतात. पण माझी आई...... "

" बस्स बस्स. पुरे करा. तुमची आई तुम्हांला लाडिकपणानें काय म्हणत होती तें नको आहे. समजलें बाई ? "

नंतर सरकारतर्फे वकिलांचे प्रश्न सुरू झाले:—

प्रश्नः—" कलावतीचें तुम्ही बाळंतपण केलें, तिला देण्याकरितां म्हणून एखादें औषध तुम्हीं गेल्या सोमवारीं रात्रीं माडीवर नेलें होतें काय ? काय हो, नेलें होतें काय ? "

उत्तरः—" होय होय. मीं नेलें होतें. मी नाहीं म्हणत नाहीं. झोंपेचें औषध मीं नेलें होतें. "

प्रश्नः—" त्या वेळीं किती वाजले असावेत ? "

उ०—" रात्रीची वेळ. मी त्या वेळीं जेवण करून अशी उठत होतें, साहेब. "

प्र०—" तुम्हांला वेळ सांगतां येत नाहीं काय ? "

उ०—" सांगतें साहेब. आतां काय गत करूं ? माझ्या तोंडाला कोरड पडली साहेब. त्या वेळीं आठ वाजले असावेत. माझी नेहमींची जेवणाची हीच वेळ. जेवण करून उठणार इतक्यांत दरवाजावर थाप मारलेली ऐकूं आली. वांग्याची भाजी, भात, लोणचें असें जेवतांना— "

मॅजिस्ट्रेट संतापून म्हणाले:—" तुमच्या जेवणांत काय काय पदार्थ

होते ते समजून घेण्याची आवश्यकता नाहीं. मुद्याच्या गोष्टी असतील ते वढ्याच सांगा. तें औषध कोणीं आणलें ? "

उ०—" मुद्याच्याच सांगतें, मी जास्त कशाला सांगूं ? तो त्या विश्राम डाक्टरांचा पोऱ्या आहेना ? तो घेऊन आला. किती मेला उर्मट कारटा हो ? [ कोर्टाकडे वळून ] सरकार, आपण असला द्वाड पोर कधींही पाहिला नसेल. पांढऱ्या कागदांत गुंडाळलेली एक बाटली त्यानें माझ्याजवळ दिली. अणि मला नाहीं नाहीं ते बोलला साहेब. मी आतां तें समळें सरकारच्या पायापाशीं सांगतें. "

मॅजिस्ट्रेट म्हणालेः—" मुद्याच्या गोष्टीशीं संबंध असेल तर सांगण्यास कांहीं हरकत नाहीं. "

मैनाई म्हणालीः—" तो मला म्हणाला...' काय आजीबाई, बरें आहे ना ? आज आजोबांची गांठ पडली होती कीं नाहीं ? सरकार, त्याचे कान उपटून हातांत द्यावे म्हणून माझीं बोटें कशीं शिवशिवत होतीं, पण काय करूं ? तो पार लांब पळून गेला. द्वाड मेला ! "

इतकें बोलून मैनाई एकदां मॅजिस्ट्रेटसाहेबांकडे, एकदां वकिलाकडे, नंतर आजूबाजूंच्या लोकांकडे वळून पाहूं लागली. तिला वाटलें यांपैकीं कोणाची तरी आपणास सहानुभूति मिळेल. त्याबरोबर कोर्टांत मोठाच हंशा पिकला. पण मैनाईचें बोलणें थांबेना..." तो माझ्या तावडींतून निसटला. आणि रस्त्यावर जाऊन उभा राहून वेडींवांकडीं तोंडें करून मला वेडावूं लागला. एकदां मनांत आलें कीं जाऊन त्याला धरावें, पण हें माझें अवजड शरीर जाग्यावरून हालेल तेव्हां ! "

मॅजिस्ट्रेट पुनः संतापून म्हणालेः—" बाई, लागू असेल तेवढेंच सांगा म्हणून तुम्हांला नुकतीच मीं ताकीद दिली आहे. त्या औषधाचें तुम्हीं मग काय केलेंत ? "

उ०ः—" मी तें औषध घेऊन माडीवरती गेलें. आनंदराव नुकतेच तिथें आलेले होते. त्यांनीं मला विचारलें, काय आहे म्हणून. मीं म्हटलें, प्रतापरावांनीं झोंपेचें औषध पाठवून दिलें आहे. आनंदरावांनीं

माझ्या हातांतून ती बाटली घेतली व ते वास घेऊन म्हणाले, ' याला बदामाच्या तेलाचा वास कां येत आहे ? "

प्र०:—" बदामाच्या तेलाचा ' असेच शब्द आनंदराव बोलले हें तुम्हांला पक्कें आठवतें काय ? "

उ०:—" होय होय, मला पक्कें आठवतें. मी कांहीं त्या वेळीं स्वप्नांत नव्हतें, कीं गैरशुद्धींत नव्हतें. आनंदरावांनीं बाटलीचें बूच काढलें, औषधाचा वास घेतला व ते मग असें म्हणाले. प्रतापरावांनीं बाळंतिणीला बदामाचें तेल काय म्हणून पाठवून दिलें असेल, असें सुद्धां ते म्हणाले. "

प्र०:—" तुम्हीं स्वतः त्या औषधाचा वास घेतला काय ? "

उ०:—" मला चांगला वास आला नाहीं, साहेब. आनंदरावांनीं दिखील ती बाटली माझ्या नाकाशीं धरली, पण मला थोडी सर्दी झाली होती, म्हणून वास येत नव्हता. "

प्र०:—" बरें, तें औषध कोणीं ठेवलें ? तुम्हीं, कीं आनंदरावांनीं किंवा त्या बाळंतिणीनें ? "

उ०—" मींच ठेवलें साहेब. पुढच्या खोलींत फडताळांत आणखी बाटल्या होत्या, त्यांच्या शेजारींच मीं ती बाटली ठेविली. "

मॅजिस्ट्रेटनीं मध्येंच विचारिलें:—" या बाटलीसारखी दुसरी एखादी बाटली तेथें होती काय, कीं चुकून ही न घेतां तीच घेतली असावी."

उ०:—" असली एक सुद्धां नव्हती. त्या सर्व बाटल्या रिकाम्या असून या बाटलीपेक्षां मोठ्या आहेत. अजूनी दिखील त्या तिथें आहेत, साहेब. "

प्र०:—" तुम्हीं ती बाटली फडताळांत ठेवली व नंतर तींतील औषध बाळंतिणीला दिलें. त्याचे दरम्यान तें औषध कोणाच्या हातीं लागलें असेल काय ? "

उ०:—" हातीं लागेल म्हणावयाला घरांत कुणी नव्हतेंच मुळीं. मी बहुतेक सर्व वेळ त्या खोलीतच होतें. बाळंतिणीला देण्याकरितां मीं औषध नेलें तेव्हां मावशीबाईनीं दिवा धरिला होता. त्या बाटलीला कुणीं दिखील

हात लावला नाहीं अशी माझी खात्री आहे, कारण मीं ज्या ठिकाणीं ती बाटली ठेवली होती त्या ठिकाणी तशाच्या तशी होती."

प्र०:—" त्या वेळीं म्हणजे तुम्हीं औषध दिलें त्या वेळीं आनंदराव गेले होते काय ?"

उ०:—" आनंदराव का ? ते लागलीच गेले. तिथें फार वेळ राहिले नाहींत, साहेब."

प्र०:–" बाई, मी तुम्हांला आणखी एक प्रश्न विचारतों. नीट लक्ष्यांत घेऊन उत्तर द्या. तें औषध बाळंतिणीला देऊं नका अशी आनंदरावांनीं तुम्हांला ताकीद दिली होती म्हणे. ही गोष्ट खरी काय ?"

त्याबरोबर मैनाई रागानें फुणफुणूं लागली. " नाहीं साहेब. मी देवाची शपथ घेऊन सांगतें, आनंदरावांनीं मला असें कांहींच सांगितलें नाहीं. औषध देऊं नका असें ते माझ्याजवळ मुळींच बोलले नाहींत. त्यांनीं तें औषध हुंगून पाहिलें—जणूं औषधांत काय आहे हें त्यांना हुंगून समजणार—एक थेंब घेऊन त्यांनीं तो जिभेनें चाखला, व नंतर ते म्हणाले कीं याला बदामाच्या तेलाचा वास येत आहे. पण तें औषध बाळंतिणीला देऊं नका असें त्यांनीं मला सांगितलें, ही जी बातमी उठली आहे ती मात्र सपशेल खोटी आहे. 'औषध घेऊं नका' असें त्यांनीं त्या बाळंतिणीला सांगितलें होतें म्हणे. पण मला तसें त्यांनीं कांहींच सांगितलें नाहीं, व ती बाळंतीणही मजजवळ कांहींच बोलली नाहीं."

प्र०:—" तुम्हीं स्वतःच ते औषध कलावतीला दिलें काय ?"

उ:–" होय साहेब, मींच दिलें. माझें तें कामच होतें. मीं तें एका गलासांत ओतलेंनि दिलें."

प्र०:–" बरें, कलावतीनें तरी तें औषध घेण्यास कांहीं कांकूं केलें काय ?"

उ०:—" नाहीं. ती काय करते बिचारी. आम्हीं कांहीं दिलें तरी ती आपली मुकाट्यानें आणि आनंदानें घेई. औषध घेऊन थोडा वेळ दि-

खील गेला नसेलहो. 'इतक्यांत तिचा प्राण गेला. ज्यानें त्या औषधांत विष घातलें त्या मेल्याचें निसंतान होवो ! "

प्र०:—" ती मेली अशी तुमची त्याच वेळीं समजूत झाली काय ? "

उ०:—" नाहीं साहेब, त्या वेळीं माझी तशी समजूत झाली नाहीं. मला वाटलें ती बेशुद्ध पडली. मीं मावशीबाईना सुद्धां म्हटलें कीं हिला काय झालें पहा तरी मीं तिच्या डोकीवरचा पदर बाजूला केला आणि मान थोडीशी वर उचलली. पण फार वेळ नाहीं हो गेला. लागलीच तिचा प्राण गेला ! आई ! आई ! "

प्र०:—" तर मग त्या औषधांत विष कसें गेलें असावें हें तुम्हांला माहीत नाहीं, किंवा तुम्हांला कोणाचा वहीमही नाहीं ? "

उ०:—" " नाहीं, साहेब, मला नाहीं माहीत. पण मला वाटतें त्या विश्राम डाक्तरांच्या पोऱ्यासारख्या दुसऱ्या एखाद्या द्वाड कार्ट्यानेंच हें काम केलें असावें. याबद्दल त्याला जरी कोणीं सुळावर द्यायला नेलें तरी मला बरेंच वाटेल. एक चांगलीशी जागा शोधून काढून मी आपली ती गंमत पहात राहीन. मग बारानी बारा चोवीस तास जरी मला उभें रहावें लागलें तरी हरकत नाहीं. पण माझे पाय काय मेले—जरा उभें राहिलें कीं लागलीच सुजतात, साहेब. "

पायांसंबंधाचा असंबद्ध मजकूर उपयोगी नाहीं हें सांगण्याकरितां हात हालवून वकीलांनीं विचारिलें:—" औषध आणतांना त्यांत त्या पोऱ्यानें कांहीं कमजास्त केलें नसेल ना ? "

" नाहीं साहेब, मी अगदीं शपथपूर्वक सांगतें कीं त्यानें त्यांत कांहीं ढवळाढवळ केली नाहीं. बाटली जशीच्या तशी त्यानें माझ्या हातांत दिली; पांढरा कागद गुंडाळलेला तसाच होता. मला तरी निदान किंचित् सुद्धां कमी जास्त दिसून आलें नाहीं. "

...पुढें मैनाईच्या साक्षीची जरूर वाटली नाहीं. तिला जाण्यास परवा...ली; त्याबरोबर ती कोर्टांतून बाहेर गेली.

... आनंदरावांना पुकारण्यांत आलें. त्यांची सभ्य मुद्रा, नीटनेटका

पोषाख व साक्ष देण्याची त्यांची तत्परता पाहून मैनाईच्या साक्षीनें उडविलेला हंशा बंद होऊन जिकडे तिकडे अगदीं सामसूम झालें.

आनंदरावांनीं हकीकत सांगण्यास सुरवात केली:—" गेल्या रविवारीं रात्रीं मी मुंबईहून घरीं आल्यावर माझ्या नोकरानें मला एक चिठी आणून दिली. तो म्हणाला, ही चिठी कालच्या शुक्रवारीं येथें कोणीं आणून दिली म्हणून. ती कोणी कलावती नांवाच्या बाईकडून आली असून मीं तिची तब्येत पहावयास यावें असें तींत लिहिलें होतें. पेठेंतील घर नंबर १३ असा पत्ता लिहिला होता. मी ताबडतोब तिकडे गेलों तर बाई बाळंत झाली असून प्रतापरावांचें औषध चालू आहे, मी नव्हतों म्हणून त्यांना बोलावून आणलें होतें, असें मला समजलें."

मॅजिस्ट्रेटनीं मध्येंच विचारिलें:—" ती चिठी तुम्ही हजर करतां काय ? "

परंतु ती चिठी साक्षीदाराजवळ ( आनंदरावांजवळ ) नव्हती. आणि चमत्कार असा कीं त्या चिठीचें काय झालें हें त्यांना खालीलायक माहीत नव्हतें. आणि रविवारीं रात्रीं ते कलावतीच्या घरीं जाण्याकरितां निघाले तेव्हां सुद्धां त्यांनीं त्या चिठीचा तपास केला पण त्यांना ती सांपडली नाहीं हें वाचकांच्या ध्यानांत असेलच. तेव्हां बाकीच्या पत्रांबरोबर ती चिठी आपण विस्तवांत टाकली असेंच त्यांच्या मनानें घेतलें होतें.

ते म्हणाले:—" ती चिठी मीं ठेविली असेल असें मला वाटत नाहीं. असलीं पत्रें संभाळून ठेवण्याची बहुतेक माझी वहिवाट नाहीं. आणि जरी मला आतां पक्कें आठवत नाहीं तरी ती मीं जाळून टाकली असावी असें वाटतें. त्यानंतर मीं पुष्कळ शोधिलें पण ती सांपडली नाहीं. हल्लीं चाललेल्या चौकशीस कांहीं मदत होईल असा मजकूर त्यांत नव्हता. फक्त ' आपण येऊन माझी प्रकृति पाहून जावें, वगैरे शिरस्त्याप्रमाणें पांच सहा ओळी लिहिल्या होत्या. "

प्र०:—" त्या पत्रावर तिची पूर्ण सही होती काय ? "

उ०:—" नव्हती. फक्त ' कलावती ' एवढेंच लिहिलें होतें. त्या दि-

ून मे महिना लागेपर्यंत तरी तिला पुरे दिवस भरत
जकूर हो वाटलें होतें."
नव्हते अ सही होती काय असें विचारण्याचें कारण एवढेंच कीं
प्र०:- नांव काय, तिच्या नवऱ्याचें नांव काय, वगैरे हकीगत
कलावतीचें नाहीं, ती समजली असती. बरें, रात्रीं तुमच्या तिच्या भे-
कांहींच स , काय वगैरे माहिती तरी तुम्हांला लागली काय ?"
टींत ती क मुळींच नाहीं. त्या वेळीं बरीच रात्र झाली होती. तिला जाग-
उ०:-" मला प्रशस्त वाटलें नाहीं. आमचें बोलणें झालें तें फक्त
रण करूं दे संबधानेंच होतें. मी येथें नव्हतों म्हणून तिला फार वाईट
तिच्या प्रकृ त्यांतल्या त्यांत प्रतापरावांसारख्या हुशार मनुष्याचें औषध
वाटत होतें. ाहून मला आनंद झाला. मी आतां परत आलों होतों तेव्हां
सुरू होतें हें सुरू करावें अशी तिची इच्छा होती. शिवाय या गांवांत ये-
माझेंच औषध मैत्रिणींनीं माझी शिफारस तिच्याजवळ केली होती असें
ण्यापूर्वीं तिच्या ल्यासारखें वाटतें."
कांहीं ती म्हण ा मैत्रिणी कोण हें तुम्हांला सांगतां येईल काय ?"
प्र०:-" हीं सांगतां येणार. शिवाय ती असें खात्रीनें म्हणालीच हें
उ०:-" न ठवत नाहीं. ती गुंगींत असावी असें दिसलें. बोलणें अ-
ही मला पक्के शब्द सुद्धां वरोबर ओळखतां आले नाहींत. जरा बरें वाटू-
गदीं हळूं, मला ली शक्ति आली म्हणजे कोणीं शिफारस केली वगैरे मा-
न बोलण्याची असा माझा बेत होता. कलावतीच्या मैत्रिणी, आप्त, इष्ट
हिती विच वी परिचयाचें असल्याचें माझ्या ध्यानांत येईना."
वगैरे कोणी माझ्य ळेपासून तुम्हीं तिला आपलें औषध सुरू केलें काय ?"
प्र०:-" त्या प्रतापरावांनीं तिला माझ्या हवालीं केल्याशिवाय मला
उ०:-" नाहीं णार ? दुसरे दिवशीं—म्हणजे सोमवारीं—मला प्रता-
औषध कसें देतां ये . त्यांना मीं आर्जवानें सांगितलें कीं आज संध्याकाळ-
"या सकाळपर्यंत तुमचेंच औषध सुरू ठेवा. कारण मला
नगी इ रसत नव्हती. त्यांचें माझें असें ठरलें कीं त्या दिवशीं
नंतर

संध्याकाळीं सात वाजतां मीं मावशीबाईच्या घरीं जावें, त्य. वळें तर दुसरे दिवशीं सकाळीं दहा वाजतां जावें. ''

प्र०:–'' मग, ठरल्याप्रमाणें तुम्ही संध्याकाळीं सात व गेलां होतां काय ? ''

उ०:–'' नाहीं, मला जावयाला झालें नाहीं. मी वेळीं एक तासभर उशीर झाला होता. प्रतापराव निघून गेले तिणीची तब्येत जरा बरी होती. पण ती थोडी त्रासलेली उद्यां सकाळीं माझें औषध सुरू करतों असें मीं तिच्याजवळ त्या दिवशींच मीं माझें औषुध सुरू करावें अशी तिची इ पण, मला आज फुरसत नाहीं, पुष्कळ रोगी पहावयाचे आ तिला सांगितलें. प्रतापराव तुम्हांला पसंत नाहींत काय, अ विचारलें; तेव्हां ती म्हणाली ' ते मला पसंत आहेत. ते म ळजीनें व अगत्यानें औषध देतात. ' ''

प्र०:–'' तुमची कोणीं शिफारस केली हें तुम्हीं तिला विचारलें काय ? ''

उ०:–'' मीं विचारलें नाहीं. ती थोडी अस्वस्थ, त्रासलेल णून प्रकृति खेरीज करून मीं तिला दुसरा कसलाच प्रश्न विच

प्र०:–'' तुम्ही असतांनाच औषध तेथें आलें काय ? ''

उ०:–'' होय. मी बाळंतिणीबरोबर बोलत होतों. इत पावलांचा आवाज ऐकूं आला. मला वाटलें प्रतापरावच तों तर मैनाई सुईण होती. तिच्या हातांत औषधाची एक ली होती. ' हें झोंपेचें औषध ' असें ती म्हणाली. मीं पाहिला तों खरेंच. ''

प्र०–'' त्या औषधाला कांहीं चमत्कारिक वास येत

उ०:—'' होय, अतिशय येत होता. सुईण वासच येत नाहीं म्हणून. मला तें खरें वाटलें नाहीं. झोंपेच्या औषधांत–प्रतापरावांनीं ' प्रसिक ॲसिड ' असावें याचें मला आश्चर्य वाटलें. पण त्यांच्या औष

करण्याचा मला अधिकार नाहीं म्हणून मीं ती बाटली त्या सुईणीला परत दिली."

प्र०:—" तिचा प्राण जाण्यास पुरें इतकें विष त्यांत आहे असें तुम्हांला वाटलें नाहीं ?"

आनंदराव या प्रश्नानें संतप्त झाले व त्यांनीं रागानें डोळे वटारले. पण हें कोर्ट आहे असें त्यांच्या लक्ष्यांत येतांच ते किंचित् तिरस्कारपूर्वक हांसून म्हणाले:—

" हा प्रश्न निरर्थक आहे, कारण मला यत्किंचित् जरी संशय आला असतां तरी बाळंतिणीनें तें औषध घेऊं नये अशाबद्दल मीं यापेक्षां जास्त काळजी घेतली असती. कित्येक वेळां अगदीं थोड्या प्रमाणांत ' प्रासिक ॲसिड ' रोग्याला दिलें तर हितावह होतें व त्यापासून गुण येतो. तेथून जाण्यापूर्वीं कांहीं मिनिटें मी बाळंतिणीशीं बोलत होतों, त्या वेळीं सुद्धां तो वास माझ्या कपाळांतून गेला नव्हता. माझ्या डोक्यांत असा एक विचार आला कीं औषध तयार करण्यांत कांहीं चूक तरी झाली नसेल ना ? कारण अशा चुका पुष्कळदां होतात, विशेषेंकरून अनुभव नसलेल्या, बिनमाहितगार अशा लोकांकडून जास्तच होतात, असा अनुभव आम्हां सर्वांना आहे. लागलीच माझ्या मनांत आलें कीं तें औषध न घेण्याबद्दल बाळंतिणीला सुचवून ठेवावें व त्याप्रमाणें मीं केलेंही "

प्र०—" त्या औषधांत विष असावें अशी जी भीति तुम्हांला वाटली, ती तुम्हीं तिला कळविली काय ?"

साक्षीदार पुनः हांसून म्हणाला:—" मी बोलतों याचा कोर्टानें राग मानूं नये साहेब, रोग्यांची आपणाला विशेष माहिती असणें शक्य नाहीं. त्यांच्या मनोविकारांमुळें त्यांच्या शरीरावर होणाऱ्या परिणामांची डॉक्टरलोकांनाच माहिती असते. त्या औषधांत चूकून विष मिसळलें आहे असें जर मीं तिला त्या वेळीं सांगितलें असतें तर तिला भयंकर धक्का बसण्याचा संभव होता व अशा स्थितींतील स्त्रियांना धक्का बसणें घातक असतें. मीं तिला एवढेंच सांगितलें कीं प्रताप-

रावांनीं आतां जें औषध पाठवून दिलें आहे तें मला पसंत नाहीं. मी जाऊन त्यांना विचारतों. पण एवढें मात्र मीं तिला निक्षून सांगितलें कीं माझ्याकडून अगर प्रतापरावांकडून, औषध घेण्यास हरकत नाहीं असा निरोप येईपर्यंत, तें औषध घ्यावयाचें नाहीं. ”

प्रश्नः—“ मग तिनें तें औषध कां घेतलें असावें तुम्हांला सांगतां येईल ? ”

उ०:—“ मला नाहीं सांगतां येणार. जितक्या स्पष्ट रीतीनें सांगावयास पाहिजे तितक्या स्पष्टपणानें मीं तिला सांगितलें होतें. फक्त तिला भीति वाटेल अशा रीतीनें सांगितलें नाहीं. मीं तिला जें काय सांगितलें तें सर्व ती विसरली असावी असें वाटतें.

प्रश्नः—“ त्याचप्रमाणें मैनाई सुइणीलाही तुम्हीं सुचवून ठेविलें होतें काय ? ”

उ०:—“ नाहीं. कलावतीला सांगितलें तेवढें पुरे असें मला वाटलें. शिवाय मी घरांतून बाहेर पडलों तेव्हां मैनाई मला कोठें दिसली नाहीं. ”

प्रश्नः—“ आनंदराव, त्या औषधाबद्दल तुम्हांला संशय आला होता तर तुम्ही ती बाटली आपल्या खिशांत घालून नेली असती तर फार बरें झालें असतें असें नाहीं का तुम्हांला वाटत ? ”

आपल्या शहाणपणावर दुसऱ्यानें टीका करावी हे आनंदरावांना रुचलें नाहीं. ते रागावून म्हणाले:—

“ पुढें काय होईल हें जर आपणास आगाऊ कळेल, तर आपण सर्वजण पुष्कळ अंशीं निराळ्या रीतीनें वागूं. संकट आलें म्हणजे मग आम्ही म्हणतों—“ मला समजलें असतें तर मीं यंव केलें असतें, त्यंव केलें असतें, व संकट टळलें असतें. ’ जर त्या औषधांत बाळंतिणीचा प्राण घेण्याला पुरे इतकें विष आहे असें मला कळतें, किंवा मीं तिला बजाविलें असतांही तिकडे दुर्लक्ष्य करून ती तें औषध पिईल असें वाटलें असतें तर मी खातीनें तें औषध बरोबर घेऊन गेलों असतों. मी तें बरोबर घेऊन गेलों नाहीं याचें त्या वेळेपासून मला वाईट वाटत आहे. पण वाईट वाटून काय उपयोग ? मेलेलें मनुष्य आतां थोडेंच जिवंत होणार ? ”

मॅजिस्ट्रेट म्हणाले ' पुढें चालूं द्या. '

" तेथून मी विश्राम डॉक्टरांच्या घरीं गेलों. प्रतापरावांची गांठ घ्यावी, त्या औषधाबद्दल आपल्यास आलेली शंका त्यांना सांगावी, व औषध बरोबर तयार केलें आहे कीं नाहीं याची चौकशी करावी अशा हेतूनें मी गेलों. परंतु प्रतापरावांची व माझी गांठ पडली नाहीं. ते घरीं नव्हते. आतां काय करावें अशा विचारांत मी पडलों. नंतर मीं असें ठरविलें कीं आपण घरीं जावें, दुसरें एक चांगलें झोंपेचें औषध तयार करून घेऊन यावें व तें बाळंतिणीला द्यावें. असा विचार करून मी घरीं गेलों. पण येण्यास मला थोडा उशीर झाला. वाटेंत एका रोग्याला पाहण्यास जाणें मला भाग पडलें. "

प्र०:—" तर मग झोंपेचें औषध देणें जरूर आहे असें तुम्हांला सुद्धां वाटलें ? "

उ —" प्रतापरावांना अशी अवश्यकता वाटली होती आणि आम्ही डॉक्टर एकमेकांच्या औषधयोजनेबद्दल शंका घेत नसतों. तशांतून तिला त्रास झाला होता असें मला दिसलें होतें म्हणून तिला एखादें स्वास्थ्यकारक औषध द्यायला पाहिजे असें मला वाटलें. नवीन औषध तयार करून तें खिशांत घालून मी येत होतों इतक्यांत वाटेंतच मला मावशीबाई घाबऱ्या घाबऱ्या येत असलेल्या भेटल्या व कलावती मेली असें त्यानीं मला सांगितलें. "

प्रश्न–" ती मेल्यावर प्रथम तुम्हीच तेथें गेला काय ? "

उत्तर–" मीच प्रथम गेलों. तेव्हां तेथें फक्त सुईणच होती. मी जाऊन एक मिनीट झालें असेल नसेल तोंच दिक्षित माझ्या मागून आले. आम्हीं पाहिलें तर ती मेली होती. "

प्रश्नः—" तिच्या मरणास तुमच्या मतें काय कारण झालें असावें बरें ? "

उत्तर—" प्रसिक ॲसिड पोटांत गेलें हेंच. त्यांत तिळमात्र शंका नाहा. तिच्या तोंडाला सुद्धां त्याचाच वास येत होता. "

प्रश्न—“ ही बाटली पहा. ज्या बाटलींत तें प्राणघातक विष होतें तीच ही कुपी ना ? ”

उत्तर–“ त्यासारखीच ही दिसते. वरती कागद लावला आहे त्यांतील अक्षर व सूचना अगदीं सारख्याच दिसतात. ” नंतर बुच काढून [ आनंदराव ] म्हणाले:–

“ होय होय, अगदीं हीच ती बाटली. हिला अजून वास येतो आहे. ”

प्र०:—“ मैनाई, इनें तुम्हीं तिच्या हातांत बाटली दिल्याबर, ती बाटली कोठें ठेविली हें तुम्हीं पाहिलें काय ? ”

उ०–“ तिनें कोठें ठेविली मला सांगतां येत नाहीं. मीं पाहिलें नाहीं. ”

प्र०—“ त्या घरांतून बाहेर पडण्यापूर्वीं तुम्हीं पुनः त्या बाटलीला स्पर्श सुद्धां केला नाहीं ? ”

आनंदरावांनीं झट्‌दिशीं तोंड फिरवून मागच्या बाजूला मंडळी बसली होती तिकडे पाहून म्हटलें:—“ मला कोणीं हांक मारली ? ”

गेलीं एक दोन मिनिटें या मंडळींत बरीच कुजबूज चालली होती व त्यांतच कोणीं आनंदरावांचें नांव घेतलें. परंतु त्यांना हाक मारल्याचें कोणींही कबूल करीना. त्यामुळें आनंदराव थोडे संतापल्यासारखे झाले. ते कोर्टाकडे तोंड फिरवून म्हणाले:—“ साहेब, मला माफी असावी. कोणीं तरी मला हाक मारली असें मला खास वाटतें. मग तो कोणी कां असेना. कायद्याच्या दृष्टीनें पाहिलें तर कोर्टाची बेअदबी केल्याचा आरोप त्याच्यावर येतो. असो. त्याचा विचार कोर्टानें करावयाचा आहे. साहेब, आपण काय विचारलें कीं, मैनाईजवळ तें औषध दिल्यानंतर त्या घरांतून जाण्यापूर्वीं पुनः मीं त्या औषधाला हात लाविला कीं काय, असेंच ना ? मीं त्याला स्पर्शही केला नाहीं व तें कोठें ठेविलें हेंही मला माहीत नव्हतें. ”

ज्या बाजूकडून आनंदरावांना हाक मारल्यासारखा आवाज ऐकूं आला त्या बाजूकडे वळून मॅजिस्ट्रेट म्हणाले:—“ लोक अशा रीतीनें कोर्टाच्या कामांत जर व्यत्यय आणतील तर त्यांना कोर्टाच्या बाहेर घालवून दिलें जाईल. ज्यांना बोलावयाचें असेल त्यांनीं बाहेर जाऊन खुशाल बोलावें. ”

आनंदरावांची साक्ष आतां बहुतेक संपत आली होती. त्यांना मॅजिस्ट्रेट म्हणाले:—" आनंदराव, तुम्हांला एक प्रश्न विचारावयाचा आहे— ह्या एकंदर गोष्टीचा कांहीं तरी तपास तुम्हांला लागतो काय? हें सांगतां येत असेल तर सांगा. आनंदराव स्तब्ध उभे राहिले. ते कांहींच बोलेनात. मोठ्या विचारांत मग्न झाल्यासारखे दिसले. कसला विचार त्यांना पडला असावा बरें ? ती बाळंतीणबाई मरण्यापूर्वी सुमारें अर्धा तास आपणास जिन्याजवळ एक चेहरा दिसला,—चंद्रप्रकाशांत एक फारच विलक्षण व भीतिदायक असा चेहरा दिसला—हा मजकूर कोर्टास सांगावा कीं कसें याचा विचार ते करीत असावेत काय ? हा जो एकंदर प्रकार घडला त्याशीं त्या व्यक्तीचा कांहीं तरी संबंध असावा हें खास, एरव्हीं त्या ठिकाणीं त्या व्यक्तीस येण्याचें काय कारण ही गोष्ट आपण कोर्टास जाहीर करावी कीं नाहीं या विचारांत चित्तवृत्ति द्विधा झाली होती किंवा काल्पनिक भीतीनें सुद्धां आपण पछाडले जातों ही गोष्ट कबूल केली तर सारे लोक आपली थट्टा करतील म्हणून ते कचरत होते ? काय ? वाचकहो, आनंदराव एवढे कां बुचकळ्यांत पडले होते हें सांगतां येणें कठीण आहे.

कांहीं वेळ वाट पाहून कोर्टानें विचारिलें:—" तुमच्याकडून उत्तर येत नाहीं ? "

आनंदरावांनीं उत्तर केलें:–" अमुक इसमावर माझा वहीम आहे असें मला सांगतां येत नाहीं, किंवा त्या औषधांत विष कसें गेलें असावें याचीही कल्पना मला होत नाहीं. फक्त तें औषध त्या घरांत येऊन पोंचलें तेव्हां त्यास विषाचा वास येत होता. यावरून तें तयार होतेवेळींच त्यांत विष गेलें असावें एवढी माझी कल्पना धांवते. "

नंतर थोडा वेळ कोर्टांत जिकडे तिकडे सामसूम होतें. कांहीं वेळानें मॅजिस्ट्रेट म्हणाले:—" आनंदराव, इतकेंच आपणास विचारावयाचें होतें. आपण आपली साक्ष सरळपणानें व तत्परतेनें दिली याबद्दल कोर्ट आपलें फार आभारी आहे. "

कोर्टाची परवानगी घेऊन आनंदराव बाहेर निघाले. इतक्यांत सर-

कारतर्फे वकील कांहीं कागद चाळीत बसले होते ते मॅजिस्ट्रेटसाहेबांबरोबर इंग्रजींतून कायसें बोलले. तें ऐकून मॅजिस्ट्रेट म्हणाले:—" बरोबर, अगदीं बरोबर. आनंदराव, क्षणभर थांबा; रविवारीं संध्याकाळीं स्टेशनावर ह्या हतभागी मयत स्त्रीचें मूल घेऊन जाणारी कोणी दयाबाई नांवाची बाई आपणाला भेटली होती नव्हे काय ? "

उ०:—" होय. स्टेशनावर एक लहान उपजलेलें मूल घेतलेली बाई मीं पाहिली. मला तिचें नांव माहीत नाहीं. तेंच तें मूल असावें यांत बिलकूल शंका नाहीं. "

प्र०—" तुमचें तिचें बोलणें झालें त्यांत ही मयत स्त्री कोण, कोणत्या गांवची राहणारी वगैरे माहिती तिनें सांगितली काय ? "

उ०:—" तिनें कांहीं सांगितलें नाहीं. काय प्रकार घडला होता हेंही मला माहीत नव्हतें. मला वाटलें कीं तें मूल ह्या गांवांतील कोणाचें तरी असेल. मूल अगदीं लहान आहे, अशक्त आहे, प्रवासाची दगदग, थंडीवारा त्याला सोसणार नाहीं असें मीं त्या बाईला सांगितलें. पण माझें सांगणें तिला रुचलें नाहीं. ' गरजेला कायदा लागू नाहीं, गरजवंताला अक्कल नसते ' असें कायसें ती बडबडली. मी त्या बाईबरोबर फार झालें तर एक कीं दोनच मिनिटें बोललों असेन, व तेंही त्या भाड्याच्या गाडीसंबंधींच. खांचखळग्यांतून, दगडांतून गाडीवानानें गाडी अगदीं बेफिकीरपणानें व भरधांव हाकली, त्यामुळें आपलें सर्व आंग कसें अगदीं ठेंचून गेलें आहे असें ती म्हणत होती. इतकेंच. "

प्र०:—" तुम्ही आतां तिला पुन्हा ओळखाल काय ? "

उ०:—" ओळखेन कदाचित्, पण खात्री वाटत नाहीं. मला तिचें तोंड चांगलेंसें दिसलें नाहीं. रात्रीची वेळ असून प्रकाशही बरोबर नव्हता."

प्र०:—" आपण कोठें जाणार वगैरे तिनें कांहीं तुम्हांला सांगितलें काय ?"

उ०:—" नाहीं. तिनें कांहीं सांगितलें नाहीं. "

"बस्स, एवढेंच विचारावयाचें होतें आनंदराव, " असें माजिस्ट्रेट म्हणाले. नंतर आनंदराव पुनः मोठ्या अदबीनें कोर्टाची परवानगी घेऊन बाहेर पडले.

# प्रकरण १२ वें.

## आनंदरावांना पुनः पुकारलें.



आनंदराव गेल्यानन्तर मॅजिस्ट्रेट व सरकारतर्फे वकील यांचें थोडेंसें संभाषण होऊन मैनाई सुइणीस पुनः कांहीं प्रश्न विचारण्यांत आले.

प्र०:—" मैनाई, तुमचें असेंच ह्मणणें ना कीं तें औषध घेण्यास मयत स्त्रीनें कांहीं हरकत घेतली नाहीं ? "

उ०:—" होय साहेब; तिनें मुळींच घेतली नाहीं. उलट तिनें औषध घेण्याची अगदीं गडबड चालविली होती. तरवणी घेतल्यानंतर लागलीच तिनें औषध मागितलें. पण मींच तिला सांगितलें कीं इतक्यांतच घ्यायचें नाहीं म्हणून. "

प्र०:—" आनंदराव ह्मणतात कीं औषध न घेण्याबद्दल तिला आपण सूचना दिली होती, आणि तुह्मीं तर शपथेवर सांगतां कीं तिनें बिलकुल हरकत न घेतां औषध घेतलें. हें कसें ? "

उ०:—" होय, होय, सरकार, मी देवाची शपथ घेऊन सांगतें. पाहिजे त्याची शपथ घेतें साहेब; माझें सांगणें जर खरें वाटत नसेल तर सरकारनीं मावशीबाईंना विचारावें. खोलींतून त्या मुळींसुद्धां बाहेर पडल्या नाहींत. माझ्याप्रमाणें सर्व हकीगत त्यांना सांगतां येईल. पण त्या अगदीं भितऱ्या आहेत. आपणावरच आतां खटला करतील अशी त्यांना भीति पडली आहे. त्या साऱ्या जन्मांत कधींदेखील कोर्टाची पायरी चढल्या नाहींत, कीं कधीं साक्ष देण्याकरितां पिंजऱ्यांत उभ्या राहिल्या नाहींत. "

नंतर मावशीबाईंना पुकारण्यांत आलें.

मावशीबाई अगोदरच भारी भितऱ्या, तशांतून कोर्टातील ती गर्दी, ते काळ्या डगल्याचे पोलीस शिपाई व चोहोंकडे भासणारी शांतता, यामुळें तर मावशीबाईच्या तोंडचें पाणी पळून गेलें. मॅजिस्ट्रेटनीं मावशीबाईना 'देवाची शपथ घेऊन खरें सांगतें ह्मणा' असें सांगितलें, पण त्या कांहीं केल्या शपथ ह्मणून घेईनात. त्या अगदीं गोंधळून गेल्या होत्या. देवाच्या शपथेचें हें काय लचांड आहे त्यांना समजेना. खरी हकीकत सांगण्यास आपली खुषी असतां पुनः 'देवाची शपथ घेऊन खरें सांगतें. खोटें सांगणार नाहीं.' असें ह्मणण्याचें प्रयोजन त्यांच्या लक्षांत येईना. त्यांनीं प्रतिज्ञा घेण्यास पुष्कळ आढेवेढे घेतले. मॅजिस्ट्रेटनीं, वकिलांनीं, शेवटीं जेव्हां पोलिसांनीं समजूत घातली तेव्हां शपथ घेण्याचें काम मोठ्या मुष्किलीनें एकदाचें पार पडलें, आणि साक्षीला सुरवात झाली.

प्र:०—"बाई, तुमचें नांव काय?"

उ:०—"मी गरीब बायकोमाणूस, येथें माझें कोणी नाहीं साहेब." मावशीबाई थरथर कांपू लागल्या.

प्र:०—"नसेल, पण आम्हांला तुमचें नांव पाहिजे आहे. बाई, तुम्हांला काय म्हणतात?"

उ:०—"मला मावशीबाई म्हणतात साहेब. माझ्यावर दया करा."

मॅजिस्ट्रेट जरा तापट स्वभावाचे होते, ते मोठ्यानें ओरडून म्हणाले: "बाई, प्रश्न नीट समजून घेऊन शांतपणानें उत्तर द्या. तुम्हांला इतकें घाबरायला काय झालें? तुम्हांला कसली भीति वाटते? येथें तुम्हांला कोण खातें वाटतें?"

हे रागाचे शब्द ऐकताच मावशीबाईची पांचावर धारण बसली. त्या गयावया करून म्हणाल्या:—"साहेब, मी अगदीं आठवण करून सांगतें कीं मीं कधीं कोणाचा अपराध केला नाहीं. मी गरीब बायको आहें. माझें कुण्णी नाहीं सरकार. मला या कोर्टांत आणलें; माझी बेअब्रू झाली साहेब" असें बोलत असतां मावशीबाईच्या कपाळावरून व नाकावरून घामाच्या धारा चालल्या होत्या.

मॅजिस्ट्रेटनीं जरा त्रासून विचारलें:—" बाई, तुमचें वय काय ? "

उ०:—" वय ? वयाची परीक्षा करण्याचें का हें कोर्ट ? शर्थ झाली बाई ! "

" हें कोर्ट असें आहे कीं येथें जेवढे प्रश्न विचारतील तेवढ्यांचेंच उत्तर द्यायला पाहिजे. जास्त बोलण्याचें कारण नाहीं. समजलें बाई ? सांगा तर मग तुम्हांला किती वर्षें झालीं ? "

" मला चाळीस बेचाळीस वर्षें झालीं असतील. " मावशीबाई अस्पष्ट बोलल्या.

मॅजिस्ट्रेटनीं तिच्या पिकलेल्या केंसांकडे व सुरकुतलेल्या तोंडाकडे पाहिलें. थोडी गंमत करावी असें वाटून ते म्हणाले:—" किती ? बेचाळीस ? घेऊं का लिहून ? बाई, तुह्मी अगदीं खरें सांगतां ना ? हें न्यायाचें कोर्ट आहे एवढें लक्षांत ठेवा. तुम्हांला प्रतिज्ञा दिली आहे. खोटा मजकूर सांगितल्याबद्दल तुमच्यावर खटला केला जाईल. मग तुम्हांला बरें वाटेल का ? "

हे शब्द ऐकतांच मावशीबाईनीं रडून गोंधळ केला. थोड्या वेळानें त्या ताळ्यावर आल्यानंतर मॅजिस्ट्रेट म्हणाले:—" वय किती या प्रश्नाचा अद्याप उलगडा झाला नाहींच. किती तुमचें वय ? तुम्ही किती ह्मणालां?"

उ०:—" हें सांगितलेंच पाहिजे काय ? "

प्र०:—" होय, सांगितलें पाहिजे. आणि हे पहा बाई, आतां तुम्हांला अखेरचें सांगतों. अशा रीतीनें कोर्टाचा वेळ व्यर्थ जाणें बरें नव्हे. तुम्हांला किती वर्षें झालीं ? "

उ:०—" मला छप्पन्न वर्षें झालीं साहेब. "

वरील शब्द बोलतांना मावशीबाईची फारच नाखुषी दिसली. तें पाहून कोर्टभर हंशा उडाला. नंतर वकीलांचे प्रश्न सुरू झाले.

प्र:०—" तुमच्या घरांत जी तरुण स्त्री भाड्यानें राहिली होती तिच्या संबंधानें तुम्हांला काय माहिती आहे ? "

उ०:—" मला कांहीं माहिती नाहीं साहेब. तिच्या गळ्यांत मंगळसूत्र होतें म्हणून मी म्हणतें तिचें लग्न झालें होतें. "

मावशीबाईची नेहमींची उत्तर देण्याची तऱ्हा म्हटली म्हणजे कांहीं तरी असंबद्ध मजकूर सांगावयाचा.

प्र०:–" ती कोठून आली, कां आली, तिचे आप्त कोण, किंवा तिला कोणी आप्तइष्ट आहेत कीं नाहींत, याची कांहीं माहिती ? "

उ०:—" ती माझ्या घरीं आली तेव्हां ह्मणाली:—' मला त्या अड्या-शेजारच्या बाईनें तुमच्याकडे पाठविलें आहे. माझे यजमान दूरदेशीं प्रवासांत आहेत ' एवढेंच. " इतकें बोलतात तों मावशीबाई धापा देऊं लागल्या.

प्र०:—" यजमान कोठें प्रवास करीत आहेत, किंवा ते कोणता धंदा करतात ही हकीकत तिनें सांगितली काय ? "

उ०:–" नाहीं साहेब. आई आई, मला घेरी येते. "

प्र०:—हें पहा, बाई, साक्ष संपेपर्यंत दम धरा, मग पाहिजे तितकी घेरी येऊं द्या. आपला येथें पुष्कळ दिवस राहण्याचा बेत आहे असें तिनें सांगितलें काय ? "

उ०:–" ती म्हणाली, या घरींच बाळंतपणास राहूं, पण अजूनी दोन महिने अवकाश आहे असेंहि तिनें सांगितलें. या गांवांत डाक्टर कोण कोण आहेत असें तिनें विचारलें. मीं त्यांचीं नांवें सांगितलीं. विश्राम डाक्टराचा व माझा घरोबा फार म्हणून मीं त्यांचेंच नांव सुचविलें. पण ती म्हणाली, मी आनंदराव डाक्टरांनाच बोलावणार. "

प्र०:–" आनंदरावांनाच पसंत करण्याचें कांहीं विशेष कारण तिनें सांगितलें काय ? "

उ०:–" ती म्हणाली, आपणास हकीगत कळली त्यावरून विश्राम डाक्टराबद्दल आपलें मत बरें नाहीं, मैत्रिणींनीं आनंदरावांची शिफारस केली आहे. परंतु मला तर असें वाटूं लागलें आहे कीं, आनंदरावांची शिग्राम गाडी आहे, त्या गाडीला पाहून ती भाळली असावी... "

प्र०:—" त्या गाडीला ती भाळली ? "

उ०:—" होय, साहेब; त्या गाडीलाच ती भाळली. ती मला म्हणाली ' विश्राम डाक्टरांची माहिती सांगा; ते कुणासारखे अ हेत, चालतात कसे,

बोलतात कसे वगैरे सर्व सांगा, " म्हणाली. नंतर आनंदरावांसंबंधाचीही माहिती तिनें विचारली. मीं तिला प्रत्येकाची माहिती दिली. पण माझा हेतु कुण्णाचें नुकसान करण्याचा नव्हता हो. मीं सांगितलें, विश्राम डाक्टर स्वभावानें चांगले मनमिळाऊ गृहस्थ आहेत. त्यांचा एक टांगा आहे तेवढ्यावर त्यांचें भागतें. मग मीं म्हटलें आनंदराव डाक्टरही स्वभावानें चांगले आहेत. पण त्यांचा जरा डौल आहे. त्यांनीं एक शिग्राम गाडी दिखील ठेवली आहे. मला वाटतें त्या शिग्राम गाडीचाच हा प्रताप. म्हणूनच तिनें आनंदरावांना पसंत केलें असावें. तिनें आनंदरावांना एक चिठी लिहून मजकडे दिली नि मीं ती त्यांच्या घरीं पोंचती करविली. ते घरीं नाहींत, मुंबईला गेले आहेत, असें समजल्याबरोबर ती रडूं लागली. काय करील बापडी ? "

प्र०:—" रडूं लागली ? तें कां बरें ? "

उ०:—" होय साहेब, खरोखरच रडूं लागली. मीं आनंरावांना येण्याबद्दल लिहिलें आहेनि आतां दुसरे डाक्टर आणले तर दोघां डाक्टरांची फी देण्याची मला निभावणी होणार नाहीं असें म्हणून ती रडूं लागली. पण मीं तिला सांगितलें आनंदराव नाहींत ह्मणून विश्राम डाक्टर येतील. दोघांपैकीं एकाला फी दिली म्हणजे झालें. तेव्हां तिला जरा बरें वाटलें. पुढें लवकरच नीटपणानें ती बाळंत झाली. मग ती विश्राम डाक्टरांना नांवाजूं लागली. पण तिच्याजवळ पैसे मात्र अगदीं नव्हते बरें. "

प्र०:—" तुम्हांला काय माहीत ? "

उ०:—" काय माहीत म्हणजे ? आम्हीं हुडकून पाहिलें पण आम्हांला कांहीं दिसले नाहींत. ह्या आपल्या पोलीस शिपायांनीं दिखील डोळ्यांत तेल घालून तपास केला. त्यांच्या तडाक्यांतून काय राहणार ? तिच्या पिशवींत काय ते दहा रुपयेच होते, जास्त नाहीं, असे ते म्हणतात. आतां पहा साहेब, एवढ्या पैशांतून ती आपला खर्च कसा भागविणार होती ? डाक्टराची फी कशांतून देणार होती ? सुइणीला काय मिळणार व मला काय देणार ? झालें. मैनाई तर माझ्याच घरीं जेवी—मी कांहीं तिच्या

जेवणाचे पैसे मागत नाहीं खरें-एवढे पैसे ती कुठून देणार होती तिचें तिलाच माहीत. ह्मणून म्हणतें साराच मेला चमत्कार. ”

प्र०:—“ बाई, तें नाहीं मी तुह्मांला विचारीत. विश्राम डाक्टरांनीं झोंपेचें औषध पाठवून दिलें त्यांत विष कसें गेलें हें तुह्मी सांगूं शकाल काय ? औषध तुमच्या घरांत येऊन पोंचल्यानंतर मग त्यांत विष घातलें असेल काय ? ”

हा प्रश्न ऐकतांच मावशीबाईची मोठी तरांवळ उडून गेली व त्या स्फुंदस्फुंदून रडूं लागल्या.

उ०:—“ म्हणजे ? मीं जाऊन त्या औषधांत विष घातलें असें का तुमचें म्हणणें ? देवा, देवा ! ”

प्र०:—“ विचारावयाचें ह्मणून मी विचारतों. असें करण्यासारखा कोणी मनुष्य त्या वेळीं तुमच्या घरीं होता काय ? निदान तुह्मांला कोणाचा संशय तरी येतो काय ? ”

उ०:—“ सरकार, मी नि मैनाई सुईण अशा दोघींनीं मिळून औषधांत विष घातलें असें जर म्हणणें असेल तर आमची चौकशी होईल तितकी लवकर करा. सोक्षमोक्ष काय तो होईल तरी. आम्ही त्या औषधाच्या बाटलीला शिवलोंसुद्धां नाहीं हो. त्या विश्राम डाक्तराच्या पोऱ्यानें जशी बाटली आणून दिली, तशीच्या तशी आम्हीं ठेवली नि तींतील औषध तिला दिलें. तिथें दुसरें तिसरें कुणी म्हणजे कुणी दिखील नव्हतें. पण त्या वेळीं आनंदराव मात्र आम्हांला बोलले कीं जिन्यांत कोणीं एक कल्लेवाला मनुष्य तुह्मीं आणून बसविला होता काय म्हणून ? ”

प्र०:—“ ही केव्हांची बरें हकीकत ? ”

उ०:—“ ज्या रात्रीं ती बाळंतीण मेली त्याच रात्रीची साहेब. औषध आलें त्या वेळीं आनंदराव डाक्तर माझ्या घरींच होते. ते जाण्याकरितां माडीवरून खालीं आले तेव्हां मी खालीं होतें. मला त्यांनीं विचारलें, ‘ आत्तां इतक्यांत वरून कोणी मनुष्य खालीं आला काय ? ’ मीं म्हटलें ‘ कुणी नाहीं. ’ तेव्हां ते म्हणाले:—‘ जिन्याच्या अगदीं वरच्या अंगाला एक कल्लेवाला मनुष्य उभा असलेला पाहिलासा वाटतो. ’

त्यावर मीं जरा रागावून म्हटलें: 'नाहीं, डाक्तरसाहेब, आमच्या घरांत असा मनुष्य आणून बसविण्याची कांहीं जरूर नाहीं आणि आणून बसविलाही पण नाहीं.' नंतर काय म्हणतात 'तर मग मला भासच झाला हें खास.' साहेब, आपण विचार करा, कीं माझ्यासारख्या घरंदाज व कुलशीलाच्या बायकांसंबंधानें त्यानें अशी भलतीच शंका घ्यावी काय ? मैनाई सुद्धां सांगेल कीं आम्हीं कोणालाही घरांत आणून बसविलें नाहीं, नि आम्हांला त्याची गरजही पण नाहीं. त्याच्याशिवाय आमचें कांहीं अडत नाहीं. आणि कल्लेवाला मनुष्य म्हणे ! आनंदराव डाक्तरनीं आमचे बरेच उपकार फेडले म्हणायचे !"

ही हकीकत मॅजिस्ट्रेटसाहेबांना बरीच महत्त्वाची वाटल्यामुळें त्यांनीं कागदावर कसलीशी खूण करून ठेविली. मावशीबाईचें रडणें सुरू होतेंच. त्यांचा राग थोडासा शांत झाल्यावर पुनः साक्ष सुरू झाली. ती देण्याचें प्रयोजन नाहीं, कारण त्यांतील बराच मजकूर वर येऊन गेला आहे. साक्ष संपल्यानंतर मावशीबाई बाहेर निघून गेल्या. मग मॅजिस्ट्रेटसाहेबांनीं आनंदराव डाक्टरांना पुनः पुकारण्यास हुकूम केला. पण ते कोर्टांतून निघून गेल्याचें त्यांना समजून आलें. त्यामुळें कोर्टाच्या कामाची थोडी खोटी झाली. आनंदरावांकडे मुद्दाम शिपाई पाठविण्यांत आला. तो त्यांच्या घरीं गेला त्या वेळीं आनंदराव एका रोग्याला औषध देत होते. मॅजिस्ट्रेटसाहेबांनीं आपणास बोलाविलें आहे असें शिपायानें सांगितलें. 'कशाकरितां ?' असें आनंदरावांनीं विचारिलें; पण 'मला माहीत नाहीं' असें शिपायानें उत्तर दिलें. कोर्टांत गेल्यावर मॅजिस्ट्रेट त्यांना म्हणाले:—"आनंदराव, चौकशी चालू असतांना कोर्टाच्या परवानगीशिवाय साक्षीदारानें निघून जाणें हें बरें नाहीं, ही गोष्ट तुम्हांला माहीत असेल असें मला वाटलें होतें. कांहीं कांहीं नवीन गोष्टी बाहेर येतात त्यामुळें पुनः तपासणी करण्याची जरूर लागते."

आनंदरावांनीं उत्तर केलें:—"माफी असावी साहेब, साक्ष संपली तरी घरीं जाण्याची मोकळीक नाहीं, अशी माझी कल्पना नव्हती. किंवा माझी पुनः जरूर लागेल असेंही मला वाटलें नाहीं."

मॅजिस्ट्रेटसाहेब नंतर म्हणाले:—" कायहो डॉक्टर! तुम्ही त्या खु— [ ' खुनाच्या ' असे शब्द त्यांच्या तोंडांतून बहुतेक बाहेर पडले होतेच, पण आवरण्याकरितां ते खाकरून म्हणाले ]—मृत्यूच्या रात्रीं जिन्यांत किंवा जिन्याच्या वरल्या अंगास एक मनुष्य छपून बसलेला तुम्हीं पाहिला म्हणतात. त्याची हकीकत काय आहे ? "

हा प्रश्न ऐकतांच आनंदरावांची मुद्रा पालटली व त्यांचा चेहरा गोरामोरा झाला. त्यांनीं लागलीच विचारिलें:—

" मीं पाहिला असें कोण म्हणतो ? "

प्र०:—" हा प्रश्न तुह्मीं विचारावयाचा नाहीं, तुम्हीं कोणास पाहिलें किंवा नाहीं एवढें सांगा म्हणजे झालें. "

उ०:—" नाहीं. मीं कोणासही पाहिलें नाहीं. "

प्र०:—नुकतीच साक्ष देऊन गेलेली मावशीबाई म्हणते कीं तुम्हीं पाहिलें किंवा पाहिल्याचा तुम्हांला भास झाला. "

आनंदराव म्हणाले:—" त्याची हकीकत अशी:—मी त्या बाळंतिणीजवळून उठून निघालों त्या वेळीं जिन्याच्या वरच्या भागावर चांदणें पडलें होतें. त्या प्रकाशांत भिंतीला टेंकून उभें राहिलेल्या एका मनुष्याचें तोंड पाहिल्यासारखें वाटलें हें खरें. " मॅजिस्ट्रेटनीं मध्येंच विचारिलें:—" पुरुष होता कीं बायको होती ? "

उ०—" पुरुष, खात्रीनें पुरुष. त्याला काळेभोर व जाड कल्ले होते. पण मला आतां वाटतें कीं तो नुसता भासच झाला. कल्पना म्हटली तरी चालेल. कारण लागलींच ती आकृति नाहींशी झाली. चंद्राच्या अस्पष्ट प्रकाशांत अशा प्रकारचा भास केव्हां केव्हां होत असतो हें आपणांसर्वांस माहीत आहेच. मीं दिवा घेऊन चोहोंकडे पाहिलें. पण मला तेथें कोणीही दिसलें नाहीं. पण मला वाटूं लागलें कीं माझा मीच फसलों, वस्तुतः तेथें कोणीच नसावें. खालीं आल्यावर मीं मावशीबाईनाही विचारलें कीं, घरांत कोणी परका मनुष्य आलेला आहे काय म्हणून. "

प्र०:—" मग ती काय म्हणाली ? ' नाहीं ' म्हणाली काय ? "

उ०:—" होय, शिवाय मीं असा प्रश्न केला म्हणून ती रागावली. "

मॅजिस्ट्रेटसाहेब विचारांत पडले व त्यांचें मनन सुरू झालें. त्यांना वाटलें, जर खरोखरच जिन्यावर कोणी मनुष्य छपून बसला असेल तर मात्र मोठा संशय उत्पन्न होण्याजोगी ही गोष्ट आहे, हिचा पुरता तपास लागला पाहिजे. तें औषध जवळच्या खोलींत होतें; खोलींतून जिन्यांत येण्याचें दार उघडेंच होतें. त्या ठिकाणीं दुसरें कोणीही नव्हतें बाळंतीण तर बाजेवर पडलेली, आपल्याच यातनेंत असणार; जवळच्या खोलींत काय प्रकार चालला आहे हें तिला समजणें शक्य नाहीं; त्या दुसऱ्या दोघी बाया तर खालींच होत्या; अशा स्थितींत विश्राम डॉक्टराकडून आलेल्या औषधाच्या बाटलीचें बूच काढून त्यांत कांहीं विषारी थेंब टाकणें अगदीं शक्य व संभवनीय आहे; जिन्यांत लपून बसलेल्या इसमानेंच हें कृत्य केलें असलें पाहिजे यांत बिलकूल शंका नाहीं. वगैरे विचारांत त्यांचें डोकें भ्रमण करूं लागलें. त्यांनीं एकदम विचारलें:—" बरें, काय हो डॉक्टर, मघांशी तुमची साक्ष झाली त्या वेळीं ही हकीकत तुम्हीं कां सांगितली नाहीं ? "

उ०:—" कां सांगितली नाहीं होय ? काय सांगावयाची ? त्या अंधारांत मला एक चेहरा दिसल्यासारखें वाटलें, पण तो केवळ भास झाला, निवळ कल्पनाच झाली, हेंच सांगावयाचें कीं नाहीं ? ज्या गोष्टी महत्त्वाच्या आहेत त्या मी मोठ्या आनंदानें सांगेन, व सांगितल्याही. पण ही हकीकत जर मीं सांगितली असती, तर माझी निव्वळ थट्टाच झाली असती. "

प्र०:—" तर मग तुम्ही या गोष्टीला कांहींच महत्व देत नाहीं ? "

उ०:—" बिलकूल नाहीं. माझी अगदीं खात्री झाली कीं मला नुसता भासच झाला. "

येथें आनंदराव डॉक्टरांची साक्ष संपली व त्यांना बाहेर जाण्यास निरोप झाला. व वक्त गुदरल्यामुळें इन्साफाचें काम दुसरे दिवसापर्यंत तहकूब ठेवण्यांत आलें. दुसरे दिवशीं प्रतापरावांचा मुलगा वसंत याला पुकारण्यांत आलें. प्रतापरावांनीं [ आरोपी इसमानें ] औषध तयार केलें त्या वेळीं त्यांचा मुलगा वसंत हा तेथें हजर होता, औषध तयार केलेलें

त्यानें पाहिलें, व त्याच औषधानें मयत स्त्रीला मरण आलें, सबब प्रत्यक्ष पाहणारा साक्षीदार वसंत होता म्हणून त्याची साक्ष घेण्यांत आली. त्यानें खरी होती ती हकीकत सांगितली. प्रतापराव त्या बाळंतिणीला पाहून आले, नंतर त्यांनीं झोंपेचें औषध तयार केलें, त्या वेळीं मुकुंद शेटजीही आले होते, औषध तयार होतांच तें आपण आपल्या पोऱ्याबरोबर मावशीबाईच्या घरीं पाठवून दिलें वगैरे हकीकत वसंतानें सांगितली. नंतर आरोपीतर्फे उलट तपासणी झाली. तींत वसंत म्हणाला कीं—त्या औषधांत ' प्रसिक ॲसिड ' विष बाबांनीं बिलकूल घातलें नाहीं. प्रसिक ॲसिडचा शिसा कपाटांत अगदीं उंचावर होता, व शिडीवर चढल्याशिवाय तो काढतांच येत नव्हता; आणि त्या दिवशीं तर शिडी दवाखान्यांत बिलकूल आणली नाहीं, इतकेंच नव्हे तर त्या शिशाला आतां दीड दोन महिन्यांत बाबांनीं हात सुद्धां लाविला नाहीं. त्यावर बोटभर धुरळा माजलेला तसाच होता. शिवाय बुचाभोंवतीं कोळयांनीं जाळीं विणलेलीं तशींच होतीं. पण दुर्दैवाची गोष्ट ही कीं बाळंतीण मेली त्याच्या दुसऱ्या दिवशीं सकाळीं त्या शिशावर फार घाण पडली म्हणून फडक्यानें झाडून पुसून मीं तो स्वच्छ केला. आणि या योगानें मीं बाबांना अनुकूल असा पुरावा नाहींसा केला. यांत किंचित् सुद्धां खोटा मजकूर नाही. मी सांगतों हें अगदीं अगदीं खरें. "

प्र०:—" त्या वेळीं तेथें आणखी कोणी हजर होतें काय ? "

उ०:—" होय साहेब, माझे काका विश्वासराव हजर होते. " नंतर विश्वासराव डॉक्टरांची साक्ष झाली.

प्र०:—" तुमच्या पुतण्यानें त्या शिशावरील धुरळा, कोळयाचीं जाळीं पुसून काढलीं, त्या वेळीं आपण हजर होतां काय ? "

उ०:—" मी तेथें होतों. माझे बंधु प्रतापराव ( आरोपी ) यांनीं शिडी लावून तो शिसा खालीं काढला त्यावर धुरळा व कोळयांचीं जाळीं बरींच जमा झालीं होतीं. त्या बुचावरून सुद्धां जाळीं पसरलीं होतीं. आतां महिन्या दोन महिन्यांत तरी तो शिसा कोणीही काढला नाहीं याजबद्दलचा तो अगदीं खात्रीलायक पुरावा होता. "

प्र०:—" ती स्त्री मेल्यानंतरची ही हकीगत, नव्हे काय ? "

उ०:—" होय, प्रेत पाहून आम्ही गेलों त्या वेळचीं. ' आपण या प्रसिक ॲसिडचा मुळींच उपयोग केला नाहीं याचा हा उत्तम पुरावा आहे कीं होईल ' असें कायसें प्रतापराव म्हणाले. मला त्यांचे शब्द पक्के आठवत नाहींत. नंतर ते व मी थोडा वेळ बोलण्यांत गुंतलों इतक्यांत वसंतानें एक फडकें घेऊन तो शिसा स्वच्छ पुसून काढला. आपण काय करतों इकडे त्याचें लक्ष्यच नव्हतें. मी नको म्हणून सांगणार इतक्यांत त्यानें शिसा पुसून काढलाच. ' अरे मुला, काय केलेंस हें ? तुझ्या बाबांना हें तुझें कृत्य भोंवणार ! ' असें मीं त्याला ओरडून म्हटलें. तेव्हां त्याला अत्यंत वाईट वाटलें. कृतकर्माचा त्याला पश्चात्ताप झाला. पण चूक होऊन गेली. ती दुरुस्त करणें अशक्य होतें. "

प्र०:—" ह्याशिवाय दुसऱ्या कशांत आणखी प्रासिक ॲसिड होतें काय ? "

उ०:—" मुळींच नव्हतें. "

येथें विश्वासरावांची साक्ष संपली. त्यांच्या साक्षींत दिसून आलेला साधेपणा, निष्कपटपणा, प्रतापरावांबद्दल त्यांना वाटत असलेलें दुःख व उत्पन्न झालेली काळजी, त्यांचें एकंदर अदबशीर व साकीचें वर्तन इत्यादि गोष्टींचा विचार करितां खरा गुन्हेगार आरोपीत ( प्रतापराव ) हा नसून कोणी तरी दुसराच इसम आहे असें मॅजिस्ट्रेटांना वाटूं लागलें—नव्हे, त्यांची खात्री होऊं लागली. आनंदराव कांहींहि म्हणोत; त्यांना भास झाला नाहीं, तेथें कोणी तरी लपून बसला होता हेंच खरें, तो कोणी तरी त्या हतभागी स्त्रीचा दुष्ट शत्रु असला पाहिजे, तिचा प्राण घेण्याकरितां तो तिच्या पाठोपाठ या गांवांत आला असावा, व संधि साधून तो त्या घरांत शिरला असावा, आणि तेथें छपून बसून आपलें नीच कर्म आटपून तो पुनः चोरून घराच्या बाहेर पडला असावा, असें त्यांना वाटूं लागलें; इतक्यांत त्यांना आठवण झाली कीं मावशीबाईच्या घरीं औषध आलें तेव्हांच त्याला विषाचा वास येत होता असें आनंदरावांनीं सांगितलें आहे. तेव्हां त्या चोरानें औषधांत विष घातलें हें कसें संभवतें ? एकंदरींत हें

मोठें गूढ आहे, तथापि प्रतापरावांच्या हातून असें कृत्य होणें असंभवनीय आहे असें त्यांना वाटूं लागलें. अशा विचारांत मॅजिस्ट्रेट साहेब गुंग झाले आहेत इतक्यांत बाहेरच्या बाजूस बराच गलबला ऐकूं येऊं लागला म्हणून सर्वजण तिकडे डोकावून पाहूं लागले.

---

# प्रकरण १३ वें.

—:o:—

## अपुरें पत्र.



कासला बरें हा गलबला ? कोर्टांतील सर्व लोक उठून उभे राहिले. कोणी खिडक्यांतून पाहूं लागले, कोणी दरवाज्यांतून बाहेर येऊन रस्त्यावर उभे राहिले, आणि कोणी जिकडून दंगा ऐकूं येत होता तिकडे पळाले. गलबला अगदीं जवळ जवळ ऐकूं येऊं लागला व रस्त्यांत माणसांची एकच गर्दी झाली. जो तो आपआपल्यापरी तर्क करूं लागला. कोणीं अशी कल्पना काढली कीं, विश्राम डॉक्टरांच्या घरांतून ज्या पोऱ्यानें त्या रात्रीं औषध आणलें, त्या पोऱ्यानें; आपणास औषधांत विष मिसळण्याकरितां कोणीं लांच दिली व आपणास एके बाजूस नेऊन त्या औषधांत विषाचे थेंब घातले ही गोष्ट कबूल केली असावी, म्हणून पोलीसलोक त्या पोऱ्याला पकडून आणीत आहेत. कोणी म्हणूं लागले कीं जिन्यावर जो चोरटा मनुष्य आनंदरावांना दिसला तो पोलिसांना सांपडला असून त्याच्या मुसक्या आवळून त्याला ते कोर्टाकडे घेऊन येत आहेत. कोणी असेंही बोलूं लागले कीं मयत स्त्री कोण, ती कोठली राहणारी. तिचें आडनांव काय,

वगैरे गोष्टींची माहिती समजण्याजोगा पुरावा मिळाला आहे. सारांश जो तो कल्पनातरंगांत पोहूं लागला. इकडे रस्त्यांतील गर्दी अगदीं कोर्टा-जवळ येऊन लोकही कोर्टांत शिरले. एका पोलीस शिपायानें एक बंद केलेला लखोटा मॅजिस्ट्रेट साहेबांच्या टेबलावर आणून ठेविला. तो त्यांनीं फोडून आंतून एक अपुरें पत्र बाहेर काढलें; फौजदाराकडून रिपोर्टासोबत तें पत्र आलेलें होतें. ' ती मयत स्त्री शुक्रवारीं दत्तापूरगांवीं दाखल झाली, त्या दिवशीं तिनें अंगांत जे पोलकें घातलें होतें त्या पोलक्याच्या खिशांत एक कागदाचा तुकडा असून त्यावर कांहीं ओळी लिहिलेल्या आहेत, व पुढें एक मोठा शाईचा ठिपका पडला आहे. हें पोलकें तिच्या खोलींत दाराच्या मागें एका खिळ्याला अडकवून ठेवलेलें असून तिकडे आतांपर्यंत कोणाचें लक्ष्य गेलें नव्हतें. हल्लीं बारकाईनें तपास करितां सदरहू पत्र मिळालें आहे. चौकशीच्या कामीं कांहीं उपयोग होईल असें समजून पाठवून दिलें आहे.' वगैरे हकीकत फौजदारांनीं रिपोर्टांत लिहून सोबत तें पत्र जोडलें होते. मॅजिस्ट्रेट-साहेबांनीं तें पत्र घेऊन सरकारतर्फेच्या वकीलास दाखविलें. त्या पत्रांतील मजकूर येणेंप्रमाणें होताः —

' श्री. मुक्काम दत्तापूर, बाजारपेठ घरनं. १३
तारीख १० मार्च सन १८९...इ.
रोज शुक्रवार.

माझे प्रियकर प्राणनाथांचे सेवेशीं विज्ञापना विशेष.

मी या गांवांत आतां अशीच सुखरूप येऊन पोंचलें. आपणास थोडें आश्चर्यही वाटेल व रागही येईल हें मी जाणून आहें, पण माझा नाइलाज झाला. उभयतांची गांठ पडली म्हणजे सर्व खुलासा होईल. येथें आल्या-बरोबर मीं डॉक्टरांचा तपास केला. विश्रामबंधूंची लोकांनीं बरीच शिफारस केली पण मीं म्हटलें आनंदराव डॉक्टरांचेंच औषध घेणार. आपलें मत काय आहे तें समजावें. त्यांनीं आज संध्याकाळींच येऊन माझी प्रकृति पहावी अशी चिठी त्यांना पाठविणें मला जरूर वाटत आहे. कारण बैलगाडीच्या हादऱ्यानें माझें आंग फारच ठणकत आहे व मला—'

ह्याप्रमाणें मध्येंच पत्र संपलें. यापुढें एक मोठा शाईचा ठिपका पडला होता. पत्र पुरें करण्यास अकस्मात् कांहीं दुसरें कारण झालें कीं हा ठिपका पडला म्हणून दुसरें पत्र लिहिलें हें सांगतां येत नाहीं. व पुढेंही समजण्याचा कांहीं संभव नाहीं.

पत्र वाचून झाल्यावर मॅजिस्ट्रेटनीं आनंदरावांना पुकारण्याबद्दल हुकूम केला. पूर्वीं साक्ष दिल्यानंतर आनंदराव कोर्टांतून निघून घरीं गेले म्हणून त्यांना मॅजिस्ट्रेट साहेबांनीं थोडी तंबी दिली होती; तेव्हां आतां कोर्ट उठेपर्यंत येथून जाऊं नये हें बरें, असा विचार करून आनंदराव तेथेंच आसपास वेळ घालवीत होते. शिपायानें येऊन त्यांना कळविलें कीं मॅजिस्ट्रेटसाहेब आपणांला बोलावतात, कांहीं नवीन हकीकत बाहेर आली आहे. त्याबरोबर आनंदरावांना फार आश्चर्य वाटलें. ‘ कसली बरें नवीन हकीकत ? त्या जिन्यांत दिसलेल्या मनुष्यासंबंधानें तर नसेल ?’ असें कायसें आपल्याशींच पुटपुटत ते चालले. त्यांच्या चेहऱ्यावर विलक्षण प्रकारची भीति दिसत होती. ते कोर्टांत येऊन उभे राहिल्यानंतर मॅजिस्ट्रेटनीं त्यांना तें पत्र दाखवून म्हटलें:—

“ डॉक्टर, हें पत्र पहा. मयत स्त्रीच्या हातचें हें अक्षर आहे कीं नाहीं तुम्हांला सांगतां येईल ? ”

आनंदराव तें पत्र घेऊन लांब एका खिडकीजवळ गेले आणि कोर्टाकडे पाठ करून पत्र वाचूं लागले. त्यांनीं तें पत्र दोनदां वाचलें, उलटून दुसरी बाजू पाहिली, पुनः आणखी तें पत्र वाचलें. मॅजिस्ट्रेट हें सर्व पहात होतेच. पत्र वाचून झाल्यानंतर आनंदराव स्वस्थानीं येऊन कोर्टास म्हणाले:—“ हें तिचेंच अक्षर कीं नाहीं मला सांगतां येणार नाहीं.”

प्र०:—“ कां बरें ? तुम्हांला तिच्याकडून एक चिठी आली होती ना ? ह्या पत्रांतील अक्षर त्या चिठींतील अक्षरासारखें आहे कीं कसें हें आठवण करून सांगतां येण्यासारखें नाहीं काय ? ”

आनंदराव क्षणभर स्तब्ध राहून म्हणाले:—“ मी त्या अक्षराकडे विशेषसें लक्ष पुरविलें नाहीं. दोन्ही अक्षरें जर येथें हजर असतीं तर ताडून पाहतां आलें असतें. मी मघाशीं घरीं गेलों तेव्हां ती चिठी शोधून

पाहिली, चोहोंकडे हुडकलें पण मला ती सांपडली नाहीं. ती चिठी मी जाळून टाकली यांत कांहीं शंका नाहीं."

अगदीं खरेंच. साक्ष झाल्यानंतर ते घरीं गेले तेव्हां त्यांनीं त्या पत्राचा तपास केला होता. टेबलाचे ड्रॉअर ओढून पाहिले, कपाटाचे खण व ओढखण काढून ते नीट तपासले, फळीवर कागदपत्र होते तेही चाळले. माडीवर निजावयाच्या खोलींत जाऊन त्या रात्रीं त्यांनीं जे कपडे घातले होते त्या सर्वांचे एकंदर खिसे त्यांनीं तपासले. सुचेल ती जागा त्यांनीं शोधून पाहिली. पण ती चिठी त्यांना सांपडली नाहीं. तेव्हां आपण मुंबईहून आलों त्या रात्रीं कांहीं पत्रें व पाकिटें जाळून टाकलीं त्याबरोबर ती चिठीही जाळून टाकिली अशी त्यांची समजूत झालेली होती व आतां तर त्यांची खात्रीच झाली.

प्र०:—"तर मग हें अक्षर कोणाचें यसंबंधानें तुम्हांला कांहींच सांगतां येत नाहीं?"

उ०:——"खात्रीपूर्वक असें कांहीं सांगतां येत नाहीं. एवढें मात्र मी सांगूं शकतों कीं, हें अक्षर त्या चिठींतील अक्षराहून भिन्न दिसत नाहीं, पण ही कसली तुटपुंजी आठवण? सर्व स्त्रियांचें अक्षर बहुतेक सारखेंच दिसतें."

प्र०:——"पण या पत्रासारखें सुरेख व वळणदार अक्षर फारच थोड्या स्त्रियांना लिहितां येतें. तें असो. पण कायहो डॉक्टर, तुह्मी तें पत्र घेऊन खिडकीजवळ कां गेलां? तुमची दृष्टि अधु आहे काय?"

आनंदरावांना थोडा राग आला. ते म्हणाले:——"माझी दृष्टि अधु नाहीं; पण ढग आले असल्यामुळें प्रकाश थोडा कमी झाला आहे, शिवाय संध्याकाळ होऊं लागली आहे. आणखी मला असें वाटलें कीं इतकी ज्या अर्थीं चळवळ उडालेली आहे त्या अर्थीं तें पत्र फार महत्वाचें असेल, व त्यायोगें या एकंदर प्रकरणावर कांहीं प्रकाश पडेल ह्मणून जरा लक्ष्यपूर्वक पाहण्याकरितां मी तिकडे उजेडांत गेलों होतों."

मॅजिस्ट्रेट म्हणाले:——"खरेंच, आह्मांला सुद्धां असेंच वाटलें होतें. पण आमची निराशा झाली."

आतां जास्त कांहीं होण्याचें राहिलें नाहीं. प्रॉसिक्यूशन तर्फेचा ( फिर्यादी तर्फेचा ) सर्व पुरावा संपला. तें अपुरें पत्र मॅजिस्ट्रेटनीं कज्जांत दाखल केलें. नंतर आरोपीच्या जबाबास सुरवात झाली. प्रॉसिक्यूशन तर्फे पुराव्यांत त्यांच्या विरुद्ध जो जो मजकूर आला होता, त्याचा खुलासा प्रतापरावांनीं पूर्णपणें केला. विश्वासराव डॉक्टर व वसंत यांनीं जशी हकीकत सांगितली तीच प्रतापरावांनीं सांगितली. जबाब देतेवेळीं प्रतापरावांची चर्या, त्यांचा गंभीरपणा, सरळपणा, साधेपणा, दृढनिश्चय, ईश्वरावर त्यांचा दिसून येत असलेला भरंवसा, यावरून त्यांच्याकडून किमपिही दोष घडून आला नाहीं असें एकंदर लोकांस समजून आलें. त्यांच्या सांगण्यामध्यें गैरमेळ अगर चलबिचल यत्किंचित्ही दिसून आली नाहीं. अर्थात् त्यांनीं जो मजकूर सांगितला तोच खरा असला पाहिजे अशी प्रत्येकाची पूर्णपणें खात्री झाली. आरोपीवर चार्ज ठेवावा कीं नाहीं याजबद्दलची वाटाघाट उभयपक्षांच्या वकिलांनीं केली. सरकारतर्फे वकिलांनीं आपलें काम चोख रीतीनें बजाविलें. पुरावा जरी तितका सबळ नाहीं तरी आरोपीवर गुन्ह्याचा चार्ज ठेवण्यास हरकत नाहीं, गुन्हा खुनाचा—अतएव—महत्वाचा आहे, पुढें सेशनकोर्टांत योग्य न्याय होईल वगैरे वगैरे बऱ्याच तक्रारी त्यांनीं कोर्टास कळविल्या. नंतर आरोपीतर्फे वकिलांनीं आपल्या भाषणास सुरवात केली. प्रॉसिक्यूशन तर्फेच्या पुराव्यांतील गौणपणा, विशेषेंकरून विश्वासराव व वसंत यांच्या साक्षींतील आरोपीस अनुकूल असा मजकूर, आनंदरावांना जिन्यांत दिसलेला तो चोरटा मनुष्य, प्रतापरावांचें आजपर्यंतचें इमानीपणाचें व बाकीचें वर्तन वगैरे गोष्टी त्यांनीं विशेष मुद्देसूद रीतीनें कोर्टापुढें मांडल्या. चार्ज ठेवण्यास यत्किंचित्ही दर्शनी पुरावा नसून आरोपीस आतांपर्यंत विनाकारण त्रास सोसावा लागला, यापुढें तरी अशा सत्वस्थ, निरपराधी व निरुद्रपवी गृहस्थास त्रास भोगावा लागूं नये, सबब आरोपीवर चार्ज न ठेवितां त्यास सोडून देण्यांत यावें अशी त्यांनीं कोर्टास शेवटची विनंति केली. कागदपत्र पाहून काय तो हुकूम होईल असें सांगून मॅजिस्ट्रेटसाहेब आपल्या चेंबर ( खोली ) मध्यें गेले.

वास्तविक म्हटलें तर मयत स्त्रीची सारजेनें पुष्कळ शुश्रुषा केलेली असल्यानें तिची साक्ष व्हावयास पाहिजे होती. परंतु कलावती मेली त्यावेळीं सारजा तेथें नव्हती. कलावतीनें झोंपेचें औषध घेतलें तेव्हांही ती हजर नव्हती म्हणून पोलिसांच्या दृष्टीनें सारजेच्या साक्षीची आवश्यकता भासली नाहीं. तथापि मयत स्त्रीच्या ठिकाणीं तिचें बसलेलें प्रेम, तिच्याबद्दल तिला वाटत असलेली कळकळ व त्या एकंदर प्रकाराबद्दल तिला उत्पन्न झालेला अचंबा, यामुळें कोर्टांत चाललेल्या चौकशींत तरी कांहीं खरी हकीकत उघडकीस येते कीं कसें इकडे सारजेचें सर्व लक्ष्य लागलेलें होतें, परंतु कलावतीच्या अकास्मिक मृत्यूबद्दल तिला कांहींच उलगडा होईना. त्या वेळच्या परिस्थितीची तिला अटकळही करितां येईना.

संध्याकाळीं त्या अड्डथाजवळच्या बाईची व सारजेची गांठ पडली. बोलतां बोलतां खटल्यासंबंधाची गोष्ट निघाली. सारजा म्हणाली:—

" मला नाहीं वाटत प्रतापरावावर गुन्हा शाबीत होईल असें. "

बाई म्हणाली:—" कोळ्याच्या जाळ्याची हकीगत ऐकली त्यावरून मला दिखील तसेंच वाटतें; त्या औषधांत विष कसें जावें याचाच मला चमत्कार वाटतो. बरें, काय ग सारजे, त्या जिन्यांतल्या मनुष्याची काय हकीगत आहे ती ? "

" मला नाहीं बाई कांहीं माहीत. पण आनंदराव आतां म्हणतात कीं आपणांला नुसता भास झाला "

" पण एवढें खरें कीं लोकांत त्यासंबंधानें भलते भलते उद्गार निघत आहेत व तर्क चालले आहेत. ती मेलेली बाई माझी जर कोणी असती तर मीं त्याचा पुरता तपास लावल्याशिवाय कध्धीं कध्धीं राहिलें नसतें. बरें पण सारजाबाई, तूं अशी वाळलेली कां दिसतेस ? तुझ्या अंगांत नीट नाहीं कीं काय ? "

" होय, बाई, कां कोण जाणें, कलावतीबाईच्या मरणामुळें माझ्या मनाला मोठा धक्का बसला आहे व मला मोठें गूढ पडलें आहे. इतके दिवस माझी दाढ दुखत होती म्हणून—आतां जरा बरी आहे—आणि

ह्या सर्व घोंटाळा झाला म्हणून कित्येक दिवसांत मी अन्नाला कशी ती शिवलें सुद्धां नाहीं. "

" सारजे, तूं वेडी तर नाहींस ? अशानें जास्तच अशक्त होशील. झाली ही गोष्ट मोठी वाईट झाली खरी, पण त्याबद्दल इतकें कशाला वाईट वाटून घ्यावयाला हवें ? त्या बाईची आमची ओळख ना देख. किती केलें तरी ती अगदीं परकी. मेली तर मेली. ती गेली म्हणून आपण जेवण कां सोडावयाचें ? "

सारजेनें हलकेंच तो विषयच बदलून टाकिला. ती म्हणाली:—" बाई, मी आतां नोकरी मिळविण्याविषयीं फारच उतावीळ झालें आहें. कांहीं काम नसलें तर नेहमीं ह्या गोष्टीचेंच ध्यान मला राहील. एखादी नौकरी असल्याचें तुमच्या नाहीं कां आढळांत ? "

" आजच मीं ऐकलें आहे. त्या रावपुऱ्यांत नवीन कोणी सरदार येऊन राहिले आहेत ना ? त्यांच्या इथें नौकरीची जरूर आहे. त्यांच्या घरची बाई निघून जात आहे म्हणे."

सारजेनें विचारिलें:—" ते कोण लोक बरें ? "

" ते कोठून लांबून नुकतेच आले आहेत. त्यांचें नांव कायसेंसें आहे बाई. काय बरें ? सर्जेराव. होय तेंच. फुलबन बंगला आहे तो ? त्या बंगल्यांत ते राहात असतात. ती नौकरी मिळाल्यास तुला बरी आहे. "

" ती नौकरी मला बरी आहे, खरीच. ते लोक दिखील बरे दिसतात. जाऊन शोध तरी करतें. " असें म्हणून सारजा निघून गेली.

दुसरे दिवशीं, म्हणजे शनिवारीं कोर्ट अगदीं गच्च भरून गेलें. कागदपत्र वाचून मॅजिस्ट्रेटनीं निकाल सांगितला. प्रॉसिक्यूशन तर्फे आलेल्या पुराव्याचें योग्य विवेचन करून शेवटीं मॅजिस्ट्रेटसाहेब म्हणालेः—

" ह्या एकंदर साधक-बाधक गोष्टींचा विचार करितां मयत स्त्रीनें जें झोंपेचें औषध घेतलें व ज्यामुळें तिला मरण आलें, त्या औषधांत ' प्रसिक ॲसिड ' विष आरोपीनेंच घातलें असें शाबीद मानण्यास पुरेसा दर्शनी पुरावा नाहीं, सबब चार्ज न करितां आरोपीस सोडून देण्यांत यावें असा हुकूम मी करितों. "

याप्रमाणें प्रतापरावांवर आलेलें संकट नाहींसें झालें. त्यांच्या नातलगांनीं, इष्ट मित्रांनीं, घरच्या मंडळींनीं त्यांचें प्रेमानें अभिनंदन केलें. वसंताचा आनंद तर त्रिभुवनांत माईना. तो देवघरांत गेला व कुळस्वामिनी श्रीजगदंबेच्या चरणीं मस्तक ठेवून अनन्यभावानें त्यानें त्या देवीचे शतशः आभार मानिले.

---

# प्रकरण १४ वें.

—::—

## सरदार सर्जेराव.



ध्याकाळची वेळ. सूर्याचे तिरपे किरण रावपुऱ्यांतील त्या टुमदार व शुभ्र बंगल्यावर पडल्याकारणानें फारच शोभा दिसत होती. मंद व शतिल वायूच्या लहरींमुळें जाई, जुई, मोगरा, मोतिया, मदनबाण वगैरे पुष्पांचा परिमळ त्या बंगल्याच्या आवारांत अगदीं भरून गेला होता. हाच आमच्या सर्जेराव जहागीरदारांचा बंगला. 'फुलबन' हें नांव याच रम्य व मनोहर बंगल्यास दिलेलें होतें. खरें म्हटलें तर सर्जेराव तूर्त तरी आडनांवाचेच जहागीरदार होते. कारण मुख्य जहागिरीचे मालक दुसरेच असून पोट भाऊबंद या नात्यानें सर्जेरावांना त्या जहागिरीच्या उत्पन्नांतून थोडीशी नेमणूक मिळत असे. व ह्याच कारणाकरितां सर्जेरावांनीं लष्करांत नोकरी धरली होती; पुढें कांहीं वर्षांनीं त्यांचें कुटुंब परलोकवासी झालें. नंतर लौकरच त्यांच्या अंगांत संधिवाताचा विकार जडला. तेव्हां प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें व प्रपंचास त्रासून त्यांनीं निमपगारी रजा घेतली होती व ते आतां तीन चार महिने ह्या गांवांत येऊन राहिले होते.

सर्जेरावांच्या तीन मुली हल्लीं त्यांच्याजवळ होत्या. वडील मुलगी इंदिरा. हिचें लग्न होऊन ती चांगल्या स्थळीं पडली होती. परंतु तिच्या व सर्जेरावांच्या कमनशीबानें तिचे यजमान चंगीभंगी निघून सर्व इस्टेटीची त्यांनीं वाताहत केली व अखेर आपणही एका गोसावड्याच्या नादीं लागून परागंदा झाले. तेव्हांपासून इंदिरा आपल्या माहेरींच येऊन राहिली, आणि आपलें आयुष्य वडिलांच्या सेवेंत घालवूं लागली. इंदिरा फार सुशील व शांत स्वभावाची असून अत्यंत शहाणी होती. सर्जेरावांवर तिचें अतोनात पितृप्रेम असून त्यांच्या जिवास कोणत्याही रीतीनें त्रास होऊं नये याकरितां ती फार झटत असे. मातुश्रीच्या मागें तिनें सर्जेरावांचा प्रपंच शक्य तितक्या उत्तम रीतीनें चालविला होता. घरांत आतां वडील बायकोमाणूस कायती इंदिराच राहिली. इतक्या लहान वयांत घरचा सर्व प्रपंचाचा भार अंगावर पडल्यामुळें इंदिरा एकसारखी झुरत चालली होती.

दुसरी मुलगी मोहना. हिचें वय सोळा सत्रा वर्षांचें असून तिचें अद्याप लग्न व्हावयाचें होतें; तिचें रूप फारच सुंदर असून एकंदर चेहरा मोठा मोहक असा होता. उंची मध्यम, बांधा सुटसुटीत, तशांत बोलण्याचालण्याची ढब मोठी ऐटबाज, यामुळें तिचें 'मोहना' हें नांव अगदीं अन्वर्थक होतें असें म्हणण्यास हरकत नाहीं. परंतु ती फार डामडौली व अभिमानी होती. सर्व तरुण मुली स्वभावतःच अशा वृथाभिमानी असतात म्हणा— सुंदर मुली विशेषेंकरून असतातच—पण मोहनेचा मानी स्वभाव तिच्या अंगचा एक दोषच होऊन बसला होता; इतका प्रकार इतर मुलींत दिसून येत नाहीं. अलीकडे अलीकडे तर तिला दुसऱ्याच एका मनोविकारानें पछाडलें होतें व त्यामुळें तिचा स्वभाव पार बदलून गेला होता. हा मनोविकार म्हणजे आनंदराव डॉक्टरावर जडलेलें तिचें प्रेम होय. सर्जेरावांच्या घरीं आनंदरावांची दररोज संध्याकाळीं एखादी खेप होत असेच व ती वेळ केव्हां येते इकडे मोहनेचें लक्ष चातकासारखें लागलेलें असे.

तिसरी मुलगी लीला, या वेळीं वयानें सात आठ वर्षांची होती. मोह-

नेप्रमाणें तीही रूपानें सुंदर होती, पण स्वभाव मात्र इंदिरेसारखा शांत व थंड असा होता.

याशिवाय सर्जेरावांचा एक पिढीजाद व विश्वासूक असा हैबती नांवाचा नोकर होता. तोही त्यांच्याजवळच असे. घरांत एक स्वयंपाकाची बाई, दोन मोलकरणी व आणखी एक दोन हरकामी नोकर होते. याप्रमाणें सरदारसाहेबांचें कुटुंब होतें. परंतु या कुटुंबाच्या निर्वाहाचीं साधनें मात्र अगदीं संपुष्टांत आलेलीं होतीं. सर्जेरावांना लष्करांतून निमा पगार मिळत असे; तो व जहागिरीच्या उत्पन्नांतून त्यांना जी थोडी तुटपुंजी रक्कम मिळत असे ती—एवढ्यानें इतक्या मोठ्या कुटुंबाचा निर्वाह कसा होणार ? अर्थातच त्यांना कर्ज फार झालें.

आज संध्याकाळच्या वेळीं इंदिरा रोजच्याप्रमाणें जमाखर्चाची वही घेऊन बसली होती. व जवळच दुकानांतून आणलेल्या सामानाचीं किंमतवार टिपणें पडलेलीं होतीं. हिशेबाच्या कामांत इंदिरा मोठी तरबेज होती असें नाहीं. तथापि आंकडेमोड तिला चांगली कारितां येत असे. पुढें पडलेल्या एकंदर टिपणांची बेरीज पाहतां रक्कम बरीच फुगली. आतां इतक्या मोठ्या रकमेची सोय कशी करावयाची ह्या विवंचनेंत इंदिरा गढून गेली होती; तिची चिंताक्रांत मुद्रा पाहून मोहना म्हणाली:—
" आक्का, ह्या हिशेबाच्या खर्ड्याबद्दल तूं आपल्या डोक्याला इतका त्रास कशाला करून घेतेस ? "

" ताई, कोणास तरी त्रास करून घेतलाच पाहिजे. मीं नाहीं करून घेतला तर बाबांना तरी करणें भाग आहे ना ? "

" पण तुझ्यापेक्षां बाबाच या गोष्टीची वासलात लावण्यास जास्त योग्य आहेत. शिवाय अशी आमची स्थिति होण्यास त्यांचाच अविचार कारण. आजपर्यंत त्यांनीं जर उधळपट्टी केली नसती, ते काटकसरीनें राहिले असते,......"

" अग गप्प बैस ताई. वडील माणसांसंबंधानें असें बोलणें बरें का ?" असें मध्येंच इंदिरा ह्मणाली.

मोहना थोडी दबल्यासारखी झाली. परंतु त्या तिघी मुलींमध्यें कुटुं-

बाच्या दरिद्रावस्थेमुळें हरघटकेला ज्या जिकीरी उत्पन्न होत त्यांबद्दल मोहनेच्या मनासच फार वाईट वाटत असे. ती ह्मणाली:—" आक्का, बाबांचा उपमर्द करण्याची माझी इच्छा नाहीं. तुझी जशी बाबांवर प्रीति आहे तशीच माझीही आहे. पण मी कांहीं दगड नाहीं कीं खांब नाहीं. आमच्याच बरोबरच्या मुली इथें आहेत. त्यांच्यामध्यें व आमच्यामध्यें किती फरक दिसतो तो मात्र माझ्यानें पाहवत नाहीं. आम्ही दिवस घालवितों ते दुःखांत, कष्टांत, हालअपेष्टेंत आणि त्यांचे अगदीं सुखांत, आनंदांत, ऐषआरामांत जातात. ह्मणून ह्मणतें."

इंदिरा शांतपणानें ह्मणाली:—"ताई, तूं इथेंच चुकतेस. घरोघर मातीच्याच चुली बरें का ? दुसऱ्यांचीं दुःखें आपणांला कशीं कळतील ? तुला जे लोक पूर्ण सुखांत व आनंदांत दिसतात त्यांना सुद्धां आमच्याप्रमाणेंच कांहीं अंतर्दुःखें असतात. ' जगीं सर्व सूखी असा कोण आहे ? ' ही साधूची उक्ति तुला माहीत नाहीं काय ? "

" पण आक्का, तूं अशी रागावूं नकोस. मी म्हणतें, आमच्याखेरीज आम्ही दिवस काढतों त्यासारखे कोणी तरी काढीत असतील काय ? नेहमीं आपलें घरांत कोंडून ठेवल्यासारखें—जणूं काय घर ह्मणजे तपश्चर्येचा मठच ! कोणाकडे जावयाचें नाहीं कीं कोणाला घरीं येऊं द्यावयाचें नाहीं. त्यांतून ह्या आमच्या जहागीरदारीनें तर आमची पाठच पुरविली. नांव मोठें नि लक्षण खोटें. नांव सोनुबाई नि पायीं कथलाचा वाळा. ज्यांच्या जवळ उदंड संपत्ति आहे, भरपूर नोकरचाकर आहेत, बागबगीचे आहेत, गाड्याघोडीं आहेत, त्यांना हें सर्व चालेल. घटकाभर हवा खायला जाईन ह्मटलें तर त्यांना सर्व गोष्टींची अनुकूलता असते. पण हे श्रीमंतीचे चोचले आह्मांला काय उपयोगी ? आक्का, तूंच पहा, अशा स्थितींत राहण्यापेक्षां..."

इतक्यांत माडीवरून एक मोठा आवाज ऐकूं आला. कोणी तरी हातांतील सोटा जमिनीवर जोरानें आपटीत आहे असें वाटूं लागलें. त्याबरोबर इंदिरा ह्मणाली:—" हें पाहिलेंस ? तूं मोठ्यानें बोलत होतीस त्याचा हा परिणाम."

इतक्यांत आणखी काठीचा आवाज ऐकूं आला व त्याबरोबरच 'मोहने, अग मोहने, ' अशी जोराची हांक ऐकूं आली. इंदिरा ह्मणालीः— ' ताई, जा, जा लवकर. तुलाच हांक मारली. पळ. '

मोहना गडबडीनें निघून गेली. जातां जातां तिनें आपल्या नाकांतील नथ काढून इंदिरेजवळ दिली. ती गेल्यावर इंदिरा थोडा वेळ विचार करीत राहिली. कांहीं गोष्टींनीं तिचें मन गोंधळल्यासारखें झालें. नथ हातांत घेऊन ती एकसारखी त्या नथीकडे पहात राहिली. तिच्या आईची ती नथ. जुन्या काळचा दागिना, पूर्वींच्या श्रीमंतीचा अवशेष काय तो इतकाच राहिला होता. मोहना ही नथ पूर्वीं कधीं घालीत नसे, पण अलीकडे अलीकडे मात्र रोज संध्याकाळीं ती घालूं लागली होती. " बाबांनीं हाक मारल्याबरोबर तिनें ही नथ काढून ठेवली. बाबांना आवडणार नाहीं ह्मणून तिनें काढून ठेवली हें खास. पण त्यांना जर आवडत नाहीं तर ही ती नथ घालते तरी कशाला ? शिवाय अलीकडे तर ही रोज संध्याकाळीं घालूं लागली आहे, याचें कारण काय ? " वगैरे वगैरे विचार मनांत येऊन इंदिरेचें मन अगदीं अस्वस्थ झालें. ही छानदार नथ यावेळीं नाकांत घालण्यांत मोहनेचा कांहीं विशिष्ट हेतु होता. परंतु इंदिरेच्या सरळ स्वभावाला त्याचा नुसता संशय सुद्धां आला नाहीं.

वडिलांनीं हाक मारली ह्मणून मोहना गडबडीनें माडीवर गेली. सर्जेरावांची स्वारी माडीवरील दिवाणखान्यांत एका आरामखुर्चीवर पडलेली होती. पाय पुढें लांब सोडलेले असून एका उंचशा स्टुलावर ठेवलेले होते. गुडघ्यांत व घोट्यांत कळा असल्यामुळें त्यांस फ्लॅनेलचे फडकें बांधलेलें होतें. पायामुळें सरदारसाहेब अगदीं बेजार झाले होते. पण हात मात्र त्यांच्या अगदीं उलट. हातानें काठीचा एकसारखा जमिनीवर आवाज निघत होता. जीभ तर वलवला करीत होतीच. मोहनेला पाहून ते ह्मणालेः—" तूंच का खालीं बोलत होतीस ती ? वेडी [illegible]ली ? "

मोहना कांहींच बोलली नाहीं. नंतर सर्जेरावांनीं एकदम विचारलेंः— " त्या खटल्याचा निकाल झाला काय ? "

" बाबा, मला त्याविषयीं कांहीं माहिती नाहीं. "

" अद्याप आनंदराव आले नाहींत ? "

" नाहीं " मोहनेनें उत्तर दिलें. आनंदरावांचें नांव निघतांच मोहनेच्या मुखावर मंद स्मित चमकूं लागलें. पण वडिलांस दिसूं नये म्हणून त्यांच्या पायाखालच्या गिर्द्या चांगल्या नीट ठेवण्याचें मिष करून ती खालीं वांकली; पण असें करितांना त्यांचा पाय जेथें दुखत होता, तेथेंच तिच्या हाताचा धक्का लागला. त्याबरोबर सरदारसाहेब ' ओय ओय ' म्हणून मोठ्यानें ओरडले. त्यांनीं आपला सोटा जमिनीवर दाणदिशीं आपटला व नेहमींप्रमाणें मोहनेवर वाईट शब्दांची लाखोली वाहिली. मोहनेस फार वाईट वाटून ती म्हणालीः—

" बाबा, माझा हात चुकून लागला. "

" मोहने, तुझा कधीं असा पाय दुखतो कायग ? "

" नाहीं बाबा. "

" तर मग ज्यांचा पाय दुखत असतो त्यांच्याजवळ असतांना जरा जास्त काळजीनें वागत जा, व असा हात चुकून लागूं देऊं नकोस. चुकून लागला म्हणे. तुझें ठीकच आहे; पण दुखणाऱ्याचें दुखतें. आज इंदिरा खालीं काय करीत आहे ती ? आनंदरावही अजून आले नाहींत याचें कारण काय ? त्यांना आतां काम जास्त झालें आहे वाटतें. होऊं दे म्हणावें. आज सबंध दिवसांत ते इकडे आले नाहींत. त्यांना निरोप देऊन विश्राम डॉक्टरांना बोलवावें असें पुष्कळदां माझ्या मनांत येतें. आम्हीं इथें आलों तेव्हांच असें केलें असतें तर बरें झालें असतें. विश्राम डॉक्टर फार अगत्यवान् आहेत. मोहने, आनंदरावांना निरोप पाठीव कीं तुम्ही आजपासून आमच्या दारांत पाय ठेवूं नका म्हणून. "

वडिलांचे हे शब्द ऐकतांच मोहनेच्या पोटांत धडकी भरली. कदाचित् बोलल्याप्रमाणें बाबा करतील असें तिला वाटलें. ती धीर करून म्हणाली, " पण बाबा, त्यांचे मागचे पैसे दिल्याशिवाय त्यांना नको म्हणून कसें सांगतां येईल ? " तिला वाटलें या सूचनेचा कांहीं तरी परिणाम होईल. पण सरदारसाहेब तिकडे लक्ष्य न देतां म्हणाले, " हैबती परत आला काय ? "

" नाहीं आला, बाबा; आजूनी येण्याची वेळ झाली नाहीं. "

सरदारसाहेब गुरगुरलेः—" वेळ झाली नाहीं ? कशी नाहीं झाली ? झाली, मी म्हणतों झाली. तो त्या खटल्याची चौकशी चालली होती तिकडे गेला असेल, आणि कोर्टाच्या आसपास कोठें तरी भटकत असेल झालें. एक गेला, दुसरा गेला, सगळेच बेटे मूर्ख, बेअक्कल ! येऊं दे आतां परत, म्हणजे या सोट्याचा एक तडाखा देतों पाठीवर. " असें म्हणून त्यांनीं सोटा जमिनीवर आपटण्यास सुरवात केली. मध्येंच त्यांनीं विचारलें:—" कमळजा काय म्हणते ? "

कमळजेचें नांव व तेंही आपल्या वडिलांच्या तोंडांतून निघालेलें पाहून मोहनेला अत्यंत आश्चर्य वाटलें व ती टकामका वडिलांच्या तोंडाकडे पहात उभी राहिली.

सरदारसाहेबांनीं पुनः मोठ्यानें म्हटलें:—" कमळजा काय म्हणते असें मी विचारतों. आतां तरी ऐकूं आलें का ? बहिरट कुठली ! "

" बाबा, कुठें काय म्हणते ? "

" कुठें काय म्हणते ! कां बरें ? परवांच इंदिरेला तिचें पत्र आलें ना ? मंगळवारींच नव्हे काय ? होय होय, मंगळवारींच. "

" कमळजेचें पत्र आक्काला नाहीं आलें, बाबा. "

" बाईसाहेब, इंदिरेला पत्र आलें आहे बरें का ? आलें नसतें तर ती मजजवळ कशी बोलली असती ? तुझा बेत ती गोष्ट माझ्यापासून चोरून ठेवण्याचा दिसतो पण मी फसायचा नाहीं. "

" खरेंच बाबा, कमळजेचें पत्र आलें नाहीं, मी खात्रीनें सांगतें. आक्कानें मला नसतें का मग सांगितलें ? "

सरदारसाहेबांच्या उजव्या पायांत भयंकर कळ आली म्हणून ते मोठ्यानें ओरडून म्हणाले:—" तूं लबाड आहेस, मला फसवायाला पाहतेस नाहीं का ? तुझी चांगली खोड मोडली पाहिजे. इंदिरा आहे म्हणून बरें. नाहीं तर तुम्हीं मला नुसतें बाहुलें करून ठेवलें असतें बाहुलें ! चावट कुठली ! चल हो चालती येथून. "

मोहना खालीं जाऊन इंदिरेला म्हणाली:—" आज बाबांचें पित्त

इतकें कां खवळलें आहे ? प्रत्येकावर आपलें तोंड सोडताहेत. कांहीं केलें तरी त्यांना आवडत नाहीं. ज्या त्या गोष्टीबद्दल कावाकावी चालली आहे. "

इंदिरा नेहमीं वडिलांची बाजू घेण्याला तयार असे. ती शांतपणानें म्हणालीः—" ताई, माणसें आजारी असलीं म्हणजे अशीं त्रासिक होतात. त्यांतून बाबांचा सारा जन्म लष्करांत गेलेला; त्यांच्या मर्जीविरुद्ध कोणी-ही जात नसत; सगळेजण त्यांच्या अगदीं हुकुमतींत; तेव्हां इथें जरा त्यांच्या मनाविरुद्ध झालें कीं लागलीच संतापतात झालें. "

" बरें, पण आक्का, अलीकडे तुला कमळजेचें एखादें पत्र आलें आहे काय ? "

इंदिरेनें आश्चर्यचकित मुद्रेनें वरती पाहून म्हटलें:—" ताई, कमळ-जेचें पत्र आलें असतें तर तुझ्यापासून मीं चोरून नसतें ठेवलें. तूं असें कां बरें विचारतेस ? "

" बाबा म्हणतात कीं मंगळवारीं तिचें पत्र आपणाला आलें आहे असें तूं त्यांना सांगितलेंस म्हणून. मीं त्यांना म्हटलें कीं तिचें पत्र आलें नाहीं. तेव्हां मला काय म्हणतात, तूं माझ्यापासून चोरून ठेवतेस."

" कमळजेचें पत्र आल्याचें मीं सांगितलें असें बाबा म्हणतात ? "

" होय होय. अस्सें बाबा म्हणतात. "

" कां बरें ? अशी त्यांची कल्पना कशानें झाली असावी ? " नंतर ती जरा आठवण केल्यासारखें करून म्हणाली:—" बरोबर. असें त्यांना कां वाटलें याचें कारण मीं समजलें. परवां सहज मीं बाबांच्याजवळ कमळजेचें नांव काढलें. हेतु हा कीं तिच्यासंबंधानें त्यांनीं जें अगदीं मौनव्रत धरलें आहे तें त्यांनीं सोडावें. म्हणून मीं त्यांना म्हटलें कीं ति-च्याकडून लवकरच पत्र येईल असें वाटतें. ही मंगळवारची गोष्ट. "

" तुला असें कां वाटलें बरें ? "

" कारण—कारण—" इंदिरा अडखळत अडखळत म्हणाली, " मला सोमवारीं रात्रीं एक भारी चमत्कारिक स्वप्न पडलें, त्यावरून तिच्या-

संबंधीं कांहीं तरी हकीकत आम्हांला लवकरच कळेल असें आपलें मला वाटूं लागलें आहे. "

मोहना खदखदां हासूं लागली:—" आक्का, तुझीं तीं स्वप्नें ऐकलीं म्हणजे हांसून हांसून माझें बाई पोट दुखूं लागतें. हं, सांग पाहूं तें स्वप्न. ऐकूं दे तर खरें. "

" ताई, मी नाहीं सांगत. तूं माझी चेष्टा करशील. शिवाय तें स्वप्नही चांगलें नाहीं. तें पडल्यामुळें मंगळवारीं सबंध दिवस मी आपली कमळजेबद्दल विचार करीत होतें, म्हणून बाबांजवळ तिचें नांव काढण्याचें मला धैर्य झालें. त्यामुळेंच त्यांची गैर समजूत झाली असेल कदाचित्. तें स्वप्न कुणाला सांगावें असें कांहीं मला वाटत नाहीं. किती भयंकर स्वप्न तें ! माझी तर अगदीं पांचावर धारण बसली बाई ! "

इतक्यांत एका शिपायानें येऊन वर्दी दिली " आक्कासाहेब, तो गाडी-वाला पुनः आला आहे. सरदारसाहेबांची गांठ घ्यावी म्हणतो."

इंदिरा बोलणार इतक्यांत मोहना त्रासून म्हणाली:—" बाबा आजारी आहेत. त्यांना कोणाची गांठ वेववत नाहीं. जा, सांग जा त्याला."

शिपाई म्हणाला:—" पण ताईसाहेब, असें सांगून तो ऐकत नाहीं. तो म्हणतो कीं सरदारसाहेबांची किंवा त्यांच्या मंडळीपैकीं कोणाची तरी गांठ घेतल्याशिवाय आपण जाणार नाहीं. तो मला पुढें बोलूंच देईना."

इंदिरेनें उत्तर केलें:—" बरें बरें, येतात म्हणून सांग जा. " तो गेल्यावर ती मोहनेला म्हणाली:—" ताई, मला आतां या गोष्टींचा त्रास आला बरें का ? दारांत देणेदार यावेत आणि त्यांना द्यायला आप-ल्याजवळ पैसे असूं नयेत ह्यापेक्षां मेलेलें पुरवलें असें मला वाटतें. "

या वेळेस माडीवरती सरदारसाहेबांची काठी मनमुराद नाचत होती व त्याबरोबरच त्यांनीं इंदिरेला हाका मारण्याचा एकसारखा सपाटा चाल-विला होता. बोलावल्याबरोबर कोणी आलें नाहीं कीं संतापून, ओरडून ते अगदीं आकाशपाताळ एक करून सोडीत. त्यांच्याकडे लवकर गेलें पाहिजे हें जाणून इंदिरा मोहनेला म्हणाली:—" ताई, मला बाबांजवळ किती वेळ बसावें लागेल समजत नाहीं. तूं जाऊन त्या गाडीवाल्याची

समजूत घाल जा, पण त्याच्यावर संतापूं नकोहो. आलें, आलें बाबा–" असें मोठ्यानें म्हणत ती जिना चढूं लागली. कारण काठीचा आवाज जास्तच ऐकूं येऊं लागला होता.

मोहना बंगल्यांतून बाहेर रस्त्याजवळ आली. तेथें एक पोक्त वयाचा गृहस्थ उभा होता. जवळच गाड्यांचा एक अड्डा होता. त्याचा तो मालक. या मालकाला सरदारसाहेबांनीं बराच उदार आश्रय दिला होता. कारण स्वारीला चैनीसाठीं म्हणून नेहमीं बाहेर फिरावयास जावें लागे. पण गाडीचें भाडें देण्यांत मात्र सरदारसाहेब तितके तत्पर नसत.

इंदिरेनें बजावलें होतें तरी मोहना रागानें म्हणाली, " सरदारसाहेब आजारी आहेत, त्यांची गांठ आज पडायची नाहीं. निरोप पाठविलेला नाहीं का पोंचला ? "

तो म्हणालाः–" बाईसाहेब, असे निरोप मीं पुष्कळ ऐकले. मी रोज इथें येतों आणि रोज कांहीं तरी सबब पुढें येते. "

मोहनेनें विचारिलेंः—" तुम्हांला पाहिजे तरी काय ? "

" काय पाहिजे ? मला भाड्याचे पैसे पाहिजे आहेत. पैसे, व त्याकारितांच मी आलों आहें. बाई, हें पहा. मी गरीब मनुष्य, घरीं कुटुंब मोठें आहे, चार मुलेंबाळें आहेत, त्यांच्या पोटाला तरी घातलें पाहिजे. "

त्याचें कळवळ्याचें भाषण ऐकून मोहनेला सुद्धां वाटलें कीं याचे पैसे सर्व चुकते करून टाकावेत. म्हणून ती म्हणालीः–" पैसे तरी किती द्यायचे आहेत ? फार आहेत काय ? "

" पन्नास रुपये बारा आणे. बाई, तुम्ही तरी तेवढे द्या आणून. "

इतके पैसे देणें आहेत हें ऐकून मोहना दचकली. ती सहज म्हणालीः– " देऊन टाकावेत असें मला सुद्धां वाटतें. पण माझ्याजवळ नाहींत. "

" बरें, सरदारसाहेबांची माझी गांठ तरी घालतां ? "

" त्यांची प्रकृति ठीक नाहीं, गांठ पडायची नाहीं, असें मीं तुम्हांला सांगितलें तें खरेंच सांगितलें. समजलें ? त्यांना बरें वाटूं लागलें म्हणजे मग तुम्ही या. "

" बाई, हें पहा. तुम्ही मला पैसे देत नाहीं. कदाचित् तुमच्याजव-

ळ नसतील हेंही खरें असेल. तरी मेहेरबानी करून एवढा माझा निरोप त्यांना कळवा. आज शनिवार आहे. सोमवारीं दोन प्रहरच्या आंत जर माझ्या हातांत पैसे पडले नाहींत तर मग कायदेशीर इलाज करणें भाग पडेल."

इतकें बोलून तो गृहस्थ फिरला व तेथून चालता झाला. मोहनेला हा सर्व प्रकार पाहून अत्यंत वाईट वाटलें.

मोहनेनें रस्त्याकडे थोडी नजर फेंकली. ज्याची ती वाट पहात होती, ज्याच्याकरितां ती आतुर झाली होती, तो तिचा प्रियकरच तिकडून येत होता. त्याबरोबर तिच्या गालावर गुलाबी लाली दिसूं लागली व डोळ्यांत प्रेमाचें तेज चमकूं लागलें. इतक्यांत आनंदराव येऊन तिच्या समोर उभे राहिले.

"प्राणप्रिये, तूं माझी वाट पहात उभी राहिलीस ?" असें मोठ्या प्रेमानें त्यांनीं विचारिलें. तिनें होय नाहीं कांहीं म्हटलें नाहीं. त्यांची गांठ पडली म्हणून झालेला आनंद, त्यांच्यासमोर उभें राहण्याचें सौख्य, त्यांनीं प्रश्न केल्यामुळें झालेला हर्ष, या योगानें ती अगदीं भांबावून गेली.

पण आनंदरावांचें प्रेम तिच्यावर होतें काय ? होय, खरोखरच होतें. किंबहुना प्रेमातिशयानें ते अगदीं वेडे झाले होते. आजपर्यंत आनंदराव अगदीं एककल्ली होते, व नेहमीं स्वैर वृत्तीनें वागत असत. जी गोष्ट त्यांच्या मनाला बरी वाटली ती केल्याशिवाय ते कधींही राहिले नाहींत. त्यांच्या पूर्वीच्या आयुष्यक्रमांत असे कांहीं प्रसंग येऊन गेले कीं त्यांची आठवण न झाली तर बरें असें त्यांना वाटत असे. मोहनेची व त्यांची दृष्टादृष्ट होईपर्यंत शुद्ध व सात्विक प्रेमाचा उद्भव त्यांच्या अंतःकरणांत झाला नव्हता; तो आतां झाला. अलीकडे कांहीं दिवसांपासून मोहनेची प्राप्ति हीच त्यांची उत्कट इच्छा, त्यांचें अंतिम साध्य होऊन बसलें होतें.

मोहनेनें हळूंच म्हटलें:—"बाबा एकसारखी वाट पहात आहेत."

"कां बरें ? आज तब्येत जास्त बिघडली आहे काय ?"

"तसें कांहीं नाहीं, पण ते आज फार संतापले आहेत."

" मी आतां इकडे येणार नव्हतों. येथून जवळच एका रोग्याकडे मला जायचें आहे, तिकडून परत येतांना सरदारसाहेबांना भेटून जावें असा माझा बेत होता. तिकडून येतांना मला जरा जास्त वेळ बसायला सांपडलें असतें. "

" पण आतां उभाउभी कां होईना, प्रथम आपण बाबांकडे जाऊन यावें असें मला वाटतें. रोग्याकडून येतांना पुनः आणखी यावेंच. "

असें बोलत मोहना बंगल्याकडे जाण्यास निघाली. आनंदरावही तिच्याबरोबर चालूं लागले. पण मोहना ह्मणाली:—" आक्का खिडकींत उभी आहे, तिला हें आवडणार नाहीं. " परंतु आनंदरावांनीं तिच्या बोलण्याकडे लक्ष्यच दिलें नाहीं. इंदिरेनें हा सर्व प्रकार पाहिला. तिला तें बरें वाटलें नाहीं. आपल्या कुलशीलास साजेल असें मोहनेचें वर्तन नाहीं, ती अजून अल्लड व अविचारी आहे असें इंदिरा मनांत म्हणाली. आनंदराव माडीवर गेले; पण फार वेळ बसले नाहींत; लागलीच खालीं आले. त्यांना इंदिरा ह्मणाली, " आपण आज लवकर निघालां ? "

" मला इकडे एका रोग्याकडे जावयाचें आहे. तिकडून परत येतांना पुनः येईन. आज हवा अगदीं वाईट पडली आहे. "

" होय. फारच वाईट. त्या खटल्याचा निकाल झाला कीं नाहीं, समजलें कांहीं ? " असें इंदिरेनें विचारिलें.

" आतांच निकाल झाला. मला इकडे येण्यास उशीर लागला त्याचें कारण हेंच. मी तिकडेच गेलों होतों. माझीही साक्ष त्या कज्जांत झाली. "

" काय झाला निकाल ? "

आनंदरावांनीं उत्तर केलें, " समाधानकारक निकाल झाला नाहीं. मॅजिस्ट्रेटसाहेबांनीं ठरावाच्या शेवटीं म्हटलें कीं मयतेस मरण येण्याचें कारण त्या औषधांत प्रसिक ॲसिड होतें हेंच. पण त्यांत तें विष आरोपीनेंच घातलें याबद्दल भरपूर पुरावा नाहीं. सबब आरोपीस सोडून देण्यांत यावें. "

इंदिरेनें विचारिलें:—" तुमच्या मतें समाधानकारक निकाल म्हणजे कसा व्हावयाला पाहिजे होता ? "

आनंदराव हांसून म्हणले:—" अजून सर्व गोष्टींसंबंधानें गूढ आहे तें आहेच. "

" आनंदराव, तुम्हांला कोणाचा वहीम आला आहे काय ? "

" वहीम आला असें नाहीं, पण—पण– " ते जरा हळूं बोलूं लागले, " आतां माझें आपलें ठाम मत झालें आहे कीं प्रतापरावांच्या हातून कांहीं तरी चूक झाली असली पाहिजे व त्यामुळेंच असा भयंकर प्रकार झाला. ही चूक दुसऱ्या कोणाकडून होणें शक्यच नाहीं. पण मी हें तुमच्याजवळ म्हणून बोललों, उघडपणानें कधींही बोलणार नाहीं. त्यांचा आमचा धंदा एकच. त्यांच्यावर असा आक्षेप घेणें आमच्या धंद्याच्या दृष्टीनें बरें नव्हे. "

इंदिरा म्हणाली:—" मला तरी निदान शंकाच राहिली नाहीं. प्रतापरावांच्या दवाखान्यांतून तें औषध थेट बाळंतिणीच्या खोलींत गेलें, तर त्या औषधांत विष दुसऱ्या कोणत्या रीतीनें जाऊं शकेल ? शिवाय औषध आल्याबरोबर आपणाला विषाचा वास आला ना ? तेव्हां औषध तयार होत असतांनाच त्यांत विष घातलें याबद्दल चांगलाच पुरावा झाला. बरें, त्या बिचाऱ्या बाईसंबंधाची कांहीं हकीगत तरी बाहेर आली काय ? ती कोण, कुठून आली, वगैरे कांहीं माहिती ? "

आनंदराव म्हणाले:—" नाहीं, कांहीं नाहीं, तिचें आडनांव सुद्धां कोणाला समजलें नाहीं. "

" पण तुमची शिफारस तिच्याजवळ कोणीं केली हें दिखील तुम्हांला समजलें नाहीं ? "

" मुळींच नाहीं. अजूनही समजेना. मंगळवारीं मीं माझ्या मुंबईतील स्नेह्यांना—ज्यांनीं म्हणून माझी शिफारस करणें शक्य आहे असें मला वाटलें त्या सर्वांना—पत्रें लिहिलीं. कांहींचीं उत्तरें सुद्धां आज आलीं आहेत. पण कलावतीची माहिती असल्याचें कोणीही लिहीत नाहीं. हें पहा, प्रत्येक गोष्टिबद्दल सगळाच अनिश्चितपणा आहे. ती मुंबईहून तरी आली कीं नाहीं याची सुद्धां आम्हांला खात्री वाटेना. "

इंदिरेनें विचारिलें:—" ती रूपानें फार सुंदर होती म्हणतात. खरें काय हो डॉक्टर ?"

आनंदराव थोडें थांबून म्हणाले:—" तिची तब्येत चांगली असतांना, ती हिंडत फिरत असतांना, अंगावर चांगले कपडे व दागिने घातले असतांना ती फार सुंदर दिसत असेल. पण मीं तिला तशा स्थितींत पाहिलें नाहीं. बाजेवर पडलेली, आजारी, निस्तेज अशी मीं तिला पाहिली, व ती-ही चांगला उजेड नसतांना."

बंगल्यांतून बाहेर पडतां पडतां आनंदराव हे शब्द बोलले. त्यांना त्या रोग्याकडे जाण्याची गडबड झाली होती.

# प्रकरण १५ वें.

—:०:—

## इंदिरेची भीति.





त्या संधिप्रकाशांत बागेंतून आनंदराव डॉक्टर गडबडीनें निघाले असतां त्यांच्या त्या ऐटबाज सुंदर व नयन-मनोहर मूर्तीकडे टक लावून पहात मोहना खिडकींत उभी राहिली होती. आतां थोडक्याच वेळानें ते परत येतील, तेव्हां मग त्यांची व आपली पुनः भेट होईल, त्यांच्याबरोबर गुजगोष्टी करण्यास थोडीशी तरी सवड मिळेल ह्या आनंदानें तिचें अंतःकरण स्फुरण पावूं लागलें होतें. भावी सुखाबद्दल तिचें मनोराज्य सुरूं होऊन त्यांत ती अगदीं गढून गेली होती. तिच्या शेजारीं इंदिरा येऊन उभी राहिली हें तिला समजलें सुद्धां नाहीं.

" तो गाडीवाला काय म्हणत होता ? " इंदिरेनें विचारिलें.

हा प्रश्न ऐकल्याबरोबर ती शुद्धीवर आली. ती प्रथम थोडी गोंधळल्यासारखी झाली पण लागलीच ह्मणाली:—" कोण ? गाडीवाला होय ? खरेंच गडे, मी तें सांगायचें विसरलेंच. तो ह्मणाला, बरें का आक्का, सोमवारीं दोन प्रहरच्या आंत आपले पैसे आले तर बरें, नाहींतर आपण बाबांवर फिर्याद करणार. तो मोठा करारी आहे. बोलल्याप्रमाणें करायला कध्धीं चुकायचा नाहीं. त्याचा अगदीं निश्चय झाल्यासारखें दिसलें. "

हृ ऐकतांच इंदिरा मोठ्या विचारांत पडली; आतां इतके पैसे कोठून आणावयाचे ? तिला दुसरीही एक काळजी लागली होती. घरांतील एका मोलकरणीनें तिला सांगितलें कीं, मी चार दिवसांत नोकरी सोडून जाणार, माझा एकंदर पगार चुकता करा, मला राहावयाला सवड नाहीं, व मला राहावयाचेंही पण नाहीं. इतक्यांत बाहेर कोणशी एक बाई भेटावयाला आली आहे म्हणून गड्यानें येऊन वर्दी दिली त्याबरोबर तर इंदिरेची छातीच दडपून गेली. तिला वाटलें, आणखी कोणी तरी आपले पैसे मागण्याकरीतां आलें असावें. म्हणून कांहींच उत्तर न देतां ती चिंताक्रांत अशी बसली. पुढें गड्यानें सांगितलें कीं, आपण नोकरीस राहण्याकरितां आलों आहों असें ती म्हणते. त्याबरोबर ' तिला इकडे घेऊन ये. ' असें इंदिरेनें सांगितलें. गडी त्या बाईला घेऊन आला. तिची तरतरीत व धूर्त मुद्रा, तिचें टापटिपीचें नेसणें व तिची अगदीं सभ्य वागणूक, हीं पाहून ती इंदिरेच्या मनांत भरली. इंदिरेचाही शांत व सरळ स्वभाव, थोर कुलांतील मुलींस साजेसें तिचें वर्तन व तिचा निगर्वीपणा पाहून यांच्या घरीं कांहीं दिवस राहून नोकरी करावी असें त्या बाईलाही वाटलें. नंतर, तुझें नांव काय, तूं येथें कोठें राहतेस ? असें इंदिरेनें विचारिलें. तेव्हां ती ह्मणाली:—" मला सारजा ह्मणतात. पेठेंत मावशीबाईच्या घराजवळ मी राहतें. "

मावशीबाईचें नांव ऐकल्याबरोबर इंदिरेचें लक्ष्य वेधलें. " मावशी—

बाईच्या घराजवळ का ? तर मग तो दुःखकारक प्रकार घडून आला त्या घराशेजारींच ? ”

“ होय बाईसाहेब. अगदीं शेजारचेंच घर ” सारजेनें उत्तर दिलें.

इंदिरेची सर्व जिज्ञासा जागृत झाली. तिनें मोठ्या कळकळीनें तिला विचारिलें:—“ त्या बाळंतिणीला तूं पाहिलें आहेस काय ? ”

“ होय बाईसाहेब, मीं पुष्कळ वेळां पाहिलें आहे. मी नेहमीं तिच्या बाजेशेजारीं बसलेलीच असे. ”

“ मोठी वाईट गोष्ट झाली नाहीं, सारजाबाई ? ”

“ वाईट तर खरीच. कोणाकडे कां दोष असेना, पण एकंदरींत मोठें अघोर कृत्य एवढें खरें ! ”

“ तो दोष प्रतापरावांकडेच येतो. याबद्दल दोन मतें होणें शक्य नाहीं. ”

सारजेनें म्हटलें:—“ बाईसाहेब, दोन मतें असूं शकतील. मॅजिस्ट्रेट साहेबांचेंच मत निराळें नाहीं का पडलें ? ”

इंदिरा:—“ कोर्टानीं असा निकाल कां दिला हें मी ओळखून आहे. प्रतापराव डॉक्टर सर्व गांवांत प्रसिद्ध आहेत. सगळ्या लोकांना हवे आहेत, अगत्यवान आहेत, इमानानें काम करतात, सरकारदरबारांत चांगलें वजन आहे, त्यांना पैसे रगडून मिळतात. झालें, तेव्हां अशा माणसाला संकटांत घालणें...”

सारजा मध्येंच ह्मणाली, “ तें कसें कां असेना ! एकंदरींत मोठें गूढ आहे एवढें खरें. पण माझी मात्र अशी समजूत आहे कीं कधीं ना कधीं तरी हा सर्व प्रकार बाहेर येईल आणि प्रतापराव अगदीं निरपराधी आहेत अशी सर्व लोकांची खात्री होईल. ”

“तुला असें वाटतें का, कीं औषध तयार करण्यांत काडीइतकी दिरंगाळ चूक झाली नाहीं म्हणून ” “ होय. प्रतापरावांच्या दवाखान्यांतून औषध अगदीं निर्भेळ बाहेर पडलें. मला तर खात्रीनें असें वाटतें कीं त्या बाळंतिणीचा कुणीं तरी दुष्टानें खून केलेला आहे. ”

“ कोणीं ! ”

" बाईसाहेब, हेंच तर कोडें कोणालाच उकलतां येत नाहीं. " इतक्यांत " हैबती म्हणतो—बरें का आक्का—कीं चौकशी संपल्यानंतर कोर्टांतून लोक बाहेर आले तेव्हां, जिन्यांत कोणसा चोरटा मनुष्य दिसला त्याच्यासंबंधानें ते बोलूं लागले. ते म्हणाले कीं तो मनुष्य दिसला ही गोष्ट जर आनंदरावांनीं बाहेर फोडली नसती तर प्रतापरावांवर गुन्हा शाबीत झाला असता. " असें लीला ह्मणाली. आपल्या घरांत नोकरीस राहण्याकरीतां आलेल्या बाईला पाहण्यासाठीं ती हळूच दारांत येऊन उभी राहिली होती. बाजार पेठेंतील मावशीबाईच्या घरीं घडून आलेला तो अनन्वित प्रकार, त्या वेळची ती चमत्कारिक परिस्थिति वगैरेबद्दलची हकीगत ऐकून तिला जिज्ञासा उत्पन्न झाली होती.

हें ऐकून इंदिरेला बरेंच आश्चर्य वाटलें व मध्येंच तोंड घालून बोलल्याबद्दल लीलेला रागें भरण्याचें सुद्धां ती विसरली. ती मोठ्यानें ह्मणाली:— " जिन्यांत कोण चोरटा मनुष्य दिसला ? "

लीला पुनः बोलली:—" आक्का, हैबती सांगत होता कीं—ती बाळंतीण बाई मरायच्या जरा आधीं तिच्या खोलीशेजारीं जिन्यांत एक विलक्षण चेहऱ्याचा मनुष्य आनंदरावांना दिसला ह्मणून. मी कांहीं माझ्या पदरचें नाहीं सांगत. "

इंदिरा एकदम शुद्धीवर येऊन ह्मणाली:—" लिलुबाळ, तूं वरती बाबांकडे जा. मला विचारल्याशिवाय तूं खालीं आलीस हें बरें नाहीं. आणखी हैबती कुठल्या भलत्यासलत्या गोष्टी सांगेल त्याही पण ऐकत जाऊं नकोस. समजलें ना ? जा तर ! "

इंदिरेचे हे रागाचे शब्द ऐकतांच लीला पार पळून गेली. नंतर सारजा हकीकत सांगूं लागली:—" बाईसाहेब, कलावती मेली त्या रात्रीं आनंदराव तिची प्रकृति पहायला आले होते. परत जातांना जिन्यांत कोणी एक परका, अनोळखी मनुष्य उभा असलेला दिसला असें त्यांना वाटलें. ते आतां म्हणतात कीं आपणाला नुसता भास झाला म्हणून. परंतु मॅजिस्ट्रेटसाहेबांनीं या गोष्टीला फारच महत्व दिलें. सर्व गोष्टी अजूनी उघडकीला आल्या नाहींत हें कांहीं चांगलें झालें नाहीं."

नंतर इंदिरेचें व सारजेचें थोडें बोलणें होऊन असें ठरलें कीं एकदोन दिवसांत विचार करून खचित काय तें कळवावयाचें. इतकें ठरल्यानंतर सारजा निघून गेली.

इंदिरा माजघरांत पाऊल टाकते तों खिडकीजवळ आनंदराव व मोहना हीं दोघें बोलत उभीं असल्याचें तिच्या नजरेस पडलें. ती आंत आल्याचें पाहतांच आनंदराव जरा लांब झाले व मोहनाही थोडीशी बाजूला सरकली हेंही तिनें पाहिलें. थोड्या वेळापूर्वीं बागेंतून येतांना आनंदराव व मोहना बरोबरीनें चालत होतीं हेंही इंदिरेनें पाहिलें होतें. पण त्या वेळीं तिच्या लक्ष्यांत इतकें आलें नाहीं. आतां मात्र सर्व गोष्टी तिच्या ध्यानांत येऊं लागल्या. अलीकडे अलीकडे रोज संध्याकाळ झाली कीं मोहना उंची उंची लुगडीं नेसून आपल्या परमप्रिय कैलासवासी आईचीं तुऱ्याची ठसकेबाज नथ कां घालीत असते; केंश, पदर, नेसण, वगैरे जेथल्या तेथें नीटनेटकेपणानें ठेवण्याकडे ती इतकी कां जपत असते; आज आनंदराव डॉक्टर यावयाचे आहेत असें समजलें कीं ते येईपर्यंत तिच्या मनाला अगदीं चैन कसें नसतें; त्यांना दुरून पाहतांच तिच्या चेहऱ्यावर टवटवी कशी येते, ते आल्याबरोबर कांहीं तरी निमित्त काढून त्यांच्याबरोबर बोलण्याची संधी ती कशी जुळवून आणते, वगैरे गोष्टी तिच्या लक्षांत येऊं लागल्या. त्या दोघांचें एकमेकांवर प्रेम जडत चाललें असेल काय, असा एक विचार तिच्या मनांत येऊन चुकला. त्याबरोबर तिला फार वाईट वाटलें. इंदिरेला आपल्या थोर घराण्याचा फार अभिमान असे. आपलें कुळ जहागीरदारांचें, आपला नांवलौकिक मोठा, किती झालें तरी आपण गर्भश्रीमंत ते गर्भश्रीमंत; आणि आनंदराव काय, यःकश्चित् डॉक्टरकीचा धंदा करून पोट भरणारे. अशा पुरुषाबरोबर आपल्या बहिणीचें लग्न व्हावें हें इंदिरेला पसंत वाटेना. पण आतुर झालेल्या मोहनेला हा उपदेश कितपत रुचणार? इंदिरेचें बोलणें ऐकताच मोहनेचा नुसता जळफळाट झाला व संतापानें ती तांबडीलाल झाली. तिनें स्पष्ट म्हटलें, ' आक्का, मी या बाबतींत तरी तुझें मुळींच ऐकणार नाहीं, साफ सांगतें. आम्ही अमुक, आमचा दर्जा अमुक, आमचें घराणें अमुक हें ऐकण्याचा

मला आतां अगदीं कंटाळा आला आहे. आमचे आप्तसोयरे पुष्कळ श्रीमंत आहेत, म्हणून आम्हांला त्यांचा काय उपयोग ? त्यांच्या श्रीमंती-पासून आम्हांला काय फायदा आहे ? आमच्या घरांत त्यांच्याकडून धन-दौलत थोडीच येते आहे. झालें. येऊन जाऊन लोक नांवें ठेवितील ही भीति. ठेवीनात बापडे. त्यांच्या तोंडाला कोण हात लावूं शकेल ? असल्या बोलण्याचा, आक्का, मला अगदीं वीट आला आहे बरें का ? कमळजेनें जसें केलें तसें आपणही करावें असें मला केव्हां केव्हां वाटूं लागतें."

कमळजेचें नांव ऐकतांच इंदिरा स्तब्ध बसली. मोहनेनेंही आपली जीभ चावली. दोघींचेंही बोलणें दुःखानें बंद झालें. कांहीं गत गोष्टींची आठ-वण त्या दोघींना झाल्यासारखें दिसलें. अलीकडे अलीकडे घरांत कमळ-जेचें नांव निघालें कीं कोणालाही बरें वाटत नसे. त्या कमळजेचा नाम-निर्देश मोहनेनें केला हें पाहून इंदिरेला पराकाष्ठेचें वाईट वाटलें. नंतर ती आपलें दुःख आवरून म्हणालीः—" ताई, आनंदरावांबरोबर लग्न करून घेण्यापेक्षां कमळजेनें केलें तें पुष्कळ बरें. जरी आनंदराव आमच्या बरोबरीचे असते, आमच्यासारखेच तेही थोर घराण्यांतले असते, तरी सुद्धां तुझें त्यांच्याबरोबर लग्न झालेलें मला आवडलें नसतें."

मोहनेच्या कपाळास आंठ्या पडल्याः—" कां, कां बरें ?"

इंदिराः—" आनंदरावांसंबंधानें माझें मत इतकें कां वाईट झालें आहे हें माझें मलाच समजत नाहीं. ताई, तुला काय सांगूं, आनंदराव माझ्या दृष्टीसमोर सुद्धां नकोत असें मला वाटतें."

" पण असें कां म्हणून ?"

" तें मला सांगतां येत नाहीं.—एक कारण आहे, पण मी नाहीं तें सांगत. ताई, कांहीं कारण नसतांना माझें मन कलुषित होतें, असें तूं मला नेहमीं म्हणत असतेसच. त्याचप्रमाणें आनंदरावांसंबंधानें माझें मन कलुषित झालें आहे. आनंदराव तुझ्या बरोबरीचे नाहींत, तसे ते केव्हांही होऊं शकणार नाहींत, तेव्हां त्यांचा नाद तूं आपला सोडून द्यावास हें बरें. "

" पण कोणतें कारण तें सांग तरी. " " न सांगितलेलेंच बरें."

" परंतु आक्का, तूं सांगितलेंस तर मोठी मेहेरबानी होईल. मला वाटतें तुला सांगणें भाग आहे. हं, सांग सांग."

" बरें तर सांगतें हो, पण मग तूं मला वेडी म्हणशील; माझी थट्टा करशील. कर बापडी. ऐक. गेल्या सोमवारीं रात्रीं मला वाईट स्वप्न पडलें तें, त्या स्वप्नाशीं आनंदरावांचा कांहीं दुष्ट प्रकारचा संबंध आहे. आनंदराव मला पूर्वींही आवडत नव्हतेच. पण त्या रात्रीपासून मला त्यांची एक प्रकारची भीति वाटूं लागली आहे. ताई, हा माझा वेडेपणा आहे असें मी म्हणतें. पण त्याला माझा इलाज नाहीं. मला भीति कां वाटावी याचें कारण मात्र मला सांगतां येत नाहीं."

इतक्यांत माडीवरून सरदारसाहेबांची हाक ऐकूं आली त्याबरोबर इंदिरा तिकडे निघून गेली. आनंदराव प्रकृति पाहून खालीं आले. तेथें मोहना एकटीच उभी होती. त्याची ती मनोरम मूर्ती पाहतांच मोहनेचे सर्व विचार बाजूस राहिले. इंदिरेनें स्वप्न सांगितलें तें चटसारें ती विसरली. आनंदराव कोटाचीं बटणें घालीत घालीत निघाले. जाता जातां त्यांनीं मोहनेशीं बोलण्याचा बेत जुळवून आणलाच.

" प्रिये, स्वस्थ रहा. खात्रीनें तूं माझी अर्धांगी होशील. सरदार-साहेबांनीं जर माझी मागणी नाकबूल केली तर मी व तूं दुसरीकडे जाऊन लग्न करून घेऊं." असें आश्वासन देऊन आनंदरावांची स्वारी हातांतील काठीस गिरक्या देत देत बंगल्यांतून बाहेर पडली."



# प्रकरण १६ वें.

——:o:——

## आनंदरावांची मागणी.



कांहीं दिवस–एक दोन आठवडे—निघून गेले. कलावतीच्या आकस्मिक मृत्यूमुळें उडालेली चळवळ थोडथोडी कमी होऊं लागली. पोलिसांनीं या बाबतींत शक्य तितकी मेहनत व तपास केला पण कांहीं उपयोग झाला नाहीं. सरदारसाहेबांच्या घरीं कांहीं गोष्टी बऱ्याच रंगारूपास येऊं लागल्या. पण त्या कोणाच्या ध्यानीं मनींही नव्हत्या. खुद्द सर्जेरावांची तब्बेत तर सुधारत नव्हतीच. मध्यें प्रकृति थोडी बरी होत चालली इतक्यांत स्वारीनें अपथ्य केल्यामुळें पुनः जास्तच घसरली आणि साहेब आतां अगदीं अंथरूण धरून बसले. घरांतील मोलकरणींपैकीं एकजण निघून गेली व सारजेनें तिचा चार्ज घेतला.

येथपर्यंत झालें तें ठीक झालें. पण एवढ्यानेंच भागलें नाहीं. सर्जेरावांची प्रकृति जास्त बिघडल्यामुळें आनंदरावांना इकडे वरचेवर येण्यास आयतीच सबब झाली. ते आतां दिवसांतून दोनदां येऊं लागले. सकाळीं एकदां येत व पुनः संध्याकाळीं येत. सकाळीं दुसरे रोगी पहावयास जाण्याची त्यांना गडबड असे सबब ते फार वेळ बसत नसत. संध्याकाळीं मात्र त्यांना रिकामपण असे ह्मणून बराच वेळपर्यंत ते बंगल्यांत गप्पागोष्टी करीत बसत. सरदारसाहेबांना वाटे, डॉक्टरांना आपल्या प्रकृतीबद्दल फार काळजी, ह्मणून ते आतांशा वरचेवर येतात. असे आपल्या कळकळीचे डॉक्टर मिळाले ह्मणून सर्जेराव धन्यता मानीत. पण असा सद्धेतु आनंदरावांचा असेल कीं नाहीं याजबद्दल इंदिरेच्या मनांत शंका येऊं लागली. तथापि तिनें मोहनेस आनंदरावांसंबंधानें बजाविल्यापासून तीं दोघें आतां

फार जपून व भिऊन वागत असत. त्यांच्यामध्यें फाजील प्रसंगाचीं कांहींच चिन्हें इंदिरेला दिसून येईनात; ह्मणून तिला वाटलें, चाललें हें ठीक आहे, असेंच चालूं द्यावें.

तथापि इंदिरेला न कळूं देतां आनंदराव व मोहना हीं केव्हां केव्हां संधि साधून चोरून एकमेकांची गांठ घेत असत. एके वेळीं अशी गांठ पडली असतांना आनंदराव मोहनेस म्हणाले:—" माझे लाडके, मी आतां सरदारसाहेबांजवळ लग्नाची गोष्ट काढणारच. किती दिवस दम धरूं? माझे बाबासुद्धां आतां मला अनुकूल झाले आहेत. ते मला म्हणूं लागले आहेत कीं तूं लग्न करून घे. तुला खर्चाकरितां मी लागतील तितके पैसे देतों."

आनंदरावांनाही हेंच पाहिजे होतें. त्यांच्या प्रपंचाची किती ओढाताण चालली होती, खर्चाच्या पायीं ते किती जिकीरीस आले होते हें त्यांचें त्यांनाच माहीत. दुसऱ्याला त्याची कल्पना सुद्धां करतां येणें शक्य नाहीं. वडिलांकडून रकम हातीं येतांच त्यांनीं कांहीं कर्ज भागवून टाकलें व बाकीची रकम लग्नाच्या तयारीकरितां ते खर्च करूं लागले. नवीन मौल्यवान् डाग दागिने, कपडे व भांडीं वगैरे जिन्नस त्यांनीं बरेंच तयार केलें. आपलें जिच्यावर अत्यंत प्रेम व बहाल मर्जी त्या मोहनेला राहण्याला सोयीवार व सुखकर असें घर थाटण्याकडे त्यांनीं वाटेल ती मेहनत व लागतील तितके पैसे खर्च करण्याला मागें पुढें पाहिलें नाहीं.

मोहनेबद्दल सर्जेरावांजवळ शब्द टाकला तर तो अगदींच वायां जाईल असें आनंदरावांना केव्हांही वाटलें नाहीं. आनंदरावांच्या मनांत एखादी गोष्ट आली कीं मग ती झालीच पाहिजे, त्यांना अगदीं धीर म्हणून निघत नसे, असा कांहीं त्यांचा देहस्वभाव होता. थोडी वाट पाहूं, संधि येईल तेव्हां करूं असें ते कधीं करीत नसत. आनंदरावांनीं मनांत आणल्याप्रमाणें केलें. त्यांनीं एके दिवशीं संधि साधून सरदारसाहेबांजवळ मोहनेसंबंधानें गोष्ट काढली. त्या वेळीं इंदिरा व मोहना ह्या दोघीही घरीं नव्हत्या. आनंदरावांना अशी भीति वाटत होती कीं इंदिरेसमक्ष गोष्ट काढली तर ती विरुद्ध जाईल; शिवाय मोहनेनें तर या-

संबधानें त्यांची खात्रीच करून सोडिली होती. म्हणून इंदिरा घरांत नसतांना गोष्ट काढणें बरें असें त्यांना वाटत होतें. एकदां सरदारसाहेबांचा रुकार मिळाला कीं मग इंदिरेला कोण विचारतो ? म्हणून इंदिरा घरीं नाहीं अशी बातमी काढून आनंदराव सर्जेरावांच्या बंगल्यांत शिरले, आणि सरदारसाहेबांची पांच मिनिटें गांठ घेण्याची इच्छा आहे, कांहीं खाजगी काम आहे, असा निरोप त्यांनीं हैबतीबरोबर पाठविला. थोड्याच वेळानें खालीं येऊन 'आपणांला सरकार माडीवर बोलावतात' असा उलट जबाब हैबतीनें कळविला. त्याबरोबर आनंदराव मोठ्या उत्सुकतेनें जिना चढून गेले.

यापूर्वीं थोडकाच वेळ आनंदराव सर्जेरावांकडे येऊन त्यांची तब्येत पाहून गेले होते. असें असतां पुनः लवकरच ते परत आले आहेत हें ऐकून सरदारसाहेबांना आश्चर्य वाटलें. त्यांनीं एकदम विचारिलें:— "का, डॉक्टर, पुनः परत आलां ?"

सर्जेरावांचा स्वभाव आनंदरावांना पूर्णपणें कळून चुकला होता. त्यांच्या मर्जीविरुद्ध कोणी कांहीं बोललें कीं सरदारसाहेबांचा सोटा—तो आपला नेहमीं जवळ पडलेला असावयाचाच—दणादण जमिनीवर आदळत राहायचा. एखादे वेळीं तो सरदारसाहेबांच्या हातांतून उशी खाऊन बोलणाराचा कपाळमोक्षसुद्धां करी हें आनंदरावांना माहीत होतें. न जाणो हा प्रसंग आपणावर गुदरतो कीं काय ह्या भीतीनें आनंदराव अंगंदीं गांगरून गेले. त्यांनीं न बोलतां तेथील एक खुर्ची घेतली व ते भीत भीत सरदारसाहेबांच्या कोचाजवळ येऊन बसले, आाण मोठ्या अदबशीरपणानें व गांभीर्ययुक्त मुद्रेनें त्यांनीं आपलें भाषण सुरू केलें:—

"सरदारसाहेब, माझी आपणास एक विनंति आहे. आतां कित्येक दिवस ही गोष्ट मी आपणाजवळ काढणार होतों, पण तशी संधीच जुळून आली नाहीं. ती वेळ आज आली आहे. माझ्या मनांतील हेतु आपणास प्रदर्शित करण्यापूर्वीं मी कोण व माझी स्थिति काय हें सांगण्याची मी परवानगी घेतों. उद्देश हा कीं पुढें कोणताही गैरसमज उत्पन्न होऊं नये. माझे वडील मुंबई येथें रहात असून त्यांनीं आपल्या वैद्य-

कीच्या धंद्यांत पुष्कळ पैसा कमाविलेला आहे. त्यांना मीच कायता ए कुलता एक मुलगा असून वडिलांच्या पश्चात् त्यांच्या सर्व इस्टेटीचा मालक मीच होणार आहें, व तो प्रसंग लवकरच येईल कारण माझे वडील अगदीं वृद्ध झाले असून त्यांच्या जीवितशाचा आतां भरंवसा नाहीं. मग श्रीमंत असें ज्यांना म्हणतात त्या लोकांत........."

स्पष्टवक्ते सरदारसाहेब मध्येंच म्हणाले:—" डॉक्टरसाहेब, आपण हें मला सांगावयाची कां तसदी घेत आहां? तुमचे वडील नवकोट नारायण असतील, ते आपली सर्व संपत्ति तुम्हांला अर्पण करतील, पण मला हें ऐकून करावयाचें आहे काय?"

आनंदरावांचा चेहरा गोरामोरा झाला. ते नम्रपणानें म्हणाले:— " सरदारसाहेब, मला अजून थोडें बोलूं द्या. माझा या शहरांत चांगला बस बसला आहे. माझ्या धंद्यालाही तेजी येत आहे. कारण शिश्राम डॉक्टरांचा धंदा अगदीं खालावत चालला आहे, शिवाय प्रत परवांनीं ती भयंकर चूक केल्यामुळें आतां तर त्यांचा धंदा अगदीं सपशेल बुडणार. थोडक्याच अवधींत मला सालीना पांच पासून सात हजार पडतील असा रंग दिसत आहे."

"होय, पडतील. पण मला त्याच्याशीं काय करावयाचें आहे? तुम्हांला तितके मिळूं लागले तर कोणाला नको का आहेत?"

" एवढेंच उत्पन्न जरी माझें झालें तरी मी म्हणतों हें कांहीं कमी नाहीं. इतक्या मोठ्या संपत्तीला कोणी तरी भागीदारीण मला पाहिजे आहे; सरदारसाहेब, ती आपण मला देण्याची मेहेरबानगी करावी. आपली मु-ल-गी.—"

हे शेवटचे शब्द आनंदराव भीत भीत व अगदीं हळूं बोलले. सरदार साहेबांना ते ऐकूं गेले कीं नाहीं याची शंकाच आहे. एवढें मात्र खरें कीं, स्वारी आश्चर्यचकित होऊन आनंदरावांकडे रोखून पाहूं लागली. तथापि न डगमगतां आनंदरावांनीं आपलें भाषण चालूच ठेविलें:— " मी आपल्या मोहनेसंबंधानें बोलतों. साहेब, ती आपण मला द्यावीच; ती माझी अत्यंत आवडती प्राणपत्नी होईल, मी तिची पुष्कळ काळजी

घेईन, तिला अगदीं फुलासारखी वागवीन, तिच्या सुखांत काडीमात्र कमी पडूं देणार नाहीं. आणखी काय सांगू ? ”

डॉक्टरांना वेड लागलें आहे कीं आपणच वेडे झालों आहों याची सरदारसाहेबांना शंका पडली. आपल्यासारख्या सरदाराच्या घराण्याशीं एखाद्या यःकश्चित् डॉक्टरकीचा धंदा करणाऱ्यानें संबंध जोडण्याची मनीषा धरावी हें पलटणींतील हवालदारानें राजकन्येशीं लग्न लावण्याची इच्छा धरण्यासारखेंच हास्यास्पद व अशक्य असें त्यांना वाटलें. ते संतापून म्हणाले:—

“ डॉक्टर, आपण काय म्हणालां ? पुनः एकदां सांगा पाहूं ! ”

“ साहेब, आपल्या मुलीवर माझें प्रेम बसलें आहे. मोहनेवर माझें जितकें प्रेम जडलें आहे तितकें प्रेम माझें आजपर्यंत कोणावर नव्हतें, व पुढेंही असणार नाहीं. माझी अर्धांगी होण्यास तिला आपण संमति द्यावी एवढीच आपल्याजवळ प्रार्थना आहे. ”

त्याबरोबर सर्जेरावांचा सोटा दणादण आपटूं लागला, व त्यांनीं आपल्या पहाडी आवाजानें हैबतीला हाक मारण्याला सुरवात केली:—“हैबती, अरे हैबती, ए हैब्या. ” त्याबरोबर हैबती मागें पिशाच्च लागल्याप्रमाणें दौडतच वर आला.

“ सरकार, तब्येत बिघडली काय ? ”

सरदारसाहेब मोठ्यानें ओरडले:—“ बिघडली ? होय, होय, त्यांची तब्येत बिघडली आहे, त्यांची (आनंदरावांकडे सोटा दाखवून म्हणाले ). हैबती, यांची तब्येतच नाहीं, तर डोकें देखील बिघडलें आहे. ते अगदीं वेडे झाले आहेत, वेडे; आणि या वेड्याशीं तूं माझी गांठ घालून दिली आहेस. आतां एकदां यांना बंगल्याच्या बाहेर पोंचते कर पाहूं. चलो, हाकाल देव इसकु ! ”

हैबती बुचकळ्यांत पडला. धनीसाहेब तोंडाला येईल तें बडबडतात हें त्याला माहीत होतें. तो आनंदरावांकडे पाहूं लागला. पण त्यांची मुद्रा शांत व गंभीर आणि वागणूक अगदीं सभ्य होती. वेड्यासारखे ते त्याला मुळींच दिसले नाहींत.

आनंदराव खुर्चीवरून उठून म्हणाले:—" सरदारसाहे
वांतील एक प्रतिष्ठित व संभावित गृहस्थ आहें. मी आ
खादी विनंति केली तर ती आपण शांतपणानें ऐकून घ्या
योग्य उत्तर मिळालें तर मोठीच मेहेरबानी होईल. "

" माझ्याकडून यापेक्षां दुसरें उत्तर प्राण गेला तरी
तुम्हांला खरोखर वेड लागलें आहे, डॉक्टर. तुह्मीं मागणी
माणें वेड्याखेरीज दुसरा कोणीही करणार नाहीं. डॉक्टर,
सरदार घराण्यांतली आहे हें तुम्हांला माहीत आहे ना ? "

" पण मीही डॉक्टर आहें, मी परीक्षेला गेलों होतों,
वैद्यकसंस्थेचा मी चिटणीस आहें. "

" आनंदराव, किती झालें तरी तुह्मी हलक्या कुळांतले
दार घराण्याशीं संबंध जोडण्याची तुम्हीं महत्त्वाकांक्षा धरा
संस्थेचे तुह्मी अगदीं स्तंभ असलां तरी तुमच्या अंगांत जर
जसपणा असता तर तुह्मीं माझ्या मुलीकडे ढुंकून सुद्धां पा
नंतर हैबतीकडे वळून ते म्हणाले:—" कायरे, ए, मूर्खा,
बाहेर पोंचविण्याचें तुझ्या मनांत आहे कीं नाहीं ? "

हैबती मोठ्यानें म्हणाला:—" डॉक्टरसाहेब, दरवाजा उघ

परंतु डॉक्टरांनीं त्याला हातानें खूण करून गप बसा
म्हणाले:—" सरदारसाहेब, मीं आपणास सांगितलेंच आहे
मोहनेवर माझें मन बसलें आहे, आणखी असेंही कळविलें
लग्न करावयास योग्य अशी सुस्थितिही मला लवकरच
सबब पुनः एकवार मी आपणांस विचारतों—ती आपण मला

सर्जेरावांनीं उत्तर केलें:—" छे छे छे ! तेवढी गोष्ट काढू
त्याबरोबर लग्न लावून आपली अब्रू खराब करून घेण्यापेक्षां
मेलेली बरी. जाव, जाव. "

आनंदराव हलकेंच म्हणाले:—" तिचे पंचप्राण, तिच्या
सुखाचे आशातंतु माझ्या ठिकाणीं बद्ध झालेले आहेत हा
गितलें तर ? "

सर्जेराव कडाडले:—" आणि आपण महा नीच वेडेपीर आहांत असें मीं म्हटलें तर ? कायरे मूर्खा ? तुझे ते बटबटीत डोळे घेऊन तेथें कशाला असा घोंटाळून उभा राहिला आहेस ? ह्या गृहस्थांना दरवाज्याच्या बाहेर घालीव ह्मणून मीं तुला ताकीद दिली होती कीं नाहीं ? बोल. पाजी, बेवकूब ! "

असें म्हणून सरदारसाहेबांनीं आपल्या सोट्याला हात घातलाच. आनंदरावांनीं लागलीच पलायन केलें. हैबतीही बाहेर पडलाच. इतक्यांत सरदारसाहेबांचा सोटा हातांतून निसटून दरवाजावर दाण करून आदळला. त्या दोघांपैकीं कोणावर त्यांचा रोंख होता हें मात्र समजलें नाहीं. पण दोघेही लवकर बाहेर पडले म्हणून बरें झालें.

हा सर्व प्रकार लीला दाराच्या आड राहून बाहेरूनच पहात होती. कारण भीतमिुळें तिला आंत जाववेना. आनंदराव बाहेर पडतांच, " ताईचें नांव कां निघालें होतें, बाबा कां संतापलें होतें, तुम्ही कुणाच्या लग्नाच्या गोष्टी बोलत होता ? " वगैरे बरेच प्रश्न त्या एवढ्याशा मुलीनें केलें. पण आनंदराव अगदीं खट्टू झालेले व रागावलेले असल्यामुळें त्यांनीं त्या सुकुमार व उत्सुक मुलीच्या विचारण्याकडे मुळींच लक्ष्य दिलें नाहीं. ते तडक बंगल्यांतून बाहेर पडून रस्त्यावर आले. तेथें त्यांची व इंदिरा आणि मोहना यांची गांठ पडली. ते एकदम मोहनेला म्हणाले—

" मीं सरदारसाहेबांजवळ गोष्ट काढली होती. आमच्या लग्नाला संमति द्यावी असें मीं त्यांना म्हटलें. पण जणुं मीं त्यांचा अपमान केला असें उत्तर त्यांनीं मला दिलें. संतापले काय, ओरडले काय, वरसदिशीं अंगावर काय आले, नाहीं नाहीं ते प्रकार त्यांनीं केले. आतां माझा सर्व भरंवसा काय तो तुझ्यावर आहे. एकाएकीं कोणतीही गोष्ट होत नसते. तुझ्या वडिलांनीं आज माझा अपमान केला आहे, करूं दे. तुझ्याकरितां, मोहने, केवळ तुझ्याकरितां मी तो अपमान सहन करितों, बरें का ? माझ्या विनंतीचा ते योग्य विचार करतील अशीही वेळ येईल; धीर धरला पाहिजे. त्यांच्या मनांतील विकल्प व गैरसमज मात्र काढून टाकण्याचा प्रयत्न आम्हीं दोघांनींही केला पाहिजे. "

इंदिरा म्हणालीः—" डॉक्टर, आम्ही दोघांनींही ' असें आपण म्हटलें. तेव्हां मोहनेचेंही मत तुम्हांला अनुकूल आहे असा भास होतो. हें खरें कीं काय ? "

" होय, अगदीं खरें. आमचें परस्परांचें एकमेकांवर प्रेम जडलें आहे. आक्कासाहेब, तिच्या माझ्यामध्यें उत्पन्न झालेलें प्रेम हें कांहीं लहान मुला-मुलींचें प्रेम नव्हे. आपल्या वडिलांनीं जरा मनांत आणलें तरी हें जडले-लें प्रेम त्यांना नष्ट करतां येणार नाहीं. "

" काय हो डॉक्टर, आमच्या घरांत येण्याची बाबांनीं तुम्हांला अगदीं बंदी केली ? तुमच्या बोलण्यावरून तर तसें दिसतें. "

" होय, माझ्या दारांत पाऊल ठेवूं नका असें ते म्हणाले. पण मी म्हणतों, आपण तरी माझ्याविरुद्ध जाऊं नका. मोहनेला माझ्यानें सोडवत नाहीं. "

इंदिरा हळूच पण निश्चयानें म्हणालीः—" छे छे छे ! आनंदराव, तेवढी गोष्ट मात्र काढूं नका. तुम्हीं मनांत आणलें आहे तसें कधीं सुद्धां होणार नाहीं. तुम्ही हा नाद..." आनंदराव बेपर्वाईनें म्हणाले:— " समजलों. समजलों. तुम्ही तरी त्यांचीच मुलगी ना ? बीज तसा अं-कुर असावयाचाच.: त्यांच्याप्रमाणें तुमचेंही मन माझ्यासंबंधानें कलुषित असणार. पण मी मात्र तो तुमचा ग्रह बदलण्यासाठीं शक्य तेवढी खट-पट करणार. व मोहनेशीं माझें लग्न व्हावें म्हणून मी हें सर्व करणार. कारण ती माझी झालीच पाहिजे. " नंतर मोहनेकडे वळून ते कोमल स्वरानें म्हणाले:—" तूं माझ्याशीं इमानानें रहा एवढेंच माझें सांगणें आहे. "

असें बोलून आनंदराव भराभर पावलें टाकीत निघाले. इंदिरा त्यां-च्याकडे पहात उभी राहिली. पुढें आपल्यास खात्रीनें त्रास होणार असें तिला वाटलें; पण तो त्रास किती दुःसह होईल याची मात्र कल्पना तिला झाली नाहीं.

# प्रकरण १७ वें.

—:o:—

## पुनः तोच चेहरा.



मोहनेच्या मनामध्यें परस्परविरुद्ध अशा विचारांचें काहूर माजून राहिले. आज्ञापालन करावें, कीं आज्ञाभंग करावा? कर्तव्याचा सरळ मार्ग स्वीकारून आपल्या वडिलांची आज्ञा शिरसा वंद्य करून त्या प्रमाणें वागावें, कीं, जन्मापासून योग्य कोणतें, व वर्ज्य कोणतें यासंबंधानें ज्या कल्पना हृदयामध्यें बिंबून राहिल्या होत्या त्या झिडकारून टाकून एकदम घरांतून बाहेर पडून आनंदरावांची अर्धांगी व्हावें? वाचकहो, सध्यांच्या काळीं स्त्री–शिक्षणाचा प्रसार इतका जारीनें सुरू झाला असतांना एका सुशिक्षित तरुणीची अशी हकीकत लिहिणें हें शोचनीय तर खरेंच, परतु असा प्रकार येऊन ठेपला होता येवढी गोष्ट खरी.

आनंदरावांनीं मोहनेबद्दल मागणी केली त्याच दिवशीं आनंदराव निघून गेल्यानंतर सर्जेरावांनीं तिला आपल्या समोर बोलावून आणलें व आपला तोफखाना सुरू केला. त्यांनीं बिलकूल शिल्लक ठेविलें नाहीं. जितके म्हणून निंदाव्यंजक शब्द त्यांना आठवले, तितक्यांचा भडिमार त्यांनीं तिच्यावर केला. आणि सरते शेवटीं 'आनंदरावांशीं लग्न करून घेण्याचा कोणताही विचार मनांत आणशील तर खबरदार' अशी त्यांनीं तिला सक्त ताकीद दिली. आनंदराव तेथें नव्हते, तथापि त्यांच्यावरही अपशब्दांची वृष्टि झालीच. सरदारसाहेब म्हणाले:—'आनंदराव आपल्या धंद्यामध्यें तरबेज आहेत, तेवढी गोष्ट खेरीज करून इतर दृष्टींनें पाहिलें तर त्यांचें वर्तन आपल्याला बिलकुल पसंत नाहीं. अशा गृहस्थाला कांहीं झालें तरी मी आपल्या घरांत पाऊल घालूं देणार नाहीं.' वगैरे वगैरे

हेच शब्द त्यांनीं पुनः पुनः आविर्भाव करून उच्चारिले. एखाद्या रंग-भूमीवर हा प्रयोग झाला असता तर तितका तो जोरदार तरी वठला असता. पण तेथें त्याचा कांहींच परिणाम झाला नाहीं. आणि तो होणार तरी कशानें! आनंदराव तर ऐकावयाला जवळ नव्हतेच. मोहना होती, पण यामुळें ती जास्तच चिडली. ती कांहीं एक न बोलतां वडिलांजवळून निघून गेली. वरवर तरी ती फारच शांत दिसली. सरदारसाहेबांना वाटलें कीं, आपला उपदेश तिच्या मनावर ठसला, व आपलें बोलणें तिला पटलें. पण अंतर्यामीं मात्र मोहनेनें आपला इष्ट हेतु साध्य करून घेण्याची इच्छा कायम ठेविली होती.

मोहना स्वभावानें अगदीं निष्काळजी, एककल्ली व अल्लड अशी होती. मी तुझी एकांतीं गांठ घेत जाईन असें आनंदरावांनीं सांगितल्याबरोबर ती भाळली. दररोज संध्याकाळीं रोग्याकडे जाणें अगदींच अवश्य नसलें म्हणजे सरदारसाहेबांच्या बंगल्यासभोंवतीं असलेल्या गर्द झाडींत आनंदराव आपले ठेवल्यासारखे हजर असावयाचे. मोहनेला या ठिकाणीं येऊन गुप्तपणें गप्पागोष्टी करण्यास मुळींच कठीण जात नसे. परंतु असा प्रकार फार दिवस चालू राहणें शक्य नव्हतें. आपण चोरटें कर्म करितों असें मनांत येऊन तिची तिलाच लाज वाटूं लागली व न जाणो आपलें कृत्य उघडकीस येईल कीं काय अशी तिला भीति वाटूं लागली. संध्याकाळच्या अंधारांत मोहना कांपत कांपत हळूंच बंगल्यांतून बाहेर पडून त्या गर्द झाडींत आली कीं, डोळयास पाणी आणून ती आनंदरावांना म्हणे 'आनंदराव, मला इकडे येण्याची भीति वाटते हो. ही आतां शेवटचीच भेट. इथें पुनः यावयाला मला धीर होत नाहीं" आनंदरावही तिची कशी तरी समजूत घालून पुनः दुसरे दिवशीं तिनें तेथें यावें एवढी तजवीज करून मग तिचा निरोप घेत असत.

अरेरे, भोळी बिचारी मोहना! आनंदरावांनीं तिच्यावर आपलें मोहनी जाल पसरलें. त्या जाळयांत सांपडण्यास तिला फार वेळ लागला नाहीं. त्यांनीं तिला एक युक्ति सांगितली, ती तिला फार पसंत पडली. ते तिला म्हणाले:—"माझे प्राणप्रिये मोहने, अशा दुःखद स्थितींत किती दिवस

काढावयाचे बरें ? आतां असें करून चालावयाचें नाहीं. या स्थितीचा शेवट लावण्याला एकच युक्ति आहे. तूं व मीं कोठेंतरी दुसरीकडे जावें व लग्न करून घेऊन मग परत यावें. मोहने, तूं अशीच जर येथें राहिलीस तर आपलें लग्न होण्याची आशा सुद्धां नको. सर्जेरावाचें आपल्या उच्च घराण्याबद्दलचें वेड केव्हांही कमी होणार नाहीं. त्याचा दुराग्रह कायमच राहणार. त्यांचा हट्टी स्वभाव तुला माहीत आहेच. परंतु एकदां का आमचें दोघाचें लग्न झालें असें त्यांना समजलें कीं, मग त्यांच्याकडून माफी मिळण्यास उशीर लागणार नाहीं. मोहने, तुला सांगून ठेवतों कीं, गगोट व फटकळ स्वभावाचे लोक धडाधड बोलून जातात, पण त्यांच्या मनांत राग फार वेळ रहात नाहीं, असा सर्वसाधारण नियम आहे. तेव्हां मी म्हणतों त्याप्रमाणें आपलें दोघांचें एकदां 'शुभमंगल सावधान' झालें कीं, मग सर्जेरावांच्या बापाची सुद्धां........." हे शेवटचे शब्द उच्चारतां उच्चारतां आनंदरावांनीं आपली जीभ चावून घेतली. मोहनेची चित्तवृत्ति भावी विवाहसौख्याच्या मनोराज्यांत गुंग झालेली असल्यामुळें ह्या शेवटच्या बोलण्याकडे तिचें लक्षच गेलें नाहीं. तिच्या डोळ्यांत पाणी भरलें व तिनें दीर्घ श्वास टाकिला आणि शेवटीं एकदांचें आनंदरावांच्या म्हणण्यास तिनें 'हो' म्हटलें. नंतर सर्व बेतबात करून जुळवाजुळव करून त्या दोघांनीं एक नक्की दिवस ठरविला व मग मोहनेचा निरोप घेऊन आनंदराव निघून गेले. इकडे मोहनाही त्या दिवसाची मोठ्या उत्कंठेनें वाट पहात राहिली. तिला एकेक दिवस म्हणजे एकेक वर्षाप्रमाणें वाटूं लागला.

कलावतीला मरून सुमारें दोन महिने झाले. रात्रीची वेळ; आकाशांत काळेभोर ढग येऊन वरचेवर पावसाच्या सरीवर सरी येत होत्या. आणि जास्त पावसाचीं चिन्हें दिसत होतीं. जेवणास थोडा अवकाश होता म्हणून सर्जेरावांच्या खोलींत इंदिरा, मोहना व लीला अशा सर्वजणी जाऊन बसल्या होत्या. मायलेकींचें लडिवाळपणाचें व प्रेमाचें संभाषण चाललें होतें. थट्टा मस्करी व विनोद चालला होता. पण मोहनेचें चित्त मात्र थाऱ्यावर नव्हतें. ती वरचेवर कावरीबावरी होई. आनंदराव आज

तिची गांठ घेण्याकरितां त्या गर्द झाडींत येणार होते, आणि घरांतून दोघांनीं केव्हां निघून जावयाचें, कसें जावयाचें, कुठें जावयाचें हा सर्व बेत आजच ठरणार होता. मोहना अगदीं अधीर झाली होती. आनंदराव येऊन आपली वाट पहात असतील काय ? मी लवकर गेलें नाहीं तर ते निघून जातील कीं काय ? हीच तिला काळजी पडली होती. इतक्यांत जेवणाची तयारी झाल्याची वर्दी आली. ती मोहनेच्या पथ्यावरच पडली. सर्व मंडळी जेवणाकरितां निघून गेली, पण मोहना गेली नाहीं. माझें आज संध्याकाळपासून कपाळ दुखत आहे, अन्नावर वासना नाहीं, मी निजतें, असें सांगून ती आपल्या खोलींत गेली. नंतर जवळपास कोणी नाहीं, सर्व माणसें जेवणांत गुंतलीं आहेत असें पाहून एका दारांतून ती गुप्तपणें बंगल्याच्या बाहेर पडली. प्रेमानें वेडी झालेली मोहना त्या गर्द झाडींत एकदम बेधडक शिरली. तेथें एका झाडास टेंकून आनंदरावांची स्वारी उभी होतीच.

मोहना ह्मणाली, " आनंदराव, मला वाटलें आपण माझी वाट पाहून पाहून कंटाळून निघून गेलां असाल. मी बाबांच्या खोलींत बसलें होतें. मला वाटलें आज कांहीं आपणाला बाहेर जातां येत नाहीं. "

" मोहने, मध्यें एकच रात्र व एकच दिवस. तेवढा गेला कीं झालेंच. "

मोहना अगदीं भिऊन गेली व तिचे ओंठ थरथर कांपूं लागले:—" पण आनंदराव, ही गोष्ट माझ्या हातून होईल असें मला वाटत नाहीं. हें भयंकर कर्म—आनंदराव, माझ्या बोलण्याकडे लक्ष्य आहे ना ?—म्हटलें, हें कर्म फार भयंकर आहे हो. "

" काय, भयंकर काय आहे ? " आनंदरावांनीं विचारिलें.

" घरांतून उठून निघून जाणें हें. अशीं कृत्यें केलेलीं मीं पुस्तकांत वाचलीं आहेत. पण व्यवहारांत असें कोणीं खरोखरी केल्याचें मला माहीत नाहीं. ती वेळ जशी जशी जवळ येत जाते तसतशी मी त्यापासून माघार घेईन कीं काय असें मला वाटूं लागलें आहे. "

" मोहने, उगी रहा. तूं याचा इतका पोक्त विचार करितेस त्याचीच

आवश्यकता नाहीं. बाप जेव्हां फाजील निर्दय होतो तेव्हां त्याच्या त्या निर्दयपणास आळा घालण्याचा मुलीला सुद्धां अधिकार पोंचतो, समजलें ? खचित तुझें मन आतां डळमळत नाहीं ना ? मोहने, आमचा जो बेत झालेला आहे त्यांत आडकाठी आणण्यास तूंच कारणीभूत होणार नाहींस ना ? आयत्या वेळेला तू माझ्यापासून परत फिरणार नाहींस ना ? ”

आनंदरावांचें हें बोलणें ऐकून मोहनेला रडें कोसळलें. ती हुंदके देत ह्मणाली:—“ नाहीं, खचित मी तुह्मांला टाकून परत जाणार नाहीं. पण कां कोण जाणे, मला आपलें आज प्रत्येक गोष्टीचें भयच वाटत आहे. पुढें याचा परिणाम काय होईल याचीच मला जास्त भीति वाटत आहे. ”

मोहनेची नीट समजूत घालण्याकरितां आनंदरावांनीं आपल्याकडून अगदीं शिकस्त केली. गोड गोड भाषणें, खुलासे, पुराणांतले दृष्टांत; वेदांताच्या गोष्टी इत्यादि सांगून त्यांनीं तिचे कान अगदीं भारून टाकिले. त्या दोघांनीं आज जें कर्म करण्याचें मनांत आणलें होतें तें कांहीं अश्रुतपूर्व नव्हे; मागें पुष्कळ वेळां असें झालें आहे, व पुढेंही अनेक प्रसंगीं हें घडून येणार. प्रवृत्ति व सदसद्विवेकबुद्धि यांचा जेव्हां विरोध येतो व त्यांची स्पर्धा सुरू होते तेव्हां बुद्धीचा पाडाव हा व्हावयाचाच !

आनंदराव पुनः प्रेमानें म्हणाले:—“प्रिये, तुझ्यावाचून मला या जगांत राहणें नको; म्हणून तूं मला सोडून जाऊं नयेस. ”

आनंदरावांशिवाय आपणालाही रहावणार नाहीं असें मोहनेला वाटलें. तिनें आपलें गोंधळून गेलेलें मन शांत होऊं दिलें व समाधानवृत्ति ठेविली. झालें, एकामागून एक भीति हळुंहळू नाहींशी झाली. शेवटीं आपणास कोणी न पाहतां कोणाकडूनही हरकत न येतां, कसें निसटून जातां येईल याचा बेत त्या दोघांमध्यें झाला. त्यांची पळून जाण्याची वेळ जवळ येत चालली. बारा आणि बारा चोवीस तासच काय ते मध्यें राहिले.

परंतु आतां बराच उशीर झाला होता. आनंदरावांची जाण्याची वेळ झाली. मोहनेलाही लवकर घरीं परत जावयाला पाहिजे होतेंच. उशीर झाला तर घरीं बोभाटा होईल, आतां पुरे,हेच शेवटचे शब्द, असें किती

वेळां तरी बोलल्यावर शेवटीं एकदांचे आनंदराव तिला सोडून निघाले. मोहना कांहीं वेळ तशीच तेथें स्तब्ध राहिली. चलबिचल झालेलें हृदय स्वस्थ करण्याकरितां व त्या सौख्यदायक गुप्त भेटीचे आल्हादकारक विचार मनांत आणीत ती तेथेंच उभी राहिली. "आतां थोडे तासच काय ते मध्यें आहेत, तेवढे गेले आणि सर्व कांहीं मनाजोगें झालें तर मग मी त्यांची कायमची होणार! अहाहा!!" इत्यादि मनोराज्यांत ती अगदीं गुंग होऊन गेली. पण लवकरच ती शुद्धीवर आली. तिनें आपले विसकटलेले केश सावरले. अंगावरील शाल अस्ताव्यस्त झाली होती ती नीट पांघरून घेतली व ती घरीं जाण्याकरितां निघाली. इतक्यांत काय झालें कोण जाणे, ती मोठ्यानें ओरडली व तिच्या सर्वांगांत कांपरें शिरलें. पलीकडे गर्द झाडींत आपणाकडे पहात कोणसें उभें राहिलें आहे असें तिला दिसलें. आकृति मनुष्याची होती, पण चेहरा अगदीं अनोळखी होता. आस्ते आस्ते ती आकृति जवळ येऊन ठेपली व हलक्या स्वरानें मोहनेला ह्मणाली:—"मोहने, आनंदरावांशीं तूं कां संबंध ठेवतेस?"

त्याबरोबर मोहना अगदींच भेदरून गेली. ती स्तब्ध खांबासारखी एका झाडाला टेंकून उभी होती. तिची मुद्रा कावरीबावरी झाली व तिच्या तोंडांतून शब्द निघेना. त्या आकृतीच्या तोंडांतून आणखी पुढील उद्गार निघाले:—"आनंदरावांशीं बिलकुल संबंध ठेवूं नकोस. तुला तुझ्या सुखाची अपेक्षा असेल, तुझा जीव तुला हवा असेल, तर त्यांच्याशीं तूं अगदीं संबंध ठेवूं नकोस. कमळजेला त्यानें काय केलें तें विचार. विषारी पदार्थांचा उपयोग तूं करतोस काय असें त्याला विचार." हे शब्द ऐकूं आल्यानंतर ती आकृति व त्याबरोबर तो आवाजही नाहींसा झाला. पण चाहूल झाल्याचा आवाज यत्किंचित् सुद्धा ऐकूं आला नाहीं. मोहनेची अगदीं त्रेधा उडून गेली. हा काय प्रकार आहे तिला कळेना. ती मोठ्या बुचकळ्यांत पडली.

इकडे आनंदराव बंगल्याच्या आवाराच्या बाहेर पडून रस्त्यावर आले, इतक्यांत त्यांना आठवण झाली कीं, उद्यां संध्याकाळचा आपला जो बेत झाला आहे त्यासंबंधाचा कांहीं मजकूर मोहनेला सांगावयाचा

राहिला. त्याबरोबर ते तसेच मागें परतले. ते पांच सहा पावलें चालून गेले असतील नसतील इतक्यांत त्यांच्यापासून थोड्याच अंतरावर, त्यांच्या अगदीं वाटेवर, झुबला व टोपी घातलेला एक मनुष्य उभा राहिलेला त्यांना दिसला- आनंदरावांना वाटलें, या बंगल्यांत कोणी तरी परगांवचा मनुष्य कामाकरितां आला असावा, व तो आपण बाहेर गेल्यानंतर बंगल्यांत शिरला असावा. तरी पण आनंदराव थोडेंसें चपापलेच. सरदार-साहेबांच्या बंगल्यांत आपण अशा वेळीं अशा प्रकारें आलों यांत आपला कांहीं सद्धेतु नाहीं. कदाचित् हा इसम आपलें सर्व इंगित बाहेर पाडील म्हणून ते गोंधळून गेले. इतक्यांत त्या माणसानें आपल्या डोकीची कानटोपी काढली. त्याबरोबर आनंदरावांनीं पूर्वीं जो चेहरा पाहिला होता, तोच चेहरा पुनः त्यांना दिसला! तो पाहतांच त्यांच्या उरांत धडकी भरली व त्यांचें तोंड काळें ठिक्कर पडलें.

पेठेंतील तेरा नंबरच्या घरांत ती बाळंतीण ( कलावती ) मेली त्या रात्रीं जिन्यांत आनंदरावांना जो चेहरा दिसला तोच हा चेहरा! अगदीं हुबेहुब तोच! त्याच्या कल्ल्याचे ते दाट काळेभोर केस अगदीं तसेच, पांढरी फटफटीत मुद्रा तशीच, डोळे वटारलेले तसेंच, व रूपही तसेच हिडीस! आपल्यमागें कोणी समंध लागला कीं काय अशी त्यांना भीति पडली व ते मट्दिशीं खालीं बसले. आपल्यासमोर जो चेहरा दिसत आहे, तो माणसाचा कीं भुताचा त्यांना समजेना. आपण शुद्धींत आहों कीं नाहीं हें समजावें म्हणून त्यांनीं आपल्या हातानें आपणास
घेतला. पुनः वर पाहतात तों ती आकृती तेथें नाहीं

अगदीं पार नाहींशी झाली. गेली तरी कुठें?
सांगतां येईना. त्यांची मति कुंठित झाली. आनंद
घमेंड असे कीं आपण फार शूर, फार धीट, इ
नाहीं. पण आतां त्यांची ही घमेंड फार जिरून
खेतांवर आनंदरावांचा अगदीं विश्वास नसे. परंतु
मागें त्या दुस्मान् रात्रीं आपणास जो चेहरा दि
भयंकर चेहरा आजही दिसला, सबब ही व्यक्ति म

पिशाच योनींतील आहे, ती आपणांस त्रास देण्याकरितां येते व आपणास भय दाखविते असेंच आतां त्यांच्या मनानें घेतलें. आनंदराव अगदीं घाबरून जाऊन त्यांचें सर्वांग घामानें दरदरून गेलें व लटलट कापूं लागलें. त्यांची मुद्रा पालटली. थोडा वेळ ते जागच्या जागीं उभे राहिले व नंतर धीर करून मोहनेला सोडून गेल्या ठिकाणीं ते आले. झालेल्या हकी-कतींतलें एक अक्षर सुद्धां तिला कळवावयाचें नाहीं असा त्यांनीं निश्चय केला. पण त्यांना पाहिल्याबरोबर धावत येऊन मोहनेनें त्यांना घट्ट मिठी मारली व ती घाबरून हुंदके देऊं लागली. आपल्याप्रमाणें तिलाही भीति वाटलेली पाहून आनंदरावांना अत्यंत आश्चर्य वाटलें. ते म्हणाले:—"मोहने, माझे लाडके, याला काय म्हणावयाचें? तुला काय होत आहे?"

ती स्फुंदत स्फुंदत म्हणाली:—"आनंदराव, अहो आनंदराव, आपण पाहिलें काय? तेथें—त्या तेथें—कोणसें उभें होतें, त्याला तुह्मीं पाहिलें काय?"

आनंदरावांची छाती जास्तच धडधडूं लागली. तथापि धैर्यानें त्यांनीं तिला विचारिलें:—"कुठें कोण उभें होतें?"

"कोण उभें मला माहीत नाहीं. त्या झाडांमध्यें, माझ्या मागच्या बाजूला ती आकृति उभी होती. मीं सहज कायसें खसपसलें म्हणून मागें वळून पाहिलें, तेव्हां मला ती दिसली. प्रथम मला वाटलें ती कुणी तरी बाई असावी, आवाज अगदीं स्त्रीसारखा होता. पण नंतर वाटूं लागलें कीं, तो पुरुष असावा. खात्रीनें असें कांहींच मला सांगतां

...श्चर्यानें विचारिलें:—"आवाज? म्हणजे ती आ-
... काय?"

..., पण अगदीं वाईट बोलली हो. आपल्याविषयीं
... मला सुचाविलें. ती बोलली नसती तर मला
... तरी फाजोल चौकसखोर मनुष्य आम्ही एकांतीं बोलत
...याकरितां आला असावा." नंतर ती एकाएकीं
...—आनंदरावही त्या योगें दचकले—ह्मणाली:—

" आनंदराव, तें कांहीं खरें नाहीं, होय ना पण ? होय ना पण ? "

" शुः ! शांत हो, शांत हो, काय म्हणतेस तें नीट सांग. काय खरें नाहीं ? " आनंदराव हळूंच म्हणाले, कारण आपलें बोलणें कोणास ऐकूं जाईल कीं काय म्हणून ते भ्याले होते. मोहना ह्मणाली:—" आपल्यासंबंधानें सावध रहा म्हणून त्या आकृतीनें मला सांगितलें. ती मला ह्मणाली—आनंदरावांबरोबर कोणताही संबंध ठेवूं नकोस. तुला सुखाची अपेक्षा असेल तर—तुझा जीव तुला हवा असेल तर—संबंध ठेवूं नकोस, असें मला तिनें बजावलें. "

आनंदराव मध्येंच तिरस्कार दाखवून ह्मणाले:—" समजलों, समजलों. कोणी तरी दुष्ट विघ्नसंतोषी मनुष्यानें आपला हा गुप्त बेत जाणून तो विसकटण्याची खटपट चालविली आहे असें दिसतें. "

मोहना ह्मणाली:—" माझें पुरतें ऐकून तरी घ्या आपण. कमळजेला काय केलेंत, आपण विषारी पदार्थांचा उपयोग करीत असतां काय असें आनंदरावांना विचार, असें ती मला ह्मणाली. "

आनंदराव गोंधळले. थोडा वेळ स्तब्ध राहून ते ह्मणाले:—" काय ? कमळजा ? कुठली कोण ती ?

मोहनेचें स्फुंदणें वाढून तिला आतां रडें कोसळलें:—" मला माहित नाहीं; आपणाला तरी माहीत आहे काय ? "

आनंदराव:—"नाहीं, मला त्या नांवाची कोणीही स्त्री माहीत नाहीं. "

मोहना कांपऱ्या कांपऱ्या ह्मणाली:—" बरें, पण विषारी पदार्थांची काय हकीकत ? 'ते विषारी पदार्थांचा उपयोग करितात काय, विचार,' याचा अर्थ काय ? "

आनंदराव:—" त्याचा अर्थ ' विषारी औषधांचा उपयोग ' असाच केला पाहिजे. डॉक्टरकीचा धंदा करणारा मनुष्य असलीं औषधें जवळ बाळगणारच. विष असलें तरी नियमित प्रमाणानें दिलें तर त्यापासून गुण येतो म्हणून सर्व डॉक्टर लोकांजवळ अशीं विषारी औषधें असतात. मग यांत विशेष तें काय आहे ? "

आनंदरावांच्या आवाजावरून व मुद्रेवरून त्यांना फार भय वाटल्या-

सारखें दिसूं लागलें. म्हणून मोहना न्याहाळून त्यांच्याकडे पाहूं लागली. पण आनंदरावांचें लक्ष्य दुसरीकडेच होतें. त्यांनीं तिला एकदम विचारिलें:—" तो चेहरा फिकट असून त्याला कळे होते काय ? "

मोहना:—" मला स्पष्ट कांहींच दिसलें नाहीं. चेहरा मात्र फिकट दिसला खरा. चांदणें पडलें आहे म्हणून कदाचित् मला तसा भास झाला असेल. कां बरें ? आपणालाही तो चेहरा दिसला कीं काय ? मग चमत्कारच म्हणावयाचा ! "

आनंदराव आपल्या मनाशींच पुटपुटले:—" मीं तो चेहरा दोन्दां पाहिल्यासारखें वाटतें. ती बाई मेली त्या रात्रीं खोलीच्या बाहेर जिन्यांत एकदा पाहिला व आतांच मी इकडे परत येत असतांना पुनः आणखी पाहिला. "

मोहना घाबरून मोठ्यानें ह्मणाली:—" पेठेंतील त्या घरांत बाळंतिणीच्या खोलीबाहेर पाहिलेला तोच हा चेहरा ? छे ! तो कध्धीं असूं शकणार नाहीं. ह्या ठिकाणीं तो कसा यावा ? "

आनंदराव:—" तें मला नाहीं माहीत. मोहने, तो मानवी आहे कीं परयोनींतील आहे हें समजत नाहीं. पुरुष आहे कीं बायका आहे हें सुद्धां सांगतां येत नाहीं. "

मोहना:—"आपण त्याला कुठें पाहिलें ? तो मग कुणीकडे गेला ? "

आनंदराव:—" मीं त्याला रस्त्यांत पाहिलें. पण तो मग कोठें गेला मला दिसलें नाहीं. तो एकाएकीं नाहींसा झाला असें मला वाटतें. तो पूर्वीं जिन्यांत दिसलेला चेहरा-तोच हा असावा एक; किंवा दुसरा कोणी तरी नीच व दुष्ट मनुष्य मनांत कांहीं तरी वाईट हेतु धरून ह्या ठिकाणीं येत असला पाहिजे एक. त्याला असा कोरडा उडविला पाहिजे कीं बस्स ह्मणावें ! या ठिकाणीं तुझ्या बापाच्या बंगल्याच्या हद्दीच्या आंत त्याला कोणीं येऊं दिलें असेल ? तो तुझा माग काढीत होता कीं माझा ? मला टेहळीत होता कीं तुला ?"

मोहना:—" आनंदराव, त्या रात्रीं चेहरा दिसला तो कोणाचा हो!"

आनंदराव:—" कोणाचा हें समजलें असतें तर मग काय ! "

मोहनाः—"त्यानेंच त्या बाळतिणिच्या झोंपेच्या औषधांत विष घातलें ह्मणे. लोक बोलत होते तें मी ऐकलें आहे."

आनंदराव रागावून म्हणाले:—"त्याचप्रमाणें आपल्याहि सुखांत विष कालविण्याची त्याची खटपट सुरू आहे असें दिसतें. माझ्याविरुद्ध तुझे कान भरविण्याचा तो प्रयत्न करीत आहे. मोहने, माझे लाडके, त्याच्या-मध्यें व माझ्यामध्यें तुला आतां निवड केली पाहिजे. त्याच्या निंद्य व खोट्यानाट्या भाषणामध्यें व माझ्या खऱ्याखुऱ्या व उत्कट प्रेमामध्यें निवड झाली पाहिजे."

मोहना अगदीं काकुळतीस येऊन ह्मणाली:—"आनंदराव, असें नका हो बोलूं. सारें जग जरी एकीकडे झालें तरी देखील माझ्या मनांत आप-ल्यासंबंधानें काळेंबेरें येणार नाहीं. आनंदराव, आपण आतां माझे भ्रतार होणार. माझ्यावर राग धरूं नये, बरें कां? ती आकृति जे शब्द बोलली तेच फक्त मीं उच्चारले. ते मीं तसेच मनांत ठेवले असते तर माझ्या हृदयामध्यें ते डाचत राहिले असते."

आनंदरावः—"तुझ्यावर, आणि हा आनंदराव रागावेल? छे! छे! ती गोष्ट मनांत सुद्धां आणूं नकोस. ज्यानें आमची दोघांची ताटातूट करण्याचा प्रयत्न केला त्याच्यावरच फक्त मी रागावलों. आतां एक रात्र आणि एकच दिवस. मग त्याची आणि सर्व जगाची सुद्धां फिकीर बाळ-गण्याचें मला कारण नाहीं. चल तर आपण आपआपल्या तयारीला लागूं या."

नंतर मोहना ज्या रस्त्यानें हळूच चोरून आली होती त्या रस्त्यानें ह्मणजे मागच्या बाजूच्या दरवाज्यानें बंगल्यांत गेली. ती सुरक्षित जाऊन पोंहचेपर्यंत आनंदराव तेथें उभे राहिले व नंतर आपल्या घराकडे जाण्या-करितां निघाले.

इकडे मोहनेबद्दल घरांत अगदींच बोभाटा झाला नाहीं असें नाहीं. जेवण आटपल्यानंतर इंदिरेला एक जिन्नस पाहिजे होता, तो मोहनेजवळ होता, ह्मणून तिनें मोहनेला हाक मारली, पण उत्तर नाहीं; ह्मणून इंदि-रेनें तिच्या खोलींत जाऊन पाहिलें तर तेथेंही ती नव्हती. माडीवर कोठें

नाहीं; खालींही कोठें दिसेना. तेव्हां शेवटीं इंदिरेनें हैबतीला विचारिलें:—"हैबती, ताई कुठें गेली ? तुला तरी माहीत आहे कां ?"

हैबती आयताच सांपडला. रोज संध्याकाळीं अंधारांत मोहना चोरून बाहेर पडून आनंदरावांची गांठ घेते, त्यांची दोघांचीं खलबतें होतात ही गोष्ट हैबतीला माहीत नव्हती असें नाहीं. परंतु त्याची मोहना भारी लाडकी, तिच्यावर त्याचें फार प्रेम होतें, ह्मणून त्यानें ही गोष्ट कोणास कळविली नव्हती. परंतु आतां प्रत्यक्ष इंदिरेनेंच विचारल्यामुळें तो अगदीं गोंधळून गेला; काय सांगावें त्याला सुचेना.

इंदिरेनें पुनः संतापून विचारिलें:—"हैबती, अरे हैबती, तुला ऐकूं येते ना ? मी विचारते कीं ताई कुठें गेली, तुला माहीत आहे काय ? तूं उत्तर कां देत नाहींस ? बहिरट मेला !"

सरते शेवटीं बागेकडे बोट दाखवून हैबती ह्मणाला:—"तिकडे आहेत ना त्या ? त्यांना कांहीं थंडी होणार नाहीं. त्यांनीं आपली शाल अंगावर घेतली आहे. येतील आतां इतक्यांत. काळजी नको करायला."

"तिच्याजवळ दुसरें कोण आहे ?"

"मला वाटतें आनंदराव डॉक्टर असावेत. पण त्या फार वेळ त्यांच्याशीं बोलत राहणार नाहींत. त्या कधींच फार वेळ बाहेर रहात नाहींत. आतां येतील, आक्कासाहेब."

इंदिरेची तळव्याची आग मस्तकाला गेली व तिला अत्यंत दुःख झालें. आपल्या अंगावर डोंगर कोसळून पडून आपला चक्काचूर झाला असेंच तिला वाटलें. ह्या अपमानापेक्षां असाच एखादा डोंगर आपल्या घरावर पडून सगळ्यांचा चुराडा झाला असता तरी बरें असें तिला वाटलें. इतक्यांत कोऱ्या लुगड्याचा खडखड आवाज तिला ऐकूं आला. त्यावरून मोहना बाहेरून येऊन आपल्या खोलींत गेली इतकें इंदिरेनें जाणलें.

आनंदरावांची चोरून गांठ घेऊन मोहना आली होती, आणि हैबतीच्या बोलण्यावरून तर अशा त्यांच्या गांठी नेहमीं पडतात हें बाहेर आलें ! झालें. इंदिरेचें काळीज चर्रर्र झालें. हा अपमान तिला फारच दुःसह झाला !

# प्रकरण १८ वें.

—:o:—

## पत्रें.

—:o:—



दुसरे दिवशीं सकाळीं सर्जेरावांच्या बंगल्यांत आश्चर्य वाटण्याजोगा एक प्रकार घडून आला. हैबती पोस्टऑफिसांत जाऊन टपाल घेऊन आला व नेहमींप्रमाणें त्यानें तें इंदिरेच्या स्वाधीन केलें. पत्रें तीन होतीं. एक सर्जेरावांच्या नांवचें होतें, तें लागलीच तिनें त्यांच्याकडे दिलें. दुसरें खुद्द तिच्याच नांवचें होतें. तिसऱ्या पत्रावर ' श्रीमंत राजश्री जहागिरदारसाहेब ' असा पत्ता लिहिला होता, त्याकडे इंदिरा एकसारखी पहात बसली. सर्जेराव आपलें पत्र वाचण्यांत गुंतले होते. तें वाचून संपल्यावर त्यांनीं विचारिलें:—" तीं दोन्ही पत्रें तुझींच काय ? " ती म्हणाली—" एक माझें आहे आणि एक जहागीरदारसाहेब यांच्या नांवचें आहे. हें पहा. पण तें इथें कसें आलें समजत नाहीं. " सर्जेरावांनीं तें पत्र इंदिरेकडून घेतलें व उलटें सुलटें करून ते पाहूं लागले.

सर्जेरावांनीं त्या पत्रावरील संपूर्ण पत्ता वाचला:—' श्रीमंत राजश्री जहागीरदारसाहेब, संस्थान रूपगड, यांचे सेवेशीं, फुलबन बंगला, रावपुरा, मुक्काम दत्तापूर ' याप्रमाणें पत्ता वाचल्यावर ते इंदिरेला ह्मणाले:—"होय, खात्रीनें हें पत्र त्यांचेंच आहे. ते इथें येणार असले पाहिजेत. मुली, ही त्यांची माझ्यावर मोठीच मेहेरबानी म्हणावयाची. ते व मी पुण्यास होतों त्याला किती तरी वर्षें झालीं ! तेव्हांपासून ते माझ्या घरीं यायचें यायचें ह्मणताहेत. पण आतांच कां बेत झाला समजत नाहीं. कदाचित् हवा बदलण्याचा विचार असेल. "

इंदिरेच्या पोटांत धस्स् झालें. ' घरचें झालें थोडें आणि व्याह्यांनीं धाडलें घोडें ' अशी तिची स्थिति झाली. दररोजच्या घरच्या नडीच भागण्याची पंचाईत. तशांत जहागीरदार साहेबासारखें बडे धेंड पाहुणचारास आल्यावर बराच खर्च करावा लागणार म्हणून इंदिरेला मोठी काळजी उत्पन्न झाली. ती म्हणाली:–" बाबा, पण ते येथें राहाणार नाहींत ना ? त्यांची नीट व्यवस्था इथें कशी जुळेल ? जागा सोयीची नाहीं, सामानसुमान नाहीं,......"

" ते आलेच तर त्यांनीं आहे त्यांत समाधान मानून घेतलें पाहिजे. मी कांहीं जास्त उठाठेव करीत बसणार नाहीं, व तूंही करूं नकोस. मी त्यांना आपलें स्पष्ट सांगेन कीं, मी गरीब माणूस, गरीबाच्या घरची मीठभाकर गोड मानून घ्या; माझें जें काय आहे तें तुमचें आहे, त्यांत आपली सोय करून घ्या. होय, उगीच भीडभाड कशाला हवी ? "

इंदिरा थोड्या वेळानें म्हणाली:–" पण ते कां येत असावेत याची मला अजूनी बरोबर अटकळ करितां येत नाहीं. "

सर्जेराव:–" हं हं. आतां आलें ध्यानांत. ते कांहीं सरकारी कामाकरितां पुण्यास जात असतील. तेव्हां सहज भेटून जावें असें मनांत आलें असेल आणि म्हणूनच त्यांनीं आपलीं पत्रें माझ्या घरच्या पत्त्यावर मागितलीं असावींत. "

इंदिरा:–" तर मग ते निघाले असावेत आणि मागाहून हें पत्र रवाना झालें आहे. "

चिमुकल्या लीलेनें धीटपणानें विचारिलें:–" बाबा, इथून त्यांच्या जहागीरीचा गांव किती लांब आहे हो ? "

सर्जेराव:– " आहे सुमारें वीस कोस बरें कां चिचुंद्रे ! "

सर्जेराव उठतां उठतां इंदिरेस म्हणाले:–" ते आज आले तर शिरापुरीची तयारी असूं दे बरें कां ! "

इंदिरेनें ' होय ' म्हणून सुस्कारा टाकला. तिला घरच्या थोड्या का विवंचना होत्या ? त्यांतच आणखी ही नवीन भर पडली !

आतांशा कांहीं दिवस सरदारसाहेबांची तब्येत थोडी बरी होती, म्ह-

णून सकाळ संध्याकाळ घटकाभर हवा खाण्याकरितां ते बागेंतून हिंडत फिरत असत. त्याप्रमाणें आजही ते गेले होते. इंदिरा स्वतःच्या नांवचें पत्र वाचीत असता सर्जेराव आंत आले. एका कुंडींतील फुलझाडाच्या फांद्या बांधण्याकरितां त्यांना एक दोरीचा तुकडा पाहिजे होता, तो मागण्याकरितां ते आंत आले होते. इंदिरा पत्र वाचीत असल्याचें पाहून ते म्हणाले:-" तुला पत्र आलें आहे तें—"

वाक्य पुरें न करतांच सर्जेराव एकाएकीं थांबले. यामुळें इंदिरेचें हृदय उचंबळूं लागलें. " कमळजेकडून " असें ते म्हणणार होते. आजपर्यंत कमळजेच्या नांवासंबंधीं त्यांनीं मौनव्रत धरिलें होतें. तें आतां नाहींसें होणार असें वाटून तिला जरा आनंद झाला. पण छेः, तसें कांहीं झालें नाहीं. सर्जेरावांच्या मनांत कमळजेविषयीं राग होता. तो अद्याप कमी झाला नव्हता.

इंदिरेनें उत्तर केलें:-"बाबा, हें पत्र पुण्याहून त्या सदासुखराम मारवाड्याकडून आलें आहे. "

" बरें तर " असें जरा ऐकलेंसें न ऐकलें करून सर्जेराव म्हणाले. नंतर इंदिरेनें आणलेला दोरीचा तुकडा घेऊन स्वारी बागेंत निघून गेली. इंदिरेनें पत्र वाचलें, तें पुण्याच्या एका कापडवाल्याकडून आलें होतें. त्याची कापडाची बाकी फार दिवस देणें होती म्हणून त्यानें तगादा केला होता.

लीलेची वेणीफणी करून इंदिरा माडीवर जाऊन मोहना काय करीत आहे हें पाहूं लागली; मोहना आपल्या बिछान्यावर चिंताक्रांत अशी पडलेली होती. त्या दोघी बहिणींपैकीं गेली रात्र जास्त काळजींत व चिंतेंत कोणाची गेली हा प्रश्नच आहे. आधले रात्रीं इंदिरेला हैबतीकडून जी माहिती लागली, त्यामुळें तिला अत्यंत आश्चर्य वाटलें, व ती बिछान्यावर सारखी दुःखी व चिंताक्रांत अशी तळमळत होती. बरें, मोहनविषयीं विचार केला तर तिचीही तीच स्थिति. तिनें व आनंदरावांनीं मिळून जो बेत ठरविला होता तो बेत फार भयंकर आहे असें तिला वाटूं लागलें. अजूनही ह्या वाईट कर्मापासून आपलें अंग काढून घेतां येईल कीं नाहीं या विचारांत ती निमग्न होऊन आपल्या बिछा-

न्यावर सारखी या कुशीवरून त्या कुशीवर लोळत पडली होती. इंदि-रा जवळ येऊन म्हणाली:—" ताई, आतां हें पुरें झालें बरें ? तूं त्यांची—आनंदरावांची—दररोज चोरून गांठ घेत असतेस ती आतां पुरे कर. पण काय ग ताई, तुझ्या बुद्धीला असा विलक्षण भ्रम कसा पडला हा ? "

मोहनेची छाती धडधडूं लागली. आपलें चौर्यकर्म उघडकीस आलें हें पाहून ती कावरीबावरी झाली. आतां अजीबात सर्वच नाकबूल करावें हें बरें असें तिला वाटलें व ती म्हणाली:—" मी चोरून गांठ घेतें असें कोण म्हणतें ? आक्का, तूं आणखी नाहीं नाहीं तो आळ माझ्यावर घालशील. "

इंदिरा:—" ताई, पुरे पुरे. खोटें बोलण्याचे परिणाम कधींही चांगले होणार नाहींत, समजलीस ? रोज संध्याकाळीं तूं त्यांना भेटावयाकारितां चोरून बाहेर जात असतेस. असतेस कीं नाहीं ? नाहीं ह्मणूं नकोस. "

पण आश्चर्याची गोष्ट ही कीं आपलें कृत्य उघडकीस आलें असें समजतांच मोहना जास्तच निगरगट्ट झाली. तिनें आपल्या बहिणीस कांहींच उत्तर दिलें नाहीं.

तथापि इंदिरा पुनः कळवळ्यानें बोलूं लागली. " ताई, मी तुझ्या हिताकारितांच बोलतें बरें. तुझें चांगलें व्हावें म्हणूनच आनंदरावांची संगत सोड असें मी तुला सांगतें. ताई, माझ्या मनानें तर असें ठाम घेतलें आहे कीं, तुला सुख देईल असा तो मनुष्य नाहीं. मग इतर गोष्टींची कितीही अनुकूलता असो. "

मोहना जरा रागानें म्हणाली:—" आक्का, आनंदरावांविषयीं तुझा ग्रह इतका वाईट कसा झाला आहे, याचेंच मला आश्चर्य वाटतें. "

" माझा झाला आहे यांत कांहीं विशेष नाहीं. पण बाबांना देखील ते आवडत नाहींत. तें सर्व असो. पण ताई, मी एक प्रश्न विचारतें चें उत्तर दे. आनंदरावांबरोबर इतकी सलगी करून, इतकीं खलबतें न तुला कोणता हेतु साध्य करून घ्यावयाचा आहे ? "

मोहनेच्या तोंडावर एकदम लाली चढली. स्पष्ट बोलण्याचें तिला धैर्य होईना. पण शेवटीं तिनें उत्तर दिलें:—

" आनंदराव माझ्याशीं लग्न करावें म्हणतात. आत्तांच नाहीं, कांहीं दिवसांनीं–तुझ्या मनाचा सर्व वाईट ग्रह पार नाहींसा झाला म्हणजे. "

इंदिरा:—" छे छे छे छे ! तें तूं मनांत सुद्धां आणूं नकोस. त्यांच्यापासून तुला कधींही सुख लागणार नाहीं. "

" आणि सुख कसें लागत नाहीं हेंच मला पाहिलें पाहिजे. "

मोहना संतापून बोलली, पण त्यापासून इंदिरेला जास्तच ताप झाला. त्यांचा गुप्त बेत काय झाला आहे हें आतां इंदिरेला पूर्णपणें कळून चुकलें. त्यामुळें तिला फार वाईट वाटलें व तिचा कंठ दाटून आला. ती पुनः मोहनेला म्हणाली:—" ताई, तूं काय बोलतेस हें तुझें तुलाच नीट कळत नाहीं. पुनः असें कधींही बोलूं नकोस. आपले शब्द जर नीटपणें तूं लक्ष्यांत घेतलेस तर तूं पुनः असें कधींही बोलणार नाहींस. ताई, मी तुझ्यापुढें पदर पसरतें. मला एवढी भीक घाल. नाहीं म्हणूं नकोस, तुला आईची शपथ आहे. उगीच कुणाची तरी बायको होण्याकरितां आपल्या वाडवडलांच्या घरांतून चोरून निघून जावें असा विचारसुद्धां मनांत येऊं देऊं नकोस. वडील माणसांचें न ऐकतां, त्यांची आज्ञा मोडून केलेलें लग्न कध्धीं सुखदायक होणार नाहीं. ताई, मला नाहीं वाटत तुला त्यापासून सुख लागेल असें. "

मोहनेच्या डोळ्यांतून घळघळ अश्रुधारा चालल्या व ती खालीं मान घालून उभी राहिली. प्रेम व कर्तव्य यांचें दारुण युद्ध तिच्या मनांत चाललें होतें. तिनें कशाचा त्याग करावा ? आपल्या वडिलांचा, नातलग मंडळीचा, आपल्या कर्तव्याचा त्याग करावा ? कीं ज्याच्यावर तिचें पूर्ण प्रेम जडलें होतें त्या आनंदरावाचा करावा ?

आपल्या उपदेशाचा कांहीं तरी परिणाम झाला असें इंदिरेला वाटलें. तिनें मोहनेला कुरवाळून म्हटलें:—" आजपासून हें बंद कर. घराच्या बाहेर चोरून कोणाची भेट घ्यायला जाऊन आपलें स्वतःशीं व घरच्या

मंडळीशीं कर्तव्य काय आहे हें पुनः विसरूं नकोस. हें बरें दिसत नाहीं. आपल्यासारख्यांना हें योग्य नव्हे."

इतकें बोलून इंदिरा मोहनेच्या खोलींतून बाहेर पडली. ग्यालरींतून जातांना तिनें खालीं पाहिलें तर सर्जेरावही बागेंतून बंगल्यांत जात असलेले तिच्या दृष्टीस पडले. त्याच क्षणीं एक मोठा आवाज—भिंग फुटल्याचा आवाज व एक मोठी किंकाळी—असा मिश्र आवाज खालून ऐकूं आला. त्याबरोबर इंदिरा घाईघाईनें जिना उतरून खालीं गेली. इतक्यांत सर्जेरावही आले. पाहतात तों लीला खिडकीशेजारीं जमिनीवर पडली असून हात रक्तबंबाळ झालेला आहे. सर्जेरावांना कायसें सांगण्याकरितां ती मोठ्या उत्सुकतेनें व गडबडीनें आंतून बाहेर आली व खिडकी उघडण्याकरितां तिनें जोरानें दार ढकललें त्याबरोबर तावदानाचें भिंग फुटून तिचा हात कापला व रक्त वाहूं लागलें. तिला सर्जेरावांनीं उठवून बसविलें व जखम बरीच मोठी झाली असल्याकारणानें डॉक्टरांना बोलावून आण म्हणून त्यांनीं हैबतीस सांगितलें.

"आनंदरावांना बोलावून आणूं, होय जी?" असें हैबतीनें विचारिलें. त्याबरोबर सर्जेरावांचा सोटा जमिनीवर आदळला; थोडें चुकलें, नाहीं तर हैबतीचा कपाळमोक्षच व्हावयाचा. सर्जेराव कडकडले:— "त्या नीच पाजी आनंदरावाला? नाहीं नाहीं. माझ्या घरांतील एकूणएक माणसें आजारी पडून मरायला जरी टेकलीं तरी त्या हरामखोराला बोलवायचें नाहीं. ऐकूं आलें का, ए गाढवा? विश्राम डॉक्टरांना बोलावून आण जा. पण त्या—ए—त्या बाईला विष मिसळून औषध दिलें, त्याला आणूं नकोस बरें का. त्याला माझ्या या बंगल्याच्या आवारांत पाय ठेवूं देऊं नकोस. त्याच्या त्या भावाला बोलावून आण. जा, पळ लवकर."

त्याबरोबर हैबतीनें धूम ठोकली. पण त्याला फारसें पळावें लागलें नाहीं. कारण तो बंगल्यांतून बाहेर पडून रस्त्यावर येतो इतक्यांत तिकडून विश्वासराव डॉक्टरच टांग्यांतून आले. हैबतीनें त्यांना सर्व हकीकत सांगितली. ती ऐकतांच ते आंत आले. त्यांनीं जखम धुऊन टाकून मल-

म लाविलें आणि वरती फडकें बांधून टाकिलें. डॉक्टर जाण्याकरितां निघाले. त्यांना पोंचविण्याकरितां सर्जेरावही बाहेर आले. ही त्यांची मोठीच मेहेरबानी म्हणावयाची. विश्वासराव त्यांना पसंत पडले एवढी गोष्ट सिद्ध झाली.

विश्वासरावः—" तिला आतां बरें वाटेल. मी इकडून जात होतों हें एक प्रकारें बरेंच झालें. नाहीं तर कदाचित् जखम जास्त व्हायची."

सर्जेरावः—" डॉक्टर, मी आपला फार आभारी आहें. आपला स्वभाव मोठा छान. गांवांत आपण अतिशय लोकप्रिय आहांत. मला फक्त एकाच गोष्टीबद्दल वाईट वाटत आहे."

विश्वासरावः—" ती गोष्ट कोणती ? "

" ती ही कीं मी आजपर्यंत त्या मूर्खशिरोमणि आनंदरावाला बोलावीत होतों. ही माझी मोठीच चूक झाली. तो गृहस्थ मला अगदीं आवडत नाहीं. आतां पुनः कधींही आपलें काळें तोंड घेऊन तो माझ्या बंगल्यांत येणार नाहीं. मीं त्याचा पक्का बंदोबस्त केला आहे. त्याच्या अंगांत थोडा तरी सज्जनपणा असावयाचा होता ? बरें, अंगांत तशी करामत आहे म्हणावें तर तीही नाहीं. आणि डौल किती ! कांहीं विचारूं नका."

विश्वासराव किंचित् हांसले. आनंदराव " तसे हुषार आहेत; नाहींत असें नाहीं; पण स्वभाव जरा......" असें अळम टळम बोलत ते आपल्या टांग्यांत चढले व टांगा निघून गेला.

तो दिवस गेला. संध्याकाळच्या गाडीनें जहागीरदार येतील. अड्ड्यांत जाऊन तपास घ्यावा, निदान त्यांची कांहीं बातमी तरी लागेल असें वाटून सर्जेराव तिकडे निघून गेले. ते घरांतून बाहेर पडल्यानंतर आणखी एक पत्र जहागीरदारसाहेबांच्या नांवचें आलें. इंदिरेनें पाहिलें तर त्या पत्रावर मुंबईचा शिक्का होता.

संध्याकाळीं ठरल्याप्रमाणें विश्वासराव डॉक्टर पुनः आले. ते इंदिरेबरोबर बोलत टेबलाजवळ उभे होते. तेथेंच जहागीरदारसाहेबांच्या नांवचें पत्र पडलेलें होतें तें त्यांच्या नजरेस पडलें. त्याबरोबर—

" रूपगडच्या जहागीरदारसाहेबांची व आपली ओळख आहे वाटतें ?" असे शब्द चटकन त्यांच्या तोंडांतून निघाले.

इंदिराः—" होय, ओळखही आहे आणि नातेंही पण आहे."

" तर मग त्यांची तब्येत हल्लीं कशी आहे आपणांस माहीत आहे काय ?"

" मला वाटतें आंतां बरी आहे. ते आज इथें येणार म्हणून आम्ही सकाळपासून त्यांची वाट पहात आहों. हें एक आणि (ओढखण ओढून) दुसरें हें एक अशीं दोन पत्रें त्यांच्या नांवचीं ते येणार म्हणून इथें आलीं आहेत. आतां रात्रीच्या गाडीनें तरी येतात का पहावें."

" मला वाटतें, आपली कांहीं तरी गैरसमजूत झाली आहे. जहागीरदारसाहेब आजारी असून अत्यवस्थ आहेत. दोन दिवसांमागेंच त्यांच्या जगण्याची बिलकुल आशा वाटत नव्हती."

" त्यांना काय होतं आहे ? ते आपल्या जहागिरीच्या गांवींच आहेत काय ?" असें इंदिरेनें विचारिलें. तिला डॉक्टरांचें बोलणें खरें वाटेना.

" ते आपल्या जहागिरीच्या गांवींच आजारी आहेत, व त्यांना सन्निपात झाला आहे."

इंदिरा स्तब्ध उभी राहिली. तिला खरोखरच अत्यंत आश्चर्य वाटलें. लीला तेथेंच अंथरुणावर पडलेली होती. ती म्हणालीः—" पण काय हो डॉक्टर, जर जहागीरदारसाहेब इथें येणार नाहींत तर मग त्यांचीं पत्रें कशीं इथें आलीं ?" लीलेची निराशा झाली होती. घरांत पाहुणे आले म्हणजे मजा मारावयास मिळेल, आपणाला खाऊ देतील, बाहुल्या देतील असें तिला वाटत होतें.

इंदिराः—" मीही तेंच म्हणतें. त्यांचें एकच पत्र नाहीं, दोन आहेत. जर त्यांचा इकडे येण्याचा बेतच नसता तर लीला म्हणते त्याप्रमाणें त्यांनीं आपलीं पत्रें इथें कां मागविलीं असतीं ?"

" आक्कासाहेब, आपण एवढें पक्कें समजा कीं रूपगडचे जे जहागीरदार आजारी आहेत असें मी म्हणतों ते तरी खास इकडे येणार नाहींत. त्यांचे अगदीं जवळचे वारस कोण, आपणाला माहीत असेलच."

इंदिरा म्हणाली:—" हो. आमचे बाबाच जवळचे वारस."

" त्या जहागीरदाराला सर्जेरावच वारस तर!"

" होय तेच आहेत."

विश्वासराव नंतर गंभीर स्वरानें म्हणाले:—" तर मग, आक्कासाहेब, आतां सर्व जुळलें. एकंदर हकीकत ध्यानांत आली. ते तरुण जहागीरदारसाहेब वारले असेंच समजा. हीं पत्रें आपल्या वडिलांस—तेच मालक जहागीरदार म्हणून—आलेलीं आहेत."

---

# प्रकरण १९ वें.

## यःपलायन.



इंदिरा तीं दोन्हीं पत्रें हातांत घेऊन त्यांच्याकडे पहात बसली होती. इतक्यांत सर्जेरावांची स्वारी बाहेरून आली. त्यांनीं अड्डयांत जाऊन तपास केला. जहागीरदार आल्याची कांहींच बातमी त्यां गली नाहीं. ते बाहेर गेल्यावर आणखी ए जहागीरदारांच्या नांवचें आलें होतें, तें इंदिरेनें त्यांना देऊन म्हटलें:—" बाबा, जहागीरदारसाहेब आज इथें येणार अशी जी आमची कल्पना झाली तीच मुळीं चुकीची दिसते. तुह्मी बाहेर गेल्यावर विश्वासराव डॉक्टर इथें आले होते. ते म्हणाले—दोन दिवसांपूर्वीं जहागीरदार सन्निपातानें आपल्या गांवीं अगदीं अत्यवस्थ असून तासादोनता-

यांचे सोबती होते, असें त्यांनीं सांगितलें. त्यांना खात्रीनें वाटतें कीं हीं दोन्हीं पत्रें तुम्हांलाच, वारस जहागीरदार ह्मणून, आलीं आहेत. "

इंदिरेचें बोलणें ऐकून सर्जेरावांना फार वाईट वाटलें. तिच्याप्रमाणेंच तेही अंतःकरणाचे फार उदार होते व त्यांनाही स्वार्थ बिलकुल माहीत नव्हता. 'बिचाऱ्याचें नशीब खोटें ! अगदीं तरुण वयांत गेला. मोठी वाईट गोष्ट झाली !' हेच विचार त्यांच्या मनांत आले. स्वतःचा उत्कर्ष त्यांच्या ध्यानींमनींही नव्हता.

ते इंदिरेला म्हणाले:—" मी यांपैकीं एक पत्र फोडून पाहतोंच. जर जहागीरदारसाहेबांची तब्येत ठीक असली तर मीं पत्र कां फोडलें याचें कारण त्यांना सांगेन. ते कांहीं मजवर रागावणार नाहींत. त्यांचा स्वभाव चांगला आहे. आज सकाळींच आलेलें पत्र दे. " असें ह्मणून त्यांनीं तें पत्र इंदिरेकडून घेतलें व फोडून वाचून पाहिलें. त्याबरोबर त्यांची मुद्रा गंभीर झाली व कंठ दाटून आला. 'बातमी खरीच ! गेला बिचारा पोरगा ! ! फार वाईट झालें ! ! !, असे उद्गार त्यांच्या तोंडांतून निघाले.

हें पत्र जहागीरदारसाहेबांच्या वाड्यांतील खासगी कारभाऱ्यांचें होतें. आपल्या तरुण यजमानांच्या शोचनीय मृत्यूची हकीकत लिहून शेवटीं 'आपण इकडे जरूर निघून यावें' अशी सर्जेरावांना त्यांनीं विनंति केली होती.

नंतर सर्जेरावांनीं दुसरें पत्रही फोडून पाहिलें. मुंबई येथील जहागीरदारांच्या फार वर्षांच्या वकिलाकडून तें पत्र आलें होतें. 'पूर्वापार लोभ आपण योग्य सल्लामसलत देऊं.' वगैरे हकीकत वकिलांनीं होती.

त्यांनीं पुढील कार्यक्रम ताबडतोब ठरविला. प्रथम जहागिरीच्या गांवीं जाण्याचा बेत त्यांनीं मुक्रर केला व त्याप्रमाणें ते जावयास निघाले. त्यांचा स्वभाव भारी उतावळा असल्यानें एक मिनिटाचा सुद्धां अवकाश त्यांना खपला नाहीं. गाडी कशी साधते इकडे त्यांचें लक्ष्य लागलें असल्यामुळें सामानसुमान वगैरे त्यांनीं आपल्याबरोबर कांहींच घेतलें नाहीं. जातेवेळीं त्यांनीं आपल्या मुलींना हाक मारली; त्याबरोबर इंदिरा व लीला

पुढें आल्या. पण मोहना कोठें दिसली नाहीं. तेव्हां ' मोहना कोठें दिसत नाहीं ती ? बरें असू दे. तिला मी गेलों म्हणून सांगा, ' असें बोलत सर्जेराव घाईघाईनें बंगल्याच्या बाहेर पडले.

ते दिसतनासे झाल्यावर इंदिरा व लीला आंत गेल्या. लीलेनें जिन्यांत जाऊन मोहनेला पुष्कळ हाका मारल्या; पण वरून ' ओ ' येईना. मोहना माडीवर नसावी असा एक भयंकर विचार इंदिरेच्या डोक्यांत आला. त्याबरोबर तिच्या पोटांत धस्स झालें, ती आनंदरावांना भेटण्याकारितां चोरून बाहेर बागेंत गेली असावी अशी तिला शंका आली. माडीवर जाऊन मोहनेच्या खोलींत तिनें पाहिलें, पण खोलींत कोणीही नव्हतें. आपण इतकें बजाविलें असून, इतका उपदेश केला असून शेवटीं मोहना रात्रीची पुनः बाहेर गेली म्हणून तिला फार वाईट वाटलें. ती तशीच खालीं येऊन बागेंत गेली व नोकर माणसांकडून तिनें सर्व बाग धुंडाळली, पण व्यर्थ. बागेंत कोणीही नव्हतें. तेव्हां ती मनांत म्हणाली कीं ती आनंदरावांबरोबर त्यांच्या घरीं गेली असावी; पण अजून फारशी रात्र झाली नव्हती, व अद्याप रस्त्यांतील लोकांची रहदारीही कमी झाली नव्हती, अशा वेळीं राजरोसपणें मोहना आनंदरावांबरोबर जाईल हेंही इंदिरेला संभवनीय वाटेना. तिनें हातांत दिवा घेऊन मोहनेच्या खोलींत जाऊन पाहिलें, तर मोहनेची अंगावर घेण्याची शाल तेथें कोठें दिसली नाहीं. झालें. शंका आली होती ती खरीच ठरली. तसा बळकट पुरावाच मिळाला.

रात्रीं नऊ वाजले, परंतु मोहनेचा पत्ता नाहीं. दहाचा ठोका पडला तरीही ठिकाण नाहीं. अकरा वाजले, आतां मात्र घरच्या मंडळींना धीर निघेना. लीलेनें तर रडून गोंधळ केला. ती फार भ्याली. ताईला भुतानें नेलें असेंच तिला वाटलें. सारजा चिंताक्रांत दिसूं लागली. हैबतीच्या तोंडचें पाणी पळालें. त्यानें आजपर्यंत नोकरी केली पण असा प्रकार कधीं झाला नव्हता. मोहनेवर त्याचें विशेष प्रेम होतें. म्हणून ती नाहींशी झाल्याचें समजतांच तो कावराबावरा झाला. तितक्यांत जरा धीर करून सारजा इंदिरेला म्हणालीः—" आक्कासाहेब, मी सांगूं क ?

ताईसाहेब संध्याकाळच्या बागेंतून फिरत असाव्यात नि तिकडून आनंदराव आले असावेत. तेव्हां त्यांनीं बोलावलें असेल म्हणून त्यांच्या घरीं गेल्या असतील. मी तेथें जाऊन शोध घेऊन येऊं काय ? ”

इंदिरेलाही तसेंच वाटत होतें, पण लाजेकाजेमुळें तिच्यानें तें स्पष्ट बोलवेना. सारजेनें गोष्ट काढतांच तिनें तत्काळ रुकार दिला. तिलाहीं हेंच पाहिजे होतें.

सारजा आनंदरावांच्या घरीं पोंचली, पण घरांत अगदीं सामसूम; उजेडसुद्धां नव्हता. घरांतील सर्व माणसें गडद निजलेलीं होतीं; हें पाहून सारजेला फारच चमत्कार वाटला. या घरांत आपल्या ताईसाहेब आनंदरावांशीं बोलत बसल्या असतील असें तिला वाटेना.

अखेर तिनें हाक मारली तेव्हां माडीवरील एक खिडकी उघडली व “ कोण आहे ? कोण हाका मारीत आहे तें ? डाक्तरसाहेब घरीं नाहींत, गांवाला गेले असे शब्द ऐकूं आले. ”

आनंदरावांचें एकाएकीं परगांवीं निघून जाणें व त्याच वेळीं मोहनाताईचें नाहींसें होणें यांचा परस्पर कांहीं तरी संबंध असलाच पाहिजे असें सारजेला वाटलें. अधिक विचार करितां तिची तर खात्रीच होऊं लागली कीं, ताईसाहेबांनीं वडिलांच्या घरांतून आनंदरावांबरोबर यःपलायन केलें हेंच खरें. ती घरीं परत आली व तिनें सर्व हकीकत इंदिरेला सांगितली. त्याबरोबर इंदिरेस पराकाष्ठेचें वाईट वाटलें व तिला गहिंवर आला. तिच्या तोंडांतून शब्द निघेना.

आनंदरावांनीं मोहनेस घेऊन पळून जाण्याचा बेत केला तो मोठ्या शिताफीनें पार पाडला. त्या रात्रीं त्यांना संकटें आलीं नाहींत असें नाहीं; आलीं, पण त्यांच्या पळून जाण्याच्या बेतांत कांहीं विघ्न आलें नाहीं एवढें खरें.

आनंदरावांनीं आपल्या बेताची मांडणी फार छान केली होती. ते जात्या मोठे चतुर व कल्पक होते. त्यांनीं मोहनेशीं असें ठरविलें कीं संध्याकाळीं अंधार पडला म्हणजे रावपुऱ्यांतील एका बोळांत आपण आपल्या शिग्राम गाडींतून यावें, व तेथें मोहनेनें येऊन आपल्याला मिळावें.

अंधार पडतांच आनंदरावांनीं थेट रावपुऱ्याकडे गाडी हाकली. तेथें पोंचल्यावर जेथें दोघांनीं यावयाचें ठरलें होतें त्या ते बोळांत गाडी वळविणार, इतक्यांत विश्वासराव डॉक्टर समोरून आले. आपण सर्जेरावांच्या बंगल्यावर गेलों होतों, ललिेच्या हातांत खिडकीच्या तावदानाच्या कांचा शिरून जखम झाली आहे वगैरे हकीकत सांगून विश्वासरावांनीं म्हटलें:— " आनंदराव, रूपगडचे जहागीरदारसाहेब वारल्याची बातमी गांवांत कोठें ऐकली काय ? दोन दिवसांपूर्वीं ते सन्निपातानें अगदीं अत्यवस्थ होते असें मीं ऐकलें होतें; आणि आज त्यांच्या नांवचीं पत्रें सर्जेरावांच्या पत्त्यावर आलीं आहेत, त्या अर्थीं कांहीं बरेंवाईट झालें असावें असें वाटतें. "

आनंदरावांना कांहींच संबंध कळेना. जहागिरदार आपले भाऊबंद आहेत येवढें मात्र त्यांनीं मागें एकदां सर्जेरावांच्या तोंडून ऐकलें होतें. पण जहागीरदारसाहेबांच्या नांवचीं पत्रें सर्जेरावांना आलीं आहेत हा बादरायण संबंध यांच्या लक्षांत येईना. हें पाहून विश्वासराव म्हणाले:—" आनंदराव, जर ते जहागिरदार खरोखरीच वारले असले तर सर्जेरावच आतां जहागीरीचे मालक झाले व त्यांनाच तीं पत्रें आलीं असलीं पाहिजेत असें मी इंदिरा—आक्कासाहेबांना सांगून आलों. " इतकें बोलून विश्वासरावांनीं निरोप घेतला. आनंदरावांचा स्वभाव फार थंड. त्यांना ही हकीगत ऐकून आश्चर्य वाटलें, पण त्यांनीं तें दाखविलें नाहीं. ' सर्जेराव जहागिरीचे मालक झाले अं ? तर मग आपली मोहना जहागीरदारांची मुलगी झाली ! ' इत्यादि विचार आनंदरावांच्या मनांत आले. विश्वासराव गेल्यावर त्यांनीं घोड्यास एक चाबकाचा चटका दिला व गाडी त्या बोळांत नेऊन उभी केली.

इकडे संकेताप्रमाणें मोहनाही बंगल्यांतून कोणास न समजतां बाहेर कसें पडतां येतें याची वाटच पहात होती. त्या सबंध दिवसभर तिच्या जिवास चैन म्हणून कसें तें नव्हतें. संध्याकाळ कधीं होते, अंधार केव्हां पडतो याकडेच तिचें सर्व लक्ष्य होतें. बंगल्यांतून कोणत्या दारानें, कोणत्या बाजूनें बाहेर पडावयाचें हें सर्व तिनें आपल्याशीं ठरवून ठेविलें होतें. संध्याकाळ झाली. अंधार पडला. माडीवरील दिवाणखान्यांत विश्वासराव डॉ-

क्टर, इंदिरा, सर्जेराव वगैरे मंडळी लीलेची जखम धुण्यांत व बांधण्यांत गुंतली आहे ही संधि पाहून मोहना माडीवरून खालीं आली व मागील दारानें बाहेर पडून तिनें तें दार हळूंच लावून घेतलें आणि मागच्या बाजूकडून जो रस्ता गेला होता त्या रस्त्यानें जावें असा तिनें विचार केला. ती कांहीं पावलें गेली, इतक्यांत माडीवरून विश्वासराव खालीं येत आहेत असें तिला वाटलें. पायऱ्या उतरतांना त्यांच्या बुटांचा खाड खाड आवाज तिला ऐकूं येऊं लागला. त्याबरोबर डॉक्टर बाहेर पडण्यापूर्वींच आपण निघून जावें असा विचार करून ती जलदीनें चालूं लागली. तथापि बायका कितीही जलद चालणाऱ्या असल्या तरी पुरुषांची बरोबरी कशा करूं शकतील ? विश्वासराव झपाझप पावलें टाकीत येत होते. मोहना तिकडून बागेंतून रस्त्यावर येते तों डॉक्टरही इकडून येऊन पोंचले. " कोण, मोहनाताई, तुम्ही का ? संध्याकाळच्या इकडे कोणीकडे ? " असें त्यांनीं विचारिलें. त्याबरोबर मोहनेच्या पोटांत धस्स झालें. ' प्रथमग्रासे मक्षिकापातः ' याप्रमाणें तिला हा अपशकुनच वाटला. ती अडखळत अडखळत म्हणालीः—" मी—मी होय ? माझें थोडें कपाळ दुखत आहे, तेव्हां म्हटलें बागेंतून जरा हिंडावें. " तेव्हां " अंधारांत हिंडूं नका, विंचूकांट्याची भीति, घरीं जा. " असें सांगून विश्वासराव निघाले. त्यांना संशय येऊं नये म्हणून मोहना थोडी मागें वळली व ते बरेच लांब जाईपर्यंत तेथेंच एका झाडाच्या आड उभी राहिली. विश्वासराव अगदीं दिसतनासे झाल्यावर मोहना बंगल्याच्या आवाराच्या बाहेर पडली व थोडक्याच वेळांत गाडी उभी होती त्या बोळांत येऊन पोंचली. आनंदराव आपल्या तयारींत होतेच. त्यांनीं चटकन खालीं उडी मारिली व मोहनेस गाडींत बसविलें. नंतर तेही गाडीवर चढून एका आडवाटेनें गाडी चालवूं लागले.

मोहनेचे डोळे पुढें होते, पण सर्व लक्ष्य मागें लागलेलें होतें. विश्वासरावांनीं आपणास पाहिलें आहे, तेव्हां आपल्या मागून आपणास धरण्याकरितां कोणी येईल कीं काय याची तिला फार भीति पडली होती. गाडी जशी लांब गेली तशी तिची भीति थोडी थोडी कमी होऊं लागली. सर्जेरावांना आलेल्या पत्रासंबंधीं व मालक जहागीरदारासंबंधीं

हकीगत आनंदरावांनीं मोहनेस विचारिली. पण तिलाही विशेष माहिती नव्हतीच, तेव्हां ती काय सांगणार ? आनंदरावांनीं तरी तिला सांगावयाची होती, पण तेंही नाहीं. त्यांनीं तिला विचारिलें एवढेंच. आपणास जी गुणगुण कळली होती ती त्यांनीं मोहनेला बिलकुल न कळवितां तिला तसेंच अज्ञानांत ठेविलें. त्यांना असें वाटलें असेल काय—कीं मोहना ही अगदीं ओढघस्तीस आलेल्या सर्जेरावांची मुलगी म्हणून आपल्याबरोबर पळून जाण्यास तयार झाली, पण 'आपले बाबा जहागिरीचे मालक झाले, त्यांची—जहागीरदाराची मी मुलगी, मला आतां आक्कासाहेब हा हुद्दा प्राप्त झाला.' वगैरे हकीगत जर तिला कळली तर ती अशी पळून जाण्यास तयार होती ना ? खरेंच, आनंदरावांना अशी धास्ती पडली असेल काय ? कोणास ठाऊक ? आनंदरावांनीं मोहनेस ही हकीगत सांगितली नाहीं इतकें मात्र खास.

आगगाडी चुकेल म्हणून आनंदरावांनीं गाडीस फार वेग दिला होता. स्टेशन सुमारें मैल दीड मैल लांब राहिलें असेल. इतक्यांत घोडा एकाएकीं ठोकरून खालीं पडला. मागें—त्या रविवारीं रात्रीं—जसा घोडा अकस्मात् खालीं पडला तसाच आतांही पडला. गाडी एका बाजूस कलंडून पडली. एक चाक तर अजीबात निखळून पडलें. पण सुदैवानें दोघांसही विशेष इजा झाली नाहीं. नंतर खिशांतील चाकू काढून आनंदरावांनीं घोड्याचे पट्टे कापून टाकले. त्याबरोबर घोडा उठून उभा राहिला, त्यानें आपलें आंग झाडलें व कान उभारून स्वारीनें जो एकदम पळ काढला तो पार कोठें दिसेनासाच झाला. अंधार ह्मणजे मी म्हणत होता; तशांत वारा गार व जोराचा सुटलेला असल्यामुळें अंगास फारच झोंबे. गाडी तर रस्त्यांत मोडून पडलेली; घोड्यावर मोहनेस बसवून स्टेशन गांठावें म्हटलें तर घोडाही कोणीकडे पार नाहींसा झाला होता; रस्त्यावर तर चिटपाखरूंही दिसेना; शिवाय आनंदराव ह्या रस्त्यानें पूर्वीं कधींच आलेले नसल्यानें हा प्रदेशही त्यांच्या माहितींतील नव्हता, आणि मोहनेनें तर रडून ओरडून पुरे पुरे केलें. याप्रमाणें आनंदरावांची अगदीं त्रेधा उडून गेली.

इतक्यांत " काय काळुक मिट्ट गा ? डोळयांत ब्वाट घातलं तरी वीं दिसना. आन् इचिभन फुड काय गा ह्ये पडलया ? " असे शब्द आनंदरावांना ऐकूं आले. त्याबरोबर त्यांना थोडा धीर आला. दोघेजण मजूर, स्टेशनावरील हमालीचें काम आटपून रात्रीच्या वेळीं या रस्त्यानें आपल्या घरीं जात होते. त्यांनीं ती आनंदरावांची संकटावस्था पाहिली. अशा हीन दीन स्थितींत हे आपणाला देवदूतच भेटले असें आनंदरावांना वाटलें.

त्या दोघांच्या मदतीनें आनंदरावांनीं आपली मोडलेली गाडी रस्त्यांतून काढून जवळच शेतांत एक खोपट होतें तेथें नेऊन ठेवली. नंतर एकास आनंदरावांनीं घोडा हुडकून काढून त्यास आपल्या घरीं पोंचता करण्यास सांगून पाठवून दिलें. आणि दुसऱ्याच्या डोक्यावर आपलें व मोहनेचें सामान देऊन आनंदराव मोहनेला घेऊन पायींच स्टेशनाकडे जाण्याकरितां निघाले.

स्टेशन थोड्या अंतरावर राहिलें होतें; इतक्यांत आगगाडीची शीट ऐकूं आली. त्याबरोबर त्यांची धांदल उडून गेली. आतां आपणाला गाडी सांपडत नाहीं असें वाटून ते दोघेही पळूं लागले व जेमतेम एकदाचे स्टेशनावर येऊन पोंचले. तिकीटाच्या खिडकीशीं आनंदराव जातात तर खिडकी बंद. मोहनेचा तर अगदीं धीर सुटला. ती गडबडीनें प्लॅटफॉर्मवर गेली व गाडी थांबावी म्हणून तिनें आपले दोनी हात वर केले. आपण काय करीत आहों हेंच तिला समजेना. तिनें हात वर केले खरे, पण गाडी थोडीच थांबणार होती ! ती जोरानें चालू झाली. जातां जातां एका सेकंड क्लासच्या डब्यांत सर्जेराव कोणाशीं बोलत बसले असल्याचें दिव्याच्या प्रकाशांत मोहनेनें पाहिलें. त्याबरोबर तिची छाती धडधडूं लागली. तिला वाटलें आपणास धरण्याकरितां बाबा आले आहेत. पण सर्जेरावांचा तसा बिलकुल हेतु नव्हता. ते आपल्या जहागिरीच्या गांवीं निघाले होते हें वाचकांना माहीत आहेच.

दुसरी गाडी मध्यरात्रीच्या सुमारास येणार होती; तोंपर्यंत वाट बघावयाला पाहिजे म्हणून आनंदराव आपल्या सामानाजवळ आले. नंतर

सामान आणल्याबद्दलचे पैसे त्यांनीं देऊन टाकिले. मोहना अजून थरथर कांपतच होती. आणि खरोखर प्रसंगच मोठा वाईट! अशा त्रासांत, अशा विपन्नावस्थेंत, धड इकडे ना तिकडे, असे ते दोघे मोठ्या कचाट्यांत सांपडले होते. आनंदराव हळूंच मोहनेस म्हणाले:—“ आज बरीच फजीती उडाली म्हणावयाची! तूं येथें बैस, मी कांहीं फराळाचें मिळतें काय पाहून येतों. आणि अंगावर ती शाल घे. थंडीनें व भुकेनें तुझ्या अंगांत कांपरें शिरलें आहे.”

“ छे छे! त्यानें नव्हे—त्यानें नव्हे हो. फराळाचें तर नांव नको. मी त्याला शिवणार सुद्धां नाहीं. आपण त्यांना पाहिलेंत काय?” असें मोहना घाबऱ्या घाबऱ्या म्हणाली.

“ कोणाला पाहिलें काय?” आनंदरावांनीं विचारिलें.

“ बाबांना?”

आनंदरावांनीं आश्चर्ययुक्त मुद्रेनें म्हटलें:—“ सर्जेरावांना? कोठें?”

“ त्या आतां गेलेल्या गाडींत. ते एका सेकंड क्लासच्या डब्यांत बसले होते.”

आनंदरावांना वाटलें, भ्रमामुळें ती असें बडबडत असावी. मोहना पुढें म्हणाली:—“ मी खात्रीनें सांगतें, बाबा त्या गाडींत कोणाबरोबरसे बोलत बसले होते. दिव्याचा प्रकाश त्यांच्या तोंडावर पडला होता. बाबाच ते, मीं त्यांना पुरतें ओळखलें.”



# प्रकरण २० वें.

—:०:—

## ‘ पुनरागमनाय च ’



दिरेची स्थिति मोठी शोचनीय झाली. त्या रात्रीं तिच्या बहिणीनें—मोहनेनें—जो मार्ग स्वीकारला त्यायोगानें तिला मनस्वी दुःख झालें. आतां पुढें काय करावें हीच मोठी अडचण येऊन पडली. सर्जेराव घरांत असते म्हणजे तिच्यावर इतकी जबाबदारी पडली नसती. पण संध्याकाळींच ते आपल्या जहागिरीच्या गांवीं निघून गेले होते. ह्मणून तर इंदिरेला जास्तच भय वाटूं लागलें. बरें, त्या दोघांनीं जो बेत केला होता त्यांत अडथळा आणण्यासही ती समर्थ नव्हती. तीचशी काय. पण कोणाच्याही हातून तें झालें नसतें. आनंदराव व मोहना यांना जाऊन आतां बरेच तास झाले होते अर्थात त्यांना गांठून परत आणणें मुळींच शक्य नव्हतें.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं ही बातमी त्या शहरांत चोहोंकडे पसरली. आनंदरावांनीं ज्या मनुष्यास आपला पळून गेलेला घोडा धरून घरीं नेण्यास सांगितलें होतें, तो मनुष्य घोडा घेऊन त्यांच्या घरीं गेला. घोडा सांपडण्यास फार वेळ लागला नाहीं, कारण तो जवळच एका शेतांत चरत होता. त्यास धरून, आनंदरावांनीं आपल्या घराची खूणखाण सांगितली होती, त्या धोरणानें तो त्यांच्या घरीं घोडा घेऊन आला. घोड्यास नुसती ओठाळी लावलेली होती व त्याचें सर्व अंग घाण झालें होतें; तें पाहून घरच्या माणसांना फारच आश्चर्य वाटलें. व काय झालें, काय झालें, ह्मणून जो तो उत्सुकतेनें विचारूं लागला. त्या इसमानें रात्रीची जेवढी हकीकत त्याला माहीत होती तेवढी सांगितली. घोड्याचा तपास करून घरीं घेऊन

जा ह्मणून डॉक्टरसाहेबांनीं सांगितल्यावरून मी घोडा घेऊन आलों, असेंही तो म्हणाला. मग बातमी पसरण्याला उशीर कसा लागणार ? ती वाऱ्याप्रमाणें चोंहोंकडे ताबडतोब पसरली. आनंदराव डॉक्टरांबरोबर सर्जेरावांची मोहना पळून गेली असें घरोघर लोक बोलूं लागले, जिकडे तिकडे चर्चा सुरू झाली,व नाहीं नाहीं ते तर्क चालले.

सकाळीं दोनतीन तास दिवसास लीलेची जखम पाहण्याकरितां विश्वासराव डॉक्टर आले, व त्यांनीं इंदिरेला खरीखुरी बातमी सांगितली. तिची चिंताक्रांत मुद्रा पाहून विश्वासरावांना वाईट वाटलें. सारी रात्र तिनें रडण्यांत व जागरणांत घालविल्याचीं स्पष्ट चिन्हें तिच्या चेहऱ्यावर दिसत होतीं. विश्वासरावांनीं म्हटलें:—" गोष्ट तर वाईटच झाली. परंतु ती मनास लावून घेऊन आपली प्रकृति बिघडून घेऊं नका. तुम्ही आज फार आजारी दिसतां. " त्यांच्या विचारण्यांत मनाची कोमलता, कळकळ, सहानुभूति व्यक्त होत होती. इंदिरेला मोठा धक्का बसला. " बातमी गांवांत समजली ? " असें तिनें विचारलें.

" हो. सर्व गांवभर जिकडे तिकडे हीच वाटाघाट चालली आहे. " विश्वासरावांनीं उत्तर दिलें.

इंदिरा चिंताक्रांत झाली:—" मला आपले वाटलें. त्यांत कांहीं अर्थ नाहीं म्हणा—अजूनी वाटत आहे कीं असें कांहीं झालें नसेल; आनंदरावांबरोबर कांहीं ती गेली नसावी; डाक्तर, माझ्या डोक्यावर वीज पडावी तसें झालें. आम्हीं तिला लहानाची मोठी केली, अंगाखांद्यावर खेळविली ती याचकरितां काहो ? "

" खरेंच, मोहनाताईकडून ही मोठी चूक झाली ! अगदींच मूर्खपणा झाला ! "

" पण डाक्टर, ही बातमी इतक्या लवकर गांवांत कशी कळली असेल बरें ? "

विश्वासरावांनीं सर्व हकीकत सांगितली. नंतर संध्याकाळीं आपण येथून बाहेर पडतांनां बागेंत मोहनाताई अंधारामध्यें दिसल्या, वगैरे हकीकत सांगून त्यांनीं म्हटलें, " यावरून त्यांचा सर्व बेत पूर्वींच ठरला होता

ही गोष्ट स्पष्ट आहे. " आतां ही बातमी बाबांना कशी कळवावी, असें इंदिरेनें डॉक्टरांना विचारिलें. नंतर दोघांचें बोलणें होऊन असें ठरलें कीं हैबतीला बरोबर घेऊन इंदिरेनें स्वतः जहागिरीच्या गांवीं जाऊन सर्जेरावांना हकीकत कळवावी व पुढचा विचार ठरवावा. नंतर डॉक्टर लीलेची जखम पाहून निघून गेले.

इंदिरा लागलीच गाडींत बसून स्टेशनावर गेली. हैबती बरोबर होताच. आगगाडींतून त्यांना चाळीस मैल जावयाचें होतें. तेवढा प्रवास संपल्यावर ते दोघेही गाडींतून उतरले. या स्टेशनापासून सर्जेरावांचा जहागीरीचा गांव दीड दोन मैल लांब होता. एक भाड्याचा टांगा करून ते दोघेही त्या गांवीं जाऊन पोंचले. जहागिरदारांचा वाडा मोठा प्रशस्त व रमणीय असा होता. सर्जेराव एका सुंदरशा दिवाणखान्यांत लोडाशीं टेकून बसले होते. व जवळच त्यांचे खासगी कारभारी कांहीं कागदपत्र हातांत घेऊन सुनावणी करीत होते. इंदिरा आंत गेली व खालीं मान घालून भिंतीला टेंकून उभी राहिली. हैबतीनेंही मोठ्या अदबीनें मुजरा केला व तो लांब एका कोंपऱ्यांत उभा राहिला. सर्जेराव म्हणाले:—

" काय, तुम्ही इकडे कोणीकडे ? आणि अगदीं एकाएकीच ? "

इंदिरा—" बाबा, मी येणार नव्हतें, पण—पण—माझ्याशिवाय हें काम दुसऱ्या कोणाकडून चांगलें होईल असें मला वाटेना; म्हणून मी आलें. बाबा, आपल्यावर मोठेंच संकट आलें आहे. "

सर्जेराव गोरेमोरे झाले. लीलेचा हात जास्त सुजून ती अगदीं अत्यवस्थ असावी असें त्यांना वाटलें. त्यांनीं एकदम विचारिलें:— " संकट ? कसलें संकट ? स्पष्ट कां सांगत नाहींस ? बोल, कायरे ए हैबती, तूं असा मुखस्तंभासारखा गप्प कां उभा आहेस ? तुम्ही असे संदिग्ध बोलूं लागलां तर माणसानें काय समजावें ? पोर मेली वाटतें ? सांग, सांग लवकर. "

इंदिराः—" नाहीं बाबा, लीलेचा हात आतां बरा आहे. पण ताई—"

" ताईचें काय ? ती माडीवरून पडली ? तर ? पुनः आपलें तेंच.

अग बोलत कां नाहींस ? " असें सर्जेराव अगदीं उतावीळ होऊन म्हणाले, व त्याबरोबर त्यांचा सोटाही दणादण आपटूं लागला.

इंदिराः—" बाबा, काल रात्रीं निघते वेळीं तुम्हीं तिला हाक मारलीत, आठवतें ना ? मला वाटलें ती निजली असेल. पण छे ! कुठें कुठें म्हणून सांपडेना. मग पुष्कळ तपास केला तेव्हां ती घरांतून पळून गेली असें मला समजलें."

" पळून गेली ? मी तिच्या पाठोपाठ पळत जाऊन तिला पकडून आणतों. कोणीकडे पळून गेली ? कशाकरितां पळून गेली ? "

" बाबा, ती एकटीच नाहीं गेली. तिच्याबरोबर आनंदराव डॉक्टरही गेले आहेत. "

" काय ? "

" होय, बाबा, ते लग्न करून घेण्याकरितां पळून गेले यांत शंकाच नको."

सर्जेराव संतापानें अगदीं तांबडे लाल झाले, व त्यांच्या तळव्याची आग मस्तकाला गेली. त्यांनीं नारसिंह अवतार धारण केला. मोहनेवर त्यांनीं हजारों शिव्या मोजल्या. आनंदरावांवर तर शिव्यांची लाखोली वाहिली. त्यांच्या त्या रागाच्या सपाट्यांत ते दोघेही गुन्हेगार त्यांच्या तावडींत सांपडण्याजोगे नव्हते हें एक त्यांचें सुदैवच म्हणावयाचें !

कांहीं वेळानें ते थोडे शांत होऊन म्हणाले:—" मुली, हें दुसरें उदाहरण. एक गेली तशी दुसरीही जाऊं दे. त्या कारटीचें माझ्या समोर तूं नांव काढीत नाहींस, तसेंच हिचेंही काढीत जाऊं नकोस."

इंदिरेला फारच वाईट वाटलें. विशेष वाईट वाटण्याचें कारण तिला असें वाटत होतें कीं, आपल्या बाबांना आतां जहागीर मिळाली तेव्हां त्या 'एकीचें' नांव काढण्याला जी आडकाठी होती ती नाहींशी होईल. पण झालें भलतेंच. शिवाय आपण समक्ष जाऊन बातमी कळविली असतां बाबांना तितकें दुःख होणार नाहीं असें जें तिला वाटत होतें त्यांतही तिची निराशा झाली. इंदिरा तेथें फार वेळ राहिली नाहीं. इकडे

लीला आजारी, घरांत दुसरें कोणी नाहीं. म्हणून ती हैबतीला बरोबर घेऊन संध्याकाळच्या गाडीनें परत दत्तापूर गांवीं आली.

इकडे आनंदराव व मोहना मध्यरात्रीं जी आगगाडी आली त्या गाडींत बसून गिरीला गेले व तेथें जाऊन त्यांनीं आपला विवाहविधि उरकून घेतला. प्रवासाच्या रात्रीं ( त्या दिवशीं बुधवार होता ) त्यांना जे क्लेश व हाल भोगावे लागले त्याच्या परिहारार्थ त्यांनीं कांहीं दिवस चैनीनें हिंडून फिरून मजा मारिली व बरोबर आठवे दिवशीं तें नूतन जोडपें परत दत्तापुरास येऊन पोंचलें.

लग्न झाल्याच्या दुसऱ्या दिवशींच आनंदरावांनीं आपल्या घरीं नौकरांस पत्र पाठवून कळविलें कीं आपल्या धर्मपत्नीच्या स्वागतार्थ सर्व जय्यत तयारी व चोख व्यवस्था ठेवावी. त्याप्रमाणें नोकरचाकरांनीं घरांत जिकडे तिकडे झाडलोट व साफसफाई केली; सामान जेथल्या तेथें नीट लावून ठेविलें, व आपआपल्या परीनें उत्तम पोषाख करून आपले धनीसाहेब व नूतन बाईसाहेब यांना सलामी ठोकण्याकरितां ते सर्व मोठ्या उत्कंठेनें वाट पहात बसले.

स्टेशनावर आगगाडी पावणेसात वाजतां येई. साडेसात वाजले; आठाचा ठोका पडला. नऊ वाजण्याचा सुमार झाला, तरी नवरदेवाचा पत्ता नाहीं. नोकरचाकर वाट पाहून पाहून कंटाळले त्यांच्या पोटांत भुकेनें तर अगदीं कलकलाट करून सोडिला. दुसरी गाडी स्टेशनावर साडेदहा वाजतां येणार, त्या गाडीनें आले तर येतील. चहा तयार केलेला तोंपर्यंत बिघडेल, म्हणून सर्वांनीं त्यावर यथेच्छ ताव मारण्यास सुरवात केली. त्यांना आतां घरांत अडपते दडपते कोणीच नव्हतें. धनीसाहेब नाहींत, कोणी नाहींत; अगदीं मोकळी मनोळी झाली. मग ते तरी कमी कां करतील? त्यांनीं आलकट पालकट घालून मनसोक्त चहापान सुरू केलें. चहाचीं भांडीं व भांडीं सारीं रिकामीं झालीं. मधून मधून फराळाच्या डब्यांतही हात जाऊं लागले. थट्टामस्करी चालली. चढाओढीनें हंशा पिकला, आणि पचनास अवश्य त्याहून जास्त आरडाओरडा चालला. निर्धास्तपणें त्यांचें हें उदरंभरणाचें काम चाललें होतें. इतक्यांत बाहेरून

मोठी हाक ऐकूं आली. त्याबरोबर सर्वजण दचकून उठले. कारण त्यांना वाटलें धनीसाहेबच आले. त्यांची जी तारांबळ उडून गेली ती कांहीं विचारूं नये. सगळी आवराआवर करतां पुरे वाट. एकानें बाहेर जाऊन दरवाजा उघडला. तों एक बाई हातांत एक मोठें गाठोडें घेऊन उभी होती. दरवाजा उघडल्याबरोबर ती आंत आली व गांठोडें खालीं ठेवून म्हणालीः—" मी सर्जेरावांच्या बंगल्यांतून आलें आहें, मोहनाताईसाहेबांची लुगडीं, चोळया वगैरे जिन्नस यांत आहेत. कुठें आहेत त्या ? मला त्यांना एक निरोप कळवावयाचा आहे."

गांठोडें घेऊन आलेली बाई ही सर्जेरावांच्या बंगल्यांत नोकरीस राहिलेली सारजा होती हें वाचकांनीं ओळखलेंच असेल. आनंदरावांनीं लग्न झाल्याबरोबर आपल्या घरीं पत्र लिहून गृहप्रवेशसमारंभाची तयारी करण्यास ज्याप्रमाणें कळविलें होतें त्याचप्रमाणें मोहनेनेंही एक पत्र इंदिरेस पाठवून त्यांत आपलें लग्न झाल्याची हकीकत लिहिली होती. याच पाकिटांत तिनें आपल्या वडिलांसही एक पश्चात्तापदर्शक असें पत्र लिहून शेवटीं झालेल्या चुकीबद्दल माफी मागितली होती.

इंदिरेच्या पत्रावर नुसता ' इंदिराबाई, फुलबन बंगला, रावपुरा, दत्तापूर, ' असा पत्ता लिहिला असून सर्जेरावांच्या पत्रावर, ती. सर्जेराव' अशीं अक्षरें लिहिलीं होतीं;:यावरून सर्जेरावांना नुकताच जो बहुमानाचा दर्जा मिळाला होता त्याची तिला वार्ताही नव्हती हें उघड दिसत होतें. इंदिरेनें सर्जेरावांच्या नांवचें जें पत्र होतें तें त्यांच्या जहागीर गांवीं ताबडतोब पाठवून दिलें. तें मोहनेचें पत्र असें समजल्यावर त्यांनीं न वाचतांच फाडून जाळून टाकिलें. तिला स्वतःला जें पत्र आलें होतें त्या पत्राचें उत्तरही इंदिरेला पाठवितां येईना. कारण आपल्या गुन्हेगार बहिणीबरोबर सर्व पत्रव्यवहार बंद करण्याबद्दल तिला वडिलांकडून ताकीद मिळाली होती. वाड्यांतील व्यवस्था लावून सर्जेरावांची स्वारी मंगळवारीं घरीं परत आली. बुधवारीं सकाळीं पुनः मोहनेचें एक पत्र इंदिरेला आलें. त्या पत्रांत आपण व आनंदराव बुधवारीं संध्याकाळीं पावणे सात वाजतांच्या गाडीनें दत्तापुरास

येऊं, तरी आपलीं लुगडीं, चोळया वगैरे जिन्नस—आपण पोंचावयाच्या आंधीं आपल्या घरीं पाठवून देण्याबद्दल तिनें लिहिलें होतें.

इंदिरेनें तें पत्र वडिलांस दाखविलें. त्याबरोबर स्वारी गरम होऊन व हातांतील काठी जमिनीवर आपटून म्हणाली:—“ बस्स’ बस्स, त्यांपैकीं एक चिंधी सुद्धां तिला मिळावयाची नाहीं. छांदिष्ट पोर ! ”

इंदिरा आर्जवानें म्हणाली:—“ पण बाबा, ती एका लुगड्यानिशीं घ-रांतून गेली आहे, तिला नेसायला......”

सर्जेराव संतप्त होऊन म्हणाले:—“ बरें झालें गेली तर. कुणीं सांगि-तलें होतें जायाला ? तूंही तिचीच थोरली बहीण. मोठी आली कैवार घ्यायाला, ठाऊक नाहीं ! ”

तथापि इंदिरेला रहावेना. मोहनेकडून मोठी चूक झाली हें खरें, पण तिच्याबद्दल तिला काळजी लागली. लुगडीं, चोळ्यांशिवाय तिचें कसें चालावें, तिची फार गैरसोय होईल, हें जाणून त्या दिवशीं संध्या-काळीं पुन: संधि साधून इंदिरेनें वडिलांकडे शब्द टाकिला. त्या वेळीं स्वारी जरा विनोदांत होती. त्यांनीं एकदम हुकूम सोडिला:—“ मोहनेचे एकूण एक जिन्नस तिच्याकडे आत्ताच्या आत्ता पोंचते करा. तिची एक चिंधीसुद्धां येथें नको. ”

इंदिरेला तेंच पाहिजे होतें. तिनें पडत्या फळाची आज्ञा घेतली. सार-जेला सांगून सांपडले तितके जिन्नस एके ठिकाणीं करून त्यांचें एक गांठोडें बांधलें, व तें सारजेस देऊन म्हटलें, “ आतां हें घेऊन जा नि ताईला म्हणावें, बाकीचे जिन्नस हुडकून उद्यां पाठवून देतें, आणि तिची ए-कीकडे गांठ घेऊन तिला सांग...”असें म्हणून इंदिरा सारजेच्या कानांत काय सें पुटपुटली. आणि म्हणूनच नव्या मालकीणबाईची गांठ घ्यावयाची आहे, त्यांना एक निरोप कळवावयाचा आहे, कुठें आहेत त्या ?—वगैरे वगैरे सारजा विचारीत उभी होती. आनंदराव अद्याप आले नाहींत, अर्थातच मोहनाबाईही आल्या नाहींत असें तिला सांगण्यांत आलें. म्हणून आण-लेलें गांठोडें तेथें ठेवून ती परतण्याच्या विचारांत होती, इतक्यांत बाहेर घडघड झालें. दरवाजांत जाऊन पहाते तर गाडींतून आनंदराव व

मोहना खालीं उतरलीं. पावणेसात वाजतांच्या गाडीनेंच यावें म्हणून ती निघाली होती. पण वाटेंत कांहीं अडचण आल्यामुळें गाडीला यावयास इतका उशीर लागला.

दोघांच्याही तोंडावर आनंदाचें तेज चमकत होतें. मोहनेचा चेहरा तर फारच प्रफुल्लित दिसत होता. आनंदराव थट्टेनें कायसें बोलले ह्मणून ती गालांतल्या गालांत हांसत होती. दरवाजांत येतांच सर्व चाकरमाणसांनीं मोठ्या अदबीनें आपल्या यजमानास व मालकीणबाईस मुजरा केला. त्यांच्याकडे प्रेमळपणानें पहात मान हालवीत मोहना आली. पलीकडे सारजा उभी होती. तिला पाहून मोहनेला फार आश्चर्य वाटलें.

ती म्हणाली:—" सारजाबाई, तूंच का ? या वेळची इकडे कुठें ? "

सारजा शांतपणानें व मोठ्या अदबशीरपणानें म्हणाली:—" होय, ताईसाहेब, मीच ती. आक्कासाहेब महाराजांनीं हें एक गांठोडें दिलें आहे व आपणास एक निरोप कळवून ये अशी मला त्यांची आज्ञा झाली आहे.."

मोहना तिच्याकडे निरखून पाहूं लागली. सारजेचें दरबारी भाषण तिच्या कानांस कसेंसेंच लागलें. आक्कासाहेब, महाराज, आज्ञा, हें काय आहे तिच्या लक्षांत येईना. सर्व जग उलटें झालें असतें तरी देखील तिला इतकें आश्चर्य वाटलें नसतें. ती अगदीं गोंधळून गेली.

मोहना म्हणाली:—" सारजाबाई—आमच्या आक्काला तूं आक्कासाहेब महाराज म्हणालीस, होय ना ? "

सारजा:—" होय ताईसाहेब. "

मोहना:—" तें काय म्हणून ? "

सारजेला आश्चर्य वाटलें. जहागीरदारांना मरून आज इतके दिवस होऊन गेले तरी मोहनेला ही हकीकत कशी कळली नाहीं याचेंच तिला मोठें नवल वाटलें. ती म्हणाली:—

" ताईसाहेब, पूर्वींचे जहागीरदार वारले, आणि आतां आमचे धनीसाहेब जहागिरीचे मालक झाले, तेव्हां आक्कासाहेबांनाही आक्कासाहेब महाराज म्हटलें पाहिजे. "

"मीं हें नाहीं बाई ऐकलें. कधीं वारले? काय झालें होतें? तुम्हांला केव्हां समजलें?"

"त्यांना वारल्याला आज नऊ दिवस झाले. गेल्या मंगळवारीं वारले. जहागिरीच्या गांवींच त्यांना ताप येऊन ते आजारी पडले नि तिथेंच वारले. बुधवारीं संध्याकाळीं त्यांच्या नांवचें पत्र आलें होतें तें त्यांचें नसून आमच्या सरकारांनाच तें पत्र आलें होतें."

"बाबांनाच तें पत्र आलें होतें? तुला कसें कळलें? घरीं प्रथम केव्हां समजलें?"

"ताईसाहेब, आपण घरांतून बाहेर गेलांत तेव्हांच समजलें. त्या दिवशीं संध्याकाळीं विश्वासराव डाक्तर आपल्या घरीं आले होते, आपणाला आठवत असेल. त्यांनींच जहागीरदारसाहेब आजारी असल्याची बातमी सांगितली. व एक दोन दिवसांपूर्वीं त्यांची तब्येत अत्यवस्थ होती असें ते म्हणाले. हीं पत्रें आमच्या सरकारांना–तेच वारस जहागीरदार म्हणून–आलीं असलीं पाहिजेत असें दिखील ते बोलले."

"आनंदरावांना ही बातमी समजली असेल काय? कारण त्या दिवशीं संध्याकाळीं विश्वासराव आपल्या बंगल्यांतून बाहेर पडून गेल्यावर ते वाटेंत आनंदरावांशीं कांहीं बोलत उभे होते हें मला दिसलें" असा एक विचार मोहनेच्या मनांत आला. पण आनंदरावांवर तिचें निःसीम प्रेम होतें तसाच तिचा पूर्ण भरंवसाही त्यांच्यावर होता; म्हणून 'छे छे! त्यांना कळलें नसेल. नाहीं तर ते मला सांगितल्याशिवाय कधीं राहिले नसते' असें तिला वाटूं लागलें.

नंतर मोहनेनें सारजेला प्रश्न विचारून विचारून पुरें पुरें केलें. बाबा कोठें आहेत, आक्का काय करीत असते, लीलेचा हात कसा आहे, हैबती बरा आहे कीं नाहीं वगैरे आठ दिवसांतील सर्व खडान् खडा माहिती तिनें विचारून घेतली. पुढें सारजेनें तिला सांगितलें कीं, धनीसाहेब लवकरच सर्व मंडळी घेऊन जहागिरीच्या गांवीं रहाण्यास जाणार आहेत. शेवटीं मोहनेनें विचारिलें:—"सारजाबाई, त्या रात्रीं बाबा माझ्यावर फार रागावले असतील नाहीं?"

सारजा:—" ताईसाहेब, तुह्मी नाहींशा झालां हें समजण्यापूर्वींच ते येथून निघून गेले असें मीं मघाशींच सांगितलें तें विसरलां वाटतें? त्यांना ही बातमी कळविण्याकारितां दुसरे दिवशीं आक्कासाहेब महाराज मुद्दाम तिकडे गेल्या होत्या."

" बरें पण, आतां परत आल्यावर तरी त्यांना फार राग आल्यासारखा दिसतो कां ग?"

" होय, ताईसाहेब, मला तरी तसें वाटतें."

" रागावूं देत. खुशाल रागावा म्हणावें. पण सारजाबाई तूं इतक्या रात्रीं कां आलीस? आक्कानें कसला निरोप सांगितला आहे म्हणालीस?"

नंतर आपण थोडेच कां कपडे आणले, ते आणावयास इतका उशीर कां लागला वगैरे सर्व हकीकत सांगून सारजा शेवटीं म्हणाली:—" ताईसाहेब, अक्कासाहेब महाराजांचा आपणाला असा निरोप आहे कीं, आपण तिकडच्या माणसांशीं कोणताच संबंध ठेवूं नका. धनीसाहेबांना तें अगदीं पसंत नाहीं."

" असें कांहीं तरी होईल असें मला वाटलेंच होतें. रागावूं देत. येतील कांहीं दिवसांनीं आपणच ताळ्यावर." असें मोहनेनें उत्तर दिलें. नंतर तिचा निरोप घेऊन सारजा निघून गेली.

रात्रीं जेवण आटपल्यानंतर आनंदराव व मोहना कांहीं वेळ गप्पागोष्टी करीत दिवाणखान्यांत बसलीं होतीं; इतक्यांत ' खालीं कोणसे आले आहेत ' अशी नोकरानें वर्दी आणली. त्यामुळें आनंदरावांना राग आला:—" घरांत येऊन थोडा वेळ झाला नाहीं तोंच पाठोपाठ बोलावणें तयार! अरे ए, खालीं जाऊन त्याला सांग कीं, मला आज रोग्याला पहावयास येण्यास मुळींच फुरसत नाहीं म्हणून. जा, काय लोक तरी वाईट आहेत!"

नोकर खालीं जाऊन लागलीच परत आला:—" साहेब, तो पोलीसशिपाई आहे. मीं त्याला सांगितलें आपली गांठ पडणार नाहीं म्हणून. पण तो म्हणतो कीं गांठ पडलीच पाहिजे."

त्याबरोबर आनंदराव दचकले. " पोलिस शिपाई!" असें आपल्याशींच पुटपुटत ते उठूं लागले.

नोकर पुढें म्हणालाः—" तो कालही आपणाला भेटायला आला होता, आज सकाळीं सुद्धां आला होता. कशाला आला, काय काम आहे म्हणून मीं किती विचारलें पण तो कांहींच सांगत नाहीं. फक्त पेठेंतील त्या घरांत मेलेल्या बाळंतिणीच्या संबंधांत कांहीं काम आहे एवढेंच म्हणाला."

आनंदरावांची त्रेधा उडाली, मोहनाही घाबरून गेली. हें काय लचांड आहे त्यांना कळेना. आनंदराव हातांत एक शामदान घेऊन जिना उतरून खालीं गेले. त्यांनीं त्या शिपायाला ओळखलें. मागें मयत स्त्रीची चौकशी झाली त्या कामांत तोच शिपाई होता. त्यानें आनंदरावांना सलाम करून म्हटलेंः—" डॉक्टरसाहेब, अशा रात्रीच्या वेळीं आपणांस तखलीफ दिली याबद्दल मी फार दिलगीर आहें. परंतु इलाज नाहीं. आमच्या ठाण्यांत त्यासंबंधानें अशी दंगल उडून गेली आहे म्हणतां!"

आनंदरावः—" कशासंबंधानें? कसली दंगल?"

पोलिसशिपाईः—" साहेब, पूर्वीं फौजदार होते त्यांचा हल्ली वर्ग होऊन दुसरे फौजदार आले आहेत. ते म्हणतात ह्या कामाची सर्व प्रकारानें घाण झाली आहे, व तपास बरोबर रीतीनें झालेला नाहीं; नाहीं तर यासंबंधानें जास्त गोष्टी उघडकीला आल्या असत्या. त्या रात्रीं आपणाला जिन्यांत जो मनुष्य दिसला त्याच्याविषयीं कांहीं हकीकत ते आपणाला विचारणार आहेत."

आनंदरावांनीं खोंचून विचारिलेंः—" आत्ता या वेळीं ते विचारणार आहेत काय?"

पोलीसः—" नाहीं साहेब, आत्तां नाहीं. सकाळीं आपणाला फुरसत होईल तेव्हां. मीं म्हटलें, आपण आलां आहांत तेव्हां कळवून जावें हें चांगलें, म्हणून मुद्दाम आलों."

आनंदरावः—" तर मग मागच्या सर्व गोष्टी पुनः उकरून काढण्याचा या नवीन आलेल्या फौजदारांचा बेत आहे तर! काय नांव त्यांचें?"

पोलीसः—" रंगराव उपद्व्यापे."

आनंदरावः—" उपद्व्यापे? नांवाप्रमाणें ते मोठे उपद्व्यापी दिसतात

खरे. बरें आहे. उद्यां सकाळीं जाऊन मला जी कांहीं माहिती आहे ती मी सांगतों. झालें ? ”

## प्रकरण २१ वें.

### फौजदार कचेरींत.





दुसरे दिवशीं सकाळीं उठल्यावर आनंदरावांनीं प्रातर्विधि आटपून चहा घेतला व रोगी पाहण्याकरितां ते बाहेर पडले. गेले आठ दहा दिवस कांहीं सूचना वगैरे न देतांच डॉक्टर परगांवीं निघून गेले म्हणून सर्व रोगी लोक अगदीं बंडाळीस आले होते.

रस्त्यानें जातां जातां आनंदराव ‘ फौजदार कचेरी ’ अशा अक्षरांची पाटी लाविली होती त्या इमारतीसमोरून चालले. थोडीं पावलें पुढें गेल्यावर त्यांना रात्रीची आठवण झाली; त्याबरोबर ते मागें वळले. दरवाजांत सुमारें चाळीस वर्षें वयाचे एक गृहस्थ उभे होते. नाक लहान आणि बसकें, मुद्रा धूर्त व चलाख आणि डोळे पाणीदार असे होते. ते आनंदरावांकडे शांतपणानें व लक्ष्यपूर्वक पाहूं लागले. चतुर व हुषार माणसें दुसऱ्याचें वर्तन आणि हालचाल समजून घेण्याकरितां कधीं कधीं अशा तऱ्हेची बारीक नजर टाकीत असतात. फौजदार रंगराव उपद्यापे ह्मणावयाचे ते हेच. पण आनंदरावांना माहीत नसल्यानें त्यांनीं विचारिलें:—
“ फौजदारसाहेबांची गांठ पडेल काय ? ”

“ हो हो. गांठ तर पडलीच आहे. आपलें काय काम आहे ? मीच फौजदार. ”

"असें का ? मग बरेंच झालें म्हणावयाचें. काल रात्रीं पोलीस शिपाई माझ्या घरीं आला होता, म्हणून म्हटलें भेटून जावें. आनंदराव डॉक्टर तो मीच."

" ओहो ! माफ करा डॉक्टरसाहेब. माझा आपला परिचय नाहीं. मी नुकताच येथें बदली होऊन आलों आहें. या या, असे आंत या. अरे खुर्ची आण खुर्ची."

शिपायानें खुर्ची आणून ठेविल्यावर ते दोघेही एका लहानशा खोलींत जाऊन बसले व शिपायानें खोलीचें दार ओढून घेतलें.

आघले रात्रीं आपलें व शिपायाचें बोलणें झालें तें सांगून आनंदराव म्हणाले:—" मला पूर्वीं जी माहिती होती त्यापेक्षां हल्लीं कांहीं जास्त नाहीं. ती बाई वारली त्या वेळीं मला जेवढी हकीकत माहीत होती तेवढी सर्व मीं पोलिसांना दिली आहेच—मला विशेष माहिती नव्हतीही."

" होय होय डॉक्टरसाहेब, पण मी नाहीं तें विचारीत. मला त्याची जरूर नाहीं. तुम्हांला हल्लीं जास्त माहिती मिळाली आहे असें नाहीं मी म्हणत. मला पाहिजे आहे तें हेंच कीं—आपण पूर्वींच्या फौजदारांना जशी माहिती सांगितली तशीच पुनः एकवार मला शांतपणानें सांगा; माझें तर असें मत आहे कीं, या सर्व प्रकरणाचा व्हावा तसा तपास झाला नाहीं. दर्याबाई नांवाची जी बाई येथें येऊन मूल घेऊन गेली त्या बाईचा पत्ता कोठें यांनीं लाविला आहे? तिच्यासंबंधानें मुळींच कांहीं तपास लागू नये?"

" पण त्यांनीं मुंबईमध्यें त्या नांवाच्या जवळ जवळ शंभर बाया पाहिल्या. परंतु त्यांना जी पाहिजे होती ती मिळाली नाहीं. तिचें नांवच मुळीं दर्याबाई नसावें. येथें येण्यापुरतें तिनें तें नांव खोटेंच धारण केलें असेल."

" तसें म्हणावें तर त्या बाळंतीण बाईनें येथें आल्यादिवशींच संध्याकाळीं त्या बाईला याच नांवानें पत्र लिहिलें होतें." असें फौजदार मानेस जरा हिसका देऊन म्हणाले. यावरून त्यांनीं या एकंदर प्रकरणाचा फार बारकाईनें तपास केला होता असें दिसलें.

आनंदराव:—" होय. परंतु हा त्यांचा बेत पूर्वींच ठरलेला असेल, फौजदारसाहेब, एवढी गोष्ट तरी निर्विवाद आहे कीं ती बाई येथें आली

ती अज्ञातवासांत राहण्याच्या उद्देशानेंच आली होती. मुंबईहून आली होती म्हणतात, पण मला नाहीं तसें वाटत. ती दर्याबाई म्हणणारी—ती सुद्धां मुंबईहून आली नसावी. मला तरी खात्रीनें असें वाटत आहे कीं येथें आल्यावर त्या बाळंतिणीचें जें काय बोलणें झालें, तिनें जें जें कांहीं केलें, त्यांत एकच हेतु दिसून येतो–तो हा कीं आमच्या सर्वांच्या डोळ्यांत धूळ टाकावयाची. आणि हा तिचा हेतु अगदीं छान साधला."

असें बोलत असतां आनंदराव आपल्या हातांतील छत्रीच्या टोंकानें जमिनीवर कायसें करीत होते. त्यांच्या चेहऱ्यावर एकदम पालट झाला. एक भीतीची लाट त्यांच्या तोंडावरून येऊन गेलीसें दिसलें. फौजदार जात्या चौकस व चाणाक्ष; त्यांत आज इतक्या वर्षांचा पोलिस खात्याचा अनुभव; तेव्हां आनंदरावांच्या मुद्रेंत फेरबदल झालेला त्यांच्या तात्काळ लक्ष्यांत आला, व त्यामुळें त्यांना फार आश्चर्य वाटलें. त्यांच्याकडे पाहून आनंदराव म्हणाले:–"फौजदारसाहेब, तुम्हांला काय सांगूं ? ती बिचारी मरून गेली खरें, पण तिच्या मरणानें मला जो कांहीं त्रास झाला तो सांगतां येत नाहीं. ईश्वर करो आणि असा त्रास पुनः मला न होवो. लोकांचा तर त्या वेळीं असा ग्रह झाला कीं माझें त्यांत अंग असावें कां म्हणाल तर ती कलावती म्हणाली होती म्हणे कीं, तुला जर कधीं डॉक्टराची जरूर पडलीच तर आनंदरावांना बोलावून आण म्हणून आपल्या मैत्रिणींनीं सांगितलें आहे. कां ? खासा उद्योग आहे कीं नाहीं ?"

फौ०—"आणि तुमची शिफारस कोणीं केली हेंही तुम्हांला समजलें नाहीं ?"

आनंदराव:—"बिलकूल नाहीं. मुंबईत माझे जितके म्हणून स्नेही आहेत तितक्या सर्वांना मी पत्रं लिहून विचारिलें कीं तुम्ही कोणा बाईकडे माझी शिफारस केलीत कीं काय म्हणून. पण सर्वांकडून नकारार्थी उत्तर आलें. कलावती नांवाची बाईच मुळीं कोणा एकाला सुद्धां माहीत नाहीं. मला वाटतें तिचें खरें नांव 'कलावती' असें नसावें हेंच खरें. दर्याबाईचें नांव जसें लटकें दिसतें तसेंच हिचेंही असावें. या सर्व बाबतींत खरा भाग दिसत नाहीं. ती बिचारी मेली एवढी मात्र गोष्ट खरी."

फौजदारः—" डॉक्टरसाहेब, आपलें स्वतःचें मत यासंबंधीं काय आहे ? खाजगी नात्यानें विचारितों हो. "

" कशासंबंधीं ?

" मरणाच्या कारणासंबंधीं. झोंपेचें औषध प्याल्यामुळें तिला मरण आलें हें सर्वांना माहीत आहे. पण मी म्हणतों त्या औषधांत विष कोणीं घातलें असावें ?

" माझें मत विचाराल तर असें आहे;—पण तें मत तुम्हांला सुद्धां सांगणें बरें नव्हे, पण खाजगी नात्यानें विचारतां म्हणून सांगतों. माझें मत आहे कीं, त्या औषधांत प्रतापरावांकडूनच निष्काळजीपणामुळें विष मिसळलें गेलें. दुसरा तर्कच चालत नाहीं. यासंबंधीं दोन मतें कां असावींत हेंच मला समजत नाहीं. "

फौजदारांनीं आपली मान हालविली. डॉक्टराप्रमाणें त्यांचें मत नव्हतेंसें दिसलें. परंतु त्यांनीं तसें बोलून दाखविलें नाहीं. प्रतापरावांकडे कांहीं दोष आहे असें त्यांना वाटलें नाहीं. ते नंतर लागलीच म्हणाले:— " माझ्या मनांत जें विचारायचें आहे तें त्या जिन्यांत तुम्हांला जो मनुष्य दिसला त्याच्या संबंधानें. हाच महत्वाचा भाग आहे. त्या मनुष्याचा पुरा तपास लावावयाला पाहिजे होता. होय कीं नाहीं, डॉक्टर ? "

आनंदरावः—" पण जिन्यामध्यें मला कोणीही माणूस दिसला नाहीं. एवढें खरें कीं कोणी दिसल्यासारखें प्रथम मला वाटलें.पण मग माझें मत झालें कीं मला केवळ भास झाला; चंद्राच्या अस्पष्ट प्रकाशामुळें माझ्या दृष्टीस थोडी विकृति झाली असावी. "

फौजदारः—" तेथें कोणी मनुष्य नव्हता, असें आपण प्रतिज्ञेवर सांगूं शकाल काय ? "

आनंदरावः—" प्रतिज्ञेवर ? नाहीं. तसें मी सांगणार नाहीं. तथापि माझी अशी पक्की खात्री झाली आहे कीं तेथें कोणीही मनुष्य नव्हता. मला वाटतें माझ्या दृष्टीनेंच मला फसविलें. "

फौजदारसाहेब जरा आपलें स्थूल प्रस्थ उचलून पुनः बसून—आपल्या भाषणाला बळकटी आणण्याकरितांच कीं काय—म्हणाले:—" डॉक्टर,

एवढें मात्र खूप समजा कीं, तेथें कोणी तरी माणूस असलाच पाहिजे, व त्यानेंच हीं सर्व कृत्यें केलीं आहेत. समजलें, समजलें, तुह्मी म्हणाल कीं औषध त्या घरीं आलें तेव्हांच त्याला विषाचा वास येत होता. तुम्ही पूर्वी आपल्या जबानींत असें सांगितलें आहे. होय ना? पण मी नाहीं त्याची इतकी मातबरी समजत. प्रथमदर्शनीं हेंच एक कोडें कसें उलगडावें हा प्रश्न पुढें उभा राहतो. पण मी या सर्व प्रकरणाची वेगवेगळ्या रीतींनीं मांडणी करून त्याबद्दल पुरता विचार केला आहे, व हें कोडें मी उलगडलें आहे. मी त्याला एक रतिभरसुद्धां महत्त्व देत नाहीं. मग तुह्मी कांहींही ह्मणा."

आनंदरावः—"तर मग जें खरें नाहीं तें मीं सांगावें असें तुमचें म्हणणें?"

फौजदारः—"छे छे छे! एक केसभरसुद्धां सांगूं नये. झालेली हकीकत बरोबर रीतीनें सांगण्यास व या एकंदर प्रकरणावर प्रकाश पाडण्यास तुह्मी माझ्याप्रमाणेंच स्वाभाविकपणें उत्सुक असाल. परंतु मला ठाऊक आहे कीं आपलींच इंद्रियें केव्हां केव्हां सपशेल फसतात, त्याप्रमाणें तुमच्या घ्राणेंद्रियानें तुम्हांला फसविलें नसेल कशावरून? तुम्हांला वाटलें त्या औषधाला प्रसिक ॲसिडचा वास आला; पण खरोखर तसा वासच तुम्हांला आला नाहीं; कारण त्यांत त्या वेळीं तें विष नव्हतेंच. ती सुईण काय तिचें नांव तें—ती लष्ठेश्वर बाई सांगते कीं तसला कांहीं वास येत नव्हता म्हणून. मी तिला येथें आणली होती. ती थोडा कैफ घेत असते असें मला समजलें आहे. पण यामुळें तिच्या नाकाचा वासच बंद झाला होता असें म्हणतां नाहीं येणार. एवढें पक्कें लक्षांत असूं द्या कीं, त्या वेळीं तिचें नाक तुमच्या नाकापेक्षां आपलें काम जास्त चांगल्या रीतीनें करीत होतें."

आनंदरावः—"छत्! आपण कांहीं तरी म्हणतां. मी जातीचा डॉक्टर आहे बरें? औषधांच्या वासाचा मला नेहमीं अनुभव आहे. मी कांहीं फसणार नाहीं."

फौजदार आग्रहानें म्हणालेः—"तेंच तेंच. मीही तेंच म्हणतों. जे

लोक नेहमीं औषधें वापरणारे, सदोदित दवाखान्यांत असणारे याच लोकांना, वास नसतो तेव्हां वास येतो असें वाटणें हें इतर लोकांपेक्षां जास्त संभवनीय. औषध जेव्हां त्या घरांत आलें तेव्हां त्याला कांहीं विषाचा वास येत नव्हता येवढें खरें. ”

आनंदराव:—“ पण त्याला विषाचा वास येत होता असें मी म्हणतों. ”

फौजदार:—“ आणि मी म्हणतों कीं येत नव्हता. खरोखरच येत नव्हता; डॉक्टर, माझी अगदीं खात्री झाली. जिन्यावर जो मनुष्य दिसला त्यानेंच त्या औषधांत विष घातलें, तुह्मी गेल्यावर घातलें. ”

आनंदराव पुढें कांहीं बोलले नाहींत. फौजदाराचें मत ठाम बनलेलें दिसत असल्यानें तें बदलण्याचा प्रयत्न करणें निरर्थक होतें. कदाचित् मोहनेला घेऊन पळून जाण्याचा बेत त्यांनीं ज्या संध्याकाळीं केला त्या वेळीं पुनः त्या चेहऱ्याची आपली दृष्टादृष्ट झाली होती या गोष्टीची आनंदरावांना आठवण झाली असेल. हा तरी निदान खातीनें भास नव्हे; कारण मोहनेनें सुद्धां आपणाला तो चेहरा दिसल्याचें त्यांना सांगितलें होतें तर मग जिन्यांत कोणीच नव्हतें असें जें आनंदराव ह्मणत त्याचा व ह्याचा मेळ कसा बसवावयाचा ? आनंदरावांना तर कांहींच सांगतां येईना. तथापि तो अनिष्ट चेहरा काल्पनिक होता, तेथें खरोखरच कोणी उभें नव्हतें, आपणाला केवळ भास झाला, हीच गोष्ट खरी व्हावी असें त्यांना मनापासून वाटत होतें, एवढें मात्र खास.

त्यांनीं नंतर फौजदारांना विचारिलें:—“ मला एवढेंच विचारावयाचें होतें ना ? या वेळीं मला आणखी बरींच कामें आहेत. ”

फौजदार:—“ नाहीं एवढेंच नाहीं, आणखीही विचारावयाचें आहे. आपल्या डोळ्याला जशा गोष्टी दिसल्या तशा आपण मेहेरबानी करून एकवार मला सांगा. प्रतापराव डॉक्टरांनीं मला सर्व सांगितल्या आहेत, पण तुमच्याकडून मला त्या एकदा ऐकावयाला पाहिजेत; एका साक्षीदाराचा एक शब्द, दुसऱ्याचा दुसरा, तिसऱ्याचा तिसरा, असें मिळून एखाद्या गोष्टीचा बरोबर खुलासा करण्यास किती मदत होते हें पाहिलें तर मोठें आश्चर्य वाटेल. आपण तिला—त्या बाळंतिणीला—मला वाटतें

प्रथम रविवारीं रात्रीं पाहिलें. तिनें आपणास लिहिलेलें पत्र जर आपण जपून ठेविलें असतें तर किती बहार झाली असती ! ”

आनंदरावः—“ त्या पत्राची पुढें कधीं तरी जरूर लागेल असें कोणाला वाटलें होतें ? आणि तें पत्र जरी मीं जपून ठेवलें असतें तरीसुद्धां कांहीं जास्त माहिती लागली नसती. कारण, त्या पत्रांत कांहीं विशेष नव्हतेंच. ”

फौजदारः—“ डॉक्टरसाहेब, प्रत्येक अक्षर, प्रत्येक शब्द प्रत्येक कागदाचा कपटा, ज्यांना त्यांचा उपयोग करण्याचें माहीत, त्यांना तो महत्वाचा वाटतो. पुरावा करण्याच्या कामीं त्याची फार मदत होते. बरें चालूं द्या. कशी कशी हकीकत झाली सांगा पाहूं. अगदीं पहिल्यापासून.”

“ ठीक आहे, अगदीं पहिल्यापासून सांगतों. ” असें म्हणून आनंदरावांनीं सांगण्यास सुरवात केली. त्यांनीं जशा गोष्टी पाहिल्या होत्या तशा सांगितल्या.

आनंदरावांचें भाषण संपल्यावर फौजदार म्हणाले:–“ एवढीच हकीकत तुम्हांला माहीत आहे काय ? ”

आनंदरावः–“ एवढचि. ”

फौजदार लेखणीच्या शेवटानें आपलें नाक खाजवूं लागले, यावरून ते कांहीं गूढ विचारांत मग्न झाले असावेत असें दिसलें. ते नंतर लागलीच म्हणालेः—“ या प्रकरणांतील सर्व हकीकत संगतवार जुळत आहे. फक्त दोनच गोष्टींचा मेळ बसत नाहीं. पहिली ही कीं औषध तयार करण्यांत प्रतापरावांकडून चूक व्हावी ही अत्यंत असंभवनीय गोष्ट. दुसरी ही कीं आपण जिन्यांत पाहिलेला त्या मनुष्याचा चेहरा. या दोहोंची बरोबर तोड निघत नाहीं. ”

आनंदरावः—“ पण मी आपणाला अगदीं खात्रीवर सांगतों कीं, जिन्यांत कोणी मनुष्य नव्हता. ”

फौजदारः–“ आपणाला आतां तसें वाटतें, पण त्या वेळीं तरी खात्रीनें तसें वाटलें नाहीं. कारण मग तुम्ही मावशीबाईजवळ असें बोलला नसतां. डॉक्टरसाहेब, विशेष प्रसंगीं मनुष्याच्या मनावर जो ठसा उठतो

त्याची फार किंमत असते. लक्ष्य आहे ना ? आतां याच मुद्याकडे मला सर्व अक्कल खर्च केली पाहिजे. त्या वेळीं जिन्यांत कोणी तरी असलाच पाहिजे. मी पैज मारतों."

आनंदरावः—" बरें बोवा. चालूं द्या तुमची खटपट, आमचें तरी काय जातें ? एवढेंच विचारायचें होतें ना ? आतां मोकळीक ?"

" होय डॉक्टरसाहेब, आपणाला फार तसदी पडली. माफ करा. आम्हांला कांहीं सुगावा लागला तर अगोदर आपणाला कळवूं. समजलें ?"

---

# प्रकरण २२ वें.

—:o:—

## आजीसाहेब.



सर्जेरावांचा मुक्काम येथें फारच थोडा झाला. पुढील व्यवस्थेसंबंधीं इंदिरेबरोबर वाटाघाट करून विचार ठरविण्याकरितां ते एक दोन दिवस इकडे आले होते.

सर्जेरावांना हल्लीं जी जहागीर मिळाली होती तिचें वार्षिक उत्पन्न दीड दोन लाख रुपयांचें होतें. त्यांच्या अलीकडच्या खालावलेल्या स्थितीशीं तुलना करून पहातां हें उत्पन्न म्हणजे एक अलोट संपत्तीची खाणच त्यांना सांपडली, असें म्हटलें पाहिजे. निदान सर्जेरावांना व इंदिरेला तसें वाटलें यांत तिळमात्र संशय नाहीं. सर्जेराव इतक्या टापटिपीनें वागत, तरी पण त्यांना कर्ज झालें नव्हतें असें नाहीं. आणि अलीकडे अलीकडे तर त्यांचा विकार जोरावल्यामुळें औषधपाण्याचें बिलच महिन्याच्या महिन्याला किती तरी मोठें होई. दशांत घराणें

उंच, नांवलौकिक मोठा, मुली तरुण व हौशी, इत्यादि कारणांमुळें सर्जेरावांचा प्रपंचखर्च अगदीं अनावर झाला होता व यामुळें त्यांच्या मूळच्या कर्जांत आणखी बरीच भर पडली होती.

इकडे जहागिरीच्या खजीन्यांत तरी बरीच शिलक असावी म्हटलें तर तेंही नाहीं. शिलकेच्या नांवानें आंवळ्याएवढें पूज्य होतें—नव्हे—भोपळ्याएवढें होतें, असें म्हटलें तरी चालेल. इतकेंच नाहीं तर आज कित्येक महिन्यांचा नोकरांचा पगार थकलेला होता. या सर्वांची निरवानिरव सर्जेरावांना करणें जरूर होतें. याकरितां जहागीर गांवच्या वाड्यांतील सर्व खटला मोडून टाकावा व आपण आपली घरची मंडळी व जरूर तेवढें नोकर बरोबर घेऊन कांहीं दिवस मुंबईस जाऊन रहावें असा त्यांनीं विचार काढला व त्याप्रमाणें त्यांनीं इंदिरेला कळविलें.

इंदिरेनें तात्काळ रुकार दिला. तिला आतां कोणत्याहि गोष्टीची उणीव नव्हती. मोहनेनें नुकताच तिच्या मनाला जो धक्का दिला तो दिला नसता तर आज आपणासारखें सुखी जगांत दुसरें कोणी नाहीं असें तिनें मानलें असतें. येऊन जाऊन कमळजेची आठवण झाली कीं तिच्या पोटांत भडभडून येई. निरुपायास्तव व घरची दैन्यावस्था म्हणून ती घरांतून बाहेर पडली. पण आतां आपले बाबा जहागिरीचे मालक झाले, आतां पैशाची काय पंचाईत ? कमळजेनें बाहेर न रहातां घरीं यावें हें बरें, असें इंदिरेला वाटे. पण सर्जेराव इतके रागावले होते, कीं कमळजेचें नांव सुद्धां माझ्या देखत काढूं नकोस अशी त्यांनीं इंदिरेला सक्त ताकीद दिली होती.

अर्थातच कमळजेविषयीं बाबांजवळ गोष्ट कशी काढावी हा विचार तिला पडला. सर्जेराव जहागीर गांवीं गेले होते. तिकडून आल्यावर स्वारी आनंदांत आहे असें पाहून बेताबेतानें गोष्ट काढावी असें इंदिरेच्या मनांत होतें. पण मोहनेचा हा प्रकार समजल्यामुळें तर ते अगदीं जमदग्नीचा अवतार बनले होते. चडफडत काय, संतापत काय, आरडत काय व ओरडत काय. त्यांच्यासमोर उभें राहण्याची सुद्धां कोणाची छाती होईना. मग तेथें उभें राहून असल्या नाजूक विषयासंबंधीं त्यांचा रुकार मिळविणें लांबच. एक दिवस गेला, दोन दिवस गेले पण इंदिरेला धैर्य होईना. शेवटीं सर्जेराव

वाड्यांतील सर्व व्यवस्था लावण्यासाठीं जहागीर गांवीं पुन्हां जावयास निघाले. गाडी स्टेशनावर जाण्यासाठीं दरवाज्यावर उभी होती; व हें बांध, तें आण, हें कर, तें कर म्हणून सर्जेराव हुकुमावर हुकूम सोडीत होते. इंदिरेच्यानें आतां राहवेना. तिचें ऊर धड धड करीत होतेंच. त्यांतल्या त्यांत धीर धरून शांतपणानें व आर्जवानें ती म्हणाली, " बाबा, तुम्ही मला न बोलण्याबद्दल ताकीद दिली आहे खरी; पण मी बोलतें त्याचा राग नसावा. म्हटलें, कमळजेचा तपास तरी करूं का ? किती तरी दिवस झाले, तिच्याकडून पत्र सुद्धां नाहीं- आपलीच ना ती ? "

सर्जेराव एकदम कडाडले. " काय ? क–म–ळ–जेला आतां घरीं आणायाची काय ? " सर्जेराव रागानें म्हणाले. " नाहीं. बस्स, बस्स, नाहीं. तुझी जीभ फारशी वळवळूं लागली ती ! तिला आणायची म्हणे ! कशाला ? येऊं दे तिला चांगली शुद्धीवर ! "

असें म्हणत सर्जेराव बाहेर जाऊन गाडींत बसले. गाडी स्टेशनावर निघून गेली. बरोबर हैबती होताच. इंदिरा बिचारी खट्टू होऊन मुळूं मुळूं रडत बसली.

वाचकहो सर्व गोष्टी नीट लक्षांत येण्याकरितां आपण थोडेंसें मागें जाऊं. सर्जेरावांना चार मुली होत्या. पण तुम्हांला तिघींचीच माहिती आहे. इंदिरा, मोहना, कमळजा व लीला अशीं त्या चौघींचीं नांवें होतीं. मोहनेच्या पाठची कमळजा, पण त्या दोघीजणी अगदीं बरोबरीच्या दिसत. इंदिरा त्यांच्यापेक्षां वयानें बरीच मोठी होती. ती सर्वांत वडील. लीला अगदीं लहान. तिला नुकतें आठवें वर्ष लागलें होतें. मोहना व कमळजा या मात्र समवयस्क दिसत. दोघींमध्यें फक्त एक वर्षाचेंच काय तें अंतर होतें; त्या जसजशा मोठ्या होत चालल्या तसतशा रूपानें अप्रतिम सुंदर दिसूं लागल्या. सर्जेरावांची चुलती जिजाबाईसाहेब म्हणून एक मोठी जहांबाज, हुशार व खर्चिक बायको होती. तिला दहा हजार रुपायांची नेमणूक असून शिवाय माहेरची इस्टेटही तिच्या जवळ बरीच होती. तिचें सर्जेरावांवर व त्यांच्या मुलींवर चांगलें लक्ष्य असे. त्यांतल्यात्यांत मोहनेवर व कमळजेवर तिचें फार प्रेम होतें. ' या दोघींना माझ्याजवळ कांहीं

दिवस ठेवा, मी यांना शाळेंत घालतें, त्यांचीं लग्नें करतें, खर्चाचा बोजा तुमच्यावर कांहीं नाहीं, माझा मी सर्व खर्च करितें, तुह्मी बिलकुल काळजी करूं नका." असें बोलणें जिजाबाईसाहेबांकडून आल्यामुळें सर्जेरावांनीं रुकार दिला. त्याप्रमाणें मोहना व कमळजा या दोघींस बरोबर घेऊन जिजाबाईसाहेब बडोद्यास जाऊन राहिल्या. तेथें चार पांच वर्षें त्या दोघीजणी शाळेंत चांगल्या शिकल्या व त्यांची खाण्यापिण्याची व वस्त्रप्रावरणाची वगैरे सुरेख व्यवस्था जिजाबाईसाहेबांनीं ठेविली. परंतु आपल्या मुली दुसऱ्याच्या घरीं रहाव्या हें सर्जेरावांच्या मानी स्वभावास पुढें पुढें पसंत वाटेना म्हणून चार पांच वर्षांनंतर मोहना व कमळजा पुनः सर्जेरावांच्या घरीं आल्या. त्या वेळीं मोहना सोळा वर्षांची असून कमळजेला पंधरावें वर्ष होतें.

परंतु बडोद्यांत जिजाबाईसाहेबांच्या घरीं असतांना त्यांना जें गृहसौख्य मिळत होतें त्यापेक्षां वडिलांच्या घरीं फारच कमी मिळूं लागलें. कारण सर्जेरावांची स्थिति अगदीं निकृष्ट झालेली होती. देणेदारांचे रोज येणारे तगादे, घरांत सर्व गोष्टींची उणीव, सुबत्ता म्हणून कशाचीही नाहीं, या वयांत अशा सुस्वरूप व शिकल्या सवरलेल्या मुलींना जी हौस व करमणूक हवी असते ती तर बिलकुल नाहीं, इत्यादि गोष्टी त्या दोघींना अगदीं सहन होईनात. इंदिरा वयानें पोक्त व समजूतदार होती. वडिलांच्या ठिकाणीं तिचें फार प्रेम होतें. त्यांच्या सेवेंत ती आलेला दिवस घालवीत होती. लीला तर मूलच. तिला कांहीं वाटणें शक्यच नव्हतें. पण मोहनेला व कमळजेला येथें राहणें फारच जड जाऊं लागलें.

कमळजेनें प्रथम या त्रासांतून आपणास मोकळें करून घेतलें. कांहीं दिवस तिनें हाल काढले. परंतु नंतर तिनें घरांत स्वच्छ सांगून टाकलें कीं आपणाला ही हालअपेष्टा सहन करवत नाहीं; आपण कोठें तरी मास्तरणीची नोकरी धरणार. त्याबरोबर घरांतील सर्वच मंडळी तिच्यावर थिथरली. सर्जेराव तर तिच्याशीं बोलेनात सुद्धां. त्यांनीं तिच्यावर यथेच्छ तोंड सोडलें, व पुनः असें बोलशील तर खबरदार म्हणून खडसून ताकीद केली. इंदिरेनें तिला उपदेशाच्या चार गोष्टी सांगण्यास सुरवात

केली. मोहनेनें तर तिची थट्टाच करण्यास आरंभ केला. पण कमळजेनें आपला हट्ट म्हणून सोडला नाहीं.

वडील माणसांच्या इच्छेविरुद्ध व त्यांची आज्ञा मोडून मोहना जशी पुढें घरांतून बाहेर पडली त्याचप्रमाणें कमळजाही घर सोडून चालती झाली.

या कामांत जिजाबाईसाहेब पडल्या नसत्या तर फार बरें झालें असतें. त्यांनीं केवळ आगींत तेल ओतलें. त्या कमळजेवर अतिशय संतापल्या, रागावल्या, व तिला नाहीं नाहीं तें बोलल्या. पण त्यांच्या रागाचा कांहींच उपयोग झाला नाहीं. घरांतून निघून जाण्यापूर्वीं जो निकराचा तंटा उडाला त्या वेळीं कमळजेनें सर्वांस असें सांगितलें कीं माझ्यामुळें तुमच्या घराण्याला कधींही काळोखी लागणार नाहीं. कारण मी आपलें नांव, आडनांव, सर्व बदलून टाकणार, व परक्या माणसास आपल्या घराण्याची ओळखसुद्धां लागूं देणार नाहीं. असा पण करून ती गुप्तपणें घरांतून बाहेर पडली.

कमळजा निघून गेली ती गेलीच. पण त्यामुळें जिजाबाईसाहेबांना घुस्सा आला. त्यांनीं कमळजेचें किंवा तिच्या निघून जाण्याचें पुनः नांवसुद्धां काढलें नाहीं. त्यांचेच पुतणे सर्जेराव. त्यांनींही तसेंच केलें.

घरांतून बाहेर गेल्यानंतर थोडक्याच दिवसांनीं कमळजेचें इंदिरेला एक पत्र आलें. आपण हल्लीं कोठें आहोंत, काय करीत असतों वगैरे हकीकत तिनें त्या पत्रांत लिहिली होती. आपण मुंबईस आल्यावर येथें स्त्री-शिक्षणप्रसारक सभेच्या मदतीनें व खटपटीनें आपणास एक नोकरी मिळालेली आहे; गिरगांवांत एक श्रीमान् व कुलीन गृहस्थ आहेत. त्यांच्या घरीं मुलींना शिकविण्याच्या कामीं माझी नेमणूक झाली आहे, माझी येथें सर्व प्रकारची सोय आहे, कांहीं काळजी करूं नये; मी येथें आल्याबरोबर आपलें नांव, आडनांव बदललें आहे पण तें सांगण्याची माझी इच्छा नाहीं, मला पत्र पाठवावयाचें असेल तर गिरगांवांत प्रार्थना समाजांत ' पुणेकरीण बाई ' या पत्त्यावर पाठविल्यास मला पोंचेल; वरचेवर पत्र पाठवून तिकडील कुशल कळवावें; बाबांच्या चरणीं माझा नम-

स्कार प्रविष्ट करावा; आणि मी स्वतःला किंवा माझ्या कुळाला बट्टा लावणार नाहीं; तुह्मी माझ्यासंबंधानें अगदीं निर्धास्त असा. मीं जें कांहीं केलें आहे तें सद्धेतूनें व सदिच्छेनें केलें आहे. पण आपण सर्व माझ्यावर रागावलां आहां. तथापि माझ्यावर प्रेम करण्याची व मला क्षमा करण्याची वेळ लवकरच येईल, अशी मला आशा आहे— वगैरे वगैरे मजकूर तिनें त्या पत्रांत लिहिलेला होता.

इंदिरेनें हें पत्र वडिलांस दाखविलें. पण तें पाहून त्यांना पराकाष्ठेचा राग आला. त्यांनीं इंदिरेला सांगून कमळजेला उत्तर लिहविलें व त्यांत 'तूं माझ्या घरीं फिरून कधींही येऊं नकोस व मी तुला केव्हांही क्षमा करणार नाहीं' असा खडखडीत निरोप त्यांनीं कमळजेला पाठविला. इंदिरेला पक्कें माहीत होतें कीं अशानें कमळजा जास्तच चिडणार. पण करते काय बिचारी ? तिला वडिलांची आज्ञा मानणें भाग झालें. या वेळेपासून कमळजेचें नांव सुद्धां कोणीं काढावयाचें नाहीं अशी सर्जेरावांनीं घरांत सक्त ताकीद दिली.

परंतु आतां आपल्या स्थितींत बदल झाल्यामुळें बाबा कमळजेला बोलावणें पाठवून आणतील असें इंदिरेला साहजिकच वाटत होतें. कमळजा आतां कांहीं गरीबाची मुलगी नव्हे, ती जहागीरदारांची कन्या झाली, तिला 'आक्कासाहेब' ही संज्ञा प्राप्त झाली. अशा थोर घराण्यांतील तरुण मुलीनें पर ठिकाणीं राहून मास्तरिणीची नोकरी धरावी हें अगदींच गैरशिस्त, असें सर्जेरावांना वाटावयाला पाहिजे होतें. परंतु इंदिरेनें गोष्ट काढल्याबरोबर—'बस्स, नाहीं. कारटी येऊं दे चांगली शुद्धीवर' असे शब्द त्यांच्या तोंडांतून कडाडून बाहेर पडले.

सर्जेराव तर निघून गेलेच. जास्त विचार करण्यास इंदिरेलाहि आतां वेळ नव्हता. आठ दिवसांनीं लीलेला बरोबर घेऊन तूं जहागीर गांवीं ये, येथें राहूं नकोस, हा बंगला सोडावयाचा आहे, असें सर्जेराव जातानां सांगून गेले होते. व जातांना लोकांचें सर्व देणें भागवून टाकण्यास पुरे इतके पैसेही ते देऊन गेले होते. इंदिरेला आतां घरांतील सर्व जिनसांची व्यवस्था करावयाची होती. तिनें घरांतील सर्व आवराआवर चालवि-

ली. मोहनेच्या खोलींतील सर्व जिन्नस एके ठिकाणीं करून नीट व्यवस्थेनें ठेव म्हणून तिनें सारजेला सांगितलें. पण सारजेनें कांहींच उत्तर दिलें नाहीं. तिचें लक्ष्य इकडे नव्हतें. ती खिडकींतून खालीं रस्त्याकडे पहात होती.

सारजा मागें वळून म्हणाली, " आक्कासाहेब, मला हाक मारलीत वाटतें ? दरवाज्यांत एक गाडी येऊन उभी राहिली म्हणून मी तिच्याकडे पहात होतें. गाडींत एक म्हाताऱ्याशा बाई दिसतात. "

इंदिरेनें खिडकींतून पाहिलें. तों आपल्या आजीसाहेब गाडींतून उतरत आहेत असें तिला दिसलें. त्याबरोबर ती गडबडीनें खालीं गेली.

आजीसाहेबांचा बांधा ठेंगणा व शरीरयष्टि जरा स्थूल होती. पण गाडींतून उतरून त्या चटाचट पायऱ्या चढून जेव्हां ओसरीवर आल्या तेव्हां त्या बऱ्याच चपल आहेत असें वाटलें.

इंदिरा जाऊन त्यांच्या पायां पडते इतक्यांत त्यांनीं विचारलें, " तुझे बाबा कोठें आहेत ? " त्यांच्या कठोर आवाजावरून इंदिरेनें ताडलें कीं यांच्या मर्जीविरुद्ध कांहीं तरी झालेलें आहे.

इंदिरेनें शांतपणानें उत्तर केलें, " बाबा आपल्या जहागीर गांवीं आजच सकाळीं निघून गेले. "

आजीसाहेब म्हणाल्या. " होय, खरेंच. त्या शिपायानें आतां मला तसेंच सांगितलें. पण असें चहूंकडे हिंडत बसण्याचें इतकें त्यांचें कसलें काम आहे ? ते इतक्या गडबडीनें कां निघून गेले ? "

" आजीसाहेब, आपला पुढील बेत मला कळविण्याकरितां व मी पुढें कसें करावें हें समजावून देण्याकरितां ते येथें आले होते. दोन तीन दिवसच त्यांचा येथें मुक्काम होता. " इंदिरा मोठ्या विनयशीलपणानें म्हणाली.

इतक्यांत लीला पळत येऊन आजीसाहेबांच्या मांडीवर जाऊन बसली. त्यांनीं तिचे किती तरी मुके घेतले. त्या नंतर म्हणाल्या, " काल रात्रीं जहागीर गांवीं जाण्याकरितां म्हणून मी स्टेशनावर आलें. रात्र फार झाली व वाट वाईट म्हणून तेथेंच राहिलें. सकाळीं उठल्याबरोबर वा-

ड्यांतील खासगी कामगारास, सर्जेराव तेथें आहेत काय अशी तार दिली. एका तासानें उत्तर आलें कीं ते परत दत्तापूर गांवीं गेलें. मीं लागलींच गाडी मागविली. आणि येथें येऊन पहातें तों ते निघून गेले आहेत. विनाकारण हेलपाटा."

इंदिराः—"मला सुद्धां वाईट वाटतें. आपण काल आलां असतां तर त्यांची गांठ पडली असती."

"नाहीं तरी मला त्यांची गांठ घेतलीच पाहिजे. माझ्या वाड्याची ते व्यवस्था काय करितात तें मला पाहिलें पाहिजे. कायग, तुझ्या बाबांचे काय बेत झाले आहेत? जहागीर गांवीं त्या नव्या वाड्यांत राहिल्यास खर्च फार येणार."

"होय आजीसाहेब, त्या वाड्यांत राहण्याचा त्यांचा बेत नाहीं."

"खरेंच, सर्जेराव जहागिरीचे मालक झाले याचें मला किती आश्चर्य वाटतें? माझ्या ही गोष्ट ध्यानीं मनीं सुद्धां नव्हती."

"आणि आमच्या तरी कोठें होती? स्वप्नांत सुद्धां वाटत नव्हतें."

"बरें, तुम्ही पुढें काय करणार? आतां येथें राहण्याचा बेत नसेल, होय ना?"

"आम्ही आठ दिवसांनीं येथून बाबांकडे जाणार व तेथून ते व आम्ही मुंबईस रहावयास जाणार आहों."

"उत्तम बेत. पण कायग, मोहनेची काय हकीकत?"

इंदिरेचें काळीज धडधडूं लागलें. आजीसाहेबांनीं हा एकाएकीं प्रश्न विचारला. सर्जेरावांपेक्षां आजीसाहेबांजवळ मोहनेची हकीकत सांगणें म्हणजे महा कठीण कर्म. ती सुस्कारा टाकून म्हणाली, "हा आम्हां सर्वांस मोठा धक्काच बसला."

"तिला वेडबीड तरी लागलें नाहीं?"

इंदिरेनें कांहींच उत्तर केलें नाहीं. "बरें, तो मनुष्य तरी कसा आहे? आनंदराव ना तो! राक्षस मेला!" आजीसाहेब उद्गारल्या.

"दिसण्यांत तरी तो राक्षस नाहीं. तसा तो चांगला आहे. पण मला तो आवडत नाहीं."

सर्जेराव म्हणाले तशाच स्वरानें आजीसाहेबही म्हणाल्या, " माझी तर मनापासून इच्छा आहे कीं तिला दुःख व्हावेंच. खात्रीनें पुढें तिला पश्चात्ताप होईल. अशा पळपुट्या चोरट्या लग्नापासून कधींच कोणाला सुख मिळालें नाहीं तें हिला तरी कसें मिळणार ! बरें, कमळजा आतां कोठें आहे ? "

इंदिरेनें हळू हळू माहीत होती ती हकीगत सांगितली.

---

# प्रकरण २३ वें.

——:o:——

## पुतळाबाई.



मुंबईत चौपाटीवरील एका सुंदरशा बंगल्यांतील दिवाणखान्यांत सरदार सर्जेरावांची स्वारी मखमलीनें मढविलेल्या एका नकशीदार कोचावर टेंकून बसली होती. जवळच इंदिरा वडिलांनीं हाक मारली म्हणून येऊन उभी राहिली होती. सबंध मे महिनाभर सर्जेराव आपल्या मुलीस घेऊन जहागीरगांवीं वाड्यांत राहिले होते व तेथून नुकतेच मुंबईत या बंगल्यांत राहण्यास आले होते. हा बंगला तीन महिन्यांच्या मुदतीनें आंतील सर्व सामानासह त्यांनीं राहण्याकरितां भाड्यानें घेतला होता. जहागीर गांवांत दोन वाडे होते. एक जुना व एक नवा. पैकीं जुना वाडा फार मोठा होता. एवढा अफाट वाडा ठेवून कांहीं उपयोग नाहीं असें मनांत आणून तो वाडा विकून टाकण्याचा सर्जेरावांनीं बेत केला व त्याप्रमाणें वर्तमानपत्रांत जाहिरातीही

फडकूं लागल्या. ही बातमी आजीसाहेबांच्या कानांवर पडतांच त्यांच्या अंगाचा अगदीं तिळपापड झाला. अशा प्रकारें आपल्या घराण्याची अब्रू घालविण्यांत मतलब तरी काय असावा हें समजून घेण्याकरितां त्या सर्जेरावांना भेटावयाला आल्या. मग काय विचारतां ? दोघेही तापटच. एक आग आणि एक भडाग. बराच वेळपर्यंत दोघांचीही मोठी खडाजंगी उडाली. कोणीही हार खाईना. शेवटीं ' माझ्या मालकीचा वाडा; मी त्याची पाहिजे तशी व्यवस्था करीन. तुम्ही पाहिजे तर नव्या वाड्यांत रहा. ' असा रोख ठोक जबाब सर्जेरावांनीं दिला. मग आजीसाहेब काय बोलणार ? त्या चरफडत उठल्या व एक क्षणभरही न थांबतां सर्जेरावांच्या बंगल्यांतून चालत्या झाल्या. सर्जेराव मनांत म्हणाले. ' बरें झालें, एकदाची ब्यांद गेली. पुनः आली नाहीं म्हणजे मिळविली. '

वाडा विक्रीची जाहिरात दिल्यानंतर पंधरा दिवसपर्यंत कोणीच गिऱ्हाईक आलें नाहीं. पुढें एक आलें. त्यांचें नांव बाबासाहेब फडणीस. त्यांना मोगलाईत मोठी नोकरी होती. आपणास राहण्याकरितां एक प्रशस्त व सोयीवार जागा घेऊन ठेवण्यास त्यांनीं आपले बंधु भवानराव यांना लिहिलें होतें. भवानराव जहागीरगांवानजीकच रहात होते. यामुळें जवळपासच एखादी जागा घ्यावी असें त्यांना साहजिकच वाटलें. त्यांनीं सर्जेरावांची गांठ घेतली व एकंदर व्यवहार फार समाधानकारक रीतीनें पार पडेल अशीं चिन्हें दिसूं लागलीं.

ही हकीकत सांगण्याकरितांच सर्जेरावांनीं इंदिरेला हाक मारली होती. सर्जेराव कोणत्याही व्यवहारांत पडोत तो व्यवहार अगदीं सरळ व साध्या रीतीनें आणि बिनभानगडीनें पार पडे. भवानराव सर्जेरावांची गांठ घेण्याकरितां म्हणून मुंबईस आले; एकदोनदांच त्यांची मुलाखत झाली असेल, पण तितक्यांत सर्व बोलणें झालें व दोघांनीं मिळून एकवार वाडा प्रत्यक्ष पाहून किंमत निश्चित करावी असें ठरलें. फडणिशीणबाईही इंदिरेला भेटण्याकरितां आधले दिवशीं आल्या होत्या. एकाच भेटींत त्या दोघींची चांगली मैत्री जमली. ' आजही पुनः त्या येणार आहेत, त्या

आणि मी मिळून माधवबागेंत जाणार आहोंत. तेथें कसलासा उत्सव सुरू आहे ह्मणे.' असें इंदिरा आपल्या वडिलांना सांगत होती.

इंदिरा या वेळीं जरी आपल्या वडिलांजवळ वाड्याच्या विक्रीसंबंधानें व फडणिशीणबाईच्या येण्यासंबंधानें बोलत होती तरी तिच्या मनांत दुसराच एक विचार घोळत होता. लीलेला शिकविण्याकरितां एखादी मास्तरीण ठेवावी, असें इंदिरेच्या मनांत फार होतें व ती त्या तपासांत होतीच. तशांत आधले दिवशींच फडणिशीणबाईंनीं एका मास्तरणीची शिफारस करून ठेविली होती. म्हणून तिनें आतां सर्जेरावांना विचारिलें:—"बाबा, घरांत राहणारी, चांगली सभ्य अशी मास्तरीण मिळत आहे. तिला मग ठेवूं कां आणून?"

सर्जेरावांनीं उत्तर केलें:—"पण लीलेला त्या महिलाविद्यालयांत ठेवलें तर काय वाईट?"

इंदिरेला हें बोलणें बरें वाटलें नाहीं. ती म्हणाली:—"बाबा, माझ्या देखरेखीखालून तिला दुसरीकडे पाठवावी हें मला पसंत नाहीं. आई मेल्यापासून मीच तिला जतन केली; लहानाची मोठी केली, आणि आतां तिला दूर ठेवलें तर मला कसें चैन पडेल? बाबा तिला दुसरीकडे पाठविलें तर तुम्हांला तरी बरें वाटेल का?" असें बोलत असतां इंदिरेच्या डोळ्यांत पाणी भरलें व तिचा कंठ दाटून आला. सर्जेराव वरून इतके कठोर दिसत पण त्यांचें अंतःकरण फार कोमल होतें. त्यांनाही गहिंवर आला व त्यांनीं इंदिरेचें म्हणणें कबूल केलें. ते म्हणाले:— "तुझ्या मनास येईल तसें कर. बाई बरी आहे याची मात्र खात्री करून घे म्हणजे झालें."

एवढ्यानें इंदिरेला समाधान वाटलें. ती कांहीं बोलणार इतक्यांत शिपायानें बाहेरून वर्दी दिली कीं, कोणी एक बाई गांठ घेण्याकरितां आल्या आहेत.

फडणिशीणबाईंनीं सांगितलेली मास्तरीण आली असावी असें इंदिरेला वाटलें, म्हणून ती दिवाणखान्यांतून खालीं आली. ओसरीवर एक उंच, सुस्वरूप, अजमासें पंचवीस वर्षे वयाची स्त्री उभी होती. दिसण्यांत अगदीं

सभ्य, पण तिच्या पाणीदार डोळ्यांत, काळ्या कुळकुळीत व किंचित् कुरळ्या केसांत आणि एकंदर चालचलणुकींत एक प्रकारची रमणीय शोभा दिसत होती. इंदिरेला वाटलें, ही कांहीं मास्तरीण नसावी.

पण ती मास्तरीणच होती. तिचें नांव पुतळाबाई, ती इंदिरेला म्हणाली:—" माझे वडील मास्तरच आहेत. माझा मराठी अभ्यास पुरा झालेला असून इंग्रजीही चार पांच इयत्तांपर्यंत झालें आहे. मी हल्लीं नोकरीवरच आहें, पण ती नोकरी सोडण्याचा माझा विचार आहे. ह्मणून गांठ घेण्याकरितां आलें होतें. "

इंदिरेनें सर्व ऐकून घेतलें. नंतर " एक दोन दिवसांत काय तें नक्की कळवूं. " असें ती म्हणाली. पुतळाबाई तिचा निरोप घेऊन बाहेर पडल्या.

फडणिशीणबाई ठरल्याप्रमाणें माधवबागेंत इंदिरेला नेण्याकरितां आल्या. " पुतळाबाई आल्या होत्या, त्या फार चांगल्या आहेत हो; सभ्यपणा तरी किती. बोलणें, चालणें अगदीं बेतास बेत. "वगैरे हकीगत इंदिरेनें सांगितली. त्या बाईनींहि तिची स्तुति करण्यास कसूर केली नाहीं. तेव्हां इंदिरा त्यांना म्हणाली:—

" पण काय हो, ती इतकी जर तुम्हांला पसंत आहे तर मग तुम्हीच कां तिला ठेवून नाहीं घेत ? तुमच्याहि मुली शिकतातच ना ! "

फडणिशीण हांसून म्हणाली :—" माझ्या घरीं एक मास्तरीण आहे. तिचें नांव जानका. चांगली हुशार आहे, वागणुकीनें देखील चांगली आहे. मग तिला सोडून देऊन दुसरी कशाला बघूं ! "

इंदिरेला थोडेंसें आश्चर्य वाटलें. " आम्ही दत्तापुर गांवीं रहात होतों तेथें एक यादवांची जानका होती. ती तर ही नसेलना ? ती सुद्धां चांगली शिकली सवरलेली आहे. "

" ही ती नसावी. पण अक्कासाहेब, तुम्हांला काय सांगूं ? तिला घरची हकीगत विचारूं लागलें, कीं ती आपली मौनव्रत धरते. ब्र सुद्धां तोंडांतून काढीत नाहीं. मी तिला एक दिवस म्हटलें, 'मास्तरीणबाई, तुमचें खरें नांव जानका नाहीं. दुसरें कांहीं तरी आहे. ' पण ती म्हणाली, ' माझें तेंच नांव. ' पण मला नाहीं तें खरें वाटलें. पुनः एकदा मीं

अगदीं खोदून खोदून विचारूं लागलें. तेव्हां तिनें शेवटीं इतकें कबूल केलें कीं, आपल्या घरण्यासंबंधानें आपणांस कांहीं बोलतां येऊं नये अशीच स्थिति झाली आहे. मग मीं तिला विचारावयाचेंच सोडून दिलें. ज्या बाईच्या शिफारशीवरून मीं तिला नोकरीस ठेवली ती बाई चांगली अब्रूदार आहे. एका मुलींच्या शाळेंत ती हेड मास्तरीण आहे, व तिच्यावर माझा पूर्ण भरंवसा आहे. तिनें हिच्या उत्तम स्वभावाबद्दल व चांगल्या वर्तनाबद्दल खात्री दिली आहे. तेव्हां मी म्हणतें, जानका आपलें रहस्य सांगत नसेल तर न सांगेना बापडी. "

इंदिरेच्या हृदयांत एकदम लख्ख झालें. ही मास्तरीण आपली कमळजा तर नसेलना ? तिनें सुद्धां, आपण आपलें नांव आडनांव बदललें आहे, असें घरांतून बाहेर पडल्यानंतर इंदिरेला लिहिलें होतें.

इंदिरेनें उत्सुकतेनें विचारिलें:—" पण काय हो फडणिशीणबाई, ही तुमची जानका रूपानें कशी आहे ? वय किती आहे ? "

" तरुण आहे, रूपानें सुरेख आहे. कां बरें ? "

" ती तुमच्याजवळ आतां किती दिवस आहे ? "

" किती दिवस ? मला वाटतें जवळ जवळ दोन वर्षें झालीं. इतकें खोदूनसें विचारतां ? "

' वयानें तरूण, रूपानें सुरेख, राहून दोन वर्षें झालीं कां ? आणखी एक महिन्यानें कमळजेला घर सोडल्याला बरोबर दोन वर्षें होतील. तेव्हां हीच ती असावी ' असें इंदिरेला वाटूं लागलें.

" बरें तिचें आडनांव काय, सांगतां येतें ? "

"आडनांव? छे बाई, या घटकेपर्यंत तरी तिनें तें कधीं आपल्या तोंडांतून काढलेलें नाहीं. सही करावयाची झाली तरी दिखील नुसती ' जानका " अशीच करते. पण आक्कासाहेब, मी विचारतें त्याचा राग मानूं नका हो. तुम्ही मघापासून इतकें जें मला विचारीत आहां तें कां ? तुमचा यांत कांहीं तरी हेतु असावा असें वाटतें "

इंदिरा आतां थोडी शुद्धीवर आली. इतका वेळ ती प्रश्न विचारण्यांतच गुंग झाली होती. तिनें उत्तर केलें:—" विचारण्याचें कारण एवढेंच

कीं माझ्या ओळखीची एक विद्यार्थीण मास्तरीण होण्याकरितां दूरदेशीं गेली आहे, तिचा अजूनी पत्ता नाहीं. तिचा शोध लावण्याची माझी फार इच्छा आहे. मला वाटतें—वाटतें हो–हीच ती कदाचित् असेल."

"तिचें नांव जानकाच होतें काय?"

"नाहीं, जानका तिचें नांव नव्हे. परंतु मला वाटतें कीं आपल्या घराण्याचा लौकिक लक्ष्यांत आणून तिनें आपलें नांव बदललें आहे. मी आतां जास्त माहिती सांगूं इच्छित नाहीं. याबद्दल राग नसावा. ही जानका म्हणणारी जर तीच माझी मैत्रीण असेल तर मग मी तुम्हांला सर्व कांहीं मोकळया मनानें सांगेन. माझी तिची गांठ तेवढी आपण घालून द्या."

"हो, हो. केव्हां पाहिजे तेव्हां. आत्तां सुद्धां पाहिजे तर चला."

इंदिरेला आग्रह करण्याचें कारणच नव्हतें. तिनें चट्कन आपली शाल अंगावर घेतली व ती निघाली. दोघीजणी गाडींत बसल्या. थोड-क्याच वेळांत फडणिशीणबाई ज्या बंगल्यांत रहात होत्या तो बंगला आला. दोघीजणी गाडींतून खालीं उतरून आंत गेल्या. नंतर फडणि-शणिबाईंनीं जानकेला हाक मारली, त्याबरोबर जानका आली; ती सु-स्वरूप, सभ्य व तरुण होती. इंदिरेनें जसें तिचें वर्णन ऐकलें होतें तशी ती होती. पण ती कमळजा नव्हती.

इंदिरेला फार वाईट वाटलें. आपली अगदीं निराशा झाली ह्मणून ती अत्यंत खट्टू झाली. ती नंतर म्हणाली:—"फडणिशीणबाई, मीं तुम्हांला उगीच त्रास दिला याबद्दल मला फार वाईट वाटतें. ही नव्हे माझी मैत्रीण." नंतर ती जानकेकडे वळून म्हणाली:—"माझी एक मैत्रीण मास्तरिणीची नोकरी धरण्याकरितां घरांतून निघून गेली. त्याला आज किती दिवस झाले! तिचा पत्ता म्हणून नाहीं. तुमची हकीकत यांनीं मला सांगितली तेव्हां मला वाटलें तुम्हीच ती असाल, म्हणून मी यांच्याबरोबर इकडे आलें. बरें असो. तुमची तरी ओळख झाली. येत जा कधीं कधीं आमच्या घरीं."

नंतर इंदिरा व फडणिशीणबाई माधवबागेंत गेल्या. तेथें घटकाभर देवदर्शन, पुराणश्रवण वगैरे झाल्यावर त्या दोघीही परतल्या व आपापल्या घरीं गेल्या.

# प्रकरण २४ वें.

## हरवलेली चोळी.



संध्याकाळची वेळ. सुमारें घटकाभर दिवस होता. तिसऱ्या प्रहरीं आनंदराव डॉक्टर रोगी पहाण्याकरितां बाहेर पडले होते, ते आतां परत आले. ते बरेच दमलेले व त्रासलेले दिसत होते. माडीवर जाऊन आपल्या प्रियपत्नीच्या सहवासानें आपणास आलेला शीण घालवावा म्हणून ते दिवाणखान्यांत गेले; पण पहातात तों तेथें मोहना नाहीं. त्यांनीं घरांत तपास केला. तेव्हां त्यांना समजून आलें कीं मोहना भाड्याची गाडी करून तीन वाजतांच कोणाला भेटण्यासाठीं म्हणून गेली, ती अद्याप परत आली नाहीं.

आनंदराव सज्ज्यांत येऊन रस्त्याकडे पहात उभे राहिले; कदाचित् मोहनेची वाट पहात असतील. त्यांचे दोन्ही हात कोटाच्या दोन्ही खिशांत होते व तोंडानें बारीक शीळ चालली होती. आनंदराव शीळ घालीत राहिले म्हणजे खात्रीनें समजावें कीं ते कोणत्या तरी गहन विचारांत मग्न झाले आहेत. अलीकडे कित्येक वेळां एक उद्वेगजनक विचार त्यांच्या मनांत येत असे, तोच आतांहि आला असावा. तो हा कीं— जर आपण व आपल्या बायकोनें काटकसरीनें खर्च केला नाहीं तर आ-

पलें उत्पन्न प्रपंचास पुरणार नाहीं व कर्ज काढावें लागणार. मोहनेला तर पैशाची किंमत बिलकुल कळत नव्हती. इंदिरेचे व तिचे या बाबतींत नेहमीं तंटे होत. आनंदरावांशीं लग्न झाल्यावर तर मोहनेच्या खर्चास कांहीं सुमारच राहिला नाहीं. कांहीं कारण नसतांना ती किती तरी पैसे खर्च करी.

परिस्थिति बदलली कीं सर्वच गोष्टी कशा बदलतात हें आनंदराव व मोहना यांच्या उदाहरणावरून चांगलें प्रत्ययास येतें. त्यांनीं कोणाचीही परवानगी न घेतां, वडील माणसांची संमति न घेतां, लग्न करून घेण्याकरितां घरांतून पोबारा केला हें त्यांचें कृत्य बिलकुल योग्य नव्हतें. विशेषेंकरून मोहनेसारख्या कुलशीलवती युवतीला तर फारच निंद्य. पण आतां परिस्थिति बदलली. पूर्वींच्या मोहनेमध्यें व आतांच्या मोहनेमध्यें महदंतर पडलें. यःकश्चित् सर्जेरावांची मोहना निराळी व जहागीरदार सर्जेरावांची मोहना निराळी. जग हें असें आहे ! जे लोक पूर्वीं तिच्याकडे पाहून नाक मुरडीत, तिचा तिरस्कार करीत, तेच लोक आतां तिच्यासंबंधानें नुसतें बोलावयाचें झालें तरी, मोहना आक्कासाहेब, मोहना ताईसाहेब असें बोलूं लागले व तिच्या गतकृत्यांकडे त्यांची आतां डोळेझांक होऊं लागली. तिचे यजमान आनंदराव. पूर्वीं आनंदरावांची लोक थट्टा व टर उडवीत; पण आतां तो सर्व मनु बदलला. थोरामोठ्यांचे, जहागीरदारांचे, पालखीपदस्थांचे जामात आनंदराव झाले. जो तो त्यांची गांठ घेण्याची इच्छा करूं लागला, व आपल्या घरीं त्यांना बोलावून नेऊं लागला.

परंतु अशा रीतीनें स्तोम माजवून घेण्यापासून फायदा तर कांहीं नाहीं, उलटें बरेंच नुकसान मात्र होतें, ही गोष्ट मोहनेच्या लक्ष्यांत येत नसे. कारण ती स्वभावतः भारी निष्काळजी होती. परंतु आनंदरावांच्या लक्ष्यांत या सर्व गोष्टी येऊं लागल्या. लोकांचीं बोलावणीं येत म्हणून मोहना बाहेर जाई खरी, पण बाहेर जावयाचें झालें कीं गाडी पाहिजे. लुगडीं चोळया उंची उंची पाहिजेत, अंगावर चांगले ठसठशीत दागिने पाहिजेत, बरोबर एखादी मोलकरीण तरी पाहिजेच. मोहनेच्या या

अनन्वित खर्चांमुळें आनंदरावांना आतां लोकांचें बरेंच देणें झालें होतें. बायकोवर त्यांचें निःसीम प्रेम असल्यानें जरा व्यवस्थितपणानें व काटकसरीनें वागण्याबद्दलची सूचना करण्याचें त्यांना धैर्य होईना. न जाणो कदाचित् बायकोला राग येईल, थोडा वेळ ती आपणाशीं बोलणार नाहीं याचीच त्यांना भीति वाटे. म्हणून त्यांनीं आपल्या वडिलांस एक पत्र पाठवून पैसे मागविले, पण म्हातारा कसला वस्ताद ! त्यानें पैसेही पाठविले नाहींत; व पत्राचें उत्तरहि दिलें नाहीं. नंतर आपणास दरसाल कांहीं तरी ठरीव रक्कम मिळावी, म्हणजे वरचेवर पत्र पाठवावयाला नको, अशी एका पत्रांत त्यांनीं पुनः मागणी केली. या पत्राचें उत्तर तरी खास येईल असें आनंदरावांना वाटत होतें.

आनंदराव ग्यालरींत फार वेळ उभे राहिले नसतील, इतक्यांत पोस्टाकडील शिपाई खालीं दरवाज्यापाशीं येऊन कांहीं पत्रें चाळीत आहे असें त्यांनीं पाहिलें. त्याबरोबर ते खालीं गेले, व शिपायाकडून त्यांनीं एक पत्र घेतलें. पत्र त्यांच्या वडिलांचेंच होतें. पत्त्याच्या अक्षरावरून त्यांनीं ओळखलें. पाकीट फोडून आंतील पत्र वाचण्याकरितां बाहेर काढणार, इतक्यांत गाडीचा आवाज त्यांना ऐकूं आला. त्यांना वाटलें आपल्या राणीसाहेबांची स्वारी आली, पण पाहतात तों गाडींत कोणी दुसरेच गृहस्थ बसलेले होते. ती गाडी निघून जाते, इतक्यांत फौजदार उपद्यापे यांची स्वारी तांतडीनें येत असलेली त्यांनीं पाहिली. 'कलावतीच्या मृत्यूसंबंधीं आणखी कांहीं हकीकत विचारण्याकरितां स्वारी येत असावी, हें मोठें लचांडच झालें, मला आतां त्रास आला' असें आनंदराव मनांत म्हणाले. इतक्यांत फौजदारसाहेबांची स्वारीही धापा टाकीत टाकीत दरवाजांत येऊन दाखल झाली. गडबडीनें जाण्याचें कारण आनंदरावांनीं त्यांना विचारलें; फौजदार म्हणाले, "एक बाई तळ्यांत पडून मेल्याची बातमी आली आहे, तिकडे निघालों आहें." नंतर ते जावयाकरितां निघाले, पण जरा थांबून त्यांनीं आनंदरावांना जवळ बोलावून म्हटलें:—"डॉक्टरसाहेब, त्या कामासंबंधीं आमचे सर्व प्रयत्न निष्फळ होणार."

"कोणत्या कामासंबंधीं?" आनंदरावांनीं विचारिलें.

"अहो त्या; मागें तुह्मी मजकडे आलां होतां त्या! कलावती विषप्रयोगानें मेली म्हणून तपास चालला होता ना? त्या कामासंबंधीं. हें काम आतां आम्हांला नापत्त्याच्या फाइलीवर ठेविलें पाहिजे. त्याशिवाय गत्यंतर नाहीं."

असें म्हणून पुनः फौजदारसाहेब आपलें अगडबंब शरीर हालवीत डोलवीत, व फांफूं करीत निघून गेले. आनंदरावांना वडिलाचें पत्र वाचण्याची भारी उत्कंठा लागली होती. ते चटकन माडीवर दिवाणखान्यांत गेले व एका आराम खुर्चीवर पडून पत्र वाचूं लागले. पत्र वाचीत असतां त्यांच्या कपाळाला आंठ्या पडल्या, भिंवया वक्र झाल्या व श्वासोच्छास उष्ण येऊं लागले; पत्रांत पुढील मजकूर होताः—

"चिरंजीव आनंदराव यास अनेक आशीर्वाद, विशेष. तुझीं पत्रें पोंचलीं. अशा प्रकारचीं याचनायुक्त पत्रें पुनः पाठवून मला त्रास न देशील तर मी तुझे अत्यंत उपकार मानीन. असलीं पत्रें मला केव्हांही पसंत नसतात हें तुला माहीत आहेच. मीं तुला लग्न करून घेण्यास सल्ला दिली असें तूं म्हणतोस. मीं अशी सल्ला दिली हें खरें. पण जहागीरदार घराण्यांतील मुलीशीं लग्न करून घेण्यास मीं तुला सांगितलें नाहीं; व असें लग्न करून घेऊन नाकापेक्षां मोती जड करण्याइतका तूं मूर्ख असशील असेंही मला कधीं वाटलें नाहीं. पैसे पाठवून देण्याबद्दल लिहिलेंस पण तूर्त तुला पैसे पाठविण्याचा माझा बिलकूल हेतु नाहीं. मी नवीन मृत्युपत्र करणार आहें त्यांतही तुझ्याकरितां रक्कम राखून ठेवीन कीं नाहीं हें सर्वस्वीं तुझ्या वर्तनावर अवलंबून आहे. मी आतां खडखडीत बरा झालों आहें व कित्येक वर्षांत माझ्या अंगांत शक्ति नव्हती इतकी शक्ति मला सध्यां वाटत आहे; काळजी करूं नये; बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद."

आनंदरावांनीं रागानें त्या पत्राचा चोळामोळा केला. ते रागावून उद्गारले, "हे आमचे वडील व आम्ही त्यांचें चिरंजीव. काय दोघांचें

प्रेम पाघळतें आहे ! वाईट, अगदीं वाईट, निर्दय, निष्ठुर ! पैसे साठवून कोणाची धन करणार आहे कोणास ठाऊक ! ”

इतक्यांत दरवाज्यांत गाडी येऊन थडकली. आनंदरावांनीं उठून खिडकींतून पाहिलें तों त्यांची मोहना राणी गाडींतून उतरून पायऱ्या चढत होती. ती हांसत हांसत माडीवर आली. आनंदरावांनी हातांतील पत्र आपल्या कोटाच्या आंतील खिशांत गडबडीनें खुपसलें व ती दिवाणखान्यांत येतांच तिला लडिवाळपणानें म्हटलें, “ लाडके, आज यायला किती उशीर हा ? मी वाट बघून बघून कंटाळलों. ”

“ मी आज किती ठिकाणीं गेलें होतें ! ओळखलें तर खरें. ”

“ ओळखूं किती ठिकाणीं तें ? दहा ठिकाणीं. होय ना ? कसें ओळखलें ? आतां बक्षीस ? ”

“ हो. गेलेंच होतें नाहीं तरी. पण इतक्या ठिकाणीं जाण्याचा माझा प्रथम बेत नव्हता. रावपुऱ्यांत तो हिरवा बंगला आहे ना ? तेथल्या वाराणशीबाईंनीं मला बसायाला म्हणून काल बोलाविलें होतें. तेथून परत येतांना म्हटलें, आपल्या फुलबन बंगल्यावरून यावें, म्हणून तिकडे गेलें. दरवाज्यांत एक भय्या होता. दुसरें कोणी नाहीं. सर्व मंडळी आपल्या जहागीर गांवीं गेली आहेत. भय्यानें मला कांहीं ओळखलें नाहीं. मीं त्याला सर्व हकीगत सांगितली तेव्हां मग उठून त्यानें माझे पाय धरिले. त्याला रखवालीकरितां नुकतेंच ठेविलें आहे म्हणे. मीं बंगल्यांत चोंहीकडे हिंडून पाहिलें. त्या भय्यानें बंगला मात्र स्वच्छ ठेविला आहे. ऐकलें का ? मग तेथून राममंदिरांत गेलें. तेथें दोघीचौघीजणी भेटल्या. त्या मला सोडीनात म्हणून त्यांच्या घरीं गेलें. बोलावणीं तरी किती ? ” असें म्हणून मोहना हांसूं लागली. आनंदरावही हांसूं लागले.

मोहना नंतर म्हणाली:—“ बरें, आणखी मी काय करून आलें आहें तें येईल सांगायला ? ”

“ आम्ही नाहीं आतां सांगत. मघाशीं मीं बरोबर सांगितलें त्याचें आम्हांला बक्षीस अद्याप मिळालें नाहीं. ”

आनंदराव कसलें बक्षीस मागतात इकडे मोहनेचें लक्ष्यच नव्हतें. ती

आपलीच हकीगत सांगण्यांत अगदीं गर्क झाली होती. ती म्हणाली:–" त्या म्हाताऱ्या आजीबाई येथें कधीं कधीं येतात ना, त्यांच्या घरीं आज सत्य-नारायणाची पूजा आहे. त्यांनीं मला आग्रह करून सांगितलें आहे कीं आ-ल्याशिवाय राहूं नको म्हणून. आणखी सांगूं का? इकडे सुद्धां त्यांनीं बो-लावलें आहे. मग यायचें ना? मी जाणार."

आनंदरावांनीं उत्तर केलें कीं रात्रीं आपणास एक रोगी पहावयास जावयाचें असल्यानें सवड होणार नाहीं. नंतर ती मोठ्या उत्सुकतेनें आ-पल्या खोलीकडे गेली. रात्रीं कोणतें लुगडें नेसावयाचें, कोणती चोळी घालावयाची, कोणते दागिने घालावयाचे हाच विचार तिच्या डोक्यांत घोळत होता.

मोहनेनें आपल्या अंगावरील शाल फेंकून दिली, व कपाटाचें कुलूप काढून ती कपडे वरखालीं करून पाहूं लागली. मोहनेच्या स्वभावाला थाटमाट, डामडौल व नट्टापट्टा फार आवडे. त्यांतून असा कांहीं चार चौघांत जा-ण्याचा प्रसंग आला कीं मग कांहीं विचारावयालाच नको. तिच्या अंगांत वारें शिरल्यासारखें होई.

सरतेशेवटीं तिचा निश्चय झाल्यासारखें दिसलें. ती आपल्याशींच म्हणाली:–"ठरलें. आज रात्रीं हें जरीकांठीं गुलाबी पातळ नेसायाचें व पर-वांच शिवलेली ती पोपटी रंगाची मखमलीची चोळी घालायाची. तिला एवढे हे कांठ लावले म्हणजे झालें. कुठें आहे बरें ती चोळी?" असें म्हणून चोळ्या ज्या खणांत होत्या तो खण ओढून ती पाहूं लागली. पण तिला जी चोळी पाहिजे होती ती कोठें दिसेना. मोहनेला संताप आला. ती म्हणाली:– "आक्कानें त्या चोळीचें केलें तरी काय? किती निष्काळजी आहे तरी! चोळी तरी जाऊं दे म्हणजे—"

पुरतें न बोलतांच ती खोलींतून बाहेर आली व जिन्यांत येऊन 'आक्कू, आक्कू, ए आक्के,' म्हणून मोठ्यानें हाका मारूं लागली. आक्का धांवत पळतच वर आली. कारण हाक मारल्याबरोबर जर गेलें नाहीं तर यजमानणीस खपावयाचें नाहीं हें तिला पक्कें माहीत होतें. ती खोलींत येऊन पहाते तों तिला आश्चर्य वाटलें. कपाट उघडें, ओढखण

बाहेर काढलेलें, लुगडीं, चोळ्या, पोलकीं वगैरे सर्व अस्ताव्यस्त पडलेलीं, गांठोडीं विसकटलेलीं, मालकीणबाई तर संतापून लाल होऊन आपलीच वाट पहात उभी ! असा प्रकार तिच्या दृष्टीस पडला.

" आक्कू, माझी ती पोपटी रंगाची मखमलीची चोळी कुठें आहे ?" मोहनेनें गर्जना केली.

" कोणती चोळी, बाईसाहेब ? "

मोहना रागानें ओरडून व वेडावून म्हणालीः—" कोणती चोळी, बाईसाहेब ? जशी कांहीं पाहुणी घरांत आली ! परवां शिंप्याकडून नाहीं का शिवून आणली ? "

आक्कूः—" हं, बाईसाहेब, ती चोळी होय ? आत्ता आठवलं. ती त्या ओढखणांत ठेविली आहे. "

" या ओढखणांत ती नाहीं–तूंच काढ हुडकून. "

" त्यांतच असली पाहिजे. ह्या जागेशिवाय मी दुसरीकडे कुठें चोळ्या ठेवीत नाहीं. " असें म्हणून आक्कू त्या ओढखणांतील एक एक वस्तु काळजीपूर्वक पाहून बाहेर काढूं लागली. मोहनेच्या उतावीळ स्वभावास आक्कूचा हा अजागळपणाच वाटला. ती वस्सादिशीं ओरडून म्हणालीः—" चल हो बाजूला, सरक तिकडे. पूजा आटपून जेवणें झालीं तरी तुझें संपायचें नाहीं. " असें म्हणून तिनें सबंध ओढखण बाहेर कढून जमिनीवर पालथा घातला. तळाला एक वर्तमानपत्राचा कागद घातला होता तो व सर्व जिन्नस खालीं पडले. मोहना म्हणालीः— " पहा आतां. आहे का यांत ती चोळी ? मी सांगत होतें तें तुला खोटें वाटलें, नाहीं ? ठेव आतां सर्व भरून. "

आक्कूची फजीती झाली, आपलेंच म्हणणें खरें झालें, म्हणून मोहनेला आनंद झाला. ती म्हणालीः—" आहे का चोळी यांत ? सांग पाहूं. "

आक्कूः—" बाईसाहेब, मीं ती चोळी यांतच ठेविली होती. दुसरीकुठें ठेविली नाहीं, मला पक्कं आठवतें. आपण पुनः कधीं नाहींना न घेतली ? आठवण नसेल म्हणून विचारतें. "

मोहनाः—" आक्कू, आतां मात्र शिकस्त झाली! तर मग मींच ती चोळी हरवली असें तुझें म्हणणें कीं नाहीं? "

आक्कू पुढें कांहींच बोलली नाहीं. ती भराभर जिन्नस ओढखणांत भरून ठेवूं लागली. सरते शेवटीं एक पत्राचा तुकडा तळाशीं राहिला होता. तो मोहनेनें चटकन उचलून घेतला. त्या पत्राचें अक्षर पाहून ती आश्चर्यानें थक्क झाली.

आपली हरवलेली चोळी ती विसरली; आक्कूवरचा रागही ती विसरली, तिला संताप आला होता तोही ती विसरली. तो कागदाचा तुकडा घेऊन ती खालीं बसली व तिनें सर्व कागद वाचला. नंतर तिनें अक्षर नीट न्याहाळून पाहिलें. पत्राचा खालचा भाग फाटून गेला होता. फक्त आरंभाच्या कांहीं ओळी व उलट बाजूवरील पत्र संपताच्या कांहीं ओळी अशा होत्या. पत्रावर तारीख गेल्या फेब्रुवारी महिन्याची अठ्ठावीस लिहिली होती. हें कमळजेचेंच पत्र इंदिरेला आलें होतें अशी तिची खात्री झाली. ती म्हणालीः—" मला वाटलें नाहीं आक्का इतकी लबाड असेल असें. तिनें मला सांगितलें कीं या जानेवारीपासून कमळजेकडून कांहींच पत्र नाहीं म्हणून; आणि हें पत्र तर फेब्रुवारी अठ्ठावीस तारखेला लिहिलेलें आहे. मला असें सांगण्यांत आक्काचा काय हेतु असेल बरें? "

मोहना कांहीं वेळ तशीच बसून राहिली व विचारांत अगदीं गढून गेली. हातांत पत्र तसेंच होतें. त्या पत्रांत जो थोडासा मजकूर होता तो वाचून ती गोंधळली. इंदिराआक्कानें आपणास खोटें सांगितलें म्हणूनही ती गोंधळली. कारण आपली आक्का म्हणजे सत्याचा गड्डा असें तिला आजपर्यंत वाटत होतें.

सरतेशेवटीं ती आपल्याशींच हांसून म्हणालीः—"लोकांनीं किती जरी लपवाछपवी केली तरी शेवटीं उघडकीस यावयाचेंच हें खास. माझे जिन्नस एके ठिकाणीं करून ते इकडे पाठविण्याकरितां गांठोड्यांत बांधतेवेळीं हें पत्र चुकून त्यांत तिनें बांधलेलें असावें. तिची लबाडी तिच्या पदरांत घालण्याकरितां मी हें पत्र असेंच जपून ठेवतें. "

इतका वेळ आक्कू बाहेर गेली होती ती आली. तिच्या हातांत ती नाहींशी झालेली चोळी होती—"बाईसाहेब हीच ना ती चोळी ? खालीं माजघरांत खुंटीवर आपलें पोलकें आहे त्याच्याखालीं होती."

मोहनेलाही मग आठवण झाली कीं एके दिवशीं आपणच ती चोळी गडबडीनें त्या ठिकाणीं ठेविली होती. तिचें मन थोर असल्यानें तिनें तें कबूलही केलें आणि 'मी तुला विनाकारण बोललें' असें म्हणून तिनें आपला खेद प्रदर्शित केला.

नंतर त्या चोळीला कांठ लावून आणण्यास मोहनेनें आक्कूला सांगितलें व ती पुनः आपल्या कपाटाकडे वळली. आक्कू जाते इतक्यांत आनंदरावांचीं पावलें जिन्यांत वाजल्याचें मोहनेनें ऐकलें. त्याबरोबर तिनें तें फाटकें पत्र एका ओढखणांत टाकिलें व आनंदराव येण्यापूर्वींच त्या खणाला कुलूप लावलें. पण आनंदराव इकडे आले नाहींत. ते दिवाणखान्यांत गेले.

मोहनेनें आजपर्यंत आपली बहीण कमळजा हिच्यासंबंधानें कांहींही हकीकत आनंदरावांना कळविली नव्हती. कारण तिला आपल्या थोर घराण्याचा फार अभिमान वाटे. आपली एक बहीण मास्तरणीची नोकरी पतकरून देशोधडीस लागली आहे ही गोष्ट आनंदरावांना सांगावी असें तिला वाटलें नाहीं.

आक्कू आपल्या कामांत भारी दक्ष असे. तिनें कांठ लावून लागलीच ती चोळी तयार करून आणली. ती पाहतांच मोहनेला अत्यानंद झाला व 'शाबास' म्हणून तिनें आक्कूची पाठ थोपटली. नंतर मोहनेनें ती चोळी घातली; तें गुलाबी पातळ ती नेसली व अंगावर दागदागिने घालून ती बाहेर जाण्याकरितां निघाली; मोहनेला आपल्या सौंदर्याची फार घमेंड होती आणि ती तशी सुंदर होतीही. तिच्या डोळ्यांत एक प्रकारची चमक असे. भिंवया कमानीदार असून अगदीं रेंखल्याप्रमाणें होत्या. ती कपाळाची पट्टी, तें ठसठशीत नाक, ते टवटवीत गाल, सर्व कांहीं अगदीं जेथल्या तेथें होतें. मोहना हें नांव यथार्थ करण्याइतका तिचा चेहरा मोहक होता खरा.

ती गाडींत बसण्याकरितां निघाली. ओसरीवर आनंदराव एका गृहस्थाशीं बोलत उभे होते. त्यांचे खालील शब्द जातां जातां मोहनेच्या कानावर पडले.

" तेव्हां म्हटलें, डॉक्टरसाहेब, बायको तर अशी आजारी. विश्वासरावांना न्यावें तर त्यांची तब्येत बरी नाहीं. त्यांच्या बंधूंना आणतों म्हटलें तर, त्यांना आणूं नका, मी त्यांचें औषध घेणार नाहीं असें ती म्हणते. आतां आपण एवढी मज गरीबावर मेहेरबानी करा आणि चला. आपले उपकार मी विसरणार नाहीं. "

आनंदरावांनीं उत्तर केलें:—" ठीक आहे. तुह्मी पुढें व्हा. हा मी आलोंच. ज्यांच्या हातून इतकी भयंकर चूक झाली त्यांचेंच औषध पुनः घेणें बरोबर नाहीं. होय; तशी चूक पुनः होणार नाहीं याची तरी खात्री कशावरून ? "

प्रतापराव डाक्टरांना उद्देशून हे शब्द होते हें मोहनेनें ओळखलें. ती गाडींत जाऊन बसली व हां हां म्हणतां गाडी पार निघून गेली.

---

# प्रकरण २५ वें.

## थोडासा सुगावा.



लीलेच्या मास्तरणीच्या जागीं पुतळाबाईची नेमणूक होऊन त्या आपल्या कामावर रुजूही झाल्या. इंदिरेची व त्यांची प्रथम मुलाखत झाली, त्या वेळीं त्यांचें नीटनेटकें नेसणें, बोलणें चालणें अगदीं बेतास बेत, एकंदर ठाकठीक, सभ्य व अदबशीर वर्तन पाहून इंदिरेचें मन अगदीं गार होऊन गेलें होतें. तशांत रांगोळ्या घालणें, कशीदा काढणें, गाणीं म्हणणें,

गोष्टी सांगणें वगैरे बाबतींतही त्या प्रवीण असल्याचें तिला समजून आ-ल्यावरून तिनें त्यांना एकदम नोकरीवर हजर करून घेतलें. दहा पंधरा दिवस गेले असतील नसतील इतक्यांत इंदिरेचें मत बदलूं लागलें. या नेमणुकीच्या कामीं आपणाकडून जरा घाई झाली, हें बरें झालें नाहीं, असें तिला वाटावयाला लागलें. शिक्षणाच्या संबंधानें पाहिलें तर पुतळाबाईंना नांवें ठेवण्यास यत्किंचित्‌ही कारण नव्हतें. परंतु इतर बाबतींत पुतळाबाईंचें वर्तन इंदिरेला पसंत पडेनासें झालें. त्या नाहीं त्या कामांत ढवळाढवळ करीत, नोकरचाकरावर रागावत, खुद्द इंदिरेलासुद्धां त्या चार गोष्टी सांगण्यास मागेंपुढें पहात नसत. घरांत पोक्त व अनुभवशीर असें बायकोमाणूस कोणीच नव्हतें. पुतळाबाई म्हणत आपण इंदिरेपेक्षां वयानें वडील. तेव्हां हरएकप्रकारच्या घरच्या कामांत इंदिरेनें आपलें मत घ्यावें व आ-पणाला विचारून काय करावयाचें तें करावें. इंदिरा जेवावयास बसली कीं तिच्या पाटास पाट लावून पुतळाबाई बसल्याच. ती नोकरांस कांहीं बोलूं लागली कीं तिच्या बरोबरीनें पुतळाबाईही बोलत. घरांत कोणी परकें माणूस आलें कीं त्याच पुढें पुढें करीत, अर्थातच लोकांचा असा ग्रह होऊं लागला कीं पुतळाबाई ही कोणी घरांतील नोकर नसून माल-कीणच आहे. पुतळाबाईंनी आपलें प्रस्थ इतकें माजविलें कीं, सर्जेरावां-जवळ जाऊन चार दोन घटका त्यांच्याशीं गप्पागोष्टी करीत बसण्यास सुद्धां त्या कचरत नसत. सर्जेराव इतके तापट खरे, पण काय असेल तें असो, पुतळाबाई आल्या कीं त्यांचा सर्व तापटपणा पार निघून जाई. पण हें इंदिरेला पसंत पडेना. ती ह्मणे, किती झालें तरी पुतळाबाई नोकर-माणूस, त्यांनीं आपली पायरी ओळखून वागलें पाहिजे; तें सोडून ह्या आपल्यावर वरचढ करूं पाहतात हें कांहीं ठीक नव्हे. तिनें संधि साधून एक दिवस सर्जेरावांजवळ ही गोष्ट काढली. तेव्हां त्यांनीं तिला स्पष्ट सांगितलें कीं ती बाई बरी आहे कीं नाहीं हें ठरविण्याचें काम तुझेंच आहे; तुला वाटेल तर ठेवून घे, नाहीं तर हाकून दे, माझी कोणतीही हरकत नाहीं. 'बरें पण शिक्षणाच्या कामांत ती कशी काय आहे?' असें त्यांनीं विचारल्यावरून इंदिरा म्हणाली कीं तें काम मात्र त्या

चोख रीतीनें करीत आहेत, त्यांत नांव ठेवण्यास बिलकुल जागा नाहीं. तेव्हां सर्जेराव म्हणाले, " लीलेला ती चांगलें शिकविते कीं नाहीं हीच मुद्याची गोष्ट आहे; ती जर चांगलें शिकवीत असेल तर मग तूं म्हणतेस त्याप्रमाणें ती जरी थोडी वाजवीपेक्षां फाजील रीतीनें वागत असली तरी हरकत नाहीं. आपण संभाळून असलें म्हणजे झालें." त्यावर इंदिरा कांहीं बोलली नाहीं. लीलेचें शिक्षण हाच महत्त्वाचा प्रश्न होता; व महत्त्वाच्या गोष्टींत क्षुल्लक गोष्टी घुसडून देऊन सर्वांचेंच मातेरें करावयाचें अशा प्रकारचा इंदिरेचा स्वभाव नव्हता.

याच दिवशीं तिसऱ्या प्रहरीं सर्जेराव वर्तमानपत्र वाचीत होते व जवळच इंदिरा कायसें विणीत बसली होती; वाचतां वाचतां मध्येंच सर्जेराव म्हणाले:—

" कमळजेचा तूं शोध करणार तो केव्हां ? "

इंदिरेच्या मनांतही या वेळीं कमळजेबद्दल वडिलांजवळ गोष्ट कशी काढावी हाच विचार चालला होता. सर्जेरावांचा प्रश्न ऐकतांच तिला आश्चर्य वाटलें व आनंदही झाला. ती म्हणाली:—" बाबा, मी तिचा तपास करूं ? तुह्मी रागावणार नाहीं ना ? कमळजेला घरीं येऊं द्यायचें ना ? "

सर्जेराव:—"तुला काय वाटत असेल तें असो, पण माझें तरी असें मत आहे कीं माझ्यासारख्या जहागीरदाराच्या मुलीनें मास्तरणीची नोकरी करीत गांवोगांव हिंडावें हें कांहीं पसंत नव्हे. कमळजेचा अपराध मोहनेपेक्षां केती तरी कमी प्रतीचा ? तिला क्षमा करायला पाहिजे. ती हल्लीं कुठें असते हें तुला माहीत आहे असें वाटतें."

" नाहीं, बाबा, मला नाहीं माहीत. "

" माहीत नाहीं ? मी आजपर्यंत समजत होतों, कीं तुला माहीत आहे. कमळजेकडून तुला पत्रें येतात ना ? "

इंदिरा:—" पण बाबा, ती हल्लीं कुठें आहे मला पक्कें माहीत नाहीं. मला वाटतें ती गिरगांवांतच कुठें तरी आहे, विशेष प्रयास न

पडतां तिचा पत्ता लागेल, तिनें मला लिहिल्याप्रमाणें प्रार्थनासमाजाच्या पत्त्यावर मी तिला पत्रें पाठवीत असतें. तिथें जाऊन तपास करूं कां ? "

" मग आतांच का जाईनास ? " असें म्हणून सर्जेरावांनीं गाडी मागविली. कमळजेला केव्हां एकदां पाहीन असें त्यांना झालें होतें व त्यामुळें ते एखाद्या लहान मुलासारखे उतावळे झाले होते.

इंदिरा गाडींत बसून प्रार्थनासमाजांत गेली. पण तिला एक अडचण येऊन पडली. कमळजेचा कोणत्या नांवानें शोध करावा म्हणजे तपास लागेल ? ' पुणेंकरीणबाई ' या पत्त्यावर पत्रें पाठविण्याबद्दल तिनें लिहिलें होतें. पण त्या नांवानें येथें आपणास कोणी ओळखत नाहीं असेंही तिनें आपल्या पत्रांत म्हटलें होतें.

प्रार्थनासमाजमंदिरांत एक नोकर भेटला; त्याला इंदिरेनें विचारिलें:—" पुणेंकरीणबाई कुठें राहते, माहीत आहे काय ? ती मास्तरीण आहे. इथेंच कुणाच्याशा घरीं मुलींना शिकवीत असते. "

नोकरः—" पुणेंकरीण ? आपणाला कांहीं माहीत नाहीं. "

" पण तिच्या नांवचीं कांहीं पत्रें मी या पत्त्यावर पाठविलीं होतीं. तीं नेण्याकरितां तरी ती इथें येत असेल ? "

नोकर जरा आठवल्यासारखें करून म्हणालाः—" खरी गोष्ट, पत्रें नेण्याकरितां एक बाई येथें येत असे खरी. पण तिचें नांव कमळाबाई मास्तरीण. तुम्ही ' पुणेंकरीण ' म्हणालां नव्हे ? पुणेकरीण बाई या नांवचीं पत्रें येत, पण कमळाबाई येऊन तीं घेऊन जात असे. "

कमळाबाई ! सर्व उलगडा झाला. तिचें मूळचें नांव कमळजा. तें बदलून तिनें ' कमळा ' हें नांव धारण करणें अगदीं साहजिक आहे असें इंदिरेला वाटलें. ती म्हणालीः—" होय, होय. कमळाबाई तीच घर मला दाखवाल काय ? "

" घर ? आपल्याला नाहीं दाखवितां येणार. ह्या इथें तो नरोत्तमदासाचा बंगला आहे ना ? तेथें प्रथम ती मास्तरीण होती. पुढें थोड्याच दिवसांनीं ती मथुराशेटजीच्या मुलींची मास्तरीण झाली. पण तिथें ती फार दिवस राहिली नसावी. "

ही हकीकत इंदिरेला माहीत नव्हती. कारण जागा बदली हें कमळजेनें इंदिरेला मुळींच कळाविलें नव्हतें. ती आश्चर्यानें म्हणाली:— " ती कशी होती सांगा बरें. म्हणजे माझा संशय तरी फिटेल. "

त्या नोकरानें तिचा बांधा, तिचा वर्ण, तिची चेहरेपट्टी वगैरे सर्व बरोबर सांगितलें. खाणाखुणा सर्व जमल्या.

तो नोकर पुढें म्हणाला:—" मला वाटतें, कमळाबाई मास्तरीण येथून एकाएकींच कोठें निघून गेली. ती आतां किती दिवस तरी इकडे येत नाहीं, व येथें कोठें दिसतही नाहीं. तिचीं ह्या पत्त्याचीं दोन तीन पत्रें अजूनी येथेंच पडून आहेत, हीं पहा. " असें म्हणून त्यानें कपाटांतून तीं पत्रें काढून पुढें केलीं. इंदिरेनें पाहिलें तों तिनेंच पाठविलेलीं तीं पत्रें होतीं, हीं पत्रें मींच कमळाबाईला पाठविलीं होतीं, तिला पोंचलीं नाहींत, तर आतां तीं मी घेऊन जातें, असें इंदिरेनें त्या नोकरास म्हटलें. तुम्हींच पाठविलीं असतील तर घेऊन जा, कांहीं हरकत नाहीं असें तोही म्हणाला. नंतर इंदिरेनें अगदीं अलीकडे जें पत्र पाठविलें होतें तें घेऊन त्यावर आपला हल्लींचा पत्ता लिहिला व त्या नोकरास तें देऊन म्हटलें:—" हें पत्र इथेंच असूंद्या. कमळाबाई कदाचित फिरून आलींच तर तिला द्या. हीं दोन पत्रें मात्र मी घेऊन जातें. असें म्हणून इंदिरा आपल्या गाडींत जाऊन बसली. "

नरोत्तम-दासाच्या बंगल्यापुढें गाडी उभी राहतांच इंदिरा गाडींतून उतरून बंगल्यांत गेली व मालकीणबाईकडे तिनें निरोप पाठविला. नंतर एक मोलकरीण येऊन इंदिरेस आंत मालकीणबाईकडे घेऊन गेली; थोडा वेळ बोलणें झाल्यावर इंदिरेनें विचारिलें, " आपल्या घरीं कमळाबाई मास्तरीण कांहीं दिवस नोकरीला होती, ती सध्यां कोठें असते ? कांहीं माहिती असेल म्हणून विचारायाला आलें. "

त्याबरोबर मालकीणबाईनीं कपाळास आंठ्या घालून म्हटलें:—" कमळा मास्तरिणीची कां हकीकत विचारतां ? अस्सें, अस्सें, आम्हांला नाहीं कांहीं तिची माहिती. ती आमच्या घरीं असतांना चांगल्या रीतीनें राहिली नाहीं. इथली नोकरी सुटल्यावर ती त्या मथुराशेटजीच्या घरीं राहि

ली. पण तिथेंही फार दिवस नव्हती म्हणे. आतां कुठें आहे कोणास ठाऊक ! त्या कमळा मास्तरिणीच्या तुम्ही कोण, बहीण कां ? तरीच. " असें म्हणून मालकीणबाई आंत निघून गेल्या. व्यवहार, सभ्यपणा, विनय, अगत्य इत्यादि गुणांचा लवलेश सुद्धां त्यांच्या अंगीं असल्याचें इंदिरेला दिसून आलें नाहीं. ती आपल्या गाडींत जाऊन बसली. " गरजवंताला अक्कल नाहीं म्हणून यांच्या घरीं यावें लागलें. असल्या घरांत बिचारी कमळजा एक दिवस तरी कशी राहिली असेल ? " असें ती मनांत म्हणाली.

मथुराशेटजींचा बंगला आला. घरधनीण आंत होतीच. अगत्यवान, ममताळू, निरभिमानी; वर्तन अगदीं साधें व सभ्य. त्या बाईमध्यें व या बाईमध्यें जमीन अस्मानाचें अंतर इंदिरेला दिसलें. आपण येण्याचें कारण इंदिरेनें तिला कळविल्यावर ती म्हणाली, " कमळाबाई नरोत्तमदासाच्या कडील नोकरी सोडून आमच्याइथें आली. तेथली नोकरी सोडण्याचें कारण, त्यांचा तो एक फाजील पुतण्या आहेना; तो तिच्याशीं चावटपणा करूं लागला. रोज कांहींना कांहीं तरी तो तिची कुरापत काढी व चेष्टा करी. तिला तें आवडलें नाहीं. तिनें कांहीं दिवस सहन केलें, पण तो जेव्हां जास्तच बेताल झाला तेव्हां तिनें ही गोष्ट बाईला कळविली. पण तिनें यांवें तसें लक्ष्य दिलें नाहीं. ती आपल्या पुतण्याचा पक्ष घेऊन कमळाबाईलाच नाहीं नाहीं तें बोलूं लागली. माझ्या मुलींनाही शिकवायला एक मास्तरीण पाहिजेच होती. तेव्हां आम्ही कमळाबाईला आमचे घरीं ठेवून घेतलें. ती आमच्याइथें सहा महिने राहिली. नंतर एके दिवशीं तिनें अकस्मात् मला सांगितलें कीं आपण आतां नोकरी सोडून जाणार म्हणून. मला भारी वाईट वाटलें. मीं तिला कारण विचारिलें. पण तिनें कांहीं सांगितलें नाहीं. पुढें ती एक दोन दिवसांतच निघून गेली. "

" कोणीकडे निघून गेली ? "

" तें नाहीं आम्हांला समजलें. आपण कोठें जाणार, पुढें काय करणार वगैरे माहिती तिनें आपल्याला बिलकुल लागू दिली नाहीं. कोणी विचार-

लेंच तर ती बोलतच नसे. म्हणून आम्हांला वाटलें यांत कांहीं तरी चोरटा प्रकार आसावा. ”

“ मग ती करणार तरी काय होती ? ”

“ कांहीं सांगतां येत नाहीं. आमचा असा ग्रह झाला कीं लग्न करून घेण्याचा तिचा बेत आसावा. ”

“ लग्न करून घेण्याचा ? म्हणजे ? ” इंदिरेला आश्चर्य वाटलें.

“ आम्हीं तिला विचारलें कीं तुम्ही आतां आपल्या नातलगाकडे रहावयाला जाणार आहां कां ? तेव्हां ती हांसली व म्हणाली—छे ! कोण नातलग ? मी नाहीं त्यांच्याकडे जात. माझा सर्वच आयुष्यक्रम आतां अगदीं निराळा होणार आहे. ह्या तिच्या बोलण्यावरून आम्ही म्हणतों कीं कदाचित् ती लग्न करून घेण्याच्या विचारांत असावीं. ”

“ ती आपल्या इथून गेली तेव्हां आनंदी दिसत होती कीं नाहीं ? ”

“ ती अगदीं आनंदांत गेली. फिरून आपण येऊन भेटूं असें सुद्धां ती म्हणाली. आपला तिचा कांहीं संबंध आहे वाटतें ? ”

“ होय, या गोष्टीला किती दिवस झाले बरें ? ”

“ याला कां ? याला बरोबर वर्ष झालें. ”

“ त्यानंतर आपण तिला पुनः कधीं पाहिलें नाहीं, कीं तिच्यासंबंधानें कांहीं वर्तमानही ऐकलें नाहीं ? ”

“ नाहीं, मुळींच कांहीं नाहीं. तिची पुढें काय वाट झाली असावी हेंच राहून राहून आमच्या मनांत येतें. ”

“ तिचा मला तपास लावला पाहिजे. ती लग्न करून घेण्याच्या विचारांत होती असें आपण म्हणतां, पण मला नाहीं खरें वाटत. आपल्या घरच्या मंडळीची संमति न घेतां असें कांहीं करण्याचें मनांत आणील अशांतली ती मुलगी नव्हे. ती थोर घराण्यांतली आहे. सर्जेराव जहागीरदार म्हणून आपणांला ऐकून तरी माहीत असतील त्यांची ती मुलगी. त्यांना एकंदर चौघी मुली. सर्वांत मी वडील. माझ्या पाठची एक आहे. आणि कमळजा तिच्या पाठची. ” नंतर इंदिरेनें सर्व हकीगत सांगितली.

घरधनीण आश्चर्यचकित झाली. " तुम्ही तिची बहीण ? तिचें नांव कमळा नव्हे तर ? कमळजा कां ? काय बाई, सगळाच मेला चमत्कार ! "

ती पुनः म्हणाली, " तर मग येथून गेल्यापासून ती आपल्या घरीं गेलीच नाहीं म्हणावयाची. आणि कोठें आहे हेंही माहीत नाहीं ? आतां काय करावें माणसानें ? "

" अगदीं माहीत नाहीं. तिचा तपास कोठें करावा हेंच कळत नाहीं. "

" मला वाटतें, तुमच्या वडिलांना जहागीर मिळाल्याची बातमी तिला समजली नसावी. "

" तसेंही असेल. आम्ही आमच्याकडून तपास करीतच आहोंत. केव्हां पत्ता लागेल तो सुदिन. मी जातें तर आतां. आपण मला इतकी माहिती दिली याबद्दल आपले मजवर उपकार आहेत. यापुढेंही आणखी कांहीं बातमी लागलीच तर ताबडतोब आम्हांला कळविण्याची मेहेरबानी करावी. आम्ही चौपाटीवर त्या बंगल्यांत राहतों. "

घरधनिणीनें तें मोठ्या आनंदानें कबूल केलें. इंदिरा तिचा निरोप घेऊन गाडींत जाऊन बसली व गाडी चालूं लागली. इंदिरेच्या मनांत विचार आला—ह्या बाई ह्मणतात त्याप्रमाणें कमळजेनें जर लग्न करून घेतलें असेल व तेंही आपल्यापेक्षां कमी प्रतीच्या व हीन घराण्यांतील गृहस्थाशीं केलें असेल तर मात्र ती तोंड दाखविण्यास धजत नसेल खरी; आणि ह्मणूनच ती घरीं परत आली नसावी. हा विचार मनांत येतांच ती फार कष्टी झाली. घरांतून निघतांना किती उत्सुकतेनें व आनंदानें ती निघाली होती ? कमळजेचा तपास काढून तिला गाडींतून घरीं आणूं, अशी तिला किती खात्री वाटत होती ? आतां घरीं गेल्यावर बाबांना सांगावें तरी काय हा विचार तिच्या मनांत घोळूं लागला,

या विचारांत ती असल्यामुळें घर केव्हां आलें हें तिला समजलेंसुद्धां नाहीं. गाडी घरापुढें येऊन उभी राहिली व नोकर गाडीचें दार उघडूं लागला तेव्हां इंदिरा शुद्धीवर आली, व गाडींतून उतरून आपल्या बंगल्यांत गेली. दिवाणखान्यांत जाऊन पहाते तों सर्जेराव व आजीसाहेब

यांचा जोराचा वाद चालला आहे. आजीसाहेबांची स्वारी सर्जेरावांना व त्यांच्या मुलींना भेटावयाला आली होती. त्यांचें व सर्जेरावांचें नेहमीं एवढ्यातेवढ्याशा कारणावरून भांडण होई व दोघेंही अगदीं हमरीतुमरीवर येत.

या वेळींही अशाच कसल्याशा क्षुल्लक कारणावरून त्या दोघांची बोलाचाली चालली होती. इंदिरेस पहातांच ते दोघेंहि गप्प राहिले. इंदिरेनें त्यांना सांगितलें कीं कमळजेचा कांहीं तपास लागत नाहीं. तेव्हां सर्जेराव ह्मणाले:—" इतके दिवस कमळजा कोठें आहे हें आपणास माहीत आहे असें तूं म्हणत होतीस आणि आतां तपास लागत नाहीं ह्मणतेस; याचा अर्थ काय ? "

इंदिरेनें एकंदर हकीकत सांगितली. ती ऐकून सर्जेरावांना काय वाटलें असेल त्याचें वर्णन करणें कठीण आहे. कमळजा नाहींशी झाली—हो, तूर्त नाहींशीच झाली म्हणावयाची—असें जेव्हां त्यांना समजलें तेव्हां ते फार संतापले, दणादण पाय आपटूं लागले व पाहिजे त्याला तडातड बोलूं लागले. इंदिरेवर त्यांनीं ताशेरा काढला; त्या म्हातारीची—आजीसाहेबांची—सुद्धां त्यांनीं बाकी ठेविली नाहीं.

सर्जेराव थोडे शांत झाल्यावर इंदिरेनें त्यांना तीं प्रार्थनासमाजांतून आणलेलीं दोन पत्रें दाखवून म्हटलें:—" हें पाहिलेंत, बाबा, गेल्या जानेवारीपासून मीं तिला तीन पत्रें पाठविलीं, पण तीं अजूनपर्यंत तशींच प्रार्थनासमाजांत पडून राहिलेलीं होतीं. पैकीं हीं दोन मी येतांना घेऊन आलें आणि तिसरें तिथेंच ठेवलें. कधीं आलीच तर तिला मिळावें म्हणून. "

" तीं पत्रें तिथेंच कां बरें पडून राहिलीं ? " आजीसाहेबांनीं विचारिलें.

इंदिरा:—" हें मला दिखील कळत नाहीं, व यामुळेंच माझ्या मनांत भीति उत्पन्न झाली आहे. गेल्या जानेवारींत तिच्याकडून एक पत्र आलें. त्या पत्रावर मुंबईचाच मुक्काम लिहिला होता. तें पत्र मीं बाबांना दाखविलें, पण त्याचें उत्तर घालूं नकोस अशी त्यांनीं मला ताकीद

दिली. पुढें मार्च महिन्यांत मी—मी—काय सांगू, आजीसाहेब, एक गोष्ट घडून आली त्यामुळें कमळजेबद्दल मला मोठी काळजी लागून राहिली; म्हणून मी तिला एक पत्र पाठविलें. एके रात्रीं मला अगदीं वाईट स्वप्न पडलें:—"

"काय स्वप्न पडलें ?" आजीसाहेबांनीं मोठ्यानें विचारिलें.

"आजीसाहेब, आपण मला अगदीं वेडी म्हणाल, म्हणा बापड्या. पण स्वप्न मात्र फारच वाईट पडलें. भयंकर, विलक्षण व अशुभसूचक-असें स्वप्न पडलें. कमळजेवर कांहीं तरी अनर्थ गुदणार, ती मरणार असें आपलें मला वाटलें ! स्वप्नावर माझा भरंवसा असल्याकारणानें त्या स्वप्नाचा माझ्या मनावर मोठा परिणाम झाला. मला कांहीं चैन पडेना. तेव्हां मी कमळजेला एक पत्र लिहिलें. त्यांत आम्ही सर्व मंडळीसह दत्तापुरास हवा पालटण्यासाठीं आलों आहोंत; सर्वांच्या तब्येती बऱ्या आहेत. तुझ्याकडून खुशालीचें उत्तर यावें वगैरे मजकूर मीं लिहिला होता. पण त्याचें उत्तर आलें नाहीं म्हणून पुनः दुसरें पत्र लिहिलें, तरी-ही उत्तर नाहीं. शेवटीं तिसरें पाठविलें तरी दिखील उत्तर नाहींच. पण मला त्याचें कांहीं वाटलें नाहीं. मीं मनांत म्हटलें—तिनें मला जानेवारींत पत्रं पाठविलें. त्याचें उत्तर मीं तिला तेव्हांच लिहिलें नाहीं म्हणून ती माझ्यावर रागावली असेल, व त्यामुळेंच तिचें पत्र येत नसेल. मी आजपर्यंत असेंच समजत होतें; पण मघांशीं प्रार्थनासमाजांत गेल्यावर माझीं सर्व पत्रें तिथें दिसलीं. तेंव्हां माझा भ्रम दूर झाला."

त्या तिघांच्याही चेहऱ्यावर काळजी दिसूं लागली, व त्यांच्या मनांत कमळजेबद्दल एकप्रकारची भीति उत्पन्न झाली.



# प्रकरण २६ वें.

——:०:——

## हाकालपट्टी.





चौपाटीवरील, बंगल्यासमोर एके दिवशीं रात्रीं गाड्यांची अगदीं खेंचाखेंच झाली होती. निमंत्रित मंडळी—बायका, पुरुष—दोन दोन चार चार असे जमाव करून भराभर बंगल्याच्या आंत जात होते. दिवाणखान्यांत पुरुषमंडळी बसण्याची सोय केली होती व त्याच्या दोन्ही बाजूंचीं दालनें बायकांकरितां राखून ठेविलीं होतीं. बंगला उत्तमप्रकारें शृंगारलेला असून रोषनाई फारच सुंदर केली होती. या रात्रीं बंगल्यांत जलसा करण्याचें सर्जेरावांनीं ठरविलें असून त्याकरितां बरीच मंडळी बोलाविली होती.

सर्जेरावांना जहागीर मिळाल्यानंतर लागलींच ते मुंबईस येऊन राहिले होते. अर्थातच त्यांचे आप्तइष्ट, स्नेहीमंडळी, अधिकारीवर्ग, वकीललोक, वगैरे सर्वांनीं शक्य त्या रीतीनें त्यांचें अभिनंदन केलें. मेजवान्या, पानसुपाऱ्या, चहापार्ट्यां, मानपत्रें, वगैरेंची अगदीं गर्दी उडून गेली. रोज एक दोन ठिकाणचें जेवणाचें आमंत्रण नाहीं, निदान चहा कॉफीचें तरी बोलावणें नाहीं असें कधींच झालें नाहीं. इंदिरेला वाटलें, आपण इतक्या लोकांच्या घरीं जाऊन त्यांचा पाहुणचार घेतला, तर त्या सर्वांना एक दिवस तरी आपल्या घरीं बोलावून आणून यथाशक्ति त्यांचें स्वागत करणें अगदीं रास्त व जरूर आहे. असें मनांत येऊन तिनें ती गोष्ट सर्जेरावांजवळ काढिली.

सर्जेरावांना दगदगीचा कंटाळा आल्यामुळें त्यांनीं तिच्या बोलण्याकडे तुच्छतापूर्वक दुर्लक्ष केलें. पण अखेरीस इंदिरेच्या आग्रहामुळें त्यांना होय

म्हणावें लागलें.—सर्जेरावांचा रुकार मिळतांच इंदिरेनें तयारी करून आजची रात्र त्याकरितां मुक्रर केली होती.

कमळजेसंबंधानें इंदिरेचें व सर्जेरावांचेंहि मन थोडें स्वस्थ होतें. सर्जेरावांना जो जो म्हणून तपास करावासा वाटला तो तो त्यांनीं केला. पोलिसांची: मदतही त्यांनीं घेतली व जारीनें तपास चालविला. त्यांत त्यांना समजून आलें कीं स्त्रीशिक्षणप्रसारक सभेच्या खटपटीनें सुमारें दहा महिन्यापूर्वीं कमळाबाई नांवाच्या एका विद्यार्थिनींला हुबळी धारवाडाकडें मास्तरिणीची नोकरी मिळाली आहे. ती वयानें तरुण, दिसण्यांत सुस्वरूप व आनंदी स्वभावाची आहे असेंही इंदिरेनें ऐकलें. त्याबरोबर तिला वाटलें हीच आपली कमळजा असावी. झालें. सर्जेरावांनेंही तिकडे ताबडतोब पत्रें रवाना केलीं. या पत्राचें उत्तर येईपर्यंत तरी निदान त्यांचीं मनें स्वस्थ होतीं आणि म्हणूनच आज रात्रीं जलशाचा बेत त्यांनीं ठरविला होता.

समारंभ आटपत आला. इकडे बायकांच्या दालनांत ओट्या भरण्याची, हळदकुंकू लावण्याची, अत्तर गुलाब देण्याची एकच गर्दी उडून गेली होती. चिमुकली लीला तर एकसारखी इकडून तिकडे व तिकडून इकडे करीत होती. लहान मुलांना कोणतेंही काम स्वतः करण्याची मोठी हौस असते. त्याप्रमाणें लीलाही स्वतः बायकांना हळद कुंकू देऊं लागली, ओट्या भरूं लागली, सर्व कांहीं करूं लागली. त्यायोगानें ती अगदीं दमून गेली होती. इंदिराही ओटी भरण्यांत गुंतल्यामुळें तिचें लीलेकडे इतका वेळ लक्ष्यच नव्हतें. त्या बायकांपैकीं कोणशी म्हणाली:—“ ह्या मुलीला कोणी तरी घ्या हो. ही अगदीं दमून गेली आहे. ” त्याबरोबर इंदिरेनें मागें वळून पाहिलें तर लीला घामानें डबडबलेली व थकलेली तिला दिसली. इंदिरेनें तिला आपल्याजवळ घेऊन विचारिलें—“ बाळ, तूं इतकी कशानें दमलीस ? आणि तुझ्या त्या पुतळाबाई कुठें आहेत ? मला वाटलें तूं त्यांच्याजवळ असशील. कुठें गेल्या त्या ? येथें दिसत नाहींत ? ”

“ त्या बाबांच्याजवळ बसल्या आहेत. बाबा आपल्या खोलींत ती थोरली चिलीम ओढीत बसले आहेत. आणि मास्तरीणबाई जवळ बोलत

बसल्या आहेत. पण आक्का, मी तशी कांहीं दमलें नाहीं. आणखीन् सुद्धां ओट्या भरीन हव्या तर. "

इंदिरेच्या कपाळाला आंठ्या पडल्या. ती संतापून सर्जेरावांच्या खोलीकडे निघाली. खोलीचें दार पुढें केलेलें असून आंत सर्जेराव व पुतळाबाई या दोघांचें संभाषण चाललें होतें:—

सर्जेराव:—" पुतळाबाइ, तुम्हांला तरी हा सावळा गोंधळ आवडतो काय ? "

पुतळाबाई:—" नाहीं, मला नाहीं आवडत. बारा घरची बारा मंडळी जमायची, त्यांत कसली मजा येणार ? खरें सुख म्हणतात तें निराळेंच आहे. नवराबायको, मुलेंबाळें वगैरे सर्व घरचीं माणसें एके ठिकाणीं बसून संसारांतील सुखदुःखाच्या गोष्टी चालतात, प्रेमाचें संभाषण चालतें, त्यांतच खरें सुख आहे. गृहसौख्य म्हणतात तें हेंच. "

सर्जेराव:—" मग हें प्रत्येकाच्या घरीं असतेंच. "

पुतळाबाई:—" नाहीं, प्रत्येकाच्या घरीं कुठलें असावयाला ? माझेंच उदाहरण घ्याना ? असें सुख मिळायचें माझ्या नशीबांत नाहीं. "

" कां मिळायचें नाहीं ? "

" धनीसाहेब, " पुतळाबाई किंचित् हांसून म्हणाल्या, " कां म्हणजे काय ? एकीनें राजाची राणी कां व्हावें व दुसरीनें रात्रंदिवस काबाडकष्ट करूनही पोटापुरती जाडी भरडी भाकर सुद्धां तिला कां मिळूं नये यासारखाच हा प्रश्न आहे. या जगांत प्रत्येकाचें नशीब निरनिराळें आहे. हर घटकेला मला वाटतें, चाकरीकारितां कांहीं ईश्वरानें मला निर्माण केलें नाहीं. माझें मन, माझें अंतःकरण, माझें सौंदर्य, हें सर्व उच्चस्थितीकरितां उत्पन्न झालें आहे, असें आपलें माझ्या मनांत येतें. पण हल्लीं तरी अशी स्थिति आली आहे. मुकाट्यानें सोसली पाहिजे, त्याशिवाय गत्यंतर नाहीं. "

आणि खरोखरच पुतळाबाई या वेळीं केवळ लावण्याची खाण दिसत होत्या. त्यांचा गौर वर्ण त्या लख्ख प्रकाशांत फारच खुलून दिसत होता. त्यांचे निमुळते स्कंध, गोंडस व बाळसेदार हात, लुसलुशीत व गुलाबी गाल, व एकंदर बांधा फारच मनोहर दिसत होता. तेथें इतक्या बायका

जमल्या होत्या पण पुतळाबाईच्या तोडीची त्यांत एकही बायको नव्हती. घराची मालकीण शोभेल इतक्या त्या सुरेख व तेजःपुंज दिसत होत्या. कदाचित् मालकीण होण्याचा विचार या वेळीं त्यांच्याही मनांत घोळत असेल.

सरदारसाहेबांच्या मनांत तरी हा विचार घोळत होता ऐवढें खरें. त्यांनीं एकीकडे गुडगुडीचे झुरके चालविले होते. व दुसरीकडे ते मोठ्या आतुरपणानें पुतळाबाईकडे पहात होते. साठी येऊन ठेपली होती तरी सुंदर स्त्रीचा अभिलाष अद्यापि त्यांच्या मनांतून नाहींसा झाला नव्हता. त्यांचे लालस डोळे आपल्या सौंदर्याकडे लागले आहेत असें पुतळाबाईही जाणून होत्या. पण त्या तशाच त्यांच्या शेजारीं बसलेल्या होत्या. खोलींत येतांना त्यांनीं आपल्या हातांत एक पुष्पगुच्छ आणला होता. सर्जेरावांना तो— व त्याबरोबर आपले पंचप्राणही—अर्पण करण्याकरितां आणला होता काय ?

सरदारसाहेबांचें सर्व काम अगदीं रोखठोक असे. त्यांच्या बोलण्यांत आडपडदा कधींच असावयाचा नाहीं. त्यांनीं एकदम पुतळाबाईना विचारिलें:—" तुम्ही माझ्या नशीबाची वांटेकरीण होतां काय ? "

पुतळाबाईनीं आपली गहिरी नजर त्यांच्याकडे लाविली. त्यांना ही सर्व थट्टाच आहे असें वाटलें. सरदारसाहेब थोडें पुढेंच सरकले व त्यांच्या तोंडाकडे नजर लावून म्हणाले:—' माझ्या वयाला जवळ जवळ साठ वर्षे झालीं आहेत तरी मी मोठा रंगेल मनुष्य आहें. माझ्या अंगांत अजून कस आहे. संधिवाताखेरीज मला दुसरा कोणताही विकार नाहीं. तूं माझी अर्धांगी झालीस तर तुला सुख होईल. "

खरेंच, मागणी करण्याची ही मोठी विचित्रच तऱ्हा म्हणावयाची ! साठी, संधिवात व लग्न यांचा हा विलक्षण मेळ सरदारसाहेब घालीत होते. किती झालें तरी असल्या नाजूक कामांत ते बिलकुल प्रवीण नव्हते. फक्त आपले खरेखुरे विचार ते स्पष्टपणें सांगत असत. तिला बोलण्यास फुरसत न देतांच ते म्हणाले:—" हं, मग तुझें म्हणणें काय आहे ? "

पुतळाबाई हलकेंच त्यांच्याजवळून जरा दूर झाल्या व अश्रुपूर्ण नेत्रांनीं त्यांनीं सरदारसाहेबांकडे पाहून म्हटलें:—

" धनीसाहेब, मी आपली आभारी आहें. पण असें होणें शक्य नाहीं. तें आपल्या मुलींना पसंत पडणार नाहीं. "

सर्जेरावांना त्यांच्या मर्जीविरुद्ध कोणीही गेल्यास आवडत नव्हतें. विरोध असा त्यांना बिलकुल खपत नव्हता; मग तो कोणाकडूनही होवो. ते त्रासून म्हणाले:—" माझ्या मुलींना पसंत पडणार नाहीं ? यांत त्यांचा काय संबंध ? "

पुतळाबाईच्यापुढें परस्परविरुद्ध विचारांचें काहूर उभें राहिलें:—" धनीसाहेब, आपण माझ्याशीं लग्न केलें तर आपण व आपल्या मुली—त्यांतल्या त्यांत इंदिराआक्कासाहेब, यांच्यामध्यें भांडणाचें बीज पेरल्यासारखें होईल; खरोखर असें होईल. "

"माझ्या मुलींकडून मला कांहीं त्रास होणार नाहीं. माझी खात्री आहे."

मास्तरिणीनें कांहीं उत्तर दिलें नाहीं. ती बोलण्याचा प्रयत्न करीत असल्याचें तिच्या तोंडावरून दिसलें.

सर्जेराव पुढें म्हणाले:—" हें पहा पुतळाबाई, मला जहागीर मिळाली त्याच दिवशीं मी लग्न करून घेण्याचा निश्चय केला. आणि लग्न करून घेणें जरूरही आहे. माझ्या जहागिरीला वारस तरी कोणी पाहिजे कीं नाहीं. लाडके, तुझ्या रूपाप्रमाणें तुझा स्वभावही चांगला आहे. मग आणखी दुसरीकडे कोठें शोधूं ? तूंच माझी पत्नी, या जहागिरीची मालकीण व माझ्या जिनगीची धनीण हो म्हणजे झालें. "

इतकें मोहजाल पसरल्यावर पुतळाबाईचा टिकाव कसचा लागतो ! त्यांनीं एकदम रुकार दिला:—" धनीसाहेब, मला पदरांत घेण्याची जर आपली इच्छा असेल तर तसें कां होईना ! माझ्याकडून मी आपणास सुख देण्याची शक्य तितकी खटपट करीन. "

" ठरलें तर मग " असे निष्कपटी, सरळ व साधे सरदारसाहेब म्हणाले. त्यांनीं आपला हात तिच्या खांद्यावर ठेविला व तिचें चुंबन घेण्याकरितां आपली मान लवविली. तिची तोंडी कबुली घेतली होती, तीवर त्यांनीं आपल्या चुंबनानें शिक्का मारून टाकिला.

याच वेळीं इंदिरा खोलीच्या बाहेर येऊन दाराच्या फटींतून पाहूं

लागली. लीलेनें सांगितलेला मजकूर ऐकून पुतळाबाईंच्या शोधार्थ ती आली होती. आंतील प्रकार पाहून तिच्या अंगाची लाही उडून गेली. तिच्या भ्रुकुटी आश्चर्यानें वक्र झाल्या; व संतापानें तिचें रक्त जणूं कढ येऊन उसळूं लागलें. त्या चुंबनाशीं कांहीं विशिष्ट हेतूचा संबंध असेल असा तिला संशय सुद्धां आला नाहीं. आपले बाबा आतां या वयांत पुनः लग्न करून घेतील हा विचार क्षणमात्र सुद्धां तिच्या मनांत आला नाहीं. सर्जेरावांवर तिचें अत्यंत प्रेम व निःसीम भक्ति असल्यानें अशी कल्पना होण्यास जागाच नव्हती. आंतील प्रकार पाहून तिला एवढेंच वाटलें कीं बाबा कांहीं तरी मूर्खपणाचा प्रकार करीत आहेत. " पुतळाबाई म्हणजे घरांतील इतर नोकरांप्रमाणें एक नोकर. तिच्याशीं इतकी फाजील सलगी बाबांनीं करावयाची म्हणजे काय ? बरें, तिला तरी कांहीं लाज लज्जा ? ती आपली खुशाल तेथेंच स्वस्थ बसली आहे ! " असें इंदिरा मनांत म्हणाली. त्या वेळेपासून तिच्याविषयीं इंदिरेच्या मनांत अत्यंत तिरस्कार उत्पन्न झाला ! ती आंत न जातां तशीच बाहेर उभी राहिली. इतक्यांत सर्जेरावही बाहेर येण्यास उठले. आपण पाहुणेमंडळीपासून आंत येऊन बराच वेळ झाला, आतां निरोप घ्यायाला तरी जावें असें मनांत येऊन ते खोलीच्या बाहेर पडले. नंतर इंदिरा आंत गेली. पुतळाबाई तशाच बसलेल्या होत्या. त्यांचा विचार चालला होता. इंदिरेनें त्यांना झाडलें:—" मास्तरीणबाई, तुम्ही येथें कां बसला आहांत! मीं चोंहीकडे तुमचा शोध केला. म्हटलें, गेल्या तरी कुठें ह्या? लीलेकडे तुमचें पूर्ण लक्ष्य असूं द्या, एवढेंच माझें सांगणें आहे. तिची काय अवस्था झाली पहा, जा. इकडे येऊन बसायाची ही वेळ तरी ! "

इंदिरेचे शब्द जोराचे, हुकूम केल्यासारखे होते. तिच्या तोंडून अशा प्रकारचे शब्द पुतळाबाईंनीं कधींच ऐकले नव्हते. त्या कांहीं न बोलतां बाहेर निघाल्या. इंदिरा एकसारखी त्यांच्याकडे पहात राहिली. तिला जो प्रकार दिसला त्यायोगानें ती अगदीं संतप्त झाली होती. उद्यां पुतळाबाईंना घर सोडून चालतें झालेंच पाहिजे, असा इंदिरेनें आपल्या मनाशीं निर्धार केला. तिला वाटलें, बाबांची एकांतीं गांठ घेण्याकरितांच मुद्दाम

पुतळाबाई या खोलीकडे आली, व तिनें त्यांना आपल्या मोहनी जालांत पकडलें.

इंदिरा पुनः बायकांकडे आली. समारंभ सर्व आटपला व आलेली मंडळी आपआपल्या घरीं निघून गेली.

सकाळीं चहा घेतल्यावर इंदिरेनें आपली जमाखर्चाची वही काढली. हिशेब अगदीं चोख लिहिलेला होता. पुतळाबाईचें आज अखेरचें देणें किती हें तिनें काढलें, व हैबतीला हाक मारली. तो येतांच " मास्तरीणबाईना इकडे पाठवून दे, " असें इंदिरेनें त्याला सांगितलें.

पुतळाबाईची सारी रात्र बहुतेक जागरणांतच गेली होती. भावी ऐश्वर्याचें मनोराज्य त्यांच्या डोक्यांत घोळत होतें. एकदां त्यांना वाटे हें ऐश्वर्य आतां अगदीं आपल्या हातांत आलेंच. पण पुनः त्यांची त्यांनाच शंका येई. त्या म्हणत, सर्जेरावांची बुद्धि चळली असेल, ' साठी, बुद्धि नाठी ' अशी त्यांची स्थिति झाली असेल, म्हणून ते कांहीं तरी बडबडले, झालें. दिवस उगवला तरी त्यांच्या मनांतून हें काहूर नाहींसें झालें नाहीं. कशाचीच त्यांना अजून खात्री वाटेना. हैबतीचा निरोप ऐकतांच त्या इंदिरेकडे गेल्या.

इंदिरा त्यांना अगदीं बेमुर्वतीनें म्हणालीः—" मास्तरीणबाई, तुम्हांला इतःपर घरांत ठेवणें योग्य दिसत नाहीं. झाली नोकरी एवढी पुष्कळ झाली. आजच जाणें तुम्हांला विशेष गैरसोयीचें होणार नाहीं ना ? "

हे शब्द ऐकतांच मास्तरीणबाई आश्चर्यानें इंदिरेकडे पाहूं लागल्या. आधल्या रात्रीं सर्जेरावांच्या खोलींत झालेला प्रकार इंदिरेला समजला असेल असें त्यांना क्षणभर सुद्धां वाटलें नाहीं. आतां इंदिरेकडून बोलावणें आलें, त्याचें कारण लीलेसंबंधानें कांहीं विचारावयाचें असेल असें त्यांना वाटत होतें. म्हणून इंदिरेचे वरील शब्द ऐकतांच त्यांच्या मनाला धक्का बसला व त्यांना कांहीं सुचेनासें झालें. अंमळशानें त्यांनीं विचारिलें:—" आक्कासाहेब, निघून जा असेंच आपण म्हणालां ना ? आजच निघून जा असें ? "

इंदिरेनें शांतपणानें उत्तर दिलें:-" होय, तसें केलेंत तर मोठे उपकार होतील."

" असा एकाएकीं माझ्यावर गहजब होण्याचें कारण तरी काय झालें हें समजलें तर बरें होईल."

इंदिरा:—" मास्तरीणबाई, कारण विचारण्याच्या भानगडींत तुम्हीं पडूं नये हें बरें. आपल्याशींच कारण शोधून पाहिलेंत तरी सुद्धां तुम्हांला कळेल. कांहीं कांहीं गोष्टी न बोलण्याजोग्या असतात. मास्तरीणबाई, मी आजपर्यंत तुम्हांला मोठी सभ्य बायको समजत होतें. परंतु माझा गैरसमज झाला म्हणून मला वाईट वाटतें. लीलेला मीं तुमच्यासारख्यांच्या स्वाधीन केली ही माझी मोठीच चूक झाली."

पुतळाबाई अगदीं संतप्त झाल्या. इंदिरेचा एकेक शब्द खोंचदार, काळजाला घरें पाडण्यासारखा होता.

इंदिरा पुढें ह्मणाली:—" हें पहा मास्तरीणबाई, तुमचे पंचवीस रुपये देणें निघतात. हे पंचवीस रुपये. आणि मी तुह्मांला आगाऊ सूचना न देतां अशी एकाएकीं जावयास सांगतें, यांत तुमची फार गैरसोय होईल ह्मणून एक महिन्याचा पगार मी तुह्मांला जास्त देतें. हे वीस रुपये. असे पंचेचाळीस रुपये ठेवले आहेत. घ्या आपले मोजून. होय, मागाहून पिरपिर नको. घांसून घ्यावें पण हांसून घेऊं नये."

पुतळाबाईंनीं कांकूं न करितां ते रुपये उचलून घेतले. थोड्या वेळानें त्यांचा राग शांत झाल्यावर त्या ह्मणाल्या:-" आक्कासाहेब, माझ्यावर आपली गैरमर्जी झाली, याबद्दल मला वाईट वाटत आहे. पण फिरून मी केव्हां तरी आपणाला आवडूं लागेन."

इंदिरेला जास्तच राग आला—इतका कधीं पूर्वीं आला नव्हता—ती ह्मणाली:—" ती गोष्ट बोलूं नका. मास्तरीणबाई, तुमचें या घरांतील काम संपलें. आपलें सामानसुमान घ्या आणि चालत्या व्हा. आणि जातांना लीलेला भेटूं नका. समजलें ?"

पुतळाबाई फुणफुणत आपलें सामान घेऊन बाहेर जाण्याकरितां निघाल्या. सर्जेरावांचा निरोप घेऊन जावें असें प्रथम त्यांना वाटलें नाहीं.

दरवाज्यांत गेल्यावर रात्रीचा प्रकार त्यांच्या लक्षांत आला, त्याबरोबर त्या थोड्या गुळमुळल्या. रात्रीं सर्जेरावांनीं आपल्याजवळ जी गोष्ट काढली ती जर खरोखरीच मनापासून काढली असेल तर आपणाला आक्कासाहे-बांकडून निरोप झाला ही गोष्ट त्यांना कळवावी आणि मग जावें, असें मनांत आणून त्या सर्जेरावांच्या खोलीकडे गेल्या. सर्जेराव पत्र वाचीत बसले होते. त्यांना पुतळाबाई म्हणाल्या:—" धनीसाहेब, मला आक्का-साहेबांनीं निरोप दिला."

सर्जेराव वाचण्यांत गर्क झाले होते. त्यांच्या लक्षांत चांगलेंसें न आ-ल्यामुळें त्यांनीं मोठ्यानें म्हटलें, " काय ? "

पुतळाबाई:—" मला सांगायला वाईट वाटतें, आक्कासाहेबांनीं मल जा म्हणून सांगितलें. "

सर्जेराव:—" कशाकरितां ? "

पुतळाबाई:—" त्यांनीं कांहीं कारण सांगितलें नाहीं. "

सर्जेराव:—" पण तूं अशा रीतीनें घरांतून निघून जावेंस हें मला पसंत नाहीं. इंदिरेचें तूं काय ऐकतेस ? मी या घराचा मालक आहें. जाऊं नकोस. रहा. ती काय करिते ? "

पुतळाबाई:—" छे छे ! धनीसाहेब, मी बोलतें त्याचा राग नसावा. आक्कासाहेबांच्या मर्जीविरुद्ध मला घरांत राहतां येणार नाहीं. ताबेदारानें मालकाच्या मताविरुद्ध घरांत राहणें अगदींच अशक्य. "

सर्जेराव:—" पण तूं आतां माझी झालीस. अशा रीतीनें तुझी हाका-लपट्टी मी इंदिरेला करूं देणार नाहीं. "

" कसें झालें तरी मला या घरांतून लवकर गेलेंच पाहिजे, जर—जर—" पुतळाबाई गुळमुळत म्हणाल्या.

सर्जेराव:—" हो खरेंच. जर आतां आपलें लग्नच व्हावयाचें आहे तर मग तुला घरांतून गेलें पाहिजेच. परत मालकीण म्हणून आलीस म्हणजे सर्व उट्टें काढून घे. आतां जावें हेंच बरें. "

थोड्या वेळानें सर्जेरावांनीं एकदम विचारिलें:—" बरें, मग तुझी केव्हां तयारी होईल ? "

"तयारी कसली ? ही मी निघालेंच."

"येथून जाण्याची तयारी मी नाहीं विचारीत. खुळसट कुठली ! लग्नाची तयारी म्हटलें ! आठ दिवसांत ?"

पुतळा:—"इश्श ! आठ दिवसांत कशी होईल ? माझी तयारी व्हायला महिनाभर तरी लागेल."

सर्जे०:—"एक महिना ? लग्नाची तयारी करण्याला एक महिना ? आपण नाहीं कधीं असें ऐकलें. याचा अर्थ तरी काय ?"

असल्या तयारीच्या विषयाची वाटाघाट करीत बसणें पुतळाबाईना बरें वाटलें नाहीं. त्या म्हणाल्या:—"याबद्दल मागाहून ठरवितां येईल. इथें मी जास्त वेळ राहिलें तर आक्कासाहेबांना राग येईल. सांगायचें होतें तेवढें सांगितलेंच. येतें तर मी आतां. बाबांच्या पत्त्यावर पत्र यायचें."

सर्जेराव:—"बरें तर. तूं आतां जाच. आपला सर्व बेत तडीस जाईपर्यंत मी इंदिरेला कांहींच कळवीत नाहीं. तूं जाऊन घरीं पोंचतेस इतक्यांत मीही पाठोपाठ आलोंच, समज."

कोणाला कां होईना, विरहदुःख फार असह्य असतें. पुतळाबाईची स्थिति मोठी कठीण झाली, पण त्या आपल्या मनाचा धडा करून खोलीं-तून बाहेर आल्या. इतक्यांत चिमुकली लीला आंतून पळत पळत आली व मास्तरीणबाईचें खोंचण धरून ती त्यांना आंत ओढून नेऊं लागली. लीलेला भेटूं नका म्हणून इंदिरेनें त्यांना बजाविलें होतें, पण त्यांचा नाइ-लाज झाला. लीलेनें येऊन त्यांना घट्ट धरलें व ती त्यांना ओढूं ला-गली. आपण आतां जाणार, येथें रहात नाहीं, वगैरे हकीकत त्यांनीं तिला सांगितली. हें ऐकल्याबरोबर ती रडूं लागली, आणि "मी आ-क्काला विचारतें, जातें," असें म्हणून आंत गेली. पण इंदिरेनें तिला दटावलें, त्याबरोबर ती मुसमुसत दाराच्या आड जाऊन पहात उभी राहिली.

नंतर इंदिरा सर्जेरावांकडे गेली व 'मास्तरणीला आज निरोप दिला' असें तिनें त्यांना सांगितलें. 'ती आपल्या घरीं रहावयास योग्य नाहीं'

एवढेंच कारण तिनें सांगितलें. तिच्या हातांत विणावयाचा रुमाल होता. ती बोलत होती, पण तिचे डोळे विणण्याकडेच लागले होते. तिनें वर पाहिलें नाहीं, कीं जरूरीपेक्षां जास्त भाषण तिनें केलें नाहीं. बाबा कांहीं विचारतील, आढेवेढे घेतील, रागावतील असें तिला भय वाटत होतें, पण सर्जेराव कांहींच बोलले नाहींत. त्यांनीं तिचें सर्व बोलणें शांतपणानें ऐकून घेतलें. तिचें बोलणें संपेपर्यंत त्यांनीं तोंडांतून एक चकार शब्द काढला नाहीं, व नंतरही ते थोडेच बोलले. ते म्हणाले:—

" पण बये, असें एकाएकीं घालवून देणें म्हणजे बरीच कडक शिक्षा म्हणायची. "

इंदिरा:—" नाहीं बाबा. मी एक महिन्याचा जास्त पगार तिला दिला आहे. "

" बरें तर, तुझी मर्जी. पण कमळजेबद्दल आतां काय करावयाचें?" असें त्यांनीं इंदिरेकडे हातांतील पत्र करून विचारिलें. " हें पाहिलेंस पत्र ! आज सकाळीं आलें आहे. ती हुबळी धारवाडाकडे नोकरीवर गेली अशी जी आम्हांला माहिती लागली ती चुकीची ठरली. ती कोणी दुसरीच कमळाबाई आहे असें या पत्रानें होतें. "

हे शब्द ऐकतांच इंदिरेची अगदीं निराशा झाली व तिला अत्यंत वाईट वाटलें.

" बरें, असली खोटीनाटी बातमी आम्हांला सांगितली तरी कशाला ! जाऊन विचारतों त्यांना. " असें म्हणून सरदारसाहेब उठले व बाहेर निघाले.



## प्रकरण २७ वें.

——:o:——

### दैवगति.



पुतळाबाईची रवानगी केली हें खरें; पण आतां त्यांच्या जागीं लीलेला शिकविण्याकारितां कोण मास्तरीण नेमावी हा विचार इंदिरेला येऊन पडला. पुतळाबाईच्या नेमणुकीच्या कामीं आपल्याकडून थोडीशी घाई झाली; याउपर अशी चूक करावयाची नाहीं असा इंदिरेनें निश्चय केला. तिच्याकडे पुष्कळजणी येऊन भेटून गेल्या, पुष्कळ शिफारसीही झाल्या. शेवटीं बरीच चौकशी करून गौराबाई नांवाची मास्तरीण तिनें पसंत केली व ती लीलेला शिकवूंही लागली. पुतळाबाईमध्यें व या मास्तरिणींमध्यें जमीनअस्मानाचें अंतर होतें.

पुतळाबाईस जाऊन थोडेच दिवस झाले असतील. इतक्यांत सरदारसाहेबांनींही घरांत कळाविलें कीं आपणास चार दिवस जहागिरीच्या गांवीं जाऊन यावयाचें आहे, तेव्हां सर्व तयारी करा. हैबतीनेंहि आपली जाण्याची तयारी केली; पण या खेपेस तुला बरोबर नेत नाहीं, घरांत कोणी नाहीं, शिवाय रिकामा भाडेंखर्च, असें सांगून त्यांनीं त्याचें जाणें रहित केलें. इंदिरेला फार आश्चर्य वाटलें. पण ती स्वस्थ बसली. सर्जेरावांनीं आपली एक ट्रंक व वळकटी बरोबर घेतली व ते बोरीबंदर स्टेशनावर जाऊन आगगाडींत बसले.

तीन साडेतीन तास आगगाडीचा प्रवास झाल्यावर सर्जेरावांना ज्या स्टेशनावर उतरावयाचें होतें तें स्टेशन आलें. त्यांच्याकारितां बाबासाहेब फडणीस आपली घोड्याची गाडी घेऊन स्टेशनावर आले होते. सर्जेराव

आगगाडींतून उतरल्यावर फडणीस व ते घोड्याच्या गाडींत जाऊन बसले, व गाडी फडणीसांच्या बंगल्याकडे निघाली.

इकडे अशी हकीकत झाली कीं भवानराव फडणीसाचें कुटुंब कोणालासें भेटण्याकरितां म्हणून दत्तापूर गांवीं गेलें होतें. तेथें मोहनेची व त्यांची गांठ पडली. मोहना अगदीं मोकळया मनाची व आनंदी स्वभावाची असल्यानें त्या दोघींची मैत्री तत्काळ जमली. शिवाय आमचे भावोजी आपला जहागिरीचा जुना वाडा खरेदी घेणार आहेत वगैरे हकीकत ही मोहनेला फडणिशीणबाईनीं सांगितली. झालें. मग त्या दोघींना वरचेवर बोलावयाला हा एक आयताच विषय होऊन बसला. दत्तापुराहून परत येतांना त्याच्यांबरोबर मोहनाही थोडे दिवस त्यांच्या घरीं राहण्याकरितां आली होती.

गाडी चालू असतांना बाबासाहेब फडणीस यांनीं, "मोहनाताई आपल्या घरीं चार दिवस राहण्याकरितां दत्तापुराहून आल्या आहेत" ही हकीकत सांगितली. त्याबरोबर सर्जेरावांचें पित्त खवळलें:—"ती आपल्या घरीं आहे तर मला तेथें यावयाचें नाहीं. आपण आपले परभारेंच जहागिरीच्या वाड्याकडे जाऊं. तिचें तोंड सुद्धां बघायला नको. वाईट, अगदीं वाईट, दुष्ट कृतघ्न कारटी! त्या हलकट डॉक्टराबरोबर लग्न करून घेण्याकरितां माझ्या घरांतून निघून गेली, आणि माझी परवानगी न घेतां!" इतका ताशेरा झडल्यावर बाबासाहेब काय बोलणार? त्यांनीं "गाडी परभारें वाड्याकडे घेऊन चल," म्हणून कोचमनास हुकूम सोडला व त्याप्रमाणें गाडी तिकडे गेली.

जहागीरगांवच्या वाड्यांत सर्जेराव एकच रात्र राहिले. दुसरे दिवशीं सकाळीं उठल्यावर आपण आज कूच करणार असें त्यांनीं कळाविलें; तें ऐकून बाबासाहेबांना फारच आश्चर्य वाटलें. चार दिवस राहण्याकरितां म्हणून ते इकडे आले, अजून वाडाखरेदीच्या व्यवहाराबद्दल कांहींच बोलणें नाहीं आणि इतक्यांतच जातों म्हणतात हें काय? म्हणूनच ते चकित झाले. कदाचित् मोहनाताई आपल्या घरीं आल्या आहेत ही गोष्ट त्यांना पसंत नाहीं; म्हणून ते रागावले असतील, व जाण्याचें

हेंच कारण, असें समजून तेही जास्त बोलले नाहींत. शेवटीं पुनः एकवार सवड काढून चार दिवस राहण्याच्या बेतानें यावें अशी विनंति आग्रहपूर्वक करून बाबासाहेबांनीं सर्जेरावांना निरोप दिला.

खरें म्हटलें तर या ठिकाणीं जास्त दिवस मुक्काम करण्याचा सर्जेरावांचा बेत पाहिल्यापासूनच नव्हता असें दिसतें; कारण पुतळाबाईकडे जाण्याकरितां ते निघाले होते, व घरच्या मंडळीस संशय येऊं नये म्हणून फडणिसांना भेटावयास जाण्याची ही नुसती बतावणी त्यांनीं केली. मुलीकारितां ही केवळ फसवणूक होती.

सर्जेराव मुंबईला जाण्याकारितां म्हणून आगगाडींत बसले खरे, पण ते दादर स्टेशनावर उतरून तेथून बडोद्याकडे जाणाऱ्या आगगाडींत बसले व पुतळाबाईचा बाप ज्या गांवीं मास्तर होता त्या गांवीं जाऊन पोंचले. पुतळाबाईचें घर अगदीं लहान पण फारच स्वच्छ व व्यवस्थित होतें. घरासभोंवतीं सुंदरशी फुलबाग असून त्याच्यापलीकडे दाट झाडी होती. सर्जेराव आले त्या वेळीं पहाट झाली होती. प्रभातकाळीं त्या झाडींतून ऐकूं येणारा पक्षांचा मंजुळ किलकिलाट, बागेंतील सुवासिक पुष्पांचा सुगंध व शीतळ वाऱ्याची झुळूक, या योगानें सर्जेरावांना फारच हुषारी वाटली.

पुतळाबाईचे वडील बाबा मास्तर. त्यांची व सर्जेरावांची मुलाखत झाली.

सकाळीं चहा घेतल्यावर सरदारसाहेबांनीं आपला इकडे येण्याचा हेतु, कांहींही आडपडदा न ठेवितां व कसलीही प्रस्तावना न करितां बाबा मास्तरांना कळविला. आपली ओळख करून घेण्याकारितां व लग्नाचें काय केव्हां ठरलें तें समजून घेण्याकरितां आपण मुद्दाम आलों असें ते म्हणाले. त्यावर मास्तर बोललेः—" सर्व हकीकत मुलीनें मला कळविली आहे. आपण तिचा स्वीकार करून आमचा जो मान केला त्याबद्दल मी आपला फार फार आभारी आहें. हा आम्हा गरीबावर मोठाच अनुग्रह म्हणावयाचा. ती आपली पत्नी होणार याबद्दल मला मोठा अभिमान वाटत आहे. परंतु पुतळाबाईप्रमाणें माझ्याही मनांत एक शंका येते. आपल्या वाड्यांत पुतळाबाई आली तर तें आपल्या मुलींना पसंत पडणार नाहीं. याला तोड काय ? "

वाचकहो, सरदारसाहेबांची तऱ्हा तुम्हांस पूर्णपणें माहीत आहेच. त्यांचा सोटा—या वेळींही तो बरोबर आणण्यास ते विसरले नव्हते—त्यांनीं दाणादिशीं जमिनीवर आपटला. त्याबरोबर मास्तरसाहेबांची पांचावर धारण बसली. तशांतच सरदारसाहेबांनीं आपल्या पहाडी आवाजांत जोराचें व रागीट भाषण सुरू करून बाबामास्तरांची प्रत्येक हरकत पूर्णपणें खोडून काढली. बिचारा मास्तर अगदीं गर्भगळित होऊन गेला व त्यानें पुनः हरकतीचें नांव म्हणून काढलें नाहीं. सरदारसाहेब म्हणतात तसें झालेंच पाहिजे. व प्रथमपासून ते आपलें म्हणणें खरें करणार हें ठरलेलें होतेंच. तेव्हां ते म्हणतील त्यास 'होस हो,' करण्याचा ठेका मास्तरांनीं आतां सुरू ठेविला.

सर्व ठरलें. फक्त मुहूर्तनिश्चयच काय तो व्हावयाचा राहिला. पण घरच्या कांहीं नडीमुळें व मुहूर्ताच्या अभावामुळें लग्न तीन महिने लांबणीवर टाकावें लागलें. यामुळें सरदारसाहेबांना किती वाईट वाटलें हें सांगावयाला नकोच. या खेपेसच सर्व काम आटपून पुतळाबाईस घरीं घेऊन जावयाचें अशा बेतानें ते आले होते. पण हा त्यांचा बेत सिद्धीस गेला नाहीं. त्यांना मुंबईस परत यावें लागलें, व भावी सुखाच्या आशेवर ते कालक्रमणा करूं लागले.

या तीन महिन्यांच्या अवधींत सर्जेरावांच्या घरीं कांहीं विशेष हकीगत घडली नाहीं. कमळजेसंबंधानें इंदिरेला वाटत असलेली काळजी किंचित्हि कमी झाली नव्हती.

तीन महिने निघून गेले. सर्जेराव चार दिवस झाले गांवास गेले होते. आज सबंध दिवस इंदिरेच्या जीवाला चैन नव्हतें. तिला थोडी कणकण वाटत होती, व मनास उल्हास वाटत नव्हता. आपणाला आज ताप येणार असें वाटून ती अंथरुणावर जाऊन निजली.

इतक्यांत सारजेनें येऊन सांगितलें, कीं बाहेर कोणी गृहस्थ आले असून, सरदारसाहेब परत केव्हां येणार, त्यांची गांठ घ्यावयाची आहे असें विचारीत आहेत.

इंदिराः—" कोण आहेत ते ? "

सारजाः—" बाबासाहेब फडणिसांच्या कामाकरितां इथें नेहमीं येतात ते, तेच. ते पहाऱ्यावरील शिपायाला म्हणत होते—जहागीर गांवाकडून निरोप आला आहे कीं सरदारसाहेबांनीं तिकडे जरूर निघून यावें; कांहीं निकडीचें काम आहे म्हणून. "

इंदिराः—" जहागीर गांवाकडून निरोप ? पण बाबा तिकडेच गेले आहेत. जा सांग जा त्यांना असें. "

इतक्यांत लीला तेथें नाचत बागडत आली व म्हणाली. " नाहीं, आक्का, बाबा तिकडे गेले नाहींत. तिकडे जायचे असते तर ते बोरीबंदर-वर नसते का गेले ? "

इंदिराः—" हो. बरें मग ? "

लीलाः—" पण ते त्या ग्रँटरोड स्टेशनावर गेले. ते गाडींत जाऊन बसले तेव्हां मी तेथें होतें. ' ग्रँटरोड स्टेशनाकडे ' असें त्यांनीं कोचमनला सांगितलेलें मीं ऐकलें. "

इंदिरेला हें खरें सुद्धां वाटेना. बंगल्यांतून निघतांना तिनेंही त्यांना ' जहागीर गांवीं जाणार काय ? ' म्हणून प्रश्न केला होता. तेव्हां त्यांनीं नुसत्या मानेनेंच ' होय ' म्हटलें होतें. म्हणून यांतला खरा प्रकार काय आहे हें समजून घेण्याकरितां कोचमनास तिनें बोलावून आणून विचारिलें. त्यानें सांगितलें कीं—' मी धनीसाहेबांना ग्रँटरोड स्टेशनावर पोंचवून आलों. अलीकडे चार पांच खेपा मी त्यांना तिकडेच पोंचवीत असतों. ' हे शब्द ऐकतांच इंदिरेला फार आश्चर्य वाटलें. कारण त्या बाजूला सर्जेरावांचें कोणी ओळखीचें असल्याचें इंदिरेला माहीत नव्हतें. " येतील लवकर म्हणावें , " असा निरोप तिनें आलेल्या गृहस्थांकडे पाठविला. तो ऐकून ते निघून गेले.

संध्याकाळीं एक गाडी दरवाजांत येऊन उभी राहिली, व त्या गाडींतून सरदारसाहेब व पुतळाबाई अशी दोघेंजण उतरून आंत येतांना लीलेला दिसलें. ती पळत पळत इंदिरेकडे जाऊन म्हणालीः—" आक्का, आक्का, खालीं बाबा आले आहेत, नी माझ्या त्या मास्तरीणबाई—पुतळा-

बाईहि आल्या आहेत. आणखी कीं नाहीं, पुतळाबाईनीं अंगावर शेला पांघरला आहे. तो कपाटांत बासनामध्यें आमच्या आईचा शेला आहे. कीं नाहीं, तसला आहे' अगदीं तसलाच."

पुतळाबाई आल्या आहेत हें इंदिरेला खरें वाटेना. जिला आपण घरांतून घालवून दिली ती परत कशी येईल असें ती मनांत म्हणाली. सारजेला हाक मारून 'खालीं पाहून ये जा कोण कोण आलें आहे तें' असें इंदिरेनें तिला म्हटलें. सारजा खालीं गेली व सर्व प्रकार समजून घेऊन आली. पुतळाबाई आल्याचें खरेंच ठरलें. त्याबरोबर इंदिरेच्या अंगाचा तिळपापड झाला. ती तडकाफडकी उठून 'कशी माझ्या घरांत पाय ठेवते तें बघतें.' असें म्हणत खालीं निघाली. पण सारजेनें तिला अडवून म्हटलें:—"आक्कासाहेब, खालीं जाऊन उगीच भांडण काढूं नका. कांहीं दिखिल उपयोग होणार नाहीं. पुतळाबाई परत जायाला कांहीं आल्या नाहींत. त्या आतां घरच्या मालकीणबाई झाल्या. धनीसाहेबांनीं त्यांच्या बरोबर लग्न केलें आहे नि त्यांना ते घरीं घेऊन आले आहेत."

इंदिरेचें काळीज धडधड करूं लागलें व तिचे पाय लटपटूं लागले. त्यामुळें तिच्यानें एक पाऊल सुद्धां पुढें टाकवेना. सारजेनें तिला धरून बिछान्यावर नेऊन निजविलें.

इतक्यांत पुतळाबाईंना घेऊन सर्जेरावही इंदिरेच्या खोलींत आले. "पुतळाबाईशीं आपण लग्न करून घेतलें, ही आतां तुमची आई झाली, तूं पूर्वीं हिला चांगल्या रीतीनें वागविलें नाहींस, इतःपर हा असला आडमार्ग टाकून दे, नीट रीतीनें वाग. ती ह्या घराची व माझ्या जहागिरीची मालकीण झाली हें ध्यानांत ठेव, असें त्यांनीं इंदिरेला बजावून सांगितलें."

पुतळाबाईनींही इंदिरेची समजूत घालण्याचा आपल्याकडून प्रयत्न केला, पण व्यर्थ. तिची समजूत कांहीं केल्या पडेना. "आपले बाबा म्हणजे अगदीं भोळे, केवळ सांबाचा अवतार. सर्प ज्याप्रमाणें आपल्या भक्ष्यास विळखा घालून अगदीं घट्ट आवळून टाकतो, त्याप्रमाणें या दुष्टेनें आपल्या मोहपाशांत त्यांना बद्ध करून टाकलें आहे; त्यांच्यामध्यें व आपल्यामध्यें या चांडाळणीनें वितुष्ट आणलें व आतां कायमचीच ताटा-

तूट होणार. " असें तिच्या मनानें पक्कें घेतलें होतें. इंदिरा कांहींच बोलत नाहीं असें पाहून सर्जेराव गेले व पुतळाबाईही निघाल्या. तेव्हां मात्र इंदिरेनें मान वळवून त्यांच्या पाठीकडे पाहिलें. तों लीलेनें सांगितलें तें खरेंच. पुतळाबाईंनीं अंगावर शेला घेतला होता तो तिच्या परमपूज्य व परमप्रिय कैलासवासी आईचा होता. बाहेर कोठें दृष्टीस पडला कीं आईची आठवण होऊन इंदिरेला वाईट वाटे, म्हणून तिनें तो बासनांत बांधून ठेविला होता. त्यांतून केव्हां न कळत सर्जेरावांनीं तो काढून घेऊन पुतळाबाईंना अंगावर घेण्याकरितां दिला होता. शेला पाहिल्यावर तर इंदिरेला पराकाष्ठेचें वाईट वाटलें. तिच्या दुःखाचा कडेलोट झाला व ती ओक्साबोक्शी रडूं लागली.

त्या रात्रीं इंदिरेला बिलकूल झोंप लागली नाहीं. ह्या कुशीवरून त्या कुशीवर व त्या कुशीवरून ह्या कुशीवर अशी ती सारखी तळमळत होती. तिच्या हृदयामध्यें कल्लोळ उसळून गेला होता. आपणाला जें नको होतें तेंच आपल्या दुर्दैवानें प्राप्त झालें; ज्याला आपण भीत होतों, तेंच पुढें येऊन उभें राहिलें ! ही अवदसा आपल्या घरांत शिरली. आतां येथून पाय काढावा हें बरें असें तिला क्षणोक्षणीं वाटूं लागलें. पण येथून गेल्यानंतर रहावयाचें कोठें ही अडचण तिला येऊन पडली. शेवटीं तिनें आपल्या मनाचा निश्चय केला, व दत्तापुरांतच जाऊन रहावें असें तिनें आपल्या मनाशीं ठरविलें. सकाळीं सर्जेराव दिवाणखान्यांत इकडून तिकडे शतपावली करीत होते. तेथें कोणी नाहीं असें पाहून इंदिरा आंत गेली व आपलें हृद्‌गत तिनें वडिलांना कळविलें. लीलेलाही बरोबर घेऊन जातें, ती अजून लहान आहे, माझ्याशिवाय तिला चैन पडणार नाहीं व मलाहि करमणूक होईल, वगैरे वगैरे इंदिरा वडिलांचा कल पाहून बोलली. सर्जेरावांनीं तिची पुष्कळ समजूत घातली, पण व्यर्थ. इंदिरेची कांहीं केल्या समजूत पडेना. इंदिरेचा दुराग्रह पाहून सर्जेरावांनींहि तिच्या जाण्यास रुकार दिला व तिच्या खर्चाची वगैरे सर्व व्यवस्था केली. पण लीलेला घेऊन जाण्यास त्यांनीं आपली संमति दिली नाहीं.

इंदिरेनें आपली सर्व तयारी केली. वडिलांची परवानगी घेऊन सार-

जेला तिनें बरोबर घेतलें व ती मुंबईहून निघून दत्तापुर गांवांत येऊन पोंचली. दत्तापुरास आल्यावर इंदिरेची प्रकृति जास्तच बिघडली. रोग म्हणावा तर कांहीं नव्हता, परंतु तिच्या मनाला जो त्रास झाला होता त्यायोगानें स्वस्थता नसल्यामुळें ती दिवसानुदिवस क्षीण होत चालली. तेव्हां तिनें विश्वासरावांना बोलावून आणून त्यांना आपली प्रकृति दाखविली. रोग शारीरिक नसून मानासिक आहे, कालानेंच गुण येणार, दुसरें औषध देऊन कांहीं उपयोग व्हावयाचा नाहीं असें डॉक्टरांनीं तिला सांगितलें. सरदारसाहेबांनीं पुतळाबाईशीं लग्न करून घेतल्याची गोष्ट ह्या गांवांत जगजाहीर झाली होती व त्यासंबंधानें जिकडे तिकडे तेथें चर्चा सुरू होती. इंदिरेची प्रकृति बिघडण्याचें हेंच कारण असें डॉक्टरांना समजण्यास फारसे प्रयास पडले नाहींत. तिच्या समजुतीकरितां त्यांनीं मनास उल्हास देणारें असें एक औषध तिला सुरू केलें व रोज थोडा वेळ तिच्याशीं इकडच्या तिकडच्या गप्पागोष्टी करून तिचें मन शांत करण्याचा त्यांनीं प्रयत्न चालविला. एके दिवशीं संध्याकाळीं विश्वासराव डॉक्टर येऊन बसले असतां इंदिरेनें त्यांना विचारिलें:—

" आम्ही गेल्यापासून इकडील हकीकत कांहीं कळली नाहीं. कांहीं नवल विशेष ? "

विश्वासराव:—" कांहीं कमी जास्त नाहीं. थोडे लोक मेले, कांहीं लग्नें झाली, हेंच. आणखी कांही नाहीं. "

" आनंदरावांचा धंदा बरा चालला आहे ? "

" त्यांना बरेच पैसे मिळतात. आमच्या प्रतापरावांवर लोकांची गैरमर्जी झाली. अर्थातच त्याचा फायदा आनंदरावांना मिळूं लागला आहे."

इंदिरा:—" ह्मणजे ? माझ्या ध्यानांत आलें नाहीं. "

विश्वासराव:—" पेठेंतील त्या घरांत मागें जो भयंकर प्रकार झाला त्यामुळें येथील लोकांच्या मनांत माझ्या बंधूसंबंधानें अप्रियता उत्पन्न झाली आहे—किंबहुना अविश्वास उत्पन्न झाला आहे, असें म्हटलें तरी चालेल. आणि म्हणून ते प्रतापरावांना बोलावीत नाहींत.

इंदिरा:—" पण प्रतापरावांना यामुळें केवढें वाईट वाटत असेल, नाहीं ? "

" खरोखरच त्यांना फार वाईट वाटत आहे व त्रासही होत आहे. पण ते इतक्या शांतपणानें कसें सहन करतात याचेंच मला आश्चर्य वाटतें. कालांतरानें सर्व कांहीं जुळून येईल, एवढेंच ते म्हणत असतात. "

" बरें, त्या बिचाऱ्या मेलेल्या बाईचा कांहीं मागमूस ? "

" छे ! बिलकुल नाहीं. बेवारस, अनोळखी, परस्थ अशी जी मेली ती मेलीच. "

———

# प्रकरण २८ वें.

——:o:——

## वसंताचें तर्कटणें.





दत्तापुर गांवाच्या ह्या टोंकापासून त्या टोंकापर्यंत सर्व लोकांचें मत प्रतापराव डॉक्टरांच्या पूर्णपणें विरुद्ध बनून गेलें होतें. लोकांचें असें मत होण्यास विशेषेंकरून आनंदरावच कारणीभूत झाले. आगींत तेल ओतावें त्याप्रमाणें अनेक प्रकारांनीं लोकांच्या मनांत प्रतापरावांविषयीं संशय उत्पन्न करण्याच्या कामीं आनंदरावांनींच पुष्कळ खटपट केली. प्रथम प्रथम हें समजून आलें नाहीं; कारण आनंदराव हें काम फार सावधपणानें करीत असत. तथापि कर्णोपकर्णीं ही गोष्ट बाहेर आलीच. विश्रामबंधू डॉक्टरांना सुद्धां हा प्रकार कळून चुकला. ' आपला धंदा चांगला चालावा असा आनंदरावांचा हेतु असेल. पण अशा रीतीनें विनाकारण दुसऱ्याची निंदा करून आपली तुंबडी भरणें हें फार वाईट; बिलकुल सौजन्याचें

अगर सचोटीचें नव्हे' असें ते आपआपल्यांत म्हणूं लागले. वसंत इतका लहान ना? पण आनंदराव आपल्या बाबांचा दुर्लौकिक करितात हें पाहून त्याला सुद्धां संताप येई व रागानें तो अगदीं चरफडत असे.

वसंताच्या आईची प्रकृति बरी नव्हती म्हणून हवा पालटण्याकरितां ती कोंकणांत आजोळीं गेली होती; तिकडून ती नुकतीच परत आली होती. वसंताला आईचें वेड फार होतें. "न मातुः परं दैवतम्" अशीच त्याची स्थिति होती. मातेहून या जगांत दुसरी कोणतीही वस्तु त्याला प्रिय नव्हती. इतके दिवस तो आईला सोडून राहिला हें फार विलक्षणच म्हणावयाचें. वडिलांचा—प्रतापरावांचा—त्याला फार धाक होता, आणि म्हणूनच त्यांच्या सांगण्यावरून तो घरीं राहिला होता.

आई गेल्यापासून या सात आठ महिन्यांत दत्तापुर गांवांत ज्या बऱ्या वाईट गोष्टी घडून आल्या होत्या त्या वसंत तिला आतां सांगत उभा होता. त्यांतच बाजार पेठेंतील त्या घरामध्यें घडून आलेला तो दुःखकारक प्रकार व त्याचे प्रतापरावांवर होणारे परिणाम, हाही एक विषय होता. ही हकीकत पत्रद्वारें तिला समजलेली नव्हती. मनाला वाईट वाटेल, त्रास होईल, अशा गोष्टी पत्रांत न लिहिणें बरें; असें वसंताला प्रतापरावांनीं सांगितलें होतें. म्हणून त्यानें ही हकीकत पत्रांत मुळींच लिहिली नव्हती. ती वसंताच्या तोंडून ऐकतांच तिला फार आश्चर्य वाटलें. ती त्याच्या तोंडाकडे टक लावून पहात म्हणाली, "बाळ, तूं काय म्हणतोस मला समजलें नाहीं; त्यांनीं त्या औषधांत विष घातलें असें कां तुझें म्हणणें?"

"आई, पण त्यांनीं घातलें नाहीं असें मी नाहीं कां तुला सांगितलें? बाबांनीं औषध तयार केलें तेव्हां मी तेथेंच उभा होतों. मिश्रण केलेलें मीं ह्या माझ्या डोळ्यांनीं पाहिलें आहे. त्यांनीं विषाच्या शिशाला हात-सुद्धां लावला नाहीं."

"बाळ, मीं तरी हेंच म्हणतें. तिकडून इतका निष्काळजीपणा होईल असें मला नाहीं वाटत. शिवाय तुझी साक्ष, तिच्या जोडीला तुझ्या काकांची साक्ष; झालेंच, तिकडचा आज इतक्या वर्षांचा अनुभव; न्याय करणाऱ्या साहेबांचें 'निर्दोषी आहेत' असें मत; इतकी अनुकूल स्थिति

असतांना, तिकडच्यासंबंधानें लोकांच्या मनांत हा संशय कां उत्पन्न व्हावा?"

वसंतः—"याचें कारण लोक मूर्ख आहेत म्हणून. आतांशा तर गांवांतील दहा लोकसुद्धां आमच्या बाबांना बोलावीत नाहींत. काका लासतात ते ह्यामुळेंच."

"मग भावोजींना आतां अगदीं फुरसत मिळत नसेल?"

वसंतरावः—"छे! बिलकुल नाहीं. बाबांचे पुष्कळ रोगी आमचे वैरी आनंदराव यांजकडे गेले आहेत. बाबांविरुद्ध चहाड्या करणारे तेच. आणि वरून तरी बाबांबद्दल किती माया दाखवितात! याचाच मला भारी राग येतो. ते म्हणतात, 'प्रतापरावांच्या ऐवजीं लोक मला बोलावतात याचें मला फार वाईट वाटतें. माझी त्यांच्यावर फार श्रद्धा आहे. त्यांच्या हातून ती भयंकर चूक झाली याबद्दल मला अत्यंत खेद होत आहे. यापुढें तरी ते विशेष काळजी घेतील अशी मला आशा आहे. पण लोक तरी काय करतील? त्यांच्या बायकामुलांच्या, आप्तइष्टांच्या, स्नेह्यांच्या जिवावर जेव्हां बेततें,'—"

वसंत आनंदरावांची इतकी हुबेहूब नक्कल करीत होता कीं ती पाहून त्याची आई खदखदा हांसूं लागली. तिनें त्याला विचारिलेंः—"पण कायरे बाळ, लोकांजवळ आनंदराव असें म्हणतात हें तुला कसें कळलें?"

वसंतः—"आई, ही गोष्ट सर्व गांवांत पसरली आहे."

"बरें, यांत आनंदरावांचा हेतु तरी काय?"

"दुसरा कोणता असावयाचा ? आमचे रोगी आमच्यापासून हिरावून न्यावयाचे हाच. आई, इतकेंच नाहीं, आणखीही आहे. मी आनंदरावांना वाईट म्हणतों हें अगदीं बरोबर आहे. त्याला कारणही तसेंच आहे."

"कारण तसेंच आहे? तें कोणतें?"

वसंत आईच्या कानांत पुटपुटलाः—"आई, मला वाटतें, त्या औषधांत विष घातलें तें आनंदरावांनींच घातलें."

पण त्याच्या आईला हें खरें वाटेना. तिची मुद्रा गोरीमोरी झाली. वसंत आणखी म्हणालाः—"हें पहा आई, आमच्या दवाखान्यांतून औषध अगदीं बरोबर तयार झालें. आमच्या पोऱ्यानें तें तसेंच्या तसेंच

तिकडे नेऊन दिलें. तेथें पोंचल्यावर आनंदरावांनीं तें कां घेतलें व त्याला विषाचा वास येत आहे असें कां म्हटलें ? त्या वेळीं त्या औषधाला विषाचा वास येणें शक्यच नाहीं, आणि जर तसा वास आलाच असेल तर मग कांहीं तरी भूतचेष्टाच झाली म्हणावयाची."

वसंत एकदां तर्कटावयाला लागला म्हणजे वाटेल तसा तर्कटतो हें त्याच्या आईला माहीत होतें, म्हणून त्याला गप्प बसण्याला तिनें हातानें खूण केली. पण वसंताचें चऱ्हाट पुनः सुरू झालें:—

"आई, अशानें मी नाहीं गप्प रहाणार. माझ्या मनांत आलें आहे तें मी एकदां बोलून टाकतों. किती दिवस तसेंच दाबून ठेवूं ? आनंदरावांचा संशय त्या रात्रींच मला आला. ती बाई मेल्याचें कळल्याबरोबर मी व काका तिकडे पळत गेलों. आनंदराव तेथें खोलींत होतेच व आपल्या स्वतःसंबंधाचा मजकूर ते सांगत होते. औषध आल्याबरोबर आपणाला वास कसा आला, नंतर तें बरोबर रीतीनें तयार केलें आहे कीं नाहीं हें समजून घेण्याकरितां आपण प्रतापरावांकडे—बाबांकडे—कसे गेलों, तेथें त्यांची गांठ पडली नाहीं म्हणून आपण आपल्या घरीं जाऊन दुसरें औषध तयार करून घेतलें पण वेळेवर आपणास कसें जातां आलें नाहीं, वगैरे हकीकत ते सांगत होते. ही हकीकत, बरें कां आई, ते मोठ्या तत्परतेनें, कुशलतेनें व अगदीं साळसूदपणानें सांगत होते. दीक्षितांना व काकांना वाटलें, कीं, आनंदराव अगदीं खरी हकीकत सांगत आहेत. पण मला तसें वाटेना. मी मनांत म्हटलें हे नुसती बतावणी करीत आहेत. ते एकसारखे एखादा धडा पाठ केल्याप्रमाणें घडघड बोलत होते. त्यावरून माझ्या मनाची तर खात्री होऊन गेली, कीं, आनंदरावांचेंच हें सर्व कृत्य आहे."

वसंताच्या आईला भीति वाटून ती म्हणाली:—"बरें, लोकांना हें कळलें तर आनंदरावांवर केवढें संकट ओढवेल, याचा विचार तूं केला आहेस काय ?"

वसंत:—"आई, मी हें लोकांना कशाला कळवायला जाऊं ? पण तुझ्याजवळ तरी सांगितलें पाहिजे कीं नाहीं ? त्या रात्रीपासून माझ्या

मनांत तें सारखें जळत होतें. त्या रात्रीं आनंदराव कांहीं तरी बतावणी करीत आहेत, अशी माझी खात्री झाली. त्यांच्या डोळ्यांत किंवा चेहऱ्यांत खरेपणा बिलकुल दिसत नव्हता. मला त्यांचा संशय आला हें त्यांनींही ओळखलें व "खोलींतून याला बाहेर घालवा" असें ते ह्मणाले. हा माझा पहिल्या खेपेचा संशय. पुढें कोर्टांत त्यांची साक्ष झाली, तेव्हां तुला काय सांगूं, आई, त्यांची जीभ कशी चुरूचुरू बोलत होती! सर्व मजकूर जणूं त्यांच्या तोंडांत अगदीं भरलेला. त्यांनीं फार सरळपणानें व तत्परतेनें आपली साक्ष दिली ह्मणून मॅजिस्ट्रेट साहेबांनीं त्यांची वाहवा केली; पण आई, अथपासून इतिपर्यंत त्यांच्या साक्षींत ओतप्रोत खोटें भरलेलें होतेंग, निवळ खोटें सपशेल खोटें, मीं तेव्हांच ताडलें."

"पण बाळ, मला अगोदर ह्या प्रश्नाचें उत्तर दे. आनंदरावांविरुद्ध तुझें मत असें कसें झालें?"

"आई, तुला सांगूं? प्रथम माझें मत त्यांच्या विरुद्ध नव्हतें. तुला खरें सांगतों, ती बिचारी बाई मरून पडली होती त्या खोलींत जेव्हां मी गेलों तेव्हां आनंदरावांविषयीं माझ्या मनांत कांहीं नव्हतें. पण औषधासंबंधानें ते जेव्हां बोलूं लागले तेव्हां मात्र मला वाटलें कीं, यांत त्यांची कांहीं तरी प्रतारणा आहे, ते खोटें सांगत असले पाहिजेत, ते सांगतात त्यापेक्षां त्यांना जास्त माहिती आहे."

"बाळ, तूं नुसती कल्पनाच करूं नकोस. तारतम्य, व्यवहार, हेही लक्ष्यांत घेतले पाहिजेत. ती बाई आनंदरावांच्या मुळींच ओळखीची नव्हती ना?"

"होय, त्यांच्याही नव्हती व आमच्याही नव्हती."

"मग तिचा जीव घेण्यांत आनंदरावांचा काय हेतु असावा?"

यावर वसंत काय बोलणार? तो निमूटपणें उभा राहिला. आईच्या प्रश्नानें त्याला कोडेंच पडलें; आजपर्यंत याच प्रश्नानें त्याला कित्येकदां घोंटाळ्यांत घातलें होतें. सारजा, मावशीबाई, प्रतापराव, या सर्वांनीं सांगितलें होतें कीं, ती बाई आनंदरावांच्या किंवा कोणाच्याच परिचयाची नव्हती.

## वसंताचें तर्कटणें.

आनंदरावांस दिलेसल्या चेहऱ्याची हकीकत वसंत आपल्या मातुःश्रीला सांगत होता; इतक्यांत प्रतापराव आंत येत असलेले पाहून तो म्हणालाः— "आई, मीं सांगितलें यांतील एक अक्षर सुद्धां बाबांना सांगूं नकोस बरें."

प्रतापराव आंत आले. त्यांच्या नेहमींच्या आनंदी चेहऱ्यावर आतां दुःखाची छटा आली होती. ते दुःखी, कष्टी, त्रासलेले व शिणलेले दिसत होते. हुश्श करून ते एका आराम खुर्चीवर पडले. नंतर नवराबायकोंचें बोलणें झालें. वसंत तेथें मुकाट्यानें उभा होता.

" आज इतकें दमायाला काय झालें ? "

" दमून अगदीं प्राणांतिक अवस्था झाली आहे. इतका मी कधींही दमलों नव्हतों. आतां येथून बिऱ्हाड हालवावें लागणार. "

" बिऱ्हाड हालवायचें "? ती आश्चर्यचकित होऊन ह्मणाली. वसंत खिडकीशीं उभा होता, तोही वळून बापाकडे पाहूं लागला.

"होय. आम्हांला येथून बिऱ्हाड हालविलेंच पाहिजे, व अशा ठिकाणीं नेलें पाहिजे कीं जेथें औषधांत मीं चुकून विष घातलें या बातमीचा बिलकूल प्रसार झालेला नाहीं. दिवसानुदिवस ही अफवा जास्त जास्तच पसरत आहे, व त्यामुळें दादांनाही फार त्रास होत आहे. यांत कांहीं आश्चर्य नाहीं ह्मणा, कारण एखाद्या मजुराप्रमाणें त्यांना रोज राबावें लागतें. आतांच पहाना, नुकते कोठें ते घरांत पाय ठेवतात तों दाराशीं तीन असामी त्यांची वाट पहात बसलेले आहेतच ! आणि अगोदर त्यांनीं कोणाकडे जावयाचें याबद्दल त्यांच्यात्यांच्यामध्येंच केवढे तंटे ! दादांनीं त्या तिघांनाही किती सांगितलें कीं—आतां सहा तास झाले, मी एकसारखा हिंडतों आहें व त्यामुळें अगदीं थकून गेलों आहें; आतां आपल्याच्यानें येववत नाहीं. तुह्मी प्रतापरावांना घेऊन जा, ते येतील.. पण छे ! मला घेऊन जाण्यास एकही सूष नाहीं. ते तिघेही म्हणाले कीं, नेलें तर तुम्हांलाच नेणार, नाहींतर कोणालाच नको. मग दादा तरी काय करणार ? गेले, झालें. पण असें किती दिवस चालणार ? "

" खरेंच, फार दिवस चालायचें नाहीं. पण मी म्हणतें, केवढें आश्चर्य

हें ? खरी स्थिति माहीत असून लोकांचीं मनें अशीं कशीं कलुषित होतात कोण जाणे ! "

" काल माझें व दादांचें बोलणें झालें. आज कित्येक महिने माझ्या मनांत घोळत होतें तें मीं त्यांना स्पष्टपणें बोलून दाखविलें. त्यांचा व माझा आतां वियोग होणार तेव्हां त्यांनीं आपल्या मदतीला कोणी तरी घेतलें पाहिजें व माझ्या नशीबाची परीक्षा मला दुसरीकडे कोठें तरी पाहिली पाहिजे. माझें स्वतःचें नुकसान होणार, त्याबरोबर दादांनाही ओढणें बरें नव्हे. शिवाय त्यांच्याजवळ मी राहिलों तर त्यांचा धंदा अजीबात बुडून जाईल. "

आज कित्येक वर्षांचें घर मोडणार हें मनांत येऊन त्यांच्या पत्नीला फार वाईट वाटलें. ती दुःखानें म्हणालीः—" आतां इथून कुठें जायचें ? "

" मला तरी काय माहीत ? कदाचित् मुंबईंतच राहणें सोयीस्कर होईल. "

" त्या रात्रीं आनंदरावांना जिन्यांत दिसलेला तो मनुष्य कोण ? " असें तिनें थोड्या वेळानें विचारिलें. हा तिचा प्रश्न ऐकतांच वसंत अस्वस्थ होऊन आपल्या आईकडे पाहूं लागला. आतां आपलें सर्व गुपित बाहेर पडणार अशी त्याला भीति पडली.

" हें कोणालाच सांगतां येत नाहीं. शिवाय आनंदराव नंतर म्हणूं लागले कीं, आपणाला निवळ भास झाला, चंद्राच्या अस्पष्ट चांदण्यानें आपणाला फसाविलें. परंतु एवढी गोष्ट मात्र निर्विवाद आहे कीं कोणी तरी तेथें लपून बसलेलें असलेंच पाहिजे. मीं व दादांनीं पोलिसांना सांगून ठेविलें आहे कीं, त्या माणसाचा तपास लावण्याच्या कामीं तुम्ही बिलकुल कसूर अगर आळस करूं नका; तोच गुन्हेगार आहे. "

" इकडे असें वाटतें ? "

" होय, माझी तशी पुरी खात्री आहे. "

प्रतापराव गेल्यावर त्यांचें कुटुंब वसंताला म्हणालें:—" बाळ, ऐकलेंस ना तिकडून काय म्हणायाचें तें ! त्या चोरट्या मनुष्याखेरीज दुसऱ्यावर तुझा संशय कसा जातो तो ? "

" आई, मी तर याबद्दल मोठ्याच घोंटाळ्यांत पडलों आहें. कोणी तरी दुष्ट मनुष्य तेथें होता याबद्दल मला संशय नाहीं. पण आनंदरावांनीं खोटें सांगितलें, ते लबाड बोलले, असा जो माझा ग्रह झाला आहे तो कांहीं केल्या जात नाहीं. आई, तुला माहीत आहे कां कीं या जगांत लांच म्हणून कांहीं आहे ? "

" लांच ! " त्याची आई आश्चर्यानें म्हणाली. " तिला त्याच्या बोलण्याचा झोंक कळला नाहीं.

" होय, लांच. आनंदराव जरी खरे गुन्हेगार नसले तरी ते गुन्हेगाराचे साथीदार तरी असले पाहिजेत, व याबद्दल त्यांनीं त्या खऱ्या गुन्हेगाराकडून लांच घेतली असली पाहिजे. आई, तूं अशी रागावून मला दबवूं नकोस. तो माझा ग्रह माझ्या मनांतून जात नाहीं. आनंदराव खरे-गुन्हेगार नसतील पण ते बाहणा करितात त्यापेक्षां त्यांना कांहीं तरी जास्त माहिती आहे हें खरें. याबद्दल मला तिळमात्र शंका नाहीं. "

वसंताचें हें बोलणें ऐकून त्याची आई चपापली. कोणीं हें बोलणें ऐकलें तर याचा काय परिणाम होईल अशी तिला भीति पडली. ती एवढेंच म्हणालीः—" बाळ वसंत, तूं असेंच नेहमीं कांहीं तरी तर्कटत असतोस. असलें बोलणें कधींही बोलूं नये, समजलें ? गप्प बैस. "



# प्रकरण २९ वें.

——::——

## बोलाचाली.





सऱ्या प्रहरची वेळ. इंदिरा एकटीच विचार-मग्न अशी आपल्या खोलींत बसलेली होती. तिला झालेला मानसिक त्रास आस्ते आस्ते कमी होऊन तिची प्रकृतिही थोडी थोडी सुधारत चालली होती. तथापि मधून मधून पुतळाबाईची आठवण होऊन तिचें मन व्यग्र होई. आतांही तिच्या डोक्यांत हाच विचार चाललेला असावा. इतक्यांत बाहेर कसलासा आवाज झालेला तिला ऐकूं आला. कोणीतरी आलें असावें असें वाटून ती खिडकींतून बाहेर पाहूं लागली, तों मोहनाबाईची स्वारी खोलीचें दार उघडून आंत आली.

या वेळीं मोहनेनें जणूं मोहिनीरूपच धारण केलें होतें. तिनें उत्तम जरीकांठी शेंदरी रंगाचें पातळ नेसलें असून, अंगामध्यें हिरव्या साटणीचें सोनेरी फीत लावलेलें मुंबई फ्याशनचें पोलकें घातलें होतें. डोकीचे केंश उलटे फिरविलेले असून आंबाडा बुचडा बांधला होता, व त्यावर जडावाचें फिरकीचें फूल बसविलें होतें. गळ्यांत पाणीदार मोत्यांची दुल्लड फारच खुलून दिसत होती. कानांमध्यें हिऱ्याच्या कुड्या घातलेल्या होत्या. त्यांच्या तेजानें तिचा एकंदर चेहरा आकाशांतील चांदणीप्रमाणें चमकत होता. तिचे गोंडस व सुकुमार हात मोत्यांच्या कंकणांनीं फारच शोभत होते. पायांतील चमकणाऱ्या पैलूदार लवंग्यांनीं तिची गजगती चाल तर फारच मोहक दिसत होती.

दार उघडून आंत येतांच मोहना ह्मणालीः—“ काय आक्कासाहेब, आंत यायला परवानगी आहे कां ? हरकत नसेल तर येतें. ”

"या तुम्ही ताईसाहेब, आज वाट चुकली वाटतें? बरी तब्येत आतां?"

"हो, बरी आहे; पण वाट चुकली नाहीं, वाट काढली, बरें का? मुद्दामच इकडे आलें. बाबांचें एकदां बिनसलें, कीं, मग ते ब्रह्मदेवाचें दिखील ऐकावयाचे नाहींत हें मी जाणून आहें. पण तुझ्यामाझ्यामध्यें तरी तसें नको. आक्का, तुला येथें आल्याला आज पंधरा दिवस होऊन गेले पण मी मेलें कीं जिवंत आहें याची कांहीं तरी वास्तपुस्त?"

"ताई, मी येणार होतें ग, पण माझ्या तब्येतीला बरें नाहीं."

"हें कांहीं खरें कारण नव्हे. माझ्या घरीं यायला बाबांनीं तुला बंदी केली आहे, होयना पण?"

"नाहीं, त्यांनीं नाहीं बंदी केली. मीच आलें नाहीं. ताई, तूं आलीस बरें झालें. तुझें नी माझें मन मोकळें होऊं दे, म्हणजे दोघींच्याही हृदयांतील जळजळ नाहींशी होईल. तुला मी आतां स्पष्ट सांगतें, राग येऊं देऊं नकोस, हो? तुझ्या घरीं मी येणार नाहीं. पण तूं मात्र इथें आलीस तर मला बरें वाटणार आहे. वाटेल तेव्हां येत जा! समजलें? आनंदरावांनीं मात्र येण्याचें कारण नाहीं."

"तूं माझ्या घरीं कां नाहीं यायची?"

इंदिराः—"कां म्हणजे? तें आनंदरावांचें घर म्हणून. त्यांचें तोंड दिखील मला बघायाला नको."

मोहना संतापानें लाल होऊन म्हणालीः—"तिकडच्या संबंधानें तुझा एकदा झालेला ग्रह कायमचा राहणार तर?"

"तें नाहीं मला सांगतां येत. पण तो ग्रह जास्तच वाईट होत चालला आहे, एवढें मात्र खरें"

"पण आक्का, तिकडची भेट झाली तर तुझें काय बिघडेल तें तरी कळूं दे."

इंदिराः—"ताई, आपण हें बोलणेंच सोडून देऊं या. तें वाढविण्यापासून कांहीं फायदा नाहीं. माझें मन आनंदरावांची गांठ घेऊं नको म्हणून मला सांगत आहे तें तूं खरेंच समज. माझा गैरसमज झाला आहे

असें तूं म्हण पाहिजे तर. झालेंच. बाबांच्याही म्हणण्याला कांहीं तरी मान दिला पाहिजे. ताई, तुझ्याकडून जें वर्तन झालें त्याबद्दल मी तुझी निंदा करीत नाहीं. ती वेळ निघून गेली. पण आनंदरावांना भेटावयास तूं मला सांगूं नयेस."

मोहनाः—"बाबांच्या म्हणण्याला मान दिला पाहिजे असें तूं म्हणतेस, पण तुझ्या म्हणण्याला बाबांनीं कितीसा मान दिला आहे? त्यांनीं केवढा खुळेपणा केला बरें?"

इंदिरा अगदीं ओशाळी झाली. यापूर्वीं वडिलांचे म्हणणें गैर असो कीं वाजवी असो त्यांचा पक्ष घेऊन ती बोले. पण आतां मात्र ही तिची वृत्ति कायमचीच नाहींशी झाली. तिनें कांहींच उत्तर दिलें नाहीं. मोहनेनें नंतर विचारिलें:—"बरें पण. ती बाई तरी कशी काय आहे?"

इंदिराः—"अग, काय विचारतेस ताई? असेल कशी तरी. तिच्याशीं त्यांनीं लग्न तर करून घेतलें नां? झालें तर मग. त्याची आतां वाटाघाट कशाला?" इंदिरेच्या बोलण्यावरून तिला किती दुःख होत होतें हें दिसलें.

मोहनाः—"आक्का तूं लीलेला कां बरोबर आणलें नाहींस?"

इंदिराः—"बाबा नको म्हणाले."

मोहनाः—"मग तूं आतां इथें अशी एकटी राहणार?"

इंदिरा स्तब्ध राहिली. एकटे राहण्याचें नशीबी आलें हाच विचार तिच्यापुढें होता. हें सर्व मुकाट्यानें सोसलें पाहिजे हें ती जाणून होती.

"आक्का, तुला बाबांनीं किती नेमणूक करून दिली?"

"सालीना पांचशे रूपये?"

"पांचशें? एवढेच का? इंदिरा आक्कासाहेबांकारितां सालीना सारे पांचशें रुपयेच का? आक्का ते सहा महिने सुद्धां पुरावयाचे नाहींत."

"कां बरें? इतके पुष्कळ झाले. मध्यम स्थितींत रहावयाला पुरे झाले. डामडौल, थाटमाट, चैन, यांना तर मी केव्हांच फांटा दिला आहे. मग इतके पुरे नाहीं का झाले? बरें पण काय ग ताई,

तुला तरी आतां रगड पैसे खर्चायला मिळतात ना ? " इंदिरेनें मोठ्या ममतेनें विचारिलें. "

मोहना एकदम संतापानें लाल झाली. आपण हल्लीं जहागीरदारांची मुलगी आहों, अशा उच्च दर्जाच्या मानानें ती आपणांस मोजीत होती. अशा श्रीमंत घराण्यांत साधारणपणें जो भपका व चैन असते, ती आपणांस मिळावी असें तिला वाटत होतें. पण आनंदरावांच्या वडिलांनीं त्यांना बिलकुल पैसा दिला नव्हता, म्हणून डॉक्टरकीच्या धंद्यांत जेवढे पैसे त्यांना मिळत तेवढ्यांतच त्यांना आपला गुजारा करणें भाग पडे. आतां आपण थोडी काटकसर केली तर बरें असें शेवटीं आनंदरावांना मोहनेला सांगावें लागलें. आणि मोहनेकडे पहावें तर हर घटकेला, फक्त श्रीमंतांना मिळतील, अशा शेंकडों वस्तु आपणांस मिळण्याची ती आशा करीत बसे. तिनें रागानें म्हटलें:—" आक्का मी म्हणतें आतां बाबांना एवढी मोठी जहागीर मिळाली तर त्यांनीं मला कांहींच का पैसे देऊं नयेत ? बरें, माझें एक राहो, पण तिकडे सुद्धां अगदींच का विचारायचें नाहीं ? हा केवढा अन्याय बरें ? तिकडे समजत नाहीं असें नाहीं. पण बोलून दाखवायचें नाहीं झालें. "

" अन्याय ? तो कसा ? " इंदिरेनें विचारिलें.

" होय, होय. अन्यायच नव्हे तर काय ? मी म्हणतें आमच्या बाबांना याची शरम वाटायला पाहिजे, शरम ! मीं असा काय अपराध केला होता ? त्यांनीं नको म्हटलें त्याच्याशीं लग्न करून घेतलें, हाच कीं नाहीं ? आणि स्वतः त्यांनीं काय केलें तें पहा. आम्हां सर्वांना जी नको तिच्याशीं त्यांनीं लग्न लाविलें ! फक्त घराणेंच कमी प्रतीचें, यामुळें मीं तिकडच्या बरोबर लग्न करून घेतलें हें जर गैर, तर आपल्या मुलींची जी मास्तरीण तिच्याशीं एका बड्या जहागीरदारांनीं—सरदार सर्जेरावांनीं, आमच्या बाबासाहेबांनीं, बरोबरीचें नातें जुळाविणें हें किती गैर बरें ? गैरशिस्तपणाची कमालच ! मला राहून राहून आश्चर्य वाटतें, व राग येतो तो याचाच. "

इंदिरेनें कांहीं उत्तर केलें नाहीं. मोहनेच्या विचारसरणींत कांहीं तर्क-

ज्ञान होतें, समंजसपणाचा कांहीं भाग होता तो इंदिरेला खोडून काढतां येईना.

इंदिरा विषय बदलून ह्मणाली, " ताई, बाबांनीं कमळजेला क्षमा केली."

" क्षमा केली ? मग ती घरीं नाहीं अजून आली ? "

इंदिरेनें हळूच म्हटलें:—" कमळजेचा पत्ता लागत नाहीं."

" पत्ता लागत नाहीं ? म्हणजे ? आक्का, तूं म्हणतेस तरी काय ? "

" खरेंच ताई, तिचा कुठेंच पत्ता लागत नाहींसा झाला आहे. आमचें आपलें असें अनुमान आहे कीं, ती कोणाबरोबर तरी लांब दूर देशीं गेली असावी. बाबांनीं कित्ती शोध केला ! चोहोंकडे पत्रें किती पाठविलीं. पण व्यर्थ. पोलिसांनीं देखील पुष्कळ तपास केला तरी पण कांहीं नाहीं. यामुळें माझ्या जिवाला चैन ह्मणून कसें तें नाहीं व मनाला स्वस्थता वाटत नाहीं. बाबांना तूं निर्दय, निष्ठुर म्हणतेस पण त्यांना-सुद्धां माझ्याप्रमाणेंच चैन नाहीं बरें ताई ! "

तरी देखील मोहनेची समजूत पडेना. तिनें इंदिरेला प्रश्नावर प्रश्न केले. इंदिरेनेंही सर्व हकीगत सांगितली. शेवटीं मोहना म्हणाली:— " गेल्या जून महिन्यापासून—म्हणजे वर्षावर दिवस होऊन गेले—तिच्या संबंधानें तूं कांहीं हकीगत ऐकली नाहींस ? पण आक्का, तिच्याकडून तुला त्यानंतर पत्रें आलीं होतीं."

" होय. मला माहीत आहे. एक पत्र आलें होतें. पण ती अमुक ठिकाणीं आहे हें त्या पत्रावरून समजलें नाहीं. गेल्या जानेवारींत पत्र आलें होतें, तेवढेंच. त्यावर कुठें आहे पत्र ? "

" पण तें कांहीं तिचें शेवटचें पत्र नव्हे ! "

" नव्हे कसें ? तेंच शेवटचें. त्यानंतर मीं तिला तीन पत्रें पाठविलीं. पण सर्व त्या प्रार्थनासमाजांत पडून राहिलेलीं मला सांपडलीं. तिचा पत्ता लागेना म्हणून तीं पत्रें तिथेंच पडलेलीं होतीं. ताई, कमळजेविषयीं मला एक चमत्कारिक—फारच वाईट—स्वप्न पडलें होतें. मीं तुला तें सांगितलें आहे. आठवतें ना ? "

"तूं मला तें सांगितलें नाहींस. तूं एवढें म्हणालीस कीं—मला एक स्वप्न पडलें, फार वाईट होतें, पण मी नाहीं तें सांगत, तूं माझी थट्टा करशील.—असें तूं म्हणालीस, होय कीं नाहीं?"

इंदिराः—ताई, बरोबर आहे. मार्च महिन्यांतली गोष्ट. तें स्वप्न पडल्यामुळें माझी जी काय अवस्था झाली ती कांहीं पुसूं नकोस. मीं कमळजेला कितीदा लिहिलें, कीं, सर्व हकीकतीचें पत्र पाठीव म्हणून. पण उत्तर नाहीं. मी म्हणतें तींच पत्रें. त्या वेळेप्रमाणें हल्लींही त्या स्वप्नांतला प्रत्येक भाग माझ्या अगदीं डोळ्यांसमोर दिसत आहे. कित्येक वेळां मला असें वाटतें कीं, कमळजेवर ओढवणाऱ्या संकटाची ही प्रस्तावनाच आहे. खरोखर मला असें वाटतें. ताई, या जन्मांत तरी तिची आमची पुनः भेट होणार नाहीं हेंच जणुं मला कळून आलें!" इंदिरेला हुंदका आवरेना. ती गहिंवरून रडूं लागली.

"पण आका, तें स्वप्न तूं कां नाहीं सांगत?"

"माझ्याऱ्यानें सांगवत नाहीं म्हणून. निदान तुला तरी सांगवत नाहीं."

"कां, कां बरं?" मोहनेनें उत्कंठेनें विचारिलें.

"कारण—कारण—त्या स्वप्नांत कमळजेबरोबरच, तिच्या वरील अरिष्टाबरोबरच,—पण मी वेडी तर नाहीं? ताई, मी नाहीं आतां जास्त सांगत."

मोहनेनेंही विशेष जिकीर केली नाहीं. इंदिरेचीं स्वप्नें ऐकून मोहना तिची थट्टा करीत असे. त्याप्रमाणें या स्वप्नाचीही तिनें थट्टाच केली असती.

मोहनेनें नंतर म्हटलें:—"आका, गेल्या जानेवारीपासून कमळजेकडून कांहींच वर्तमान कळलें नाहीं, असें तूं सांगितलेंस; पण तुझी ही प्रतारणा नव्हे काय?"

"खरोखरच कांहीं कळलें नाहीं; तुझ्या गळ्याची शपथ!"

मोहनेला राग आला. सर्जेरावांप्रमाणेंच तिला न समजूं देतां कोणी कांहीं केलें कीं ती संतापेः—"आका, असें म्हणण्यांत कांहीं अर्थ नाहीं. तुझ्या पदरांत घालून देईन. त्यानंतर तुला एक तरी पत्र आलें आहे खास. फार ममतेचें व कळकळीचें पत्र आलें होतें."

इंदिरा बुचकळ्यांत पडली:—"ताई, तुझें चित्त कोणीकडे भ्रमण करीत असतें, कांहीं समजत नाहीं. गेल्या जानेवारीपासून कमळजेकडून एक ओळ किंवा एक अक्षरही लिहून आलेलें नाहीं ग."

नंतर मोहनेनें आपल्या पोलक्याच्या खिशांतून एक फाटकें पत्र—पत्राचा तुकडा—काढून इंदिरेकडे दिला. "आक्का, हें पहा आतां. तुला कमळजेचें अक्षर ओळखतां येतें. हें तिचेंच पत्र कीं नाहीं? तुला दाखवावें म्हणून मीं येतांना घेऊन आलें."

तें पत्र पाहून इंदिरा म्हणाली:—"होय, ग, होय. हें तिचेंच अक्षर."

पत्राच्या आरंभींचा थोडासा मजकूर होता; तारीख फेब्रुवारीची अठ्ठावीस लिहिलेली होती; व शेवटचाही थोडा मजकूर होता आणि खालीं कमळजेची सही होती:—'शेवेसीं विज्ञापना ऐसीजे. मी आपणांस एक गोष्ट विचारणार आहे ती'—येथून पुढील कागद फाटून गेला होता. मागच्या बाजूस पत्राचा शेवट होता:—'अगदीं विलंब होऊं नये.' आणि त्या खालीं आपली कमळजा अशी सही होती. अर्थातच पत्र अगदीं लहान होतें.

इंदिरा त्या पत्रांतील मजकूर, त्यावरील तारीख, व त्या खालची सही यांचा विचार करूं लागली. पण हें पत्र तिनें पूर्वीं कधींही पाहिलें नव्हतें. त्याप्रमाणें तिनें मोहनेला सांगितलें.

मोहना:—"सगळाच खुळेपणाचा बाजार. तुला हें पत्र आलें नाहीं तर मग कुणाला आलें होतें ग? ती घरांतून गेल्यापासून तुझ्या खेरीज दुसऱ्या कोणाला तिचीं पत्रें येत नव्हतीं, होय ना पण?"

"होय; माझ्याशिवाय दुसऱ्याला तिचीं पत्रें येत नसत खरें, पण हें पत्र फारच विलक्षण दिसतें. याप्रमाणें मजकूर तिच्या कोणत्याही पत्रांत नसे. बायकोनें नवऱ्यास लिहावें तसें हें पत्र लिहिलेलें दिसतें. बरें पण, हें पत्र तुझ्या हातांत कसें आलें, ताई?"

मोहनेनें सर्व हकीकत सांगितली:—"माझी एक चोळी कुठें सांपडेना ह्मणून मीं सर्व कपाट रिकामें केलें. ओढखण बाहेर काढून जमिनीवर पालथें घातलें. ओढखणाच्या तळाशीं एक मोठा कागद घातलेला होता.

त्याखालीं हें पत्र सांपडलें. तूं माझ्या सर्व जिनसा गाठोड्यांत बांधून पाठविल्यास, तेव्हां चुकून त्यांत हें पत्र आलें असेल असें मला वाटलें. ”

पण इंदिरेची समजूत पडेना. तिला खात्री होती कीं, सर्व जिनसा लक्ष्यपूर्वक आपण गाठोड्यांत बांधल्या त्या वेळीं हें पत्र आपण त्यांत घातलें नाहीं. शिवाय हें पत्रच कधीं तिनें पाहिलें नसल्यानें तिला फार आश्चर्य वाटलें. तिनें तें पत्र मोहनेकडून मागून घेऊन आपले जवळ ठेविलें. या पत्राचें तिला मोठें कोडेंच पडून राहिलें.

मोहना घरीं जाण्याकरितां उठली. ‘ आणखी केव्हां तरी येईन, अजून पुष्कळ बोलायचें आहे ’ असें ह्मणून ती निघाली. इंदिरा तिला पोंचवावयाला बाहेर सडके पर्यंत आली. मोहना निघून गेल्यानंतर ती तशीच बागेंत इकडे तिकडे हिंडत व बागेची शोभा पहात राहिली. कांहीं वेळानें रस्त्यांत कोणाची बोलाचाली चाललेली तिला ऐकूं आली. तिनें वर मान करून पाहिलें, तों आनंदराव व वसंत उभे असून त्या दोघांचें भांडण चाललेलें होतें. इंदिरेनें झाडाच्या आड उभे राहून तो सर्व प्रकार पाहिला.

भांडणाचें कारण असें झालें:—ध्रुपदराव माने या नांवाचे एक मराठे खानदानीचे गृहस्थ कुटुंबाची प्रकृति बरी नव्हती ह्मणून हवा पालटण्याकरितां या गांवांत नुकतेच येऊन राहिले होते. त्यांनीं रावपुऱ्यांतच बंगला भाड्यानें घेतला होता. या बंगल्यापासून आनंदराव डॉक्टरांचें घर जवळ असल्यानें त्यांनीं आनंदरावांचेंच औषध सुरू केलें होतें. बरेच दिवस झाले. पण गुण येईना. कुटुंबाची तब्येत जास्तच बिघडली. तेव्हां आनंदरावांनीं सांगितलें कीं, माझ्या जोडीला आणखी एक डॉक्टर पाहिजेत; विश्वासराव विश्राम यांना घेऊन या, म्हणजे दोघांच्या सल्ल्यानें औषध देण्यास बरें पडेल. ध्रुपदरावांना या गांवांतील कांहीं माहिती नव्हती. ते विश्वासरावांच्या घरीं गेले, पण विश्वासराव घरीं नव्हते. त्यांचे बंधु प्रतापराव होते. प्रतापरावासंबंधानें लोकांचें वाईट मत झालें आहे हें ध्रुपदरावांना माहीत नसल्या कारणानें, “ विश्वासराव नाहींत तर आपण चला. आपणही डॉक्टरच आहांत, विश्वासराव काय आणि आपण काय एकच, ” असें ध्रुपदराव म्हणाले. त्यावरून प्रतापराव त्यांचे घरीं गेले. आनंदरावही

तेथें होतेच. विश्वासरावांना आणण्यास सांगितलें असून प्रतापराव कसे आले याचें आनंदरावांना आश्चर्य वाटलें, पण त्या वेळीं कांहीं बोलले नाहींत. प्रतापरावांनीं कुटुंबाची तब्येत पाहिली व बाटलींत औषध तयार करून हें तीन तीन तासांनीं द्या असें सांगून प्रतापराव निघून गेले. ते गेल्यानंतर आनंदरावांनीं सर्व हकीकत सांगितली.

ध्रुपदरावांनीं शेजारच्या घरीं शोध केला. तेथें ही त्यांना समजलें कीं, प्रतापरावांच्या औषधानें मागें एक बाई मेली एवढें खरें. झालें. ध्रुपदरावांची खात्री झाली. त्यांच्या आजारी कुटुंबाला ही हकीकत कळली. मग काय ? त्या बाईनें भीतीच घेतली:—“ त्या मेल्याला आमचा उंबरा सुद्धां ओलांडून देऊं नका. बरें तर बरें, नाहीं तर मी जीवाला फुकट मुकलें असतें ! आनंदराव देतात तेवढेंच औषध पुरें. ” असें ती ह्मणाली. तिला त्रास झाला व त्यामुळें तिची तब्येत जास्तच बिघडली.

ही सकाळची गोष्ट ! प्रतापरावांना अर्थातच यांतील कांहीं बातमी नव्हती. तिसरा प्रहर होऊन गेला. “ आपण सकाळीं औषध देऊन आलों. त्याचा काय परिणाम झाला तो समजला नाहीं, तेव्हां तूं जाऊन शोध घेऊन ये,” असें प्रतापरावांनीं वसंताला सांगून तिकडे पाठवून दिलें. वसंत ध्रुपदरावांच्या बिऱ्हाडीं आला व त्यानें वडिलांचा निरोप त्यांना कळविला. त्याबरोबर ध्रुपदराव रागावून ह्मणाले:—“ मुला, तुझ्या बाबांना सांग जा, आतां तुमच्या औषधाची कांहीं गरज नाहीं व तुह्मी इकडे येण्याचेंही पण कारण नाहीं म्हणून. त्यांच्या औषधांतून कधीं कधीं चुकून विष येत असतें ह्मणें. हें आम्हांला काय माहीत ? आनंदराव डॉक्टरांनीं जेव्हां आह्मांला ही सर्व हकीकत कळविली. तेव्हां कानाला खडा लावून घेतला समजलें ना. जा तर. ”

वसंत कांहींही न बोलतां तेथून परत फिरला. आपल्या बाबासंबंधानें झालेल्या ह्या अन्यायामुळें त्याचें रक्त अगदीं तापून गेलें.

तो चरफडत रस्त्यानें निघाला होता. इतक्यांत इंदिरेच्या बंगल्याच्या कंपाउंडासमोर आनंदरावांची व त्याची गांठ पडली. त्याबरोबर निर्भिड

व संतापलेला वसंत, त्यांच्या समोर त्यांच्या वाटेवर जाऊन उभा राहिला व म्हणालाः—

" डॉक्टरसाहेब, मेहरबानी करून एक क्षणभर थांबा; आपण माझ्या बाबांसंबंधानें ध्रुपदरावांच्या मनांत काय काय भरवून दिलें, तेवढें कृपा करून सांगा पाहूं ? "

आनंदराव डोळे वटारून त्याच्याकडे पाहूं लागले. त्यांचा चेहरा घमेंडखोर व कुरेंबाज दिसत होता. ते त्याला म्हणालेः—

" मुला, तूं कां उगीच संतापतोस ? मी आहे व तुझे बाबा आहेत. आमचें आह्मी पाहून घेऊं. तुझ्या मदतीची जरूर नाहीं. तूं आपल्या वाटेनें नीट जा. "

आनंदरावांचें हें खोंचदार भाषण ऐकून तर वसंत ज्यास्तच चिडला. तो म्हणालाः—" आनंदराव, तुह्मी फार दुष्ट व कपटी आहां. या गांवांतून माझ्या बाबांना पिटाळून लावण्याचा तुह्मीं गुप्तरीतीनें प्रयत्न चालविला आहे. तुह्मीं रोज त्यांची कोठें ना कोठें तरी निंदा करीत असतां. काय हो डॉक्टर ? तुह्मी त्यांच्या तोंडावर कां बोलत नाहीं मग ? म्हणजे त्यांना खुलासा तरी करितां येईल. असें भितऱ्या भागूबाईसारखे आडून आडून कां गोळ्या मारतां ? हं बोला लवकर, समजूं द्या मला काय आहे तें. "

वसंताला भय वाटावें ह्मणून आनंदरावांनीं आपली वेताची छडी उगारून म्हटलेंः—" मुला, तुझे काका माझे व्यवसाय–बंधु आहेत. तुझ्या बापानें चूक केली आहे तरी तुझ्या काकांबद्दल माझ्या मनांत आदर आहे. नाहीं तर ही छडी तुझ्या पाठीवर बसवून सभ्यपणा म्हणजे काय, रीतभात कशी असते हें मीं तुला चांगलें समजावून दिलें असतें. चल, होतोस कीं नाहीं बाजूला ? "

या धमकावणीनें वसंताचा राग बिलकुल शांत झाला नाहीं. तो तसाच उर्मटपणानें बोलूं लागलाः—

" मी ह्मणतों डॉक्टर, बाबांनीं चूक केली नाहीं, हें तुह्मांला माहीत आहे. औषध तेथें पोहोंचल्यानंतर तुह्मी एकटेच तेथें होतां. त्या-

संधींत तुह्मींच त्या औषधांत विष घातलें. घातलेंत कीं, नाहीं ? आनंदराव, तुमची छडी घ्या बाजूला. असल्या छड्या मीं पुष्कळ पाहिल्या आहेत. तुम्हीं स्वतः त्या औषधांत विष घातलें नसलें तरी त्या जिन्यावर तुम्हांला जो मनुष्य दिसला त्याचें तरी हें कृत्य असलें पाहिजे. कदाचित् तुम्ही त्याच्याकडून लांच घेऊन त्याचा पक्ष स्वीकारला असावा व त्याजवरील वहीम तुम्ही नाहींसा करण्याच्या खटपटींत आहां. ज्या रात्रीं हा प्रकार झाला त्या रात्रींच मला तुमचा संशय आला. डॉक्टर, तुम्हांला तो माहीत आहेच. मला बाहेर घालवा म्हणून तुम्हीं सांगितलें होतें, आठवतें कां ? पुढें चौकशीच्या वेळेसही तुमचा मला संशय आला होता. हेंही तुम्हांला माहीत आहे. त्या गरीब बिचाऱ्या बाळंतीणबाईनें तुमचें असें काय मोठें नुकसान केलें होतें हें तुमचें तुम्हांलाच माहीत. पण मी तुम्हांला स्पष्टपणें सांगतों कीं, त्या बाईचा तुम्हींच खून केलात अगर ज्यानें खून केला त्या इसमास छपवून ठेवण्याचा तुम्ही हल्लीं अपराध करीत आहांत. हें मी ईश्वराला साक्षी ठेवून सांगतों. आनंदराव, जा; आतां खुशाल जा. आणि माझ्या बाबासंबंधानें वाटेल तें व वाटेल तितकें खुशाल बडबडा, जा. पाजी ! हरामखोर ! तुमच्या सारखें नीच व हलकट तुम्हीच. मनुष्यजातींत असा दुसरा कोणी सांपडणार नाहीं."

इतका वेळ छडीचा तडाखा मोठ्या हिकमतीनें चुकवून वसंत जें बोलावयाचें होतें तेवढें बोलला. पण आतां मात्र तो आनंदरावांच्या सपाट्यांत सांपडला. त्यांनीं जोरानें त्याच्या पाठीवर ती छडी ओढली. त्याबरोबर सिंहाची शक्ति वसंताच्या अंगांत आली. त्यानें आनंदरावांचा हात धरिला व छडी काढून घेऊन तिचे तुकडे तुकडे करून लांब फेंकून दिले. आनंदराव त्याला तोंडानें शिव्या देत व आपल्या मिशाला पीळ घालीत घालीत मागें पुढें पहात तेथून निघून गेले. वसंतही थोडी विश्रांति घेण्याकरितां कंपाउंडाच्या दरवाज्याला टेंकून उभा राहिला.

हा सर्व प्रकार बागेंत उभा राहून इंदिरेनें पाहिला. त्या दोघांची चाललेली बोलाचालीही तिनें ऐकिली. वसंत दरवाज्यास टेंकून रस्त्याकडे पहात उभा होता. इंदिरा हळूच मागून आली व तिनें वसंताचे डो-

ळे झांकले त्यासरशीं वसंत चपापला. त्यानें झटका देऊन तिचे हात काढून टाकिले. इंदिरेला पहातांच वसंत खट्टु झाला व त्यानें खालीं मान घातली. इंदिरा ह्मणालीः—" वसंतबाळ, तूं आनंदरावांना काय बोललास तें सर्व मीं ऐकिलें. तूं त्यांच्यावर जो आरोप लादला आहेस तो तुझा तुला सुद्धां खरा वाटत नसेल. फक्त रागाच्या आवेशांत तूं असें बोललास होय ना ?"

"आक्कासाहेब, आपण ऐकिलें असेल तर फार वाईट झालें. मी आपली माफी मागतों. पण विनाकारण आरोप करणारा मी आहें असें मात्र समजूं नका. खरोखरीच मला तसें वाटत आहे. त्या रात्रीपासूनच माझी तशी खात्री झाली आहे."

असें ह्मणून वसंत घरीं जाण्याकरितां निघाला. रस्त्यांत पडलेली टोपी उचलून घेऊन त्यानें ती आपल्या डोकीवर ठेविली. इंदिरा स्वतःशींच पुटपुटलीः—" तो वेड्यासारखें कांहीं तरी बडबडेना कां ? पण स्वभाव मोठा मानी आहे. असें बोलण्याबद्दल आनंदराव त्याला काय शासन करतील समजत नाहीं."

---

# प्रकरण ३० वें.

—:०:—

## ही जगाची रहाटीच आहे.



सा रांश, प्रतापरावांचें दुर्दैव हात धुऊन त्यांच्या पाठीस लागल्यामुळें यापुढें दत्तापूर गांवांत त्यांचा निभाव लागेना, म्हणून कित्येक वर्षांचें आपलें घर सोडून त्यांना मुंबईस जाऊन रहावें लागलें. वसंत मात्र आपला अभ्यास चालू ठेवण्याकरितां चुलत्याजवळ राहिला. प्रतापराव मुंबईस जावयाच्या संधीलाच काळकादेवी रस्त्याव-

रील एक सुप्रसिद्ध डॉक्टर एकाएकीं वारले. त्यांचा बंगला प्रतापरावांनीं रहाण्याकरितां घेतला. ते स्वभावानें फार हुषार, मेहेनती व अगत्यवान असल्यामुळें लवकरच प्रसिद्धीस आले, व धंदा त्यांच्या घरीं चालून येऊं लागला. थोडक्याच दिवसांत दत्तापुर गांवांत ते व विश्वासराव या दोघांना मिळून जितका पैसा मिळे, त्याच्या दुप्पट तिप्पट पैसा त्यांना एकट्यांनाच मिळूं लागला.

इंदिरा मुंबईहून दत्तापुरास परत आल्याला सुमारें बारा महिने लोटले. इतक्या मुदतींत कांहीं विशेष हकीकत घडली नाहीं. मोहनेला एक मूल झालें पण तें जन्मल्याबरोबरच मेलें. पुनः ती आपली खुशालचेंडू-सारखी हिंडूंफिरूं लागली. आनंदरावांचाही धंदा चांगला चालूं लागला. दत्तापुराच्या आसपास नवीन नवीन बऱ्याच इमारती होऊन वस्ती पुष्कळ वाढली. अर्थातच आनंदरावांकडे पुष्कळ लोक औषधाकरितां येऊं लागले. वसंताचे व आनंदरावांचे त्यावर पुनः तंटे झाले नाहींत. ते फार विचारी व समजूतदार असल्यानें त्या मुलाच्या उद्दाम वर्तनाकडे त्यांनीं दुर्लक्ष्य केलें. कधीं रस्त्यांत तो त्यांना भेटलाच तर कांहींही न बोलतां ते निघून जात.

नाहीं म्हणावयाला, चौपाटीवरील बंगल्यांत मात्र विशेष प्रकार घडून आला. पुतळाबाई सर्जेरावांना फार चांगली बायको मिळाली. इंदिरेप्रमाणेंच सरदारसाहेबांच्या जिवाकरितां पुतळाबाई फार जपत असत. लीलेवरही त्यांचें भारी प्रेम होतें. आतां पंधरा दिवस झाले, पुतळाबाई आपल्या खोलींत बाजेवर पडून होत्या व त्यांच्या शेजारीं एक पाळणा हालत असून त्यांत एक नुकतेंच जन्मलेलें मूल निजलेलें होतें. सर्जेरावांनीं इतक्या उतारवयांत ज्या हेतूनें लग्न करून घेतलें, तो त्यांचा हेतु सफल झाला व पुतळाबाईंना मुलगा झाला. आपल्यामागें आपल्या जहागिरीला वारस झाला म्हणून सरदारसाहेबांना फार आनंद झाला; पण त्यांची तब्येत मात्र आतां बरी नव्हती. संधिवाताचा विकार जोरावल्यामुळें ते हल्लीं बिछान्यास खिळून गेले होते. त्यांचा तो इमानी नोकर, हैबती, त्यांच्या पाठीशीं हुंदके देऊन रडत होता. सरदारसाहेब मृत्युपंथास लागलेले

होते. जवळ तीन डॉक्टर त्यांच्या प्रकृतीचें मान पहात बसलेले असून शिवाय चवथ्या डॉक्टरांना बोलावून आणण्याकरितां गाडी गेली होती. घरांत सर्वत्र मूर्तिमंत उदासीनता भासत होती.

सर्जेरावांना आपल्या प्रकृतीचें मान कळून चुकलें होतें, म्हणून त्यांना आतां भरंवसा वाटेना. सकाळची वेळ असल्यानें तब्येत जरा शांत होती. ते म्हणाले:—" डॉक्टर, इमारत आतां ढासळून पडणार; लांकूड, सामान सर्व किडून व कुजून गेलें आहे. कितीही टेकूं दिला तरी कांहीं उपयोग होणार नाहीं. "

सरदारसाहेबांना धीर यावा म्हणून डॉक्टरांनीं सांगितलें, " प्रकृती तितकी कांहीं घसरली नाहीं. औषध बदलून दिलें आहे. त्यापासून लवकरच बरें वाटेल. " पण सर्जेरावांनीं स्पष्ट सांगितलें, " डॉक्टर, तुम्ही खोटें बोलतां. हा तुमचा नेहमींचा क्रम आहे. रोगी बारा तासांच्या आंत परलोकाची वाट धरणार, हें तुम्हांला माहीत असलें तरी तुम्ही म्हणतां, ' प्रकृती सुधारत चालली आहे ' आणि अशा रीतीनें तुम्ही लोकांना फसवितां. पण मी तसा फसावयाचा नाहीं. बायका, मुलें वगैरे नाजूक प्रकृतीच्या व कमसमजुतीच्या माणसांना असें सांगणें बरें, पण मला तसें सांगून कसें भागेल ? "

सरदारसाहेबांचा आवाज खोल जाऊं लागला. डॉक्टरांनीं ग्लासांत कांहीं औषध घालून त्यांना पाजलें; व त्यांच्या कपाळावरील घाम पुसून काढला.

सरदारसाहेब पुढें म्हणाले:—" डॉक्टर, मी लष्करांतील एक वृद्ध बाणेदार मनुष्य आहें. माझ्या भर उमेदींत मी रात्रीच्या रात्री घोड्यावरच बसून काढल्या आहेत. प्राण गेले तरी बेहेत्तर, पण आपलें कर्तव्य म्हणून मी कधीं चुकलों नाहीं. त्या वेळीं मी मरणाला जर भ्यालों नाहीं तर आतां भिईन असें आपणास वाटतें काय ? तसें असेल तर माझ्या स्वभावाची बरोबर पारख आपणाला झाली नाहीं असेंच म्हटलें पाहिजे. माझा स्वभाव फार करारी आहे. आतां मी थोडा तापट व हेकड आहे ही गोष्ट खरी. तोंडाला येईल तें मी बोलतों. पण लष्करांत

असतांना ही संवय माझ्या अंगीं जडली आहे, ती जातां जात नाहीं. त्याला माझा नाइलाज आहे. हें सर्व त्या सर्वसाक्षी परमेश्वरास माहीत आहे. त्याला सर्व कळतें. तो माणसाचें अंतःकरण पहातो. माझ्या तोंडांतून चुकून एखादा अपशब्द गेला तर तो मला क्षमा करील. हैबती, अरे हैबती !"

हैबती पुढें येऊन पलंगाजवळ उभा राहिला. त्याच्या एकंदर चर्येवरून त्याला अत्यंत दुःख होत आहे असें दिसलें. त्याला सरदारसाहेब म्हणालेः—" हैबती, तूं ह्यांना सांग. मी तुझ्यावर कितीही ओरडलों, संतापलों, तरी मी वाईट धनी आहें काय ? मी धनी कसा आहें सांग ?"

बिचारा हैबती धन्याच्या पायांवर डोकें ठेवून उभा राहिला. त्याच्या एकंदर चर्येवरून तो फार कष्टी दिसत होता. अश्रूंनीं त्यानें त्यांचे पाय भिजवून टाकिले. दुःखातिशयानें त्याला हुंदके येऊन त्याचा गळा दाटून आला. तो रडत रडत म्हणाला, " असला उत्तम धनी मिळावयाचा नाहीं. फार थोर, फार उदार, खरा सरदार ! त्यांच्या ऐवजीं देवानें मला न्यावें. मी जायाला तयार आहें. "

सरदारसाहेबांची प्रकृति क्षणोक्षणीं जास्त बिघडूं लागली. ते डॉक्टरांना म्हणाले, " आतां मी फार वेळ जगत नाहीं. कसेंही करून इंदिरेला आणून मला भेटवा व त्यांनाही बोलवा. "

हे शेवटचे शब्द पुतळाबाईस उद्देशून सर्जेराव बोलले. पण त्यांना प्रसूत होऊन थोडे दिवसच झाले होते. त्यांना दुःख होईल म्हणून सर्जेरावांच्या आजाराची बातमी सुद्धां त्यांना कोणी कळविली नव्हती. सरदारसाहेबांची प्रकृति बिघडली आहे एवढें त्यांना मोलकरणीनें सांगितलें होतें. पण ते अत्यवस्थ आहेत हें त्यांच्या ध्यानीं मनींही नव्हतें. डॉक्टरांनीं सरदारसाहेबांना कळविलें, कीं, बाईसाहेबांना येथें आणून उपयोग नाहीं. कदाचित् त्यांच्या मनाला धक्का पोंचेल, व त्यांची प्रकृति बिघडेल. तेव्हां नाइलाज होऊन त्यांनीं ' बरें तर ' असें म्हटलें. " इंदिरेला तरी आणवा " असें शेवटीं त्यांनीं कळवळून सांगितलें. त्याबरोबर डॉक्टरनीं इंदिरेला तार केली.

इंदिरा व सारजा तिसऱ्या प्रहरीं तेथें दाखल झाल्या. डॉक्टर माणीकजी तेथें होतेच. त्यांनीं इंदिरेस हळूंच सांगितलें कीं, " प्रकृति अगदींच घसरली आहे, त्यांत आतां कांहीं अर्थ दिसत नाहीं; तुह्मीं त्यांच्याशीं फार बोलूं नका, त्यांना त्रास होईल." इंदिरेनें तें कबूल केलें व ती वडिलांच्या पलंगाजवळ जाऊन उभी राहिली. सर्जेराव डोळे मिटून पडलेले होते, दीर्घ श्वास जात होता, व त्यांच्या चेहऱ्यावर मृत्यूची छाया दिसत होती. इंदिरेला त्या वेळीं जें दुःख झालें त्याचें वर्णन कोण करूं शकेल? त्यांनीं नवीन लग्न करून घेतलें होतें, दुसरी बायको घरांत आणली होती, व त्यामुळें इंदिरा वडिलांस अंतरली होती. तथापि त्यांना अशा शोचनीय स्थितींत पाहून इंदिरेचें काळीज दुभंगलें, व ती हुंदके देऊन रडूं लागली.

तिची चाहूल ऐकतांच सर्जेरावांनीं डोळे उघडले. इंदिरेला पाहतांच त्यांच्या चेहऱ्यावर आनंदाचें तेज चमकूं लागलें व त्यांनीं आपला अशक्त हात तिच्या तोंडावरून फिरविला; त्याबरोबर इंदिरेला दुःखाचें भरतें आलें व ती ओक्साबोक्शीं रडूं लागली. सरदारसाहेब तिला म्हणाले:— " रडूं नकोस, बाळे, उगी रहा. अशी दुःखी होऊं नकोस. आम्हां सर्वांना एखादे दिवशीं जावयालाच पाहिजे. ही जगाची रहाटीच आहे ! "

" बाबा, आम्हांला सोडून तुह्मी जातां काय हो ? मी तुमच्या मनाप्रमाणें वागलें नाहीं, याबद्दल मला क्षमा करा. "

" बाळ, उगी. अशी कष्टी होऊं नकोस. तुझ्याकडे चूक नाहीं. मींच तुला दुखविलें. मी समजून आहें. नंतर मला सुद्धां पश्चात्ताप झाला. मला मुलगा नव्हता. या एवढ्या मोठ्या जहागिरीला माझ्या मागें वारस तर कोणी पाहिजे कीं नाहीं ? ह्मणून मीं लग्न करून घेतलें. त्यासारखा मुलगाही झाला. सगळें कांहीं ठीक झालें. आतां मीं हें तुला विचारून करायचें होतें, तुझी सल्ला घ्यावयाला पाहिजे होती, तेवढें माझ्याकडून चुकलें. मला वाटलें हें तुला आवडणार नाहीं व तुझा रुकार मिळणार नाहीं, ह्मणून घाईघाईनें मीं सर्व उरकून घेतलें. त्यांचा स्वभाव तसा चांगला आहे. तुझ्यावर त्यांचें प्रेम आहे, लीलेवर आहे, सर्वांवर आहे. तूं माझी

सेवाचाकरी किती तत्परतेनें व एकनिष्ठपणानें केलीस ! माझा शब्द कधींही मोडला नाहींस; असें असून शेवटीं मीं तुला दुःख दिलें याबद्दल रागावूं नकोस. " त्यांचे डोळे पाण्यानें भरले.

नंतर मोहना कां आली नाहीं ह्मणून त्यांनीं विचारिलें. तेव्हां मोहना घरीं नाहीं, फडणिसांच्याकडे गेली आहे, तिला मीं तार केली आहे, रात्रीच्या गाडीनें येईल. वगैरे हकीकत इंदिरेनें सांगितली.

" तिचा नवरा खुशाल आहे ? " सर्जेरावांनीं विचारिलें.

" होय, बाबा; पण मी कधीं तिकडे जात नाहीं. ताईस आपल्या बरोबर गाडींत घ्यावी ह्मणून येतांना तेवढी गेलें होतें. आनंदराव घरीं होते, पण मी त्यांच्याशीं बोललें नाहीं. "

थोड्या वेळानें सर्जेराव ह्मणाले:—" बरें, कमळजा कुठें आहे ? या वेळीं तुह्मां सर्वांपेक्षां तीच माझ्या डोळ्यांसमोर फार दिसत आहे. तिच्या-वर कांहीं अनर्थ तर गुदरला नसेल ? "

" कसला अनर्थ ? "

" तें कांहीं मला सांगतां येत नाहीं. पुनः मला वाटतें कीं, ती कुठें तरी दूरदेशीं गेली असावी. पण तिची आठवण झाली कीं मला आपली एकसारखी काळजी लागून राहते. काय असेल तें असो. मला आतां जास्त बोलवत नाहीं. तूंच तिचा समाचार घेत जा. ही जबाबदारी मीं तुझ्यावर ठेवतों अं ! लक्ष्यांत असूं दे. तिचा तपास करण्याच्या कामीं तूं मुळींच आळस करूं नकोस. हा पण तूं शेवटाला ने. तिचा शोध लागला म्हणजे तिला माझा निरोप कळीव कीं, तुझ्यासाठीं शक्य ती तर-तूद करून ठेविली आहे. याप्रमाणें तूं सर्व व्यवस्था कर. " सरदारसाहे-बांचा आवाज क्षीण होत होत शेवटीं अगदीं बंद झाला, व त्यांना ग्लानि आली.

इंदिरा त्यांच्या पलंगाजवळ बसून राहिली. तिला तेथून जाववेना. संध्याकाळ झाली, अंधार पडला, रात्र झाली, तरी मोहना आली नाहीं. इंदिरेला फार आश्चर्य वाटलें. " ताई लहरी आहे. मनास आलें तर येईल, नाहींतर कशाला जायचें असें सुद्धां म्हणायची. पण ही वेळ

नव्हे." असें ती मनांत ह्मणाली. तिचें सर्व लक्ष्य तिकडे होतें. जरा बाहेर आवाज झाला कीं तिला वाटे मोहनाच आली. डॉक्टरलोक वरचेवर आंत येत, बाहेर जात असें चाललें होतें. सरदारसाहेब स्वस्थ पडले होते. नाड्या आखडत आल्यामुळें त्यांची हालचाल अगदीं बंद झाली होती.

रात्रीचे नऊ वाजले. इंदिरेला जेवायला बोलावण्याकरितां एक बाई आली. तिच्याशीं इंदिरा बोलते, इतक्यांत 'बाळ' असा आवाज तिनें ऐकिला.

तो तिच्या वडिलांचा शब्द. त्यांना थोडीशी शुद्धि आली होती, व थोडी हुषारीही वाटल्यासारखें दिसलें. इंदिरेनें चमचाभर दूध त्यांच्या तोंडांत घातलें.

"बाळ, मला आतां कैलास दिसत आहे. तेथल्या नद्या कशा स्फटिकासारख्या चकाकत आहेत! दोन्ही कांठांवर सुंदर व सुवासिक फुलांचे ताटवे आहेत. मी आतां तेथें जाऊन पोंचलोंच समज. मध्यें थोडासा अंधार आहे. तेवढा पार पडला म्हणजे झालें."

सर्जेराव वायूच्या लहरींत बडबडत आहेत हें इंदिरेनें ओळखलें. ते आतां घटकेचे सोबती आहेत असें समजून तिला पराकाष्ठेचें वाईट वाटलें व तिच्या डोळ्यांतून घळघळ अश्रुधारा वाहूं लागल्या.

सर्जेरावांनीं अंमळ थांबून विचारिलें:—"कमळजा कुठें आहे? आली कीं नाहीं अजून?"

मोहनेस उद्देशून ते बोलले असें वाटून इंदिरा ह्मणाली:—"आम्ही कमळजेची वाट नाहीं पहात बाबा. ती येणें शक्य नाहीं."

"कदाचित् माझ्यापूर्वींच ती कैलासाला गेली असेल. तिथें ती मला भेटेल."

कमळजेचा कांहींच पत्ता लागत नाहीं. ही गोष्ट मनांत येऊन वडिलांना फार दुःख होत असावें असें इंदिरेनें ताडलें. ती नंतर म्हणाली, "बाबा, ताई जरी या वेळीं तुम्हांस भेटावयाला आली नाहीं, तरी तिच्यावरचा राग जाऊं द्या. तिचा अपराध पोटांत घाला."

" घातला. माझा राग गेला. तिला मीं क्षमा केली. ती मला भेटायला यायची, पण नवऱ्यानें तिला परवानगी दिली नसेल."

" हें काय बाबा? ती घरीं नव्हती म्हणून मघाशीं मीं नाहीं कां सांगितलें? आनंदराव तसें करणार नाहींत."

" तिला सांग, बरें काय, तिला सांग, तुला व तुझ्या नवऱ्याला सुद्धां मीं क्षमा केली म्हणून. पण तो मला आवडत नाहीं. कधींच आवडला नाहीं. तिलाही तो सुख लागूं देणार नाहीं. तसा प्रसंगच आला तर तिला तूं संभाळ. तुझ्याशिवाय तिला संभाळणारें दुसरें कोणी नाहीं."

मरतेवेळीं कित्येकांना भविष्यज्ञान होतें म्हणतात. त्या ज्ञानानेंच हें वाक्य सर्जेरावांनीं उच्चारिलें असेल काय? असेल कदाचित्.

सर्जेराव नंतर म्हणाले:—" बाळ, त्यांना—तुझ्या सावत्र आईला—सांग, माझी भेट झाली असती म्हणजे बरें झालें असतें. पण डॉक्टर परवानगी देत नाहींत. तूं छोटे जहागीरदार पाहिले काय? त्यांच्यावर तुझी माया असूं दे. आणि लीला अजून लहान आहे. तिलाही संभाळ. मीं मृत्युपत्र करून ठेवलें आहे. त्यांत तुमची सर्वांची व्यवस्था केली आहे." सर्जेरावांचा आवाज इतका खोल गेला, कीं, त्यांच्या तोंडाजवळ कान नेल्याशिवाय इंदिरेला ऐकूं येईना.

सरदारसाहेबांना पुनः ग्लानि आली व ते स्वस्थ पडले. अकरा वाजण्याच्या सुमारास ते एकाएकीं दचकल्यासारखें करून म्हणाले:—"बाळ, तूं कुठें आहेस? माझ्याजवळ ये. मला धरून बैस. ते पहा—शिवदूत मला बोलवायला आले आहेत. हातांनीं खुणा करीत आहेत. मला निरोप दे. मी जातों; सोड, सोड. राम—राऽम—राऽऽऽम.!" असें म्हणून ते स्तब्ध झाले ते झालेच. त्यांच्या देहांतून प्राण निघून गेला.

तेथल्या नोकरांपैकीं एकजण ही हकीकत सांगण्याकरितां खालीं निघाला. इतक्यांत जिची सर्वजण इतका वेळ वाट पहात होते ती मोहना आली. इंदिरेची तार फडणिसांच्या घरीं पोंचली तेव्हां मोहना घरीं नव्हती. फडणिशीण बाई, ती व आणखी कांहीं बायका मिळून त्या दिवशीं सकाळीं लवकर जेवण आटपून सोमेश्वराचें जुनाट देवालय

व तेथेंच असलेला नदीचा मनोहर धबधबा पाहण्याकरितां गेल्या होत्या. तिकडून परत आल्यावर तिला तार पोंचली. त्या वेळीं संध्याकाळ झाली होती. तारेचा मजकूर ऐकल्यावर मग मात्र मोहनेनें बिलकुल आळस केला नाहीं. शक्य तितकी जलदी करून तिनें स्टेशन गांठलें. पण वडिलांची व तिची भेट झाली नाहीं. ती येण्यापूर्वींच सर्जेरावांचें प्राणोत्क्रमण झालें होतें.

मोहनेनें रडून आकांत केला. तिनें सरदारसाहेबांच्या बिछान्यावर अंग टाकलें. ती किंकाळ्या फोडूं लागलीः—"आपणाला लवकर बोलावणें पाठविलें नाहीं. आपली भेट होऊं दिली नाहीं. आपली ताटातूट केली." वगैरे मर्मभेदक शब्द ती बोलूं लागली. इंदिरेलाही मनस्वी दुःख झालें होतें. पण ती विचारी होती. मोहनेचें ती समाधान करूं लागली. वडिलांच्या अंगीं शेवटीं शेवटीं आलेला शांतपणा, त्यांची आपणा सर्वांवरील ममता, कमळजेला, मोहनेला व आनंदरावांना त्यांनीं केलेली क्षमा इत्यादि हकीकत इंदिरेनें तिला कळविली, पण मोहनेचें रडें थांबेना; तिचें समाधान ह्मणून कांहीं केल्या होईना."

पुतळाबाईच्या कानावर ही रडारडी गेली. त्यांना कसेंसेंच वाटूं लागलें. घरांत काय प्रकार झाला हें त्यांना कळेना. कांहीं तरी अरिष्ट कोसळलें खास असें जाणून त्या ताडदिशीं उठल्या व सुईणीस न जुमानतां खोलींतून बाहेर पडून माडीवर गेल्या. तो सर्व प्रकार पाहून त्यांना अत्यंत दुःख झालें व रागही आला. नवऱ्याच्या मृत्यूबद्दल दुःख व आपणास घरच्या माणसांनीं बातमी कळविली नाहीं याबद्दल त्यांना राग आला. परंतु मनावर त्यांचा विलक्षण पगडा असे. त्यांनीं आपली वृत्ति शांत ठेविली व मनांतील विकार बाहेर दिसूं दिले नाहींत.

आपणास ती हकीकत कां कळविली नाहीं, शेवटची भेट सुद्धां कां होऊं दिली नाहीं, मला अंतर वैरी कां केलें, असें पुतळाबाईनीं इंदिरेला विचारिलें. तिनें त्यांना सर्व गोष्टी समजावून सांगितल्या, तेव्हां त्याची समजूत पडली. पुतळाबाईनींहि आपलें सर्व दुःख गिळून टाकिलें, व त्या इंदिरेचें व मोहनेचें समाधान करूं लागल्या. नंतर त्या इंदिरेला म्हणाल्या,

"आक्कासाहेब, अशा दुःखाच्या प्रसंगीं आपण सर्व दुजाभाव विसरून जाऊं या. ते आतां अशा ठिकाणीं गेले आहेत कीं जेथें तंटा नाहीं, भांडण नाहीं, कांहीं नाहीं; माझें नशीब खोटें. मी तुमची ताटातूट होण्यास कारण झालें. मला क्षमा करा. माझ्यावरील सर्व राग घालवून टाका."

इंदिरेलाही वाईट वाटलें. पुतळाबाईच्या गळ्यांत हात घालून ती रड-रड रडली. त्या दोघींमध्यें इतःपर बेबनाव राहिला नाहीं.

---

# प्रकरण ३१ वें.

## तोच चेहरा पुनः एकवार.



ह्या प्रसंगीं एक विलक्षण योगायोग घडून आला. सरदारसाहेब वारले त्याच दिवशीं आजीसाहेबही आपल्या भुलेश्वराजवळच्या बंगल्यांत मरण पावल्या. दोन्ही श्मशानाविधि एकदमच उरकून घेण्यांत आले. व पुढील और्ध्वदेहिक क्रियाकर्मांतर वगैरे त्यांच्या लौकिकास साजेशा रीतीनें यथासांग करण्यांत आलें.

अर्थातच चवदा दिवस पर्यंत इंदिरेला व मोहनेला मुंबईतच रहावें लागलें. इतक्या मुदतींत पुतळाबाईचें वर्तन पाहण्यास इंदिरेला आयतीच फुरसत मिळाली. त्यांचा निरभिमानी स्वभाव, आपल्यावरील व आपल्या बहिणीवरील त्यांचें निष्कपट प्रेम, लीलेवर त्यांचें असलेलें लक्ष व एकंदर बाबतींत त्यांची दिसून येणारी दक्षता, इत्यादि पाहून इंदिरेला

फारच आश्चर्य वाटलें; अशा सर्वगुणसंपन्न स्त्रीबद्दल आपला वाईट ग्रह विनाकारण झाला याबद्दल ती स्वतःस दोष लावून घेऊं लागली.

सरदारसाहेब वारल्याची दुःखकारक बातमी प्रतापराव डॉक्टरांना समजली. ते समाचारासाठीं म्हणून जहागीरदारांच्या बंगल्याकडे आले. त्यांनीं नानाप्रकारांनीं इंदिरेचें व पुतळाबाईचें सांत्वन केलें, व नंतर दत्तापूर सोडल्यापासून आपण मुंबईत काळकादेवी रस्त्यावर दवाखाना काढला आहे, पैसे पुष्कळ मिळतात, बस चांगला बसला आहे, सरकारदरबारांत ही आपली चांगली चहा चालली आहे वगैरे हकीकत सांगितली. इंदिरेला अलीकडे त्यांच्या सालस स्वभावाबद्दल बरीच हकीकत कळली होती. सारजेलाही त्यांच्या निरपराधीपणाबद्दलची खात्री होती. त्या दोघींनीं पुतळाबाईजवळ प्रतापरावांची फारच वाखाणणी केली. तेव्हांपासून प्रतापराव रोज इकडे येऊन सर्वांची तब्येत पाहून जाऊं लागले, व ते त्यांचे फॅमिली डॉक्टर बनले. प्रतापरावांच्या घराण्याचा व जहागिरदारांच्या घराण्याचा पुढें जो संबंध जुळून आला त्याचा हा ‘ ओनामाच ’ म्हणावयाचा.

चवदा दिवस झाल्यानंतर एके दिवशीं इंदिरा गाडींत बसून मथुराशेटजींच्या कुटुंबाला भेटण्याकरितां गेली. एक वर्षापूर्वीं ती कमळजेचा तपास करण्याकरितां ह्या बाईकडे गेली होती, तेव्हां कमळजाबाई मास्तरिणीची थोडी हकीकत त्यांनीं इंदिरेला कळविली होती व आणखी कांहीं कळल्यास तुम्हांला ताबडतोब पत्रानें कळवीन असें त्यांनीं इंदिरेला अभिवचनही दिलें होतें. त्या वेळेपासून आजपर्यंत इंदिरेला ह्या बाईकडून कांहीं पत्र आलें नव्हतें; अर्थात कांहीं कमजास्त बातमी त्यांना कळली नसावी, कळली असती तर त्यांनीं ताबडतोब पत्र पाठविलें असतें, असें इंदिरेला वाटलें. तथापि मुंबईत राहिल्यासारखें एकदां तिकडे जाऊन तपास करावा हें बरें, असें मनांत आणून इंदिरा गेली होती. बाई घरांत होत्याच. त्यांनीं इंदिरेला सांगितलें कीं, कांहीं विशेष हकीकत कळली नाहीं. हें ऐकून इंदिरेची निराशा झाली शेवटीं, “ पुढें तरी कांहीं बातमी कानांवर आली तर अगत्यानें कळवायाची, बरें कां ? येते तर ” असें म्हणून इंदिरेनें बाईचा निरोप घेतला व ती घरीं परत आली.

माजघरांत पुतळाबाई व मोहना अशा दोघीजणी बोलत बसल्या होत्या. मोहनेनें त्या चिमुकल्या जहागिरदारांना आपल्या मांडीवर घेतलें होतें. मोहना स्वभावानें भारी तुसड होती. लहान मुलें चिरचिरीं, घाणेरडीं व रडून त्रास देणारीं असावयाचीं म्हणून त्यांच्या संपर्कास सुद्धां ती उभी रहात नसे. पण तिलाही नुकतेंच एक मूल झालें होतें; व लेकरांवर आईची किती माया व ममता असते याचा अनुभव तिला आलेला होता. यामुळें तिचा पूर्वीचा तुसडपणा जाऊन मूल म्हणजे—मग तें कोणाचेंही असो,—तिला जीव कीं प्राण होत असे. तशांत पुतळाबाईचा छोकरा अंगानें गुटगुटीत व रूपानें देखणा असल्यानें कोणासही त्याला घ्यावें असें साहजिकच वाटे. या मुलाला मांडीवर घेऊन मोहना बसली होती पण तोंडानें तिच्या स्वतःच्या मुलाचा स्तुतिपाठ चालला होता. मधून मधून त्याची आठवण झाल्यानें तिच्या नेत्रांतून दुःखाश्रु येत, ते ती आपल्या पदरानें पुसून काढीत होती. इतक्यांत इंदिरा गाडींतून उतरून आंत आली व हुश्श करून म्हणाली:—" व्यर्थ मला हेलपाटा पडला. बाईची गांठ पडली, पण कमळजेची कांहींच बातमी त्यांना लागलेली नाहीं. आतां आपलें मला असें वाटतें कीं, ती मुळींच सांपडणार नाहीं."

मोहना स्वभावानें तापट होती. इंदिरेचे हे शब्द ऐकतांच ती म्हणाली:—" सांपडणार नाहीं ? ती कशी ? हें सगळें जग मी उलथें पालथें करून टाकीन, पण कमळजेचा शोध लावल्याशिवाय कधींही रहायाची नाहीं. या जगाच्या बाहेर तरी ती कुठें गेली नाहीं ? होयना ? मग सांपडलीच पाहिजे."

सर्जेरावांच्या मुलींपैकीं एका मुलीसंबंधानें कांहीं तरी गूढ आहे, ही गुणगुण पुतळाबाईना कळली होती. पूर्वी त्या मास्तरीण असतांना कमळजेसंबंधानें कांहीं उद्गार निघालेले सहजासहजीं त्यांच्या कानांवर आले होते; पण यापेक्षां जास्त कांहीं हकीकत त्यांना समजली नव्हती. लग्न झाल्यावर त्यांनीं सर्जेरावांना एकदा दोनदां विचारून पाहिलें. पण सरदारसाहेबांनीं तें मनावरच घेतलें नाहीं. जणूं तो

विषय काढण्याची त्यांची इच्छाच नव्हती. हें सर्व पुतळाबाईंनीं आतां इंदिरेला सांगितलें. तेव्हां इंदिरा ह्मणाली:—“तुम्हांला बाबांनीं कांहीं-च कां सांगितलें नाहीं ? मग आश्चर्यच ह्मणायचें !”

मोहना मध्येंच ह्मणाली, “आक्का, अग आश्चर्य कसलें यांत ? मला सुद्धां कमळजेसंबंधानें दुसऱ्याजवळ कांहीं बोलावेसें वाटत नाहीं. आपण बोलावें आणि दुसऱ्यांनीं नाकें मुरडावींत यांत अर्थ काय ? मी तिकडे सुद्धां ही हकीकत कळविली नाहीं. मला आणखी एक बहीण आहे अशी कल्पनासुद्धां तिकडे नाहीं. बरी आठवण झाली हो ! आक्का, दत्तापुरांत असतांना मी एक तुला फाटकें पत्र दिलें होतें आठवतें काय ग ? ”

इंदिरा:—“अग हो, मी नेहमीं त्या पत्राकडे सारखी पहात बसतें. त्या पत्रामुळें मी जी घोंटाळ्यांत पडलें आहें तें कांहीं विचारूं नकोस.”

मोहना:—“मला दिखील हेंच आश्चर्य वाटतें. कदाचित् बाबांनीं रागारागानें तें पत्र फाडून टाकलें असावें. बरें पत्र तरी तुझ्या नांवचेंच होतें काय ?”

इंदिरा:—“मला नाहीं सांगतां येत. मला बरोबर खुलासा होईना ह्मणून मी बाबांना पत्र पाठवून विचारलें. त्यांनीं मला उलट टपालानें उत्तर पाठविलें कीं, असलें पत्र आपण कधींच पाहिलें देखील नाहीं. मला असें वाटूं लागलें आहे कीं, कमळजा आम्हाला कधींच सांपडणार नाहीं !”

मोहनेनें स्पष्ट सांगितलें:—“आक्का हा तुझा निवळ वेडेपणा आहे. ती जिवंत असो कीं मेली असो तिचा पत्ता ह्मणून लागलाच पाहिजे.”

मोहनेचा स्वभाव असा होता कीं, कोणत्याही गोष्टीची झाली तरी वाईटापेक्षां चांगलीच बाजू ती घेत असे. तिला वाटे, हीं असलीं दुष्ट भाकितें अगदीं वेडेपणाचीं होत. इंदिरेनें कमळजेसंबधीं सर्व हकीकत अगदीं पाहिल्यापासून पुतळाबाईंना सांगितली. ती ऐकून त्यांच्या मनावर फारच विलक्षण परिणाम झाला. असली चमत्कारिक गोष्ट आपण कधींच ऐकिली नाहीं, असें त्या ह्मणाल्या. हकीगत सांगतांना इंदिरेनें त्या चमत्कारिक व वाईट स्वप्नाचाही उल्लेख केला. त्याबरोबर मोहनेनें

तिची टर उडविण्यास सुरवात केली. ती ह्मणाली:—" आक्का, कोणी म्हणतील, कीं, तूं ऐंशी वर्षांची आजीबाईच आहेस. अजुनी हा खुळेपणा तुझ्या मनांतून कसा जात नाहीं कुणास ठाऊक! ज्याला त्याला तूं आपली त्या स्वप्नाची हकीकत सांगत बसतेस."

इंदिरा:—" तूं हांस, थट्टा कर, टर उडीव. पण एवढें खरें कीं, तें स्वप्न पडल्यापासून कमळजेची कांहींच बातमी आम्हांला लागली नाहीं. ज्या वेळीं आमची कमळजा सुरक्षित व चांगली धट्टीकट्टी अशी घरीं येईल तेव्हांच मी तें स्वप्न विसरेन. तोंपर्यंत तें माझ्या मनांतून जाणार नाहीं. मग तूं काय पाहिजे तें म्हण."

" बरें, बरें." असें दिमाखानें ह्मणत मोहना उठून गेली. तिला गाडींत बसून बाहेर जावयाचें होतें. म्हणून त्या चिमुकल्या सरदाराला पाळण्यांत निजवून दुसरें लुगडें नेसण्याकरितां ती माडीवर गेली. ती गेल्यावर इंदिरा पुतळाबाईंना ह्मणाली:—" माई, ताई माझी थट्टा करिते. करो बापडी. पण मी तुम्हाला सांगतें; आतांपर्यंत मला अशीं तीन चार वेळां विलक्षण स्वप्नें पडलीं व त्यांचा दाखलाही मला तात्काळ आला. अशीं स्वप्नें तरी कां पडावींत हेंच समजत नाहीं."

पुतळाबाई:—" आणि असेंच एक स्वप्न कमळजेसंबंधानें पडलें. ?"

इंदिरा:—" होय त्या वेळीं बाबांना जहागीर मिळालेली नव्हती. किती भयंकर स्वप्न म्हणून सांगूं ? त्यावरून तिच्या मरणाचें भविष्य मला समजलें. कमळजेचा इतके दिवस झाले तरी पत्ता लागत नाहीं ही गोष्ट मनांत आली म्हणजे चटकन् तें स्वप्न आपलें माझ्या डोळ्यांसमोर उभें राहतें. तें विसरणें शक्यच नाहीं."

पुतळाबाई:—" कसलें बरें स्वप्न होतें तें ?"

" त्या स्वप्नांत, ताईचे यजमान आनंदराव यांचाच संबंध जास्त आहे, व तो संबंध फारच भयंकर तऱ्हेचा आहे. विशेष मजकूर माझ्यानें आतां सांगवत नाहीं. फक्त त्या स्वप्नांत कमळजा मेली व आनंदराव तिच्या मरणाला कारणीभूत झाले किंवा निदान कोणत्या तरी रीतीनें त्यांचें त्यांत अंग आहे, एवढें मला दिसून आलें."

पुतळाबाई धर्मवेड्या नव्हत्या व त्यांचा स्वभावही भोळसर नव्हता, ह्मणून इंदिरेचें स्वप्न त्यांना खरें वाटेना. तथापि तिच्या चेहऱ्यावर दिसून येणारी भीति, तिचें हळूं बोलणें, तिच्या शब्दांतील गंभीरपणा इत्यादि पाहून पुतळाबाईनाही इंदिरेची हकीकत खरी वाटूं लागली व त्यामुळें त्यांच्या अंगावर शहारे आले.

इंदिरा पुढें म्हणाली:—" त्या वेळीं ताईचें लग्न झालें नव्हतें. पण माझी आणि आनंदरावांची नेहमीं गांठ पडे, कारण बाबांना औषध देण्याकरितां ते आमच्या घरीं येत असत. आणि ह्मणून मी म्हणतें कीं, यामुळेंच ते माझ्या स्वप्नांत आले असावेत. मला एकदां वाटतें कीं, हा केवळ योगायोगाचा प्रकार असावा. तथापि त्या स्वप्नांत मला जो आनंदरावांचा देखावा दिसला तो कांहीं केल्या माझ्या मनांतून जातां जात नाहीं; त्या वेळेपासून मला त्यांचें भय वाटूं लागलें आहे. माझें मनच वाईट, असें तुह्मी ह्मणा पाहिजे तर. पण असें होऊं लागलें आहे एवढें मात्र खरें."

पुतळाबाई:—" पण कमळजेची व आनंदरावांची ओळख तरी होती काय ? "

इंदिरा:—"मुळीं दिखील नाहीं. आणि म्हणूनच मला चमत्कार वाटतो. मीं एकदां ताईला सुद्धां ही गोष्ट सांगितली, पण ती विसरली असावी. तिचें लग्न होण्यापूर्वींची ही गोष्ट."

पुतळाबाई:—" पण तें स्वप्न तरी ऐकूं दे एकदां. मोहनाताईप्रमाणें मी दिखील कुणी स्वप्न सांगूं लागलें कीं त्याची टर उडवतें; माझाही स्वप्नांवर विश्वास नाहीं. पण हें स्वप्न मात्र ऐकण्याची मला फार इच्छा झाली आहे."

इंदिरा:—" मी तें स्वप्न कधींच कोणाला सांगितलें नाहीं, आणि तुम्हांलाही पण सांगत नाहीं. आनंदरावांसारख्या माणसानें असें करावें हें अगदींच गैर. तुह्मी मला वेडी ह्मणा, भावडी ह्मणा, तिरसट, एककल्ली ह्मणा; काय पाहिजे तें ह्मणा, पण—

इतक्यांत पाळण्यांत निजलेल्या छोटे साहेबांनीं एक जोराची किंकाळी

फोडिली त्याबरोबर पुतळाबाई उठून तिकडे गेल्या. त्यामुळें बोलणें अर्धेंच राहिलें.

थोड्या वेळानें जहागीरदारांचे मुंबई येथील वकील येऊन दाखल झाले. त्यांनीं सांगितलें कीं, जहागीरदारांनीं थोड्या वर्षांपूर्वीं एक मृत्युपत्र करून तें नोंदविण्याकरितां मजजवळ दिलें होतें. त्या मृत्युपत्रांत लिहिल्याप्रमाणें व्यवस्था करण्याचें त्यांनीं मजकडे सोंपविलें आहे; असें ह्मणून त्यांनीं आपल्या खिशांतून एक लांबच लांब कागद काढून तो सर्व मंडळीस वाचून दाखविला. ह्या मृत्युपत्रांत सर्जेरावांनीं इंदिरेला तिच्या हयातीपर्यंत दरसाल बाराशें रुपये द्यावे असें लिहिलें होतें. लीलेच्या लग्नाकरितां दहा हजार व तिच्या चोळीकांकणाकरितां व माहेरपणाकरितां ह्मणून पांच हजार अशी पंधरा हजारांची वट रक्कम त्यांनीं लीले-करितां राखून ठेविली होती. कमळजेकरितां—तिचा शोध लागलाच तर—पांच हजार काढून ठेविले होते. आणि मोहनेकरितां ? मोहनेला कांहीं द्यावयाचें नाहीं, तिनें आपल्या मर्जीविरुद्ध, आपलें सांगणें न जुमानतां, आनंदरावांबरोबर पळून जाऊन लग्न करून घेतलें, सबब तिला कांहीं द्यावयाचें नाहीं. असा स्पष्ट शेरा त्यांनीं मृत्युपत्रांत मारला होता. पुतळा-बाई त्या वेळीं गरोदर होत्या. त्यांना मुलगा झाला तर ठीकच. नाहीं तर त्यांनाही दरसाल पांच हजार नेमणूक मिळावी अशी व्यवस्था केली होती.

ह्याप्रमाणें वकीलसाहेबांनीं सर्जेरावांनीं केलेलें मृत्युपत्र वाचून दाखविलें. नंतर दुसरा एक कागद खिशांतून काढून त्यांनीं सांगितलें कीं, आजीसा-हेबांनींही आपल्या जिनगीची व्यवस्था केली आहे; त्यापैकीं पांच हजार रुपये इंदिरेला व पांच हजार लीलेला देऊन बाकी सर्व संपत्ति आपल्या मुलींना वाटून टाकलेली आहे. याप्रमाणें वडिलांनीं व आजीसाहे-बांनीं आपणाला अजीबात वगळलें याबद्दल मोहनेला पराकाष्ठेचें वाईट वाटलें, व तिला रागही आला. आतां मात्र तिला मुंबईंत राहणें बरें वा-टेना. ह्मणून तिनें इंदिरेजवळ तेथून निघण्याची अगदीं घाई चालविली. पुतळाबाईनीं पुष्कळ आग्रह केला, पण व्यर्थ. इंदिरा व मोहना दत्तापु-रास जाण्याकरितां निघाल्या. कांहीं दिवस हवापालट करण्याकरितां लीले-

लाही इंदिरेनें पुतळाबाईंची परवानगी घेऊन बरोबर घेतलें. कारण, लीलेची सर्व देखरेख पुतळाबाईंनीं पहावी असें सर्जेरावांनीं मृत्युपत्रांत लिहिलें होतें. सारजाही त्यांच्या बरोबर होतीच.

त्या चौघीजणी आगगाडींत बसल्या. मोहनेनें एकदां जो एक कोपरा धरिला तो तिनें कांहीं सोडला नाहीं, कीं ती कोणाशीं बोलली नाहीं. तिला संताप चढला होता व वाईट वाटत होतें. आतां घरीं गेल्यावर नवऱ्याला—आनंदरावांना—वाईट बातमी सांगावी लागणार याबद्दलच तिला वाईट वाटत होतें, व तिच्या अंगाचा तिळपापड होत होता. तिनें मध्येंच त्रासून इंदिरेला विचारिलें:—" आक्का, कमळजेचें तें फाटकें पत्र मी तुझ्याजवळ दिलें होतें. त्यासंबंधानें तूं बाबांना पत्र लिहिलेंस, पण मला कुठें बोलली नाहींस तीं. सगळीं कशीं अगदीं इथुन तिथुन सारखीं ? माझी कोणाला तरी काळजी आहे काय ? " असें म्हणून मोहना डोळ्यांला पदर लावून रडूं लागली.

इंदिरेनें सुस्कारा टाकून म्हटलें. " तुला मी कां कळविलें नाहीं तें मला आतां सांगतां येत नाहीं. काय असेल तें असो. कमळजे संबंधानें बोलणें मला आवडत नाहीं. शिवाय त्या पत्तावरून कांहींच निष्पन्न झालें नाहीं कीं, कमळजेचा कांहीं सुगावा लागला नाहीं. यावर मोहना कांहीं बोलली नाहीं. ज्या स्टेशनावर त्यांना उतरावयाचें होतें तें स्टेशन आलें. तेव्हां त्या चौघीजणी आगगाडींतून उतरल्या व गाडींत बसून दत्तापुरास येऊन पोंचल्या. प्रथम आनंदराव डॉक्टरचें घर लागलें, तेथें मोहना उतरली व बाकी तिघीजणी रावपुऱ्याकडे गेल्या.

या वेळीं रात्रीचें आठ वाजले होतें. आनंदराव डॉक्टर घरांत होतेच. त्यांनीं प्रेमभरानें बायकोचें स्वागत केलें, व " मुंबईहून जाऊन यायला जवळ जवळ तीन आठवडे लागतात हें मला माहीत नव्हतें. इतक्या मुदतींत मी पृथ्वीची सुद्धां प्रदक्षिणा केली असती. मी एकसारखी तुझी वाट पहात आहें. दिवस जातात कीं नाहीं असें मला झालें. " असें ते म्हणाले. मोहनेनें सर्व हकीगत सांगितली. बाबांनीं व आजीसाहेबांनीं आपल्या इस्टेटीची व्यवस्था केली असें ती नंतर म्हणाली. तेव्हां आनंद-

राव म्हणाले:–" केली कां व्यवस्था ? मग काय तूं आतां श्रीमंत झाली असशील ? आमच्या सारख्या गरिबांनीं तुझ्या पुढें नुसतें उभें राहण्याची सुद्धां मुष्कील. किती ? तुला किती मिळाले ? निदान वीस हजार तरी खास."

" खरेंच सांगू कां ? मला त्या दोघांनींहि कांहीं दिलें नाहीं. त्यांचा माझ्यावर पहिल्या पासून राग होताच. पण त्यांनीं सगळ्यांना दिलें आणि मलाच तेवढें वगळलें. म्हणून वाईट वाटतें."

आनंदराव म्हणाले:—" आलें तसें घेतलें पाहिजे. या बद्दल वाईट वाटून घेऊन काय उपयोग ? येतील दिवस तसे ढकलावेत झालें."

मोहना आंत निघून गेली, पण आनंदराव तसेंच तेथें खिडकीसमोर उभे होते. त्यांच्या तोंडावर खेदाची छटा दिसूं लागली. दुःखानें, कीं पुर्वीच्या कांहीं आठवणींनें, कीं त्रासानें कोणास ठाऊक ? खिडकीसमोर ते तसेच कांहीं वेळ उभे होते. मोहनेनें त्यांना जी हकीगत सांगितली त्यामुळें उत्पन्न झालेल्या विचारांत ते गर्क होते. व त्यांचे डोळे जमिनीकडे लागले होते. त्यांना आजपर्यंत आशा होती कीं मोहनेला कांहीं तरी पैसे मिळतील. आणि आपलें सर्व कर्ज फिटून जाईल. पण त्यांची सर्व निराशा झाली. थोड्या वेळानें त्यांनीं आपले डोळे वर केले.

डोळे वर केले पण त्यांना काय दिसलें ? त्यांच्या समोरच खिडकी होती, व खिडकीचीं दोन्ही दारें लावलेलीं होतीं. बाहेरच्या बाजूस कोणी उभे असून दारांच्या भिंगांतून आंत पहात आहे असें त्यांना वाटलें. मागें त्यांना दिसलेला तो भयंकर चेहरा—कलावती मेली त्या रात्रीं जिन्यांत एकदां दिसलेला व पुनः सर्जेरावांच्या बंगल्यांतील झाडींत दिसलेला तो भयंकर चेहरा—मानवी कीं पिशाच्च योनीपैकीं कोणास ठाऊक, भिंगास नाक लावून पहात असलेला त्यांच्या दृष्टीस पडला.

त्याबरोबर आनंदरावांना अत्यंत भीति वाटून घामानें त्यांचें सर्वांग दरदरून गेलें, त्यांचे पाय लटलट कांपूं लागले. त्यांनीं एक जोराची किंकाळी फोडली.

---



# भयंकर स्वप्न.



## उत्तरार्ध.



## प्रकरण १ लें.

——:o:——

### सात वर्षांनंतर.





मागील भागांत सांगितलेली हकीकत घडल्याला सात वर्षें होऊन गेलीं. इतक्या अवधींत आमच्या कथानकांत कांहीं विशेष प्रकार घडून आला नाहीं. रावपुऱ्यांत बरेच फेरफार झाले होते. नवीन बंगले, दुकानें, बागबगीचे, देवालयें होऊन त्या ठिकाणास कांहींसें महत्व प्राप्त झालें होतें.

या मुदतींत इंदिरेच्या वृत्तींत विशेषसा फरक पडला नाहीं. पूर्वींची तिची काळजी, प्रपंचाची ओढाताण इत्यादि कमी झाली होती; पण

कमळजेसंबंधानें तिच्या जिवास लागलेला चटका किंचित्‌ही कमी झाला नव्हता. तिनें पुष्कळ प्रयत्न केले, किती तरी ठिकाणीं तपास केला, पत्रें किती पाठविलीं, पण कांहींच पत्ता लागेना. आतां मात्र तिची पूर्ण निराशा झाली. कमळजा आपल्या हातीं लागत नाहीं असेंच तिच्या मनानें घेतलें. तथापि मधून मधून तिची आठवण होऊन इंदिरेच्या मनाला वाईट वाटत असे. सर्जेरावांनीं मरते समयीं सांगून ठेविल्याप्रमाणें कमळजेचा तपास आमरण करावयाचा, हें काम आपण बरोबर रीतीनें करीत आहों कीं नाहीं याचा ती आपल्या मनाशीं विचार करी. परंतु तिला आढळून आलें कीं आपण इतके प्रयत्न केलेले सारे व्यर्थ गेले तेव्हां यश येणें अगदींच कठीण; तथापि केव्हां केव्हां तिचें तिलाच वाटे कीं हें गौडबंगाल कधींना कधीं तरी उघडकीस येणार व ती वेळ आज नाहीं उद्यां, उद्यां नाहीं परवां, येणार हें खास.

ह्यां सात वर्षांत मोहनेच्या वागणुकीमध्यें बराच फरक पडला होता. तिचे ते वृद्ध मामंजी परलोकवासी होऊन त्यांची सर्व संपत्ति आनंदरावांना मिळाली होती व त्यामुळें त्यांच्याही वर्तनांत थोडा फेरबदल झालेला होता. प्रथम प्रथम मोहनेला वाटत असे कीं आनंदरावांचें आपल्यावर निःसीम प्रेम आहे. पण त्यांचा स्वभाव जरा चैनी व हौशी असल्यामुळें त्यांच्या वर्तनाबद्दल—एकपत्नीत्वाबद्दल—मोहनेच्या मनांत शंका येऊं लागली. तशांतच आनंदरावाच्या बाहेरख्यालीपणासंबंधाच्या उडत उडत बातम्या तिच्या कानावर आल्यामुळें तर तिचें मन कलुषित व संशयखोर होऊं लागलें. त्यांतून तिला एखादें मूल असतें तर इतक्या थरावर गोष्ट येती ना. पण तसाही प्रकार नव्हता. मोहनेला एक मूल झालें होतें, तें वारलें. त्यावर तिला दुसरें मूलच झालें नाहीं. आनंदरावांना घरांत दुसरी कांहीं करमणूक नसल्यामुळें ते आपला बहुतेक वेळ बाहेर घालवीत. त्यामुळें तर मोहनेच्या मनांतील संशय जास्तच जोरावला. सारांश, तिचें जिणें ह्मणावें तसें सुखकारक झालें नाहीं. कृतकर्माचा तिला आतां पश्चात्ताप होऊं लागला.

इकडे प्रतापराव डॉक्टरांच्या स्थितींतही बरेंच अंतर पडलें होतें. त्यांचा धंदा हळू हळू चांगला चालत गेला, व त्यांना तसे अनुकूल

योगही जुळून आले. पुढें पुढें त्यांचा नांवलौकिक वाढत जाऊन मोठमोठ्या अंमलदारांचीही श्रद्धा त्यांच्यावर बसली, आणि सरकारांतून त्यांना मोठी किताबत मिळून सालीना बरीचशी रक्कम नेमणुकीदाखल त्यांच्या घरीं येऊं लागली. साऱ्या मुंबईत सर्वतोमुखी प्रतापराव डॉक्टरांचें नांव ऐकूं येऊं लागलें. काळबादेवी रस्त्यावरील तो पूर्वीचा बंगला सोडून देऊन त्यांनीं आतां महालक्ष्मीवर एक हवाशीर व टुमदार हवेली खरेदी घेतली होती. त्यांचा मुलगा वसंत हल्लीं मेडिकल कॉलेजांत होता. त्याचें वय या वेळीं सुमारें बावीस तेवीस वर्षांचें होतें. चेहरा मोहक, स्वभाव उमदा, एकंदर वर्तन पाहिलें तर सभ्य व विनयशीलपणाचें, तशांत अपार संपत्ति व वडिलांचा होत असलेला बडेजाव यांची भर पडलेली; यामुळें वसंताला थोरामोठ्यांच्या, सरदारांच्या, जहागीरदारांच्या किती तरी मुली सांगून येऊं लागल्या. तथापि वसंताचें खरें प्रेम सर्जेरावांची मुलगी लीला हिच्यावरच जडलेलें होतें. लीला हल्लीं उपवर झाली होती. लहानपणीं दत्तापुरास असतांना वसंत व लीला यांचा चांगला परिचय झाला होता. तशांत सर्जेराव वारल्यानंतर इंदिरेच्या शिफारशीवरून प्रतापराव हे पुतळाबाईंचें कुटुंबवैद्यच बनले होते. यामुळें मुंबईत आल्यानंतर वसंताची व लीलेची बरीच घसट पडली होती. रोज सकाळीं, संध्याकाळीं चौपाटीवरील बंगल्याकडे वसंताची एखादी तरी खेप होईच होई. वसंत व लीला या दोघांच्या दरम्यान त्यांना न कळतच प्रीतीचा अंकुर उद्भवूं लागला. पुतळाबाई फार चाणाक्ष असल्यानें त्यांच्या लक्ष्यांत ही गोष्ट चटकन् आली. वसंत व लीला या दोघांचें एकमेकांवर प्रेम बसलें आहे हें त्यांनीं ओळखलें. कांहीं दिवसपर्यंत त्यांनीं आपल्या मनाची खात्री करून घेतली, व नंतर त्यांनीं इंदिरेला "तुह्मी ताबडतोब मुंबईस निघून या, कांहीं जरूरीचें काम आहे; सर्व मंडळी खुशाल आहेत." अशा मजकुराचें एक पत्र लिहिलें; हें पत्र वाचून इंदिरेला फार आश्चर्य वाटलें. सर्व मंडळी तर खुशाल आहेत, मग इतक्या जरूरीनें या म्हणण्याचें कारण काय? असें ती आपल्या मनाशींच विचारूं लागली. तिच्या कांहीं लक्ष्यांत येईना. शेवटीं "काय असेल तें असो,

जाऊन तर पाहूं" असा निश्चय करून इंदिरा मुंबईस जाण्याकरितां निघाली. तिनें सारजेलाही बरोबर घेतलें. मुंबईस आल्यावर पुतळाबाईनीं सर्व हकीगत इंदिरेला सांगितली. नंतर त्या दोघींचें बोलणें होऊन असें ठरलें कीं कांहीं हरकत नाहीं, झालें तें झालें, त्यांत आतां फेरबदल होणें शक्य नाहीं, जोडा चांगला आहे, दोघांतही नांव ठेवण्यास मुळींच जागा नाहीं, वसंताच्या बापाजवळ पैसे रगडून आहेत, शिवाय सरकारांतून नेमणूक व मोठी पदवी त्यांना मिळालेली आहे; असें स्थळ पाहूं गेलें तरी कोठें मिळावयाचें नाहीं, तेव्हां रुकार द्यावा हें सर्वतोपरी बरें. याप्रमाणें त्या दोघींचें बोलणें चाललें होतें तों प्रतापराव व वसंत असे दोघेही तेथें दाखल झाले. नंतर सर्व गोष्टींचा खुलासा होऊन भावी वधूवरांच्या तोंडांत साखर घालण्यांत आली, व सुमुहूर्त पाहून विवाहविधि उरकून घ्यावा असें ठरलें. छोटे सरदारसाहेब तेथें खेळत होते. त्यांना हा सर्व प्रकार पाहून फार मजा व गंमत वाटली. लीलाताई व वसंतराव यांच्याकडे अनुक्रमानें पाहून ते पोट धरधरून हांसूं लागले.

वाचकहो, कलावतीस मरून सुमारें आठ वर्षें होऊन गेलीं होतीं; इतक्या अवधींत तिच्यासंबंधाचा कांहींच सुगावा आपणास लागला नाहीं. परंतु निदान तिच्या मुलाचें तरी काय झालें असावें हें जाणण्याची जिज्ञासा आपणास झालीच असेल.

कलावतीच्या मुलाला आतां आठ संपून नववें वर्ष लागलें होतें. पण त्याची प्रकृति अगदीं नाजुक व अशक्त असल्यानें पहाणाऱ्याला तो सात वर्षांचा सुद्धां दिसत नसे. त्या मुलाला घेऊन ती दर्याबाई नांवाची बाई आगगाडींत बसून दत्तापुरास येण्याकरितां निघाली. कलावतीच्या मृत्यूबद्दलची कांहींच हकीगत तिला कळालेली नव्हती. आपण या मुलाला बाळगण्याकरितां घेऊन आलों खरे, पण त्याच्या आईचा पत्ता कसा नाहीं, इतक्या वर्षांत तिच्याकडून पत्र नाहीं, समाचार नाहीं, हें कसें? ह्मणून तिला फार आश्चर्य वाटत होतें. इतकें दिवस वाट पाहिली, आतां असें उपयोगी नाहीं, स्वतःच दत्तापूर गांवीं जाऊन तपास करावा हें बरें, असें मनांत आणून ती इकडे येण्याकरितां निघाली होती. स्टेशनावर

मैनाई सुईणही कांहीं काम होतें ह्मणून गेली होती. परत येतांना त्या दोघीही एकाच गाडींत बसून आल्या. तेथें त्या दोघींच्या गप्पा सुरू झाल्या. कलावती एकाएकीं मेली, तिला चुकून विषारी औषध दिलें गेलें, तें पोटांत गेल्यानें तिला मरण आलें वगैरे मागची सर्व कच्ची हकीगत मैनाईनें त्या दर्याबाईला सांगितली. ती ऐकून तिला फारच आश्चर्य वाटलें.

गांवांत येऊन पोंचल्यावर दर्याबाईच्या मनांत ज्या घरांत कलावती बाळंतीण होऊन मेली तेंच मावशीबाईचें घर भाड्यानें घेऊन त्यांत रहावें असें होतें; परंतु तें घर हल्लीं मोकळें नसून त्यांत कोणी भाडेकरी आहे असें समजल्यावर त्यांनीं दुसरें एक चांगलें हवाशीर घर भाड्यानें ठरविलें व त्या मुलाला घेऊन दर्याबाई त्या घरांत राहूं लागल्या.

दोन चार दिवस झाले. एके दिवशीं मैनाई सुईण त्या घरावरून जात असतां तिला दर्याबाईनीं हाक मारून ह्मटलें:—"मैनाई, मला कांहीं सामान विकत आणावयाचें आहे, मी बाजारांत जातें, तुह्मी तोंपर्यंत येथें बसा, मुलगा निजला आहे." मैनाईनें तें कबूल केलें व दर्याबाई निघून गेल्या. इतक्यांत सारजाही ह्या रस्त्यानें कोठेंशी निघाली होती. मुंबईहून ती व इंदिरा येथें परत आल्यास पंधरा दिवस झाले होते. मैनाई ओसरीवरच बसलेली होती. तिला पाहून सारजेनें ह्मटलें, "मैनाई, तुह्मी येथें कां? या घरांत कोण राहिलें आहे?" तेव्हां मैनाईनें सांगितलें:—"परवां मी स्टेशनावर गेलें होतें, तिकडून परत येतांना या बाईची गांठ पडली. कलावती कशी मेली याची चौकशी करण्याकरितां ती आली आहे असें वाटतें, कारण कालपासून विचारून विचारून तिनें माझी पुरेवाट केली आहे. ती हकीगत एखाद्या वर्तमान पत्रांत छापली आहे कीं कसें? असें ती मला विचारीत होती. तिचा एक मुलगा आहे. अगदीं म्हणजे अगदीं अशक्त पापी प्राणी आहे, तुला दाखवितें ये." असें म्हणून मैनाईनें सारजेला आंत नेलें व तेथें अंथरुणावर निजलेलें एक मूल दाखविलें. त्या मुलाकडे पहातांच सारजेला आश्चर्य वाटलें. कोणा तरी माहितींतल्या मनुष्याच्या चेहऱ्यासारखा अगदीं हुबेहूब

याचा चेहरा आहे असें तिला वाटलें. ती पुनः पुनः त्या मुलाकडे पाहूं लागली.

नंतर सारजा आपल्या कामाला निघून गेली. तिकडून परत येतांना पहाते तर मैनाई तेथें नसून दुसरीच एक परस्थ बाई तिला दिसली. सारजेनें तिला ओळखलें, कारण मैनाई सुइणीनें दिलेल्या माहितीची तिला चांगली मदत झाली. "कलावतीबाई बाळंत झाल्यावर येथें येऊन तुह्मीच त्यांचें मूल घेऊन गेलां ना ?" असें सारजेनें विचारिलें. दर्याबाईनीं उत्तर दिलें:—"होय; पण मी कोण, कां आलें आहें वगैरे हकीकत कोणालाही कळवूं नका, बरें का ! कारण कलावती कोण, कुठें रहाणारी, कुणाची, याबद्दल आजपर्यंत कोणालाही पत्ता लागलेला नाहीं; तेव्हां तिच्या माहितीची एक बाई या गांवांत आली आहे ही गोष्ट समजतांच सगळें गांवच्या गांव मजकडे लोटेल आणि मग प्रत्येक जण विचारून विचारून मला पुरे पुरे करील. ह्मणून म्हणतें." सारजेनें ती गोष्ट कबूल केली. नंतर 'तुह्मीं नेलेलें मूल कोठें आहे ?' असें तिनें विचारल्यावरून दर्याबाई म्हणाल्या:–"तें मूल मेलें. आतां असतें तर नऊ वर्षांचें असतें. हा मुलगा माझा आहे. याला सातवें वर्ष आहे." सारजेनें पुनः त्या मुलाच्या तोंडाकडे पाहून म्हटलें:—याचा चेहरा कोणा ओळखीच्या माणसाच्या चेहऱ्यासारखा दिसतो, पण त्याचें नांव लक्ष्यांत येत नाहीं. नंतर दर्याबाईनीं कलावतीच्या मरणासंबंधाची सर्व बारीकसारीक माहिती विचारण्यास सुरुवात केली. मैनाई सुइणपेक्षां सारजेकडून जास्त खुलासेवार हकीकत कळेल असें त्यांना वाटलें. कलावतीला औषधं देण्याकरितां कोणते डॉक्टर येत होते, ते संभावित होते कीं लफंगे होते, त्यांचें लग्न झालेलें होतें कीं नव्हतें, दोन डॉक्टर कशाकरितां येत होते, किती दिवस येत होते, आपण मूल घेऊन गेल्यानंतर किती दिवसांनीं ती मेली वगैरे शेंकडों प्रश्न दर्याबाईनीं सारजेला विचारिले. तिनेंही जी हकीकत तिला माहीत होती ती सर्व सरळपणानें सांगितली. ती ऐकून दर्याबाईची उत्कंठा जास्तच वाढली. "सारजाबाई, तुह्मी आज येथेंच रहा, आपण पुष्कळ बोलूं" असें दर्याबाई कळवळून तिला ह्मणाल्या. पण 'आज मला फुर–

सत नाहीं, कांहीं जरूरीचें काम करण्याकारितां मला मालकीणबाईंनीं पाठ-
वून दिलें होतें, त्या माझी वाट पहात असतील, मला लवकर गेलें पाहिजे, आणखी केव्हां तरी त्यांना विचारून फुरसतीनें येईन, जातें आतां.' असें ह्मणून सारजा तेथून घाईघाईनें निघून गेली.

सारजा गडबडीनें चालूं लागली खरी, पण तिच्या डोक्यांत अनेक विचार घोळूं लागले. 'दर्याबाई ह्मणूं देत, पण तें मूल खात्रीनें त्यांचें नव्हे. कलावतीबाईचें जें मूल त्या घेऊन गेल्या होत्या तेंच हें मूल असावें. आतां दिसण्यांत तें तितकें गोड दिसत नाहीं हें खरें, तरी पण हें तेंच मूल असावें खास.' अशी कल्पना सारजेच्या डोक्यांत घोळूं लागली. पण ती पुनः आपल्याशींच ह्मणाली; कदाचित् हें मूल कलावतीबाईचें नसेलही. तिच्या चेहऱ्यांत व या मुलाच्या चेहऱ्यांत कांहींच सारखेपणा दिसत नाहीं. असे परस्परविरुद्ध विचारतरंग तिच्या मनांत येऊन ती चालली असतां 'फुलवन' बंगल्याच्या दरवाज्याजवळ येतांच तिच्या डोक्यांत एकदम लख्ख प्रकाश पडल्यासारखें झालें. ज्या मनुष्याच्या तोंडवळ्या-सारखा त्या मुलाचा तोंडवळा होता त्या माणसाची तिला आठवण झाली. त्याबरोबर तिच्या मनाला धक्का बसल्यासारखा झाला व ती मोठ्या बुच-कळ्यांत पडली. 'असें कसें व्हावें?' हें तिला मोठें कोडेंच पडलें.

मैनाई सुईण निरोप घेऊन गेली तेव्हां दर्याबाईनीं तिला सांगितलें होते कींमुलगा आजारी आहे. त्याच्या गुडघ्यांत कळा घालतात, थोडी सूजही आली आहे, यामुळें तो फार अशक्त झाला आहे, तेव्हां तुमच्या माहितीचे कोणी चांगले डॉक्टर असतील तर इकडे एकदां येऊन मुलाची तब्येत बघून जायला सांगा. ह्मणून मैनाई ही हकीकत सांगण्या-करितां संध्याकाळीं आनंदरावाच्या घरीं गेली. पण ते घरीं नव्हते. आज दत्तापुरांत सर्व लोकांची एक जंगी जाहीर सभा भरली होती. त्या गांवांत गंगेच्या कांठीं एक श्रीदत्तात्रय देवाचें जुनाट देवालय असून तें अगदीं मोडकळीस आलें होतें. त्या देवालयाचा जीर्णोद्धार करावयाचें सर्व गांवच्या लोकांनीं ठरविलें असून त्याकरितां वर्गणी जमवावयाची व सरकाराकडेही मदतीबद्दल मागणें करावयाचें, असा ह्या सभेचा उद्देश होता. अध्यक्ष-

स्थानीं आनंदरावांची योजना करण्यांत आली होती. आनंदराव स्वभावानें थोडे एकलकोंडे असल्यानें त्यांना असें मंडळींत जाणें आवडत नसे. ह्या खेपेस त्यांनीं अध्यक्षस्थान पतकरिलें ही आश्चर्याचीच गोष्ट ह्मणावयाची. तथापि हें पतकरलेलें काम त्यांनीं फार उत्तम रीतीनें पार पाडलें. अध्यक्षांचें भाषण प्रौढ व सुविचारपरिप्लुत असें झालें. सर्व लोकांनीं त्यांची फार वाहवा केली, जिकडे तिकडे त्यांची शिफारस होऊं लागली, जो तो आनंदरावांचे गुणानुवाद गाऊं लागला. सभा बरखास्त झाल्यानंतर आनंदराव घरीं निघाले असतां त्यांच्या मनामध्यें हजारों विचारतरंग आले. त्यांना वाटूं लागलें कीं धंदा करण्यास ह्या गांवापेक्षां मुंबई शहर फार उत्तम. तेथें जाऊन राहिलें तर आपला नांवलौकिक वाढेल, पैसे खूप मिळतील, श्रीमंत लोकांच्या, विद्वान् लोकांच्या ओळखी होतील. असल्या ह्या भिकार गांवांत कुजत राहण्यापेक्षां, मुंबईंत जाऊन नशीब काढावें हें चांगलें, असे अनेक विचार त्यांच्या डोक्यांत घोळूं लागले. अशा कल्पनातरंगांत पोहत असतांच ते घरीं येऊन पोंचले. दरबारांत मैनाई त्यांची वाट पहात उभी होतीच. तिनें त्यांना सांगितलें कीं ' एक दर्याबाई नांवाची परस्थ बाई येथें येऊन त्या घरांत राहिली आहे; तिचा मुलगा सहा सात वर्षांचा असून आजारी आहे, त्याच्या गुडघ्यांत कांहीं रोग आहे; त्या बाईनीं आपणाला बोलाविलें आहे. उद्यां केव्हां तरी सवड करून तिकडे येऊन जा. ' आनंदरावांनीं ' बरें आहे ' असें म्हटलें व मैनाई निघून गेली.

दुसरे दिवशीं सकाळीं आनंदराव रोगी पाहण्यासाठीं घरांतून बाहेर पडले. दर्याबाईचें घर वाटेवरच होतें. आनंदराव दरवाज्यांतून नीट घरांत गेले; माजघरांत एका पलंगडीवर अंथरुण घातलेलें असून त्यावर एक मुलगा बसलेला त्यांना दिसला. त्याच्यापुढें पांच सात लाकडी बाहुल्या पडलेल्या होत्या व एका रांगेनें पलटणींतील शिपायांप्रमाणें त्यांना उभें करण्याची त्याची खटपट चालली होती. आंत गेल्यावर आनंदराव ह्मणाले—" तुझाच कायरे गुडघा— "

आनंदराव इतकें बोलतात तों त्या मुलानें त्यांच्या तोंडाकडे पाहिलें.

त्याबरोबर आनंदराव स्तब्ध झाले व आश्चर्यानें त्याच्या तोंडाकडे टक लावून पाहूं लागले. सारजेप्रमाणें त्यांनाही त्या चेहऱ्यामध्यें कांहीं साम्य दिसलें काय ? काय असेल तें असो. ते त्या मुलाकडे न्याहाळून पाहूं लागले एवढें खरें. स्वयंपाकघराच्या दारांतून दर्याबाई हा प्रकार पहात होत्या. थोड्या वेळानें आनंदरावांचें लक्ष्य या बाईकडे गेलें तेव्हां ते शुद्धीवर आले.

दर्याबाई ह्मणाल्या—“ मीं म्हटलें कोण बोललें ? डाक्तर येणार होते ते आपणच का ? ”

“ होय, मीच तो. ” असें आनंदरावांनीं उत्तर दिलें. व दर्याबाई-कडेही त्यांनीं न्याहाळून पाहिलें. मुलाकडे डॉक्टर चमत्कारिक दृष्टीनें पहात होते हें दर्याबाईनीं ताडलें. त्यांना वाटलें मुलगा फार अशक्त दिसतो ह्मणून डॉक्टर याच्याकडे असे पहात असतील कदाचित्. त्या ह्मणाल्या:—“ खरेंच तो भारी अशक्त झाला आहे. डॉक्टर, याचेंच ना तुम्हांला आश्चर्य वाटलें ? ”

आनंदराव:—“ छे, छे ! अशक्त ह्मणून नव्हे. या मुलाला पाहतांच मला कोणाचीशी आठवण झाली. याचें नांव काय ? ”

“ सोन्या. ”

“ कोणत्या गांवाहून तुह्मी याला घेऊन आलां ? ”

दर्याबाईचें बोलणें अगदीं तडकाफडकी, एक घाव दोन तुकडे, असें असे. त्यांचा देहस्वभावच तसा होता. वाचकांना माहीत आहेच. हा आनंदरावांचा प्रश्न ऐकून त्यांना राग आला. त्या ह्मणाल्या:—

“ माणसांना मेली रिकामी पंचाईत करण्याची संवयच ! डॉक्टर, मी तुम्हांलाच ह्मणतें असें नाहीं. चहूंकडे हीच तऱ्हा. आह्मी इंदुराहून आलों, समजलें ? याचें बाळपण तिकडेच गेलें. हा माझा अगदीं शेवटचा मुलगा. हाच काय तो इतका वाढलेला. बाकी सर्व मुलें अगदीं लहान असतांनाच गेलीं. मग मी आमच्या घरच्या देवाला मागून घेतलें कीं मुलगा होऊन त्याला पांचवें वर्ष लागलें म्हणजे तुला सोन्याची कुंची देईन म्हणून. ”

" मग, दिली सोन्याची कुंची देवाला ? खर्च बराच आला असेल. "

दर्याबाईः—" बराच आणि कमी. रिकामी पंचाईत म्हणतात ती यालाच. काय खर्च आला असेल तो माझा मला ठाऊक. मी वावगा खर्च करणारी बायको नव्हे, बरें डॉक्टर ? मीं काय केलें, समजलें का ? मुलगा पांच वर्षांचा होईपर्यंत मीं त्याचें नांवच ठेवलें नाहीं. पांच वर्षें जेव्हां संपलीं तेव्हां मीं त्याचें नांव ' सोन्या ' असें ठेवलें. नी मग एक खणांची कुंची करून ती देवाला दिली. इकडे नवसही फेडला आणि खर्चही वांचविला. "

आनंदरावांना हांसूं आलें. त्यांनीं नंतर विचारिलें:—" याचा जन्म इंदुरांतच झाला ? "

दर्याबाईः—" झालें. पुनः आणखी तेंच. इंदुरांत झाला असेल नाहीं तर बडोद्यांत झाला असेल. त्याचें आतां काय ? इतकी खडाखडा माहिती घेतल्याशिवाय तुह्मांला जर औषध देतांच येत नसेल तर तुह्मी आपले आलांत तसें निघून जा. मी दुसऱ्या डॉक्टरांना बोलावीन. " असें दर्याबाई त्रासून ह्मणाल्या. आपल्या खासगी गोष्टींत डॉक्टरांनीं मन घालणें त्यांना पसंत नव्हतें.

आनंदराव शांतपणानें ह्मणालेः—"बाई, अशा रागावूं नका. कित्येक वेळां रोगी कोणत्या प्रदेशांत रहात होता, त्याची जन्मभूमि कोणती, ही माहिती आम्हांला समजली म्हणजे औषधयोजना करावयाला फार मदत होते. आम्ही प्रश्न करितों ते रिकामटेंकडे ह्मणून नव्हे. बरें तें असो, याच्या गुडघ्याला काय झालें आहे पाहूं. "

नंतर दर्याबाईनीं मुलाच्या गुडघ्याला गुंडाळलेलें फडकें सोडिलें. आनंदराव गुडघा पहाण्याकारितां खालीं वांकले तरी त्या मुलाच्या चेहऱ्यापासून त्यांचे डोळे निघेनात. चेहऱ्यांत इतका कांहीं विशेष प्रकार होता असें नाहीं. फक्त डोळेच काय ते पहाण्यासारखे होते. चेहरा अगदीं फिकट व कृश दिसत होता, पण डोळ्यांत अशी कांहीं चमक होती व डोळ्यांची एकंदर ठेवण इतकी रमणीय होती कीं पहाणारा अगदीं

तल्लीन होऊन जाई. त्याच्या गुडघ्याला हात लावून आनंदरावांनीं विचारिलें:—" बाळ, आतां गुडघा दुखतो कायरे ? "

" नाहीं डॉक्टर. पण हा माझा शिपाई बघा, उभाच रहात नाहीं. " असें तो मुलगा बाळपणाच्या धिटाईनें एक बाहुली आनंदरावांकडे करून म्हणाला.

" आण इकडे पाहूं कसा उभा रहात नाहीं तो. याच्या पायाला करट झालें आहे वाटतें. दम धर हो, कापून काढूं या " असें म्हणून आनंदरावांनीं खिशांतील चाकू काढून त्या बाहुलीचा एक पाय थोडा तासून काढला. " आतां पहा बरें, उभा रहातो का ? "

त्या मुलाला मोठा आनंद झाला. त्यानें किती खटपट केली पण शिपायाला उभें केलें कीं तो खालीं पडे. आनंदरावांनीं त्याचा पाय जरा तासल्याबरोबर तो उभा राहिला. त्याबरोबर सोन्याच्या डोळ्यांत आनंदाचें विलक्षण तेज चमकूं लागलें. तें पाहून आनंदरावांना फारच मौज व कौतुक वाटलें. दर्याबाई तेथें नसत्या तर त्या मुलाच्या डोळ्यांकडे आनंदराव तासचे तास पहात उभे राहिले असते.

आनंदराव नंतर म्हणाले:—" हा मुलगा फार शांत दिसतो. "

दर्याबाई:—" शांत ! तुम्हांला पूर्वीची माहिती नाहीं. ह्याच्यासारखा हट्टी, हूड, त्रासिक, असा मुलगा मीं कुठें पाहिला नाहीं. म्हणेल तें खरें करील. त्याच्या म्हणण्याप्रमाणें झालेंच पाहिजे. पण हा विकार अंगीं जडल्यापासून मात्र अगदीं गरीब गाय झाला आहे हो. पूर्वीचें बाळसें गेलें, तरतरी गेली, हुषारी नाहींशी झाली, खाणें तर अगदींच कमी झालें. दिवसाच्या कांठीं सुपारीएवढा भातदेखील पोटांत जात नाहीं. बरें, हा विकार याला कसा जडला, याची कांहीं कल्पना होते कां ? कुठें पडला नाहीं, सवरला नाहीं, कांहीं लागलें म्हणावें, तर तसेंही नाहीं. "

आनंदरावांनीं उत्तर केलें:—" प्रकृति अशक्त असली म्हणजे हा विकार होतो. तसेंच कांहीं दुखापत झाल्यामुळेंही होतो. आतां या गांवांत कायम रहाण्याचा विचार आहे काय ? "

" पाहूं आतां. येथली हवा मुलाच्या प्रकृतीला कशी काय मानवते त्यावर अवलंबून आहे. माझ्या मनाची मी मुखत्यार आहें. अमुकच ठिकाणीं राहिलें पाहिजे अशी मी कांहीं बांधली गेलें नाहीं."

नंतर पथ्यापाण्याचें वगैरे सांगून आनंदराव तेथून निघून गेले. पण त्या मुलाचा चेहरा मात्र त्यांच्या डोळ्यांसमोरून हालला नाहीं.





# प्रकरण २ रें.

—:o:—

## विलक्षण साम्य.



खरोखरच त्या मुलाचे डोळे फारच मोहक होते. पहाणाऱ्यास अतिशय कौतुक वाटे व त्याची वृत्ति तल्लीन होऊन जाई.

वरील दिवशीं तिसऱ्या प्रहरीं इंदिरा व मोहना ह्या दोघी बहिणी देवदर्शनाकरितां ह्मणून घरांतून बाहेर पडल्या होत्या. दर्याबाईच्या घरावरून जात असतां ओसरीवर एक पलंगडी टाकलेली असून तिजवर एक मुलगा निजलेला त्यांनीं पाहिला. जवळच जमिनीवर कांहीं लाकडाचीं रंगीत खेळणीं पडलेलीं होतीं. मुलाला डुलकी लागली होती पण त्याचा चेहरा चांगला स्पष्ट दिसत होता. मोहनेची नजर त्याजकडे गेली; त्याबरोबर ती एकदम थबकली—

" अगबाई, हा काय चमत्कार! अगदीं हुबेहुब! "

इंदिरेनें विचारिलें—" म्हणजे? ताई, तूं ह्मणतेस तरी काय? हुबेहुब म्हणजे कोणासारखा? मुलगा अगदीं फिकट व रोगी दिसतो. कुठलीं माणसें आहेत कोण जाणे. सारजा ह्मणत होती कीं ह्या घरांत कोणी भाडेकरी राहिले आहेत ह्मणून. "

मोहना—" खरेंच आक्का, मी इतका हुबेहुब चेहरा साऱ्या जन्मांत

कधीं पाहिलेला नाहीं. तुला नाहीं दिसत ? " मोहनेची नजर सारखी त्या मुलाच्या तोंडाकडे लागली होती.

इंदिरा—" कोणासारखा हुबेहुब तूं म्हणतेस ? मला तर तसें कांहीं दिसत नाहीं. "

मोहना—" आक्का, हे तुझे डोळे कीं म्हणायचें तरी काय ? अजून ओळखत नाहींस ? बरें, तुला ओळखत नाहीं तर मीही पण सांगत नाहीं. खरेंच, अगदीं कसें तेव्हांच लक्षांत येतें. "

त्या पुढें जाणार इतक्यांत आंतून 'सोन्या–' अशी हाक त्यांना ऐकूं आली. त्याबरोबर मोहना इंदिरेला मागें ओढून म्हणाली—" ऐक ! "

" अरे सोन्या, पुनः निजलास वाटतें. खेळत बैस ह्मणून सांगितलें तें दिलेंस सोडून, आणि निजलास काय ? आतां मात्र मी नाहीं ऐकणार. दिवसा इतका निजतोस, मग रात्रीं कशाला झोंप येते ? उठलास कीं नाहीं ? ऊठ, जागा हो. " असें बोलत बोलत दर्याबाई बाहेर येऊन थडकल्या.

त्यांना इंदिरेनें म्हटलें—" मुलगा आजारी आहे वाटतें ? "

दर्याबाईः—" वाटतें कशाला ? आहेच आजारी. सकाळीं, सायंकाळीं जेव्हां पहावें तेव्हां आपला निजतो. मग रात्रीं कोजागरी. आपण जागायचें नि दुसऱ्याला जागवायचें, ह्मणून त्याला ऊठ म्हणतें. पण उठेल तेव्हां. "

इंदिराः—" आजारी माणसें बहुधा अशीं दिवसा निजतातच. तुह्मी परगांवाहून आला वाटतें ? "

" होय. ह्मटलें इकडच्या हवेनें तरी याला बरें वाटतें का पहावें ? ह्मणून आलें. " नंतर दर्याबाई त्या मुलाच्या हातावर टिचकी मारून ह्मणाल्याः—" सोन्या, अरे ऊठ. हे पाहिलेस का तुझे शिपाई सगळे पळून गेले. धर त्यांना, ऊठ, जागा हो. "

दर्याबाईचा मर्दानी आवाज, त्यांच्या टिचक्या व 'शिपाई पळून गेले' हे शब्द, यांनीं तो मुलगा पूर्णपणें जागा झाला. व आपल्या विशाल व काळ्याभोर डोळ्यांनीं त्या दोघी बायांकडे तो पाहूं लागला.

इंदिरा हळूंच म्हणाली:—" ताई, आतां आलें माझ्या ध्यानांत. खरेंच, अगदीं हुबेहुब. तस्सेच्या तस्से डोळे. एवढी सुद्धां चूक नाहीं."

मोहनेनें उत्तर केलें:—" छे, छे! डोळेच तेवढे सारखे दिसत नाहींत. त्यानें डोळे मिटले होते तेव्हां मला अगदीं हुबेहुब चेहरा दिसला.

" अग नीट पहा तरी ताई. तिच्या डाळ्याचें पाणी सुद्धां असेंच होतें. अगदीं अस्सेंच."

मोहना आश्चर्यानें म्हणाली:—" तिच्या डोळ्यांचें म्हणजे मी नाहीं समजलें. आक्का, तुझी कल्पना तरी कोणीकडे धांवली ही ?"

" अग कोणीकडे म्हणजे ? मला कमळजेची आठवण झाली. तिच्यासारखा मुलाचा चेहरा हुबेहुब आहे."

नंतर दर्याबाईकडे वळून इंदिरेनें म्हटलें:—" कुणाचा मुलगा हा ? माझ्या एका—एका मैत्रिणीसारखा अगदीं हुबेहुब याचा चेहरा आहे."

" असेल. पण हा माझाच मुलगा." येवढेंच उत्तर आलें.

इंदिरेनें दुःखाचा उसासा टाकला. कमळजेविषयीं कांहीं गोष्ट निघाली किंवा विचार आला कीं तिला असा उसासा नेहमीं येत असे. पण आतांच्या उसाशांत आरामाचें मिश्रण होतें. आराम कां वाटला हें सांगतां येणें कठीण आहे. पण तिच्या कष्टी अंतःकरणास थोडासा आराम वाटला एवढी गोष्ट खरी.

" असा सारखेपणा कां असावा हें सांगतां येत नाहीं." असें जातां जातां इंदिरा दर्याबाईंना ह्मणाली. पण त्यांनीं ऐकिलें न ऐकिलेंसें केलें. त्या दोघी बहिणी चालूं लागल्या.

मोहना—" आक्का, आमच्या कमळजेसारखा का तो मुलगा दिसतो ? खचित तुझ्या बुद्धीला भ्रम झाला असावा."

इंदिरा—" म्हणजे! अगदीं हुबेहुब आहे, असें तूंच पहिल्यांदा ह्मणालीस ना ?"

" अग हो, पण कमळजेसारखा नाहीं म्हटलें. तिच्यासारखा मुळींच त्याच चेहरा नाहीं."

" तर मग कोणासारखा ह्मणालीस ? " इंदिरेनें आश्चर्यानें विचारिलें.

" तें नाहीं मी सांगत. कमळजेसारखा नाहीं एवढें खरें. " असें मोहनेनें स्पष्ट उत्तर दिलें.

इंदिरा—" ताई, त्या मुलाचे आणि कमळजेचे—आणखी कांहीं थोडेसे लीलेचे—पण लीलेचे जरा बारीक आहेत—जसे डोळे आहेत तसे डोळे या जगांत दुसऱ्या कोणाचे असतील असें वाटत नाहीं. इतके मोठे, इतके तेजस्वी व इतके नाजूक आणि सुरेख हं ? तुझेही डोळे तसेच आहेत पण पाणी तसें नाहीं. कमळजा जशी होती तसा अगदीं हुबेहुब ! केवढें आश्चर्य वाटतें ? "

इंदिरेचें बोलणें ऐकून मोहना थबकली. " थांब हो, मी पुनः ऊन पहातें " असें ह्मणून ती परतली व त्या मुलाबरोबर थोडा वेळ लत उभी राहिली. तिचें सर्व लक्ष्य त्या मुलाच्या तोंडाकडे होतें. दर्याबाई तेथेंच होत्या, पण मोहनेनें त्यांच्याकडे लक्ष्यच दिलें नाहीं. जातांना मात्र मोहनेनें त्यांच्याकडे पाहून नाक उरडलें व कपाळास आंठ्या घातल्या.

मोहना परत आल्यावर इंदिरेनें विचारिलें:—" कसें काय ? ',

" काय असायचें ? जें आहे तेंच. कमळजेसारखा कांहीं नाहीं असें मी पुनः ह्मणतें. दुसऱ्या एकासारखा तो मला दिसतो पण डोळ्यांत सारखेपणा आहे म्हणून नव्हे. शिवाय तो निजला होता. डोळे मिटले होते, तेव्हां जितकें मला आश्चर्य वाटलें तितकें जागेपणीं वाटत नाहीं. "

इंदिरा:—" चमत्कारच म्हणायचा ! "

" कसला चमत्कारच ? "

" साराच चमत्कार ! कमळजेसारखा मला तो दिसला हा एक चमत्कार. तुला तसें वाटत नाहीं हा दुसरा चमत्कार. दुसऱ्या कोणासारखा तो तुला दिसतो हा तिसरा आणि कोणासारखा दिसतो तें तूं सांगत नाहींस हा चवथा चमत्कार. मिळून चमत्कारांची कमालच झाली ह्मणायची. ताई, आपल्या घरच्या कोणासारखा तो तुला दिसतो काय ग ! "

" आमच्या जहागीरदाराच्या घराण्यांतल्या ! छे छे ! मुळींच नाहीं. पण आक्का, कमळजा जशी होती असें तूं म्हणालीस, होय ना ? होती असें कां म्हणतेस ! आतां ती जिवंत नाहीं, असें का तुला वाटतें ? "

सुस्कारा टाकून इंदिरेनें उत्तर दिलें:—" तसेंच तर दुसरें काय म्हणूं ? इतकीं वर्षें गेलीं, तिचा कांहींच पत्ता नाहीं. बाबांनीं मरते वेळीं तिचा तपास कर म्हणून मला सांगितलें आहे; पण कांहीं धागा लागत नाहीं. ऐकण्यांतही कांहीं येत नाहीं. यावरून मला यश येईल असें दिसत नाहीं."

मोहना जरा खोंचून म्हणाली:—" ती मेली असें जर तुला खात्रीनें वाटत असेल तर बाबांनीं तिला जे पांच हजार रुपये दिले आहेत ते तूं घे जा. " आपणाला कांहीं दिलें नाहीं ही गोष्ट अद्यापि तिच्या मनांत डांचत होती. इंदिरा शांतपणानें म्हणाली:—" नाहीं, नाहीं. तिचा पैसा मी घेणार नाहीं. माझें मला पुष्कळ आहे. "

वाचकहो, त्या मुलाचा चेहरा पाहून ह्या दोघी बहिणींचा मतभेद झाला याबद्दल तुम्हांला आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. आपणां सर्वांना ही गोष्ट माहीत आहे कीं जेथें एकाला साम्य दिसतें तेथें दुसऱ्याला दिसत नाहीं. कोणाला शरीराच्या बांध्यांत साम्य दिसतें तर कोणास तोंडावळ्यामध्यें दिसतें; कोणी म्हणतो:—" तें मूल किती आपल्या बापासारखें दिसतें हो ! " तर दुसरा म्हणतो:—" छे छे ! आईसारखें हुबेहूब आहे. " आणि दोघांचेंही म्हणणें बरोबर असतें. सारख्या भावांचीच गोष्ट घ्या. त्यांचें नातें ठाऊक नसलें तरी नुसत्या तोंडावळ्यावरून हा त्याचा भाऊ आहे असें एखादा म्हणेल. पण दुसऱ्याला तसें कांहीं वाटणार नाहीं; त्याच्या दृष्टीला साम्य दिसणार नाहीं. तुम्हांला सुद्धां याचा अनुभव आला असेलच. त्याचप्रमाणें या दोघी बहिणींची स्थिति झाली. एकीला दिसलें तें दुसरीला दिसेना. पण त्यांतल्या त्यांत चमत्कार तो हा कीं त्या मुलाच्या चेहऱ्यांत, एकाच मनुष्याशीं नव्हे असें विलक्षण साम्य त्या दोघींसही दिसून आलें.

इकडे संध्याकाळीं आनंदराव एका बाईची तब्येत पाहण्याकरितां गेले होते, तेथें मैनाईची व त्यांची गांठ पडली. मैनाईच्या अंगांत कांहींही

दोष असोत पण ती फार हुषार व चतुर बायको असून प्रसंगास पाठ देणारी होती. आणि प्रसंग आला म्हणजे तिची कर्तृत्वशक्ति जशी दिसे तशी कधींही दिसत नसे. ती नेहमीं म्हणे:—" एखादा कठिण प्रसंग आला म्हणजे माझ्या अंगांत संचार झाल्यासारखें होतें. माझी करामत काय आहे ती तेव्हां लोकांना दिसते." अशी स्थिति होती म्हणून मैनाई मोठी भाग्यवान् म्हणावयाची, नाहीं तर यापूर्वीं केव्हांच ती कोठें तरी कोंपऱ्यांत पडून तिला कोणींही विचारिलें नसतें.

आनंदराव मैनाईबरोबर गप्पा मारीत बसले होते, पण त्यांच्या गप्पांना मधून मधून विघ्न येई; कारण एखाद्या मोठ्या यात्रेंत चुकलेल्या कुत्र्याप्रमाणें मैनाई एकदां या खोलींत, एकदां त्या खोलींत, अशी सारखी आंत बाहेर करीत होती. तितक्यांत तिनें विचारिलें:—" डाक्तर, मग त्या दर्याबाईकडे गेलां होतां का ? "

" होय, सकाळीं गेलों होतों. कोठून आल्या आहेत ? " असें आनंदराव म्हणाले. पण त्यांच्या बोलण्याकडे विशेष लक्ष्य न देतां मैनाई म्हणाली:—" मुलग्याची धडगत दिसत नाहीं, नाहीं ? "

" त्याच्या औषधपाण्याची बरोबर व्यवस्था झाली नाहीं, असें मला वाटतें. त्या बाई कोठून आल्या आहेत, या गांवांत त्यांचें काय काम आहे, हें तुला समजलें आहे काय ? "

" कोठल्याशा गांवाहून—इंदुराहून कीं बडोद्याहून आपण आलों असें त्या म्हणत होत्या. आतां या गांवांत त्यांचें काय काम आहे हा वेगळा प्रश्न. "

मैनाईचें बोलणें आनंदरावांना जरा विलक्षण वाटलें ह्मणून त्यांनीं दरडावून विचारिलें—" ती बाई येथें कां आली आहे याची तुला कांहीं कल्पना होते काय ? "

" कल्पना होय ? हो. न व्हायला काय झालें ? माझी कल्पना चुकीची ठरेल नाहीं तर बरोबर ठरेल. त्याचें मला नाहीं इतकें वाटत. पण तें ऐकून तुम्हांला काय करायचें, डॉक्टर ? "

आनंदराव थोडे उत्सुकतेनें, थोडे निष्काळजीपणानें म्हणाले—" हं, चालूं दे, सांग. येथें ती कोणत्या कामाकरितां आली आहे, सांग. "

मैनाई आतां कुजबुजूं लागली—" डॉक्टरसाहेब, तुम्हांला आठवण आहे कीं नाहीं ? ती—प्रतापराव डॉक्टरांच्या औषधानें मावशीबाईच्या घरीं एकाएकीं बाळंतीण मेली ती-त्यावर तुमच्याकडे हजारों रोगी आले असतील. किती वर्षें झालीं त्याला ! तिची तुम्हांला आठवण दिखील नसेल. "

" त्या बाळंतिणीच्या संबंधानें काय ? " असें आनंदरावांनीं विचारिलें. त्यांची छाती दडपून गेली व आवाज अगदीं खोल गेला.

" डॉक्टर, मला आपलें असें वाटतें कीं ती बाळंतीणबाई कशी मेली, केव्हां मेली, कुणाच्या औषधानें मेली ह्याचा तल्लास काढण्याकरितां ही बाई येथें आली असावी. दुसरें कारण कांहीं दिसत नाहीं. "

यावर आनंदराव कांहीं बोलले नाहींत. ज्या उत्सुकतेनें ते त्या मुलाच्या तोंडाकडे पहात होते तितक्याच उत्सुकतेनें ते आतां मैनाईकडे पहात राहिले. त्यांच्या मनाची फार तेधा उडून गेली होती, पण त्यांच्या शांत चेहऱ्यावर कांहींच चलबिचल दिसली नाहीं. थोड्या वेळानें ते ह्मणाले—

" केवढा खुळेपणा हा ! "

मैनाईनें उत्तर केलें—" मी तरी तेंच ह्मणतें. आणि त्या बाईला तरी यापासून काय मिळणार ? ती बिचारी मेलेली बाळंतीण कोण, कुठची रहाणारी होती, औषधाचें विष कसें झालें, हा तपास लागला तर कांहीं उपयोग. पण अजून तरी तसा कांहीं तपास लागला नाहीं. मी हेंच माझ्या तोंडानें दर्याबाईला स्पष्ट सांगून टाकलें. "

" एकूण तूं यासंबंधानें त्या बाईजवळ बोललीस तर ? "

" बोललें तर. माझी आणि तिची स्टेशनावर गांठ पडली. आह्मी दोघीजणी एकाच गाडींत बसून आलों. तेव्हांपासून विचारून विचारून तिनें माझी पुरेवाट केली. "

" स्टेशनावर ती केव्हां ? " आनंदरावानीं विचारिलें.

गप्पाशिवाय दुसरा विषय मैनाईला क्वचितच आवडे. म्हणून आनंदरावांनीं विचारल्याबरोबर दर्याबाईची गांठ कशी व कुठें पडली, केव्हां पडली, तिनें काय विचारिलें, आपण काय सांगितलें वगैरे इत्थंभूत हकीगत मैनाई सांगूं लागली. आनंदराव शांतपणानें ती हकीगत ऐकत होते व त्यांचें मनन चाललें होतें. तिची हकीगत सांगून झाल्यावर आनंदराव ह्मणाले—" ही गोष्ट तूं कोणाजवळ बोलली आहेस काय ? "

" मी ? छे छे ! मी कुणाजवळ बोललें नाहीं, शिवाय त्या बाईनेंही 'कोणास कळवूं नको' ह्मणून मला ताकीद दिली आहे. " असें मैनाई ह्मणाली. " सारजेला तिनें ही हकीकत सांगितली होती पण याची तिला आठवण नव्हती. "

आनंदराव ह्मणाले—" मैनाई, आणखी मीही तुला सांगून ठेवतों, ही गोष्ट तूं कोणाजवळ बोलूं नकोस. तुला आठवण नसेल, पण या कामीं मला किती त्रास झाला व केवढी दगदग पडली तें मी अद्याप विसरलों नाहीं. त्या सर्व प्रकरणाचा अखेर निकाल लागेपर्यंत माझ्या सभोंवार रिकामटेकड्या व उपद्व्यापी लोकांचा रात्रंदिवस नुसता गराडा पडला होता, गराडा. माझा धंदा सुद्धां त्यांनीं मला करूं दिला नाहीं, समजलें ? तीच गोष्ट पुनः उकरून काढण्यांत येईल तर फिरून आणखी मला असा त्रास होईल, म्हणून म्हणतों कीं कोणाजवळ यासंबंधानें चकार शब्द काढूं नकोस. दर्याबाईनींही तुला बजाविलें आहेच. बरें पण, मी म्हणतों, त्यांनीं तरी तुला असें बजावलें, यांत त्यांचा काय हेतु असेल बरें ? "

मैनाई—" ती मला कांहीं बोलली नाहीं. आपला असा असा हेतु आहे, अगर कांहीं तपास लागला तर आपणाला कळीव असें कांहीं ती बोलली नाहीं. पण मनुष्य जेव्हां खोदून खोदून तीच तीच हकीकत पुनः पुनः विचारूं लागतो तेव्हां त्यांत कांहीं तरी मुळाशीं हेतु असलाच पाहिजे. "

आनंदराव विचार करीत म्हणाले:—"ही कोण बाई आहे कोण जाणे. "

ती स्वतःसंबंधीं अगदीं गुपचूप आहे. कांहीं देखील सांगत नाहीं. "

यावर आनंदराव जास्त बोलले नाहींत. त्यांना आंत कोणींशी हाक मारिली म्हणून ते तिकडे गेले. सुमारें अर्ध्या तासानें तेथील काम आटोपून ते आपल्या घरीं गेले.

आनंदराव घरीं पोंचले खरे, पण त्यांचें डोकें अद्यापि विचारांत भ्रमण करीत होतेंच. दर्याबाई हें नांव, मैनाई सुइणीनें दिलेली बातमी, यावरून त्यांना साहजिकच असें वाटूं लागलें कीं, " ज्या बाईनें कलावतीचें मूल नेलें व जी बाई आपणांला स्टेशनावर भेटली होती तीच ही बाई असावी. तसें असेल तर मग तेंच का हें मूल ? सकाळीं मुलाचें वय बाईला विचारलें तेव्हां ती सात वर्षें ह्मणाली. दिसण्यांतही या मुलाचें वय सात वर्षांपेक्षां जास्त दिसत नाहीं. तो मुलगा जिवंत असता तर आज नऊ वर्षांचा असता—म्हणजे यापेक्षां बराच मोठा दिसला असता. पण—पण मुलाचें वय त्याच्या चेहऱ्यावरून केव्हांही बरोबर समजत नाहीं. कदाचित् हेंच तें मूल असेलही. " इत्यादि विचार त्यांच्या मनांत घोळूं लागले.

घरीं गेल्याबरोबर आनंदराव आपल्या दवाखान्यांत गेले व बाटलींत एक औषध तयार करून घेऊन खिशांतील घड्याळाकडे पहात पहात ते बाहेर पडले.

त्यांच्या घरापासून थोडक्याच अंतरावर एक चित्रांचें दुकान होतें. खिडकींत एक चित्र—एक ढोलगें वाजविणारा शिपाई—असल्याचें त्यांनीं पाहिलें. त्या चित्राच्या मागल्या बाजूला एक तार होती ती ओढली कीं शिपाई हातांनीं ढोलगें वाजवी. आनंदरावांनीं बारा आणे देऊन तें चित्र विकत घेतलें व ते जलदीनें चालूं लागले.

आनंदराव थेट दर्याबाईच्या घरीं गेले. बाई डाळतांदूळ नीट करीत बसलेली होती व जवळच सोन्या एका ताटलींत पानगी घेऊन खात बसला होता. मधून मधून दर्याबाईशीं त्याच्या गप्पा चालल्या होत्याच.

" आतां कसें आहे गुडघ्याचें ? " आनंदरावांनीं विचारिलें. त्याबरोबर दर्याबाई त्यांच्याकडे आश्चर्यानें पाहूं लागल्या. डॉक्टर पुनः संध्याकाळीं येतील असें त्यांना वाटलें नव्हतें.

आनंदराव खिशांतून बाटली काढून ह्मणाले—" सकाळीं मी बोललों नाहीं, पण याला कांहीं तरी पुष्टीचें औषध दिलें तर बरें असें मला वाटतें. ह्मणून मी तें घेऊन आलों आहें. पथ्य वगैरे सांगितलें तेंच. सोनूबाळ, तुह्मी तिकडे काय चालविलें आहे ? "

दर्याबाईनीं उत्तर दिलें—" या वेळीं त्याला फार भूक लागते, आणि दुसरें तिसरें कांहीं खायचा नाहीं. पानगी पाहिजे. ती नाहीं करून दिली कीं बसलाच अडून. "

" असेना. पानगी कां खाईना. तांदळाच्या पिठाची असते, ती कांहीं बाधायची नाहीं. बरें, आतां मी आलोंच आहें तर याचा एकदा गुडघा पाहूं. "

गुडघा पाहून झाल्यानंतर आनंदरावांनीं खिशांतील चित्र बाहेर काढून ह्मटलें—" बाळ, तुझे ते शिपाई परेड करूं लागले म्हणजे ढोलगें वाजवायला कोणी नको काय ? हा घे शिपाई; कसा ढोलगें वाजवायला लागला बघ. "

चित्र पहातांच त्या मुलाला अत्यानंद झाला व हर्षभरानें त्याचे नेत्र चमकूं लागले. दर्याबाईनीं आनंदरावांस आभारपूर्वक म्हटलें—" डॉक्टर, तुह्मी मुलांचे बरेच हौशी दिसतां हो. नाहीं तर कोण इतकें मुद्दाम चित्र विकत आणून द्यायला बसलें आहे ? "

आनंदराव—" त्यांत काय मोठेंसें ? येतांना दुकानांत एक चित्र दिसलें. म्हटलें तें या मुलाला दिलें तर तितकें त्याला बरें वाटेल. अशा गरीब, अशक्त मुलांना असलीं निरुपद्रवी खेळणींच बरीं. जातों तर आतां. औषध द्यायला विसरूं नका हो ! कांहीं दिवस याला चांगलें जपलें पाहिजे. "

असें ह्मणून आनंदराव जावयाकरितां निघाले. दर्याबाईही त्यांच्या पाठीमागून दरवाज्यापर्यंत आल्या. त्यांना डॉक्टर ह्मणाले—" कांहीं घाबरायचें कारण नाहीं. चार आठ दिवस जपा म्हणजे झालें. " इतकें सांगून आनंदराव लगबगीनें घराकडे निघाले.

संध्याकाळचा अंधार पडत चालला होता, तरी आनंदरावांनीं मागें वळून पाहिलें असतें तर त्यांना फार आश्चर्य वाटलें असतें. मागच्या बाजूस तिकडून त्यांची बायको-मोहना-ही येत होती. ती कोठें निघाली होती तिचें तिलाच माहीत; पण पुनः एकवार त्या मुलाला पहावें अशी तिची इच्छा होती. दर्याबाईच्या घराजवळ येते तों आनंदराव आंतून बाहेर पडतांना व दर्याबाईशीं कांहीं बोलतांना तिला दिसले. त्याबरोबर ती चपापली व त्यांना दिसूं नये ह्मणून एका झाडाच्या आड उभी राहिली. एखादें नीच, खोडसाळपणाचें कृत्य करीत असतांना दुसऱ्यानें पाहिलें म्हणजे जशी मनाची स्थिति होते तशी तिची झाली.

आनंदराव इकडे तिकडे बिलकुल न पहातां जलदीनें निघून गेले. ते दिसेनासे झाल्यावर मोहना झाडाच्या आडून पुढें आली पण भीत भीतच चालूं लागली. खरें म्हटलें तर इतकें भिण्याचें कांहीं कारण नव्हतें. आनंदरावांनीं तिच्या-नवऱ्यानें-तिला पाहिलें असतें तरी काय ? संध्याकाळची वेळ, देवदर्शन घ्यायला पुष्कळ बायका बाहेर पडतात, त्याप्रमाणेंच मीही बाहेर पडलें होतें असें तिला सांगतां आलें असतें. पण ह्मण आहे ना ? 'चोराच्या मनांत चांदणें' या वेळीं इकडे येण्यांत तिचा दुसराच हेतु होता आणि म्हणूनच आनंदरावांना पाहून ती इतकी चपापली.

दर्याबाईच्या घरांतून आनंदराव निघाले तेव्हां सोन्याही बाहेर दरवाजांत आला होता. त्याच्या हातांत तें चित्र तसेंच होतें. ज्यांनीं आपणास हें नवें चित्र दिलें त्या आनंदरावांना जणूं निरोप देण्याकरितां तो दरवाजा-पर्यंत आला होता. त्याचा गुडघा दुखत होता तरी लंगडत लंगडत तो चालत आला होता. आनंदराव निघून गेले. दर्याबाईही आंत गेल्या. पण तो मुलगा रस्त्याकडे पहात तसाच तेथें उभा होता. त्याच्याकडे पहात मोहना उभी राहिली. चांगली अर्धी घटका त्याच्या तोंडाकडे न्याहाळून पहात ती उभी होती. मुलगा इतर अशक्त मुलांप्रमाणें भितरा व लाजाळू नव्हता. तोही तिच्या तोंडाकडे पाहूं लागला.

बराच वेळ त्याच्या चेहऱ्याकडे निरखून पाहिल्यावर मोहनेनें त्याला विचारिलें—" बाळ, तुझें नांव सोन्या कायरे ? "

" होय. "

" तुझें आडनांव काय देशमुख होय ? "

" होय. "

" तुझ्या आईचें नांव काय ? "

" आईचें नांव ? आई. "

" मघाशीं येथें उभी होती तीच का तुझी आई ? "

" होय, तीच माझी आई. "

हें ऐकून मोहनेचा चेहरा काळवंडला. तिनें पुढें विचारिलें—

" तुला भाऊ बहिणी किती ? "

" कुणी नाहीं. मी एकटाच. मला एक भाऊ होता. पण आई ह्मणते तो मी जन्मायच्या आधींच देवाच्या घरीं गेला. "

नंतर बराच वेळ कोणीही बोललें नाहीं. मोहना आपल्या डोळ्यांनीं तें मूल न्याहाळीत होती. तिनें पुनः विचारिलें:—

" तुझा बाप कुठें आहे रे ? "

" माझा बाप ! बाबा होय ? ते देखील देवाच्याच घरीं गेलेत. "

" अस्सें, अस्सें, तरी म्हटलें या बाईच्या कपाळाला कुंकू का नाहीं असत ? " असें म्हणत मोहना त्या मुलाच्या कोटाचीं बटणें निघालीं होतीं तीं आपल्या हातांनीं घालूं लागली.

नंतर " हें पहा " असें ह्मणून त्यानें आपल्या हातांतील चित्र तिला दाखविलें.

" वाः फार छान आहे रे. " असें ती जरा निष्काळजीपणानेंच ह्मणाली. इतक्यांत तिला आठवलें कीं आपल्या घराशेजारीं जें दुकान आहे त्या दुकानांत असलें चित्र आपण पाहिलें होतें, ह्मणून तिनें विचारिलें—

" तुला कोणीं दिलें रे हें चित्र ? "

" आनंदराव डॉक्टर आतांच तें देऊन गेले. " असें ह्मणून सो-

ऱ्यानें तार ओढली. त्याबरोबर शिपाई ढोलगें वाजवूं लागला. सोन्या म्हणाला—" बाकीचे परेड करूं लागले कीं ह्यानें ढोलगें वाजवायचें. डॉक्टर असें ह्मणत होते."

" बाकीचे कोण ?"

" माझे शिपाई. आणखी किती तरी आहेत! आतां रात्र झाली ह्मणून ते निजायला गेले. हे बघा, त्या कपाटांत आईनें त्या रुवांना कोंडून ठेवलें आहे. सकाळीं उजेडलें कीं मग त्यांना बाहेर काढायचें. आई म्हणत होती."

मोहनेला वाईट वाटून ती ह्मणाली—" तर मग हें चित्र तुला डॉक्टरांनीं आणून दिलें तर ? आतां नुकतेंच आणून दिलें का ?"

या प्रश्नाकडे सोन्यानें लक्ष्यच दिलें नाहीं. तो त्या चित्राकडे पहात होता. तो म्हणाला—" डॉक्टरांनीं हें चांगलें केलें. कसें ढोलगें वाजवितोय पहा तरी. आई म्हणत होती—"

इतक्यांत " सोन्या, अरे सोन्या, रात्रभर तेथेंच का उभा रहाणार ? चल, आंत ये. आलास कीं नाहीं ?" असा दर्याबाईचा कर्कश आवाज बाहेर ऐकूं आला. त्यासरशी मोहना तेथून निघाली व तिनें आपल्या घरचा रस्ता धरला.





# प्रकरण ३ रें.

——:०:——

## पळत जाऊन धांवत आले.





मोहना घरीं येऊन पोंचली, पण संतापानें अगदीं लाल झाली होती. त्या मुलाचा चेहरा हुबेहूब तिच्या नवऱ्याच्या—आनंदरावांच्या—चेहऱ्यासारखा तिला दिसला. इतका सारखेपणा पाहून तिला फारच आश्चर्य वाटलें, व साहजिकच तिच्या मनामध्यें वाईट कल्पना येऊं लागल्या. आनंदरावांच्या वर्तनासंबंधानें मागें तिला संशय आला होता, त्याची तिला आठवण झाली. आनंदरावांचें आपणावर अकृत्रिम प्रेम नाहीं, त्यांनीं आपणाला लटकी माया दाखवून शेवटीं फसविलें, असें आतां खास तिच्या मनानें घेतलें व त्यामुळें तिला मनस्वी दुःख झालें. तिला अतोनात संताप चढून नागिणीप्रमाणें ती क्रोधभरानें धुसफुसूं लागली. त्या संतापाच्या भरांत संभवनीय गोष्टी कोणत्या हें सुद्धां तिच्या लक्ष्यांत आलें नाहीं. त्या मुलाची आई दर्याबाई—इच्यासंबंधानें मोहनेच्या अंतःकरणांत मत्सराग्नि प्रदीप्त झाला व त्याच्या ज्वालांनीं तिचें सर्वांग रसरसून गेलें. वयानें दर्याबाई इतकी पोक्त होती कीं ती आनंदरावांची आई शोभेल. पण ह्मणून काय झालें ? बरें, रूपानें म्हणावें तर अगदीं कुरूप, हिडीस; नाजुकपणा तर बिलकुल नाहीं, अंग अगदीं राकट,

घोरपडीसारखें; बायकोपणा तिच्या ठिकाणीं कसला तो नव्हता; म्हणून तरी काय? कुब्जेसारखी ती जरी आठ ठिकाणीं वांकडी असती तरी सुद्धां कांहीं अंतर पडलें नसतें. मोहनेच्या मनानें एकदां जो संशय घेतला तो कायमच होऊन बसला.

त्या दिवशीं तिसऱ्या प्रहरीं मोहना इंदिरेबरोबर दर्याबाईच्या घराकडे गेली होती तेव्हां आनंदरावांच्या चेहऱ्याशीं साम्य तिनें पाहिलें–किंवा पाहिलेंसें तिला वाटलें. त्यायोगानें तिच्या मनामध्यें फक्त संशयच उत्पन्न झाला होता. तिच्या अंतःकरणांत नुसता विकल्प आला होता. हा विकल्पाग्नि तसाच तेथें धुमसूं लागला आणि जसजशी संध्याकाळ होऊं लागली, तसें मोहनेला–हिच्यासारखी संशयखोर स्त्री दुसरी असणें अशक्य-पुनः तिकडे जावेंसें वाटलें व ती गेलीही. पण ही वेळ मोठी वाईट लागली. कारण तेथें तिनें जो प्रकार पाहिला त्यायोगानें तर तिच्या मनाची पक्की खात्रीच होऊन गेली. मग काय? तिच्या अंगाचा नुसता जळफळाट होऊं लागला. ती घरीं गेली, पण ज्याच्या त्याच्यावर कावावें, संतापावें, वाटेल तें बोलावें असा प्रकार चालला. नोकरांना वाटलें, धनीसाहेब घरीं नाहींत म्हणून बाईसाहेब रागांत आहेत; ते आले म्हणजे सर्व कांहीं समजूत होईल.

इकडे धनीसाहेब–आनंदराव–दर्याबाईच्या मुलाला चित्र देऊन परत निघाले ते मैनाई सुईण ज्या बाईच्या बाळंतपणासाठीं गेली होती त्या घरीं गेले. डॉक्टरांनीं पुनः तेथें जावें अशी कांहीं आवश्यकता नव्हती किंवा ते येतील असें कोणास वाटतही नव्हतें. अर्थातच त्यांना पहातांच मैनाईला फार आश्चर्य वाटलें. डॉक्टर तिला म्हणाले—" सर्व कांहीं ठीक आहे कीं नाहीं हें पहाण्याकरितां आलों; दुसरें कांहीं काम नव्हतें." नंतर इकडचें तिकडचें बोलणें काढून ओघा ओघानें दर्याबाईच्या मुलाच्या दुखणाऱ्या गुडघ्यापर्यंत त्यांनीं मजल आणून पोंचविली. ते सहज ह्मणाले—" कांहीं कमी नाहीं हें खरें, पण त्या मुलाला सात्विक अन्न घातलें पाहिजे."

मैनाई—" मग घालतातच नाहीं तरी सात्विक अन्न. मुलाला जप-

णारी, व त्याच्यावर माया करणारी दर्याबाईसारखी आईच मिळायची नाहीं. आतां स्वभावानें थोडी रागीट आहे. असू द्या. त्या मुलानें आज सोनें खातों ह्मटलें तरी देखील ती कमी करणार नाहीं. जवळ पैसा रग-ड्डून आहे. मग कमी काय ? ”

“ ती कोण असावी याची कल्पना नाहीं होत ! ”

“ नाहीं का ? माझी कल्पना तर अशी आहे कीं मूल घेऊन गेलेली ती हीच बाई. पहिल्यानें मला ओळख लागली नाहीं, पण मागाहून सगळें आठवलें. ”

“ असेल, असेल, तीच असेल. पण ध्यानांत ठेव हो ! अगदीं गप्प-चिप्प. एक शब्द सुद्धां कोणाजवळ बोलूं नकोस. ” असें आनंदराव बाहेर पडत पडत म्हणाले. “ त्याची काळजी नको ” असें मैनाईनेंही आश्वा-सन दिलें.

आनंदराव तेथून निघून वरीं गेले. पण माजघरांत असलेल्या झोंपा-ळ्यावर आपली प्रियपत्नी दिसली नाहीं तेव्हां त्यांना फार आश्चर्य वाटलें. रोज या वेळीं आनंदरावांची वाट पहात मोहना ह्या झोंपाळ्यावर बसलेली असावयाची; पण आज नव्हती. आनंदराव जिना चढून माडीवर दिवाणखान्यांत गेले व कपडे वगैरे काढून आपल्या खोलींत जाऊन पाहूं लागले तर राणीसाहेब पलंगावर निजलेल्या त्यांच्या दृष्टीस पडल्या. नोकरांप्रमाणें त्यांनींही ओळखलें कीं आज तब्येत जरा गरम झाली आहे; ती थंड केली पाहिजे. येतांना त्यांनीं थोडीं द्राक्षें विकत आणलीं होतीं; तीं एका बशींत घालून ते पलंगाजवळ गेले, व प्रेमानें म्हणाले—“ प्रिये, तुला द्राक्षें आवडतात नव्हे काय ? हीं घे. ”

त्याबरोबर मोहनेच्या कपाळाला आंठ्या पडल्या व भ्रुकुटी वक्र झाल्या. ती ताडदिशीं पलंगावरून उठून बाजूस उभी राहिली व झण-कान्यानें ह्मणाली—“ मला ‘ प्रिये ’ असें ह्मणून दुःखावर डागण्या देण्यांत अर्थ काय ? आवडीचीं माणसें गांवांत थोडीं का आहेत ! तिक-डेच जावें आणि मला द्यावें सोडून. आतां तरी सोडलेंच आहे ह्मणा. ”

इतका गहजब ऐकून आनंदराव अगदीं भांबावून गेले; त्यांच्या कांहींच लक्ष्यांत येईना. हिला इतका त्रास होण्यास आपण कारणीभूत झालों नाहीं, आपण अगदीं निरपराधी आहोंत असें ते समजत होते. त्यांनीं विचारिलें—" पण झालें काय तें तरी समजूं दे. "

" समजावयाचें काय ? सगळें समजतें. स्वतःचें मनच सांगेल. वेड घेऊन पेड पांघरायचें झालें. पण मी ह्मणतें, इतकें का ह्मणून मला छळायचें तें ? "

" मीं तुला छळलें नाहीं, अगर तुझें मन दुखविलें नाहीं माझ्याकडून तुझ्यासंबंधानें कांहींच गैर झालेलें नाहीं. तुला इतका राग कां आला ? सांगितल्याशिवाय कसें समजेल ? "

मोहनेला गहिंवर आला व ती रडूं लागली—" माझ्याकडूनच गैर झालें, दुसऱ्या कुणाकडून नाहीं. बाबांच्या घरीं सुखासमाधानांत, आनंदांत होतें; मला ही अवदसा आठवली ! तें घर सोडून मी आलें. किती वेडी ! नी यांत मला मिळालें तरी काय ? बाबांचा राग झाला नी त्यांनीं मला आपल्या जिनगीपैकीं एक पैसा सुद्धां दिला नाहीं. बाकीच्या माणसांनींही मला टाकलें. हें मी ओळखूनच होतें ह्मणा. पण इकडच्या जिवावर आजपर्यंत खुशाल होतें तिकडूनही फशीं पडलें. "

" खरोखरच मी शपथपूर्वक सांगतों कीं माझ्याकडून कांहीं गैर झालेलें नाहीं. तुला काय बोलायचें असेल तें एकदां स्पष्टपणें बोलून टाक; म्हणजे समजेल तरी. "

मोहना खोंचून ह्मणाली—" समजून घ्यायचें मनांत असलें म्हणजे सारें समजतें. माहीत नसेल तर स्पष्टपणीं बोलायचें ना ? इकडे सगळें माहीत आहे. खरेंच ही किती लाजिरवाणी गोष्ट ? माझ्याकडून कोणती अशी चूक झाली ती तरी पदरांत घालायची होती ? विनाकारण माझे धिंडवडे करावयाचे नव्हते ! थोरामोठ्यांची, जहागीरदारांची मुलगी मी—"

" तुझें डोकें आज ताळ्यावर दिसत नाहीं. मीं काय केलें ? कसले धिंडवडे मीं केलें ? " असें आनंदराव ओरडून ह्मणाले. आपली बायको आज शुद्धीवर नाहीं असेंच त्यांना वाटूं लागलें.

आनंदरावांच्या बोलण्यानें मोहनेचा संताप जास्तच वाढला. जवळ-जवळ ती भ्रमिष्टच झाली म्हणावयाची. तिनें उत्तर केलें:—" मला आतां जास्त चिडवूं नये, आणि आपलें समर्थन करण्याच्या भानगडींतही पण पडूं नये. स्वतःसंबंधानें थोडासा विचार करून पहावा; स्वतःच्या वर्तनासंबंधानेंही विचार करावा. पुरुष असे वागूं लागले तर त्यांत बायकांना कमीपणा आहे, त्यांची अब्रू जाते, नांवाला बट्टा लागतो, लोक त्यांच्याकडे पाहून नाकें मुरडतात. अशीच माझी स्थिति झाली आहे."

आनंदराव रागावून ह्मणाले—" छे छे छे छे ! असलें वाईट बोलूंसुद्धां नकोस. हें तुझें नेहमींचेंच नाटक आहे. मला वाटत होतें कीं ही तुझी मर्मभेदक भाषा, हें तुझें उपदेशपर व्याख्यान सगळें कांहीं संपलें. परवांच तुझें माझें बोलणें झालें. असेंच कायसें काढून तूं रागावली होतीस. त्या वेळीं मीं तुझी चूक तुझ्या पदरांत घातली. तेव्हां मग तुझा राग गेला व तुझें तुलाच वाईट वाटायला लागलें. आहे का ध्यानांत ? पुनः आज आणखी कोणीं उठावणी दिली ?"

" कोणीं उठावणी दिली म्हणून मलाच विचारायचें ? अगदीं माहीत नसेल, नाहीं ? निजलेल्याला कोणी झालें तरी जागें करील, पण झोंपेचें सोंग घेणाऱ्याला कोण जागें करणार ? समजतात, हीं सारीं बोलणीं मला समजतात !"

" देवाची शपथ, मला यापैकीं कांहीं माहीत नाहीं. तूं काय ह्मणतेस हेंच मला समजत नाहीं. तुझ्या प्रश्नाचें मीं उत्तर द्यावें अशी तुझी इच्छा असेल तर काय आहे तें स्पष्ट सांग. हीं द्राक्षें मी विनाकारण—" असें म्हणत आनंदरावांनीं रागानें ती द्राक्षांची बशी उचलली व ताडदिशीं जमिनीवर आदळली. त्याबरोबर बशीचे तुकडे तुकडे होऊन ते सर्व खोलीभर उधळले. द्राक्षें चेंगरून आंतील रसानें सतरंजी भिजून गेली.

आनंदरावांचा नारसिंह अवतार पाहून मोहनाही बरीच घाबरली. आनंदराव चेहऱ्यावरून जसे शांत दिसत, तसाच त्यांचा स्वभावही शांत होता. त्यांच्याकडून असा प्रकार झालेला मोहनेनें कधीं पाहिला नव्हता. म्हणून ती भयानें थरथर कांपूं लागली. आतां सर्व सांगितल्याशिवाय

गत्यंतर नाहीं असें ती समजली व हळू हळू बोलूं लागली—" त्या तिकडे, रावपुऱ्याच्या बाजूला, वाटेवरच एक बाई आणि एक मुलगा अशीं रहातात, तो मुलगा इकडचा; होय ना ? "

मोहनेच्या विचारण्याचा झोंक, तिच्या त्या वक्र झालेल्या भ्रुकुटी, तिच्या मनांत आलेला संशय, ह्यायोगानें आनंदरावांना अत्यंत आश्चर्य वाटलें. आश्चर्यानें, कदाचित् रागानें, त्यांच्या चेहऱ्यावर विलक्षण फरक पडला व त्यांची मुद्रा पालटली. हा सर्व प्रकार पाहून मोहना तिरस्कारानें म्हणाली—" मी बोललें त्याचा राग आला वाटतें ? मेली जनाची राहू दे पण मनाची तरी लाज वाटायला हवी होती. माझ्याकडून काय गैर झालें, कुठें चुकलें, कोणतें बिघडलें तें तरी समजूं दे. ती बाई एक निलाजरी झाली ह्मणून सगळ्यांनींच का लाज टाकायची ? तिला येथें आणून प्रदर्शन करायला कशाला हवें होतें ? यापेक्षां ती जिथून आली तिथेंच तिला ठेविली असती तर ? या गांवांत आणून माझ्या डोळ्यादेखत तिला मिरविण्याचें काय कारण होतें ? कांहीं अडलें होतें कीं काय ? "

आनंदरावांनीं खिशांतील दस्त रुमाल घेऊन आपला घामानें डबडबलेला चेहरा पुसून काढला, व कुंठितमति होऊन ते मोहनेकडे पाहूं लागले. ते नंतर ह्मणाले—" त्या बाईच्या वर्तनाबद्दल शंका ! खरेंच, तूं वेडी नसलीस तरी खात्रीनें मूर्ख आहेस असें मी ह्मणतों. तुला राग येईल, येऊं दे. आजपर्यंत—म्हणजे त्या मुलाचा पाय बघावयाला येण्यासाठीं मला बोलावणें येईपर्यंत—त्या बाईची व माझी ओळख सुद्धां नव्हती. छे ! शिवाय माझी आई शोभेल इतकी ती वयानें वृद्ध आहे. तुझ्या मनानें काय घेतलें आहे कोणास ठाऊक ? "

मोहनेच्या मनांत अनेक गोष्टी येऊं लागल्या. तथापि आनंदराव इतक्या काकुळतीनें, इतक्या खरेपणानें बोलत होते कीं, ती इतकी संतापली होती तरी देखील थोडी शांत झाली.

आनंदराव तसेंच त्रासून पुढें ह्मणाले:—" तेव्हां मग असें ठरलें ह्मणावयाचें कीं रोग्याकडून बोलावणें आलें तरी जाऊन उपयोग नाहीं.

मग धंदा मोठा सुरेख चालेल ! येथून गाशाच गुंडाळला पाहिजे. मला लाज वाटली नाहीं असें तूं म्हणालीस. पण मला लाज वाटली पाहिजे असें नाहीं मला वाटत. अशा भलत्या भलत्या कल्पना तुझ्या मनांत येतात त्याबद्दल तुलाच लाज वाटायला पाहिजे. त्या बाईची किंवा त्या मुलाची आणि माझी बिलकुल ओळख नाहीं. मी अगदीं शपथेवर सांगतों कीं काल संध्याकाळपर्यंत तें घर कोणीं भाड्यानें घेतलें आहे किंवा त्या घरांत अमुक राहतात हें मला मुळींच माहीत नव्हतें. ”

मोहना—“ बरें, तिकडून बोलवायला कोण आलें होतें ? ”

आनंदराव—“ मैनाई सुईण काल रात्रीं मी बाहेरून घरीं आलों तेव्हां येथें दरवाजांतच उभी होती. ती मला म्हणालीः—‘ त्या-घरांत एक बाई व एक मुलगा अशी परगांवाहून येऊन राहिलीं आहेत. त्यांची येथें कोणाची आळख नाहीं. मुलगा आजारी आहे, सवड झाली तर एकदां पाहून या.’ ह्मणून मी गेलों; तिकडे जाऊन तपास करून येण्याची तूं तसदी घेशील तर मी म्हणतों तें बरोबर आहे असें तुला कळेल. त्या मुलाचा गुडघा सुजला आहे व ठणकाही आहे. ”

“ मी तिकडे गेलें होतें. ” मोहना शांतपणानें म्हणाली.

पण आनंदरावांना चिरड आलीः—“ तूं तिकडे जाऊन आलीस ? मग तर फार उत्तम? मी रोग्याकडे जातांना माझ्यावर पाळत राखणें तुला आवडत असेल तर खुशाल राखीत जा. मी तुला हरकत करणार नाहीं, व करून उपयोगही नाहीं. ”

“ तसें मात्र मी बोलूं देणार नाहीं. मीं कधीं कुणावर पाळत राखली ? मला नाहीं ती संवय. ”

“ तसें दिसतें मात्र. ”

“ नाहीं. मी नाहीं असें म्हणूं देणार. आक्का नि मी देवदर्शनाला जात होतों. तेव्हां सहज त्या घरावरून गेलों. ”

“ मग हा संशय येण्याचें कारण काय ? झोपेंत तुला कांहीं तरी स्वप्न पडलें असावें खास. तूं त्या बाईच्या चेहऱ्याकडे पाहिलें असतेंस, तरी

सुद्धां तुला आलेला संशय किती वेडगळपणाचा आहे, याबद्दल तुझी खात्री झाली असती. ”

आतां मात्र मोहनेचें मन घोटाळ्यांत पडलें. तिला आलेला संशय खरा कीं चुकीचा ? ती ह्मणाली:—

“ तर मग त्या मुलाचा तोंडवळा अगदीं हुबेहुब इकडच्यासारखा कसा ? ”

हा प्रश्न ऐकून आनंदरावांनाही आश्चर्य वाटलें. ते म्हणाले:—“ त्या मुलाचा तोंडवळा माझ्यासारखा अगदीं हुबेहुब ? छे, छे ! बिलकुल नाहीं. तुझी कल्पना कोणीकडे धांवली ही ? ”

मोहनेनें उत्तर दिलें:—“ खरोखरच अगदीं हुबेहुब ! साऱ्या जगांत असा सारखेपणा कुठें नसेल. डोळे तेवढे सोडून बाकी सर्व अगदीं इकडच्यासारखें ! इतकेंच नव्हे, तर कान सुद्धां अगदीं इकडच्या कानांसारखे ! कपाळाची पट्टी, केंसांची ठेवण देखील हुबेहुब. ”

आणि खरोखरच आनंदरावांना हें सादृश्य मुळींच दिसलें नाहीं व तिकडे त्यांचें लक्षही गेलें नाहीं. अर्थातच मोहनेचें बोलणें त्यांना खरें वाटेना. तिचें मन संशयखोर असल्यानें ती कांहीं तरी बडबडत आहे असें साहजिकच त्यांना वाटलें. ते ह्मणाले:—

“ प्रिये, केवढा हा तुझा वेडेपणा ! मला वाटत होतें, तुझ्या असल्या खुळचट कल्पना अजीबात नाहींशा झाल्या असतील ह्मणून ! ”

“ पण त्याचें आडनांवही ‘देशमुख’ कसें ? ”

आनंदराव:—“ त्याचें आडनांव देशमुख नसेल. ”

ती रागानें म्हणाली:—“ नसेल कसें ? तेंच; नाहीं म्हटलें तर मी कशी ऐकेन ? मी चांगला तपास करून आलें. ”

“ असेल कदाचित् ! मी नाहीं ह्मणत नाहीं. अशीं आडनांवें पुष्कळांचीं सारखीं असतात. ”

“ बरें, तें असूं द्या. तें चित्र त्याला इकडूनच दिलें ना ? ”

“ होय, मींच दिलें. मला स्वतःला मुलें नाहींत. पण मला मुलें आवडतात. तूं पाहिजे तर गांवांत शोध कर. त्यांत कांहीं बिघडलें कीं काय ? ”

"बिघडावयाचें काय खरें; पण आडनांवही तेंच आणि तोंडवळा अगदीं सारखा. म्हणून म्हटलें."

"खरेंच, हा तुझा अगदीं निव्वळ वेडेपणा आहे. लोकांचीं आडनांवें देशमुख असलीं तर त्याला मी काय करणार? चेहरा हुबेहुब माझ्यासारखा म्हणतेस, पण तुझ्या अक्काला तो तसा दिसला काय? तुम्ही दोघी जणी जात होतां ना?"

"ती असें कांहीं म्हणाली नाहीं."

एवढ्यानें आनंदरावास दुजोरा मिळाला. ते म्हणाले:—" झालें! सारखेपणा नाहीं म्हणून त्या बोलल्या नाहींत. शिवाय असता तर मला नसता का दिसला? तो मुलगा माझ्या बिलकूल माहितीचा नाहीं."

मोहनेनें मुळींच उत्तर दिलें नाहीं. कारण तिचें बोलणें तिच्याच अंगाशीं आलें. आपणाकडून ही घोड्याएवढी चूक झाली असेंच आतां तिला वाटूं लागलें. आनंदरावांनीं तिचा हात धरून तिला पलंगावर आणून बसविलें व तिची समजूत घालण्यास सुरुवात केली—" प्रिये, मी काय म्हणतों तें नीट समजून घे. त्या मुलाच्या व माझ्या चेहऱ्यांत सारखेपणा असो अगर नसो. त्याचें महत्त्व तुला व मला तितकेंच. माणसासारखीं माणसें थोडीं का असतात? आतांपर्यंत अमुक अमुक माणसें त्या घरांत राहतात, हेंही मला माहीत नव्हतें. आणि माझ्या समजुतीनें तरी ती बाई मला अगदीं परकी व अनोळखी आहे. तूं माझी धर्मपत्नी आहेस, तुझें माझ्याशीं विधियुक्त लग्न लागलेलें आहे. तूं माझी सहभागिनी आहेस व आपल्या एकमेकांच्या त्या वेळीं आणाशपथा झाल्या आहेत. त्या शास्त्रांना व सर्वसाक्षी परमेश्वराला स्मरून मी सांगतों कीं, मी बोलतों हें खरें, अगदीं खरें आहे. यांत खोट्याचा लवलेश सुद्धां नाहीं. झालें? गेला राग आतां? वेडी रे वेडी!"

असें म्हणून आनंदरावांनीं मोहनेच्या हनुवटीला हात लाविला. तिला देखील आतां वाईट वाटूं लागलें. तिची खात्री होऊन चुकली कीं चेहऱ्यांत व आडनांवांत सारखेपणा सहजासहजीं आला असेल. असें पुष्कळ

वेळीं होतें. तिच्या डोळ्यांतून अश्रुधारा चालल्या. तिनें त्यांच्या तोंडा-कडे पाहून म्हटलें:—“ माझा स्वभाव संशयी आहे खरा. पण इंक-डच्या वर्तनामुळेंच तो तसा झाला आहे. ”

आनंदराव:—“ आतां तूंच संशय घेत असतेस. तें जाऊं दे आतां. मागील गोष्टी काढूं नको म्हणजे झालें. बरें, पण पुढें मीं त्या मुलास औषध देण्यास जावें कीं न जावें? तुझी मर्जी असेल तसें करतों. गेलों तरी सारखेंच आणि न गेलों तरी सारखेंच. मीं जाऊं नये अशी तुझी इच्छा असली तर मग डॉक्टर विश्रामना कळवितों. ते जाऊन औषध देतील. ”

“ तसें कांहीं नको. चाललें आहे तसें चालूं द्या. ”

मोहनेच्या ह्या उत्तरावरून त्या मुलाला औषध देण्याचें तसेंच चालू ठेवावें, बंद करूं नये, अशी तिची सूचना आहे असें आनंदरावांनीं मानलें व तदनुसार पुनः दुसऱ्या कीं तिसऱ्या दिवशीं ते तिकडे गेले. मुलास दर्याबाई मांडीवर घेऊन बसल्या होत्या. व जवळच त्याचे सर्व शिपाई लढाई करण्याला सज्ज असे उभे असून ढोलगेवाला ढोलगें वाज-वीत होता. दर्याबाईबरोबर थोडेंसें बोलून मग आनंदराव त्या मुलाची थट्टा करूं लागले:—“ शिपाई लोक लढाई करावयाला निघालेत आणि कमांडरसाहेब अजून मांडीवर बसून गुलगुल गोष्टी करीत बसले आहेत, हें कसें? अशीच का लढाई करावयाची? ” असें म्हणून आनंदराव हसूं लागले व मुलगाही हासूं लागला. थोड्या वेळानें आनंदराव आपले खिसे चाचपून म्हणाले:—“ आं! मुख्य तेंच विसरलों. याच्या गुड-ग्याला चोळण्याकरितां मी एक नवीन मलम तयार केलें आहे. पण तें येतांना आणण्याचेंच विसरलों. आतां पुनः इतक्या लांब जाऊन यायचा कंटाळा आला आहे. आज सबंध दिवस मी एकसारखा हिंडतों आहे. घोडा आजारी आहे म्हणून पायांनींच धांवपळ चालली आहे व त्यामुळें पाय कसे अगदीं दमून गेले आहेत. राहूं दे आतां. उद्यां आलों म्हणजे घेऊन येईन. ”

दर्याबाई:—“ कुठेंसें आहे तें मलम? मीं जाऊन घेऊन येतें. आज

गुडघा जास्त ठणकतो आहे, सूजही बरीच आहे. औषध लावलें नाहीं तर रात्रभर निजूं देणार नाहीं."

आनंदरावः—"बरें तर. दवाखान्यांत टेबल आहे तें, त्यावर पांढऱ्या कागदांत गुंडाळलेली एक डबी आहे, तेवढी मागून घेऊन या. मी तोंपर्यंत याचा गुडघा पहातों."

दर्याबाई निघून गेल्या. आनंदरावांनीं त्या मुलाच्या गुडघ्याचें फडकें सोडून गुडघा बोटांनीं दाबून पाहिला. सूज बरीच असून ठणकाही होता. नंतर पुनः फडकें बांधून आनंदरावांनीं विचारिलें—"मुला, तुझें आडनांव काय ?"

"माझें आडनांव होय ? देशमुख. डाक्टर, मी माझ्या शिपायांकडे जाऊं काय ?"

आनंदरावः—"थांब हो सोन्याबापु ! तुझे बाबा कोठें आहेत रे ?"

"माझे बाबा ? आई म्हणत होती कीं, आम्ही येथें येण्यापूर्वींच ते देवाच्या घरीं गेले म्हणून. काय हो, डाक्टर, हा तुम्हीं दिलेला शिपाई नेहमीं ढोलगें वाजवील काय ?"

"हो, हो. तार ओढीत राहिलें, कीं ढोलग्याला सुरुवात झालीच समज. सोनुबाळ, तुला मोकळी हवा पाहिजे आहे. चल, तुला ओसरीवर नेऊन बसवितों." असें म्हणून आनंदरावांनीं त्या मुलास पांघरूण घालून बाहेर माच्यावर आणून बसविलें. व त्याचे सर्व शिपाई आणून ते त्याच्या शेजारीं भिंतीशीं उभे केले. "येथें वारा पहा कसा छान येतो तो." असें म्हणून आनंदराव आंत गेले.

आनंदराव आंत गेले खरे, पण तेथें त्यांच्या विलक्षण भानगडी सुरू झाल्या. ते माडीवर गेले व ही पेटी उघड, त्या पेटींत पहा, फडताळाचें दार उघडून आंतील जिन्नस तपास, असें करूं लागले. कोणास कळूं नये म्हणून जागच्या जागीं सर्व जिन्नस त्यांनीं ठेविले व ते खालीं आले. इतके ते काय शोधीत होते !

व खालीं येऊन माजघरांत गेले. तेथें एक कपाट होतें तें त्यांनीं उघडून

पाहिलें. नंतर खालीं ओढखण होता तो ओढून त्यांतले जिन्नस ते इकडे तिकडे करूं लागले. त्यांत एक पत्राचें पाकीट दिसलें, तें त्यांनीं उत्कंठेनें घेऊन आंतील कागद बाहेर काढिला. ही एक औषधांची यादी होती. पण त्यांना काय माहीत? कागद उघडून पाहिल्यावर त्यांना समजलें.कागदाची घडी घालून जागच्याजागीं ठेवणार इतक्यांत त्यांना वाटलें कीं, दर्याबाई तेथें उभ्या राहून पहात आहेत. इतक्या लवकर ह्या परत कशा आल्या असें आनंदराव मनांत ह्मणूं लागले.

त्यांनीं चटकन् तें पाकीट हातांतून टाकलें, व शुद्धीवर येऊन पुनः ते त्या ओढखणांत पाहूं लागले. त्यांची वृत्ति शांत व थंड दिसत होती. दर्याबाईकडे वळून ते ह्मणाले:—" मी एखादें फडकें पहातों आहें. "

आनंदरावांची ही उठाठेव दर्याबाईना बिलकूल पसंत पडली नाहीं. " फडकें ! तुह्मी फडकें का शोधतां आहां ! या ओढखणांत मी फडकीं ठेवीत नसतें. पण मी म्हणतें मी येईपर्यंत वाट पाहिली असती तर ! शर्थ झाली बाई माणसापुढें !"

आनंदरावांनीं उत्तर केलें:—" तुह्मांला यायला बराच वेळ लागला. मलाही लवकर जायचें आहे म्हणून म्हटलें— "

दर्याबाई:—" मला बराच वेळ लागला का ! मग लवकर कशाला म्हणतात समजत नाहीं. पळत जाऊन धांवत आलें, तरी म्हणे बराच वेळ लागला— "

आनंदराव पुढें बोलले नाहींत. त्यांनीं ती मलमाची डबी दर्याबाईकडून घेतली व त्या मुलाला आंत आणून त्याच्या गुडघ्याला मलम चोळण्यास सुरुवात केली. चोळतां चोळतां मधून मधून ते त्या मुलाचा चेहरा न्याहाळूं लागले, पण त्यांच्या बायकोनें म्हटल्याप्रमाणें सारखेपणा त्यांना दिसून येईना. नंतर त्यांनीं पुनः एक फडकें मागून घेऊन त्या मुलाच्या गुडघ्याभोंवतीं गुंडाळलें व ते जाण्याकरितां निघाले. निघतांना हांसत हांसत—" अशीं फडकीं नेहमीं बाहेरच ठेवीत जा, म्हणजे तुमच्या खिडक्या आणि कपाटें शोधीत बसायला नकोत. " अशी दर्याबाईची समजूत करून डॉक्टरसाहेब बाहेर पडले.

दर्याबाई म्हणूं देत, पण खरें म्हटलें तर त्या पळत जाऊन धांवत आल्या नाहींत. जातांना त्या जलदीनें गेल्या हें खरें. दवाखान्यांत जाऊन त्यांनीं ती मलमाची डबी घेतली व त्या परतल्या. पण वाटेंत त्यांना सारजा भेटली. मग काय ? एक दिवस सवड काढून बसावयाला येईन म्हणून सारजेनें कबूल केलें होतें, पण त्याप्रमाणें ती अद्यापि आली नव्हती, म्हणून दर्याबाईनीं तिला कारण विचारिलें. अर्थातच बोलणें वाढलें. शेवटीं सारजेनें प्रश्न केलाः—" मुलग्याची तब्येत बरी आहे का आतां ?"

" आहे साधारण. अजून मागचा कांटा नाहीं. आनंदराव डाक्टरांना आणून पाय दाखवला. आतां ते आमच्या इथेंच आहेत. ही मलमाची डबी आणायची ते विसरले होते, ती मी घेऊन निघालें. त्यांचा स्वभाव थोडा तऱ्हेवाईक दिसतो नाहीं ?"

" तऱ्हेवाईक ?" सारजा म्हणाली. तिला त्या शब्दाचा अर्थच कळेना.

" म्हणजे त्यांच्या धंद्यासंबंधानें विचार केला तर तऱ्हेवाईकच म्हणायचे. त्यांनीं मला प्रश्न विचारून विचारून पुरे पुरे केलें. आम्ही कुठून आलों, कां आलों, राहतों कुठें, मुलाचा जन्म कुठें झाला, त्याला वर्ष कितवें, हा इतका अशक्त कां, असे किती तरी प्रश्न त्यांनीं विचारिले. विचारायचें म्हणजे त्यांनीं कांहीं ठेवलें असें नाहींच. याबद्दल मी त्यांना नांवें ठेवतें असें नाहीं. ते तसे हुषार आहेत, परीक्षा चांगली आहे, मुलावर माया करतात—"

" हो, ते फार हुषार आहेत. लोकांचीही त्यांच्यावर श्रद्धा आहे. तुम्ही जा आतां. डाक्टर तिकडे वाट बघत असतील. मी बोलल्याप्रमाणें एकदां फुरसतीनें येईन बरें," असें म्हणून सारजेनें दर्याबाईचा निरोप घेतला. त्याही निघून गेल्या.

तेथून रावपुऱ्यांतील इंदिरेचा बंगला जवळच होता. सारजेबरोबर दर्याबाई बोलत उभ्या होत्या हें इंदिरेनें बागेंतून पाहिलें. म्हणून सारजा आल्याबरोबर ती बाई कोण, कुठें गेली होती, काय बोलत होती वगैरे हकीकत इंदिरेनें विचारिली. दोन तीन दिवसांपूर्वी त्या मुलाच्या चेह

त्यांत, तिची बहीण कमळजा, इच्या चेहऱ्याशीं साम्य असल्याचें तिनें पाहिलें होतें तेव्हांपासून इंदिरेच्या मनांत त्या बाईच्या संबंधानें कल्पनावर कल्पना येत होत्याच. सरजेनें हकीकत सांगितल्यावर इंदिरेनें म्हटलें:—
" तर मग तुझी आणि त्या बाईची ओळख आहे ? "

" तितकी ओळख नाहीं. तिच्या घरावरून जातांना मी एकदोनदां तिच्याशीं बोलले आहें. तिचा मुलगा आजारी आहे. आनंदरावांना नेऊन दाखविलें, असें म्हणत होती. "

थोड्या वेळानें इंदिरेनें एकदम विचारिलें:—" तो मुलगा तिचाच काय ? आपलाच असें तिनें सांगितलें, पण मला शंका येते. एक तर तिच्या वयाच्या मानानें पाहिलें तर मुलगा अगदीं लहान दिसतो. इतका लहान मुलगा तिचा असणार नाहीं. "

" होय, आक्कासाहेब, मला देखील शंका येते ! "

" दुसरें असें कीं, त्या मुलाचा चेहरा माझ्या एका ओळखीच्या माणसाच्या चेहऱ्यासारखा हुबेहुब आहे. "

" आक्कासाहेब ! मला देखील आश्चर्य वाटतें. इतका हुबेहुब चेहरा मीं कधींच कुठें पाहिला नाहीं. "

" तुला सुद्धां तसें वाटलें ? म्हणजे तुझी तिची ओळख कुठली ? तूं तिला कधीं पाहिलेंस ? मी काय म्हणतें समजलीस का ? मी माझ्या बहिणीसंबंधानें बोलत होतें. "

" आक्कासाहेब, तर मग माझ्या लक्षांत आलें नाहीं, हेंच खरें ! " असें ह्मणून सारजा गप्प बसली.

इंदिरा पुढें ह्मणाली—" सारजाबाई, मला आणखी एक बहीण होती तिची तुला माहिती नाहीं. तिच्यासारखेच हुबेहुब त्या मुलाचे डोळे आहेत ग ! इतकी सुद्धां चूक नाहीं. ती मला डोळ्यासमोर दिसत आहे. तूं कोणासारखा त्या मुलाचा तोंडवळा दिसतो ह्मणालीस ? "

सारजाः—" तें कशाला सांगत बसूं आक्कासाहेब ! मला आपलें वाटलें कीं, माझ्या ओळखीच्या एका माणसासारखा त्याचा चेहरा आहे. पण पुरुषाचा चेहरा हो, बायकोचा नव्हे. "

" पुरुषाचा ! असेल कदाचित्. सारजाबाई, तुला माझी बहीण माहीत असणें शक्य नाहीं. ती ह्या गांवांत कधींच आली नाहीं. "

सारजेच्या मनांतून कांहीं बोलावयाचें होतें, ह्मणून ती इंदिरेच्या तोंडाकडे टक लावून पाहूं लागली. पण कांहीं न बोलतांच ती वळली.

इकडे आनंदरावांच्या बायकोच्या मनांत दुसऱ्याच विकाराचें बीज रुजूं लागलें. त्यांनीं खुलासा केला तेव्हां तिचें तेवढ्यापुरतें समाधान झालें. पण तिच्या अंतःकरणांत उत्पन्न झालेला संशय जास्तच वाढूं लागला व भलत्याच थरावर गोष्ट जाणार, अशीं चिन्हें दिसूं लागलीं. तिच्या हृदयामध्यें मत्सराग्नि धुमसूं लागला. व तो अखेरीस पेट घेऊन कोणाची आहुति घेतो कीं काय, अशी भीति वाटूं लागली. मत्सरासारखा निर्मूलन करण्यास कठीण असा दुसरा मनोविकारच नाहीं.





# प्रकरण ४ थें.

—:o:—

## आणखी एक बातमी.





पुतळाबाईंनीं छोट्या जहागीरदारांची एकंदर व्यवस्था फारच उत्तम ठेविली होती. लहानपणापासूनच त्या मुलाच्या विलक्षण बुद्धिमत्तेचीं चिन्हें दिसूं लागलीं. तशांत पुतळाबाई जात्या सुग्रण व हुशार असल्यानें जेणेंकरून त्याच्या बुद्धीचा विकास व उन्नति होईल अशा योजनेंत त्या नेहमीं असत. त्यांनीं एक विद्वान् व कुलीन मास्तर मुलाला शिक्षण देण्याकरितां ठेवून दिला व त्याच्या नजरेखालीं हे बाल-राजे फारच हुषार व होतकरू बनूं लागले. मुलाच्या प्रकृतीसंबंधानेंही पुतळाबाई फार जपत असत, व त्याला शारीरिक व्यायाम देण्यासाठीं त्यांनीं एक तालीम मास्तर सुद्धां नेमला होता; तथापि त्याची प्रकृति ह्मण-ण्यासारखी सुदृढ व सशक्त नव्हती. चार आठ दिवसांनीं प्रकृतींत कांहीं बिघाड झाला नाहीं असें बहुधा होतच नसे. त्यांचा जुना पिढीजाद नौकर हैबती हा अद्यापि त्या मुलाच्या दिमतीला होताच. परंतु तो आतां बराच वृद्ध व अशक्त झाला असल्याकारणानें छोटेसाहेब त्याला केव्हांच झुकांडी देऊन पार होत असत. एक दिवस अशीच हैबतीची नजर चुकवून मागील बाजूस एक कारंजें होतें तिकडे जाऊन त्यांनीं चावी फिरविली. त्याबरोबर पाण्याचे फवारे उडून त्यांचे सर्व कपडे भिजून गेले तरी तेथून न हालतां ते तसेच किती वेळ तरी गंमत करीत उभे राहिले. इकडे हैबती

आपल्या सर्व घरांत त्यांना शोधतो आहे. अखेरीस कोणीसें त्याला सांगितलें, तेव्हां तो मागील बाजूस गेला. तों त्याचें चिमुकले धनीसाहेब थंडीनें कांपत कांपत आंत येत असलेले त्यानें पाहिले. धोतरानें त्यांचें सर्वांग त्यानें पुसून काढिलें व त्यांच्या अंगांतील कपडे काढून दुसरे गरम कपडे घातले. परंतु त्या दिवसापासून जी त्यांची प्रकृति बिघडली ती कांहीं केल्या ताळ्यावर ह्मणून येईना. रोज ताप येई, तशांतच खोकला सुरू झाला, मग काय ! हे अगोदरच बारीकराव! ते जास्त जास्तच बारीक व अशक्त होऊं लागले. प्रतापराव डॉक्टर रोज येऊन औषध देत, पण कांहीं गुण येईना. शेवटीं त्यांनीं पुतळाबाईंना अशी सल्ला दिली कीं, मुंबईची हवा सोडून देऊन देशावरची मोकळी हवा मिळाल्याशिवाय मुलाची प्रकृति सुधारणार नाहीं; सबब सोलापुरास कांहीं दिवस जाऊन रहावें. पुतळाबाईंचे एक मावसबंधु सोलापुरास रहात होते. त्यांची गांठ पडूनही बरींच वर्षें झाली होतीं. सबब त्यांच्याकडेच जाऊन रहावें असा पुतळाबाईंनीं बेत केला व त्याप्रमाणें त्यांना पत्रही पाठविलें. त्यांच्याकडून जरूर येण्याबद्दल आग्रहाचें उत्तर आलें. तेव्हां निघण्याची तयारी झाली. लीलेच्या मनांत तिकडे जावयाचें नव्हतें ह्मणून तिला इंदिरेजवळ ठेवावें असा विचार करून पुतळाबाईंनीं दत्तापुरास पत्र लिहिलें. त्याबरोबर इंदिरा निघून मुंबईस येऊन पोंचली.

पुतळाबाईंना जाण्यास दोन तीन दिवस अवकाश होता. दरम्यान एक दिवस संध्याकाळीं हवा खाण्याकरितां व वेळ जाईना म्हणून इंदिरा गाडींत बसून समुद्रकांठीं गेली. तेथें पुष्कळ बायका आलेल्या होत्या. पैकीं एक बाई मथुराशेटजींच्या कुटुंबासारखी तिला दिसली. पण तिची खात्री होईना. कारण अंग बरेंच—पूर्वींच्या दुप्पट—स्थूल झालेलें होतें. म्हणून इंदिरा तशीच त्यांच्याकडे पहात उभी राहिली. पूर्वींची सर्व आठवण होऊन तिला वाईट वाटूं लागलें. मागें पुष्कळ वर्षांपूर्वीं एके दिवशीं कमळजेचा शोध करण्याकरितां ती ह्या बाईकडे गेली होती. तेव्हां, वर्षांचीं वर्षें लोटतील आणि कमळजेचा पत्ता अगदींच लागणार नाहीं असें तिला यत्किंचित् तरी वाटलें होतें काय !

इतक्यांत त्या बाईचीही नजर इंदिरेकडे गेली. त्याबरोबर ओळख पटून त्या इंदिरेकडे आल्या. इंदिरेला वाटलें तें खरेंच. मथुराशेटजींचेंच तें कुटुंब. त्यांना पहातांच इंदिरेचें अंतःकरण आनंदानें उचंबळूं लागलें व तिनें हास्यवदन केलें. जिवंत कमळजा व मृत कमळजा यांमधील सांखळीचा दुवाच या बाई आहेत असें इंदिरेला वाटलें. ह्या ठिकाणीं इंदिरेची व त्या बाईची गांठ पडावी हा केवढा विलक्षण योगायोग ! योगायोगापेक्षां यांत कांहीं निराळेंच होतें—कारण कमळजेच्या भवितव्यतेसंबंधीं पडलेलें कोडें उकलण्याला येथूनच सुरवात झाली.

थोडा वेळ इकडचें तिकडचें बोलणें झाल्यानंतर इंदिरेनें कमळजेची गोष्ट काढली. तिचा अजूनपर्यंत कांहींच पत्ता लागत नाहीं, हें ऐकून त्या बाईंना फार आश्चर्य वाटलें. त्या म्हणाल्याः—" मोठाच चमत्कार ह्मणायचा ! आक्कासाहेब, तुह्मीच सांगतां ह्मणून बरें. दुसऱ्या कोणीं सांगितलें असतें तर मला खरें सुद्धां वाटलें नसतें. कोणी मनुष्य नाहींसें व्हावें ही गोष्ट सध्यांच्या काळीं तरी घडणें नाहीं. कधीं कधीं अमुक मुलगा चुकला आहे, अगर अमुक एक मुलगी घरांतून गेलेली आहे, असें वर्तमानपत्रांतून छापून आलेलें ऐकूं येतें, पण पुढें तीं माणसें सांपडलेलीं आहेत. पण तुमच्या बहिणीचें पहावें तों सर्वच विलक्षण ! यासंबंधानें तिकडेसुद्धां—" आपल्या नवऱ्यास उद्देशून त्या म्हणाल्या—" तिकडेसुद्धां हकीकत कळली आहे. तुह्मी मागें आमच्या घरीं आलां होतां तेव्हां तिकडून म्हणायचें—पण मी कशाला बोलूं तें ? आपणाला रुचणार नाहीं. "

बाई बोलावयाला कां कचवचतात हें इंदिरेला समजेना. ती उत्सुकतेनें ह्मणालीः—" तसें कांहीं नाहीं. आपण सांगाच. काय व्हायचें असेल तें होईल. मी आतां सर्व कांहीं ऐकायाला तयार झालें आहें. दगडापेक्षां देखील माझें मन मीं कठोर केलें आहे. माझ्या बहिणीसंबंधानें एक शब्द जरी झाला तरी मला तो ऐकायला पाहिजे. कोणीं कांहीं कल्पना जरी काढली तरी सुद्धां ती ऐकावी असें वाटतें. मग ती चांगली असो अगर वाईट असो. "

बाई म्हणाल्या—" सांगतें तर मग. तिकडून असें ह्मणायचें झालें कीं कमळाबाई मास्तरिणीनें हलक्या कुळांतील माणसाबरोबर लग्न करून घेतलें असावें—तुह्मी इतकें वाईट वाटूं देऊं नका. अहो, असें हें चालायचेंच. घरोघर मातीच्याच चुली असतात, समजलें? मग मला सुद्धां तसेंच वाटूं लागलें. तरी पण एकदां लग्न करून घेतल्यानंतर मग उशीरा कां होईना, पण ती तें गुप्त ठेवणार नाहीं असें आम्ही म्हणत होतों. आतां त्याला किती तरी वर्षें झालीं ? अजून सुद्धां गुप्तच का ठेवायचें ? इश्श ! सगळाच मेला चमत्कार ! "

इंदिरेनें मध्येंच विचारिलें:—" कुणाचें लग्न म्हणतां ? आमच्या कमळजेचें लग्न झालें नव्हतें. "

" नव्हतें कसें ? झालें होतें. आणि तेंच तर तिला नडलें; इतका वेळ ऐकतां काय तर ? "

" झालें होतें ? म्हणजे ? तुम्हांला काय ठाऊक ? कसें समजलें तुह्मांला ? "

हा प्रश्न ऐकतांच बाई बुचकळ्यांत पडल्या. ही गोष्ट अद्यापपावेतों इंदिरेला कशी कळली नाहीं याचाच त्या विचार करूं लागल्या. वास्तविक म्हटलें तर मागें सर्जेराव वारल्यानंतर इंदिरा त्यांच्याकडे कमळजेच्या शोधार्थ आली होती तेव्हांच ही गुणगुण बाईच्या कानांवर आली होती. पण तें इंदिरेला कळवायाचें त्यांनीं त्या वेळीं विशेषसें मनावर घेतलें नव्हतें. लग्नासंबंधानें खात्रीलायक बातमी जरी त्यांना समजली नव्हती तरी लग्न झालें असावें असें मानण्याजोगीं कांहीं कारणें होतीं. पण तीं सुद्धां त्यांनीं इंदिरेजवळ सांगितलीं नव्हतीं. बाई कांहीं बोलत नाहींत असें पाहून इंदिरा पुनः आर्जवानें म्हणाली:—" आतां तें सर्व एकदां मला सांगाच. माझ्या जिवाला कशी चुटपुट लागली आहे. "

बाईंनीं सुरवात केली—"ही हकीगत आम्हांला, आमच्या येथें पूर्वीं एक गुजाबाई म्हणून मोलकरीण होती तिच्याकडून कळली. ती आमच्या घरीं किती दिवस तरी नोकरीला होती ! कमळाबाई मास्तरणीनें नोकरी सोडली त्याच वेळीं गुजाबाईही नोकरी सोडून गेली. कारण तिची प्रकृति बिघडली, आणि ती एकसारखी वाळत चालली. मला वाटलें तिला

काम फार पडत असेल, ह्मणून मीं तिला सांगितलें; घरीं जा आणि औषध घे, तितका विसोटा मिळेल नि प्रकृति सुधारेल. त्याप्रमाणें ती आपल्या घरीं गेली. येथेंच कुठल्याशा जवळच्या खेडेगांवांत तिचें घर आहे. तिकडे गेल्यावर तिला बरें वाटलें. पण मग ती आमच्या नोकरीवर आली नाहीं. दुसरीकडेच कुठें राहिली. पुढें पुष्कळ दिवसांनीं ती आम्हांला भेटायला ह्मणून आली तेव्हां ती सांगूं लागली कीं, कमळाबाई मास्तरीण भेटली होती. तिनें लग्न करून घेतलें नि ती आपल्या नवऱ्याजवळ नांदायला लागली."

"कुठें, केव्हां बरें भेटली?" इंदिरेनें उत्सुकतेनें विचारिलें.

"कमलाबाई आमच्या घरांतून गेल्यानंतर जी दिवाळी आली तेव्हां. मला वाटतें दिवाळी पुढें एक दोन दिवस असेल. आणि भेटली ती इथेंच कुठें तरी जवळपासच. पण अमुकच ठिकाणीं भेटली असें नाहीं मला आठवत. गुजाबाईची नि तिची गांठ पडली तेव्हां गुजाबाईनें तिला विचारलें, 'तुमचें लग्न झालें वाटतें!' ती ह्मणाली. 'होय. नोकरी सोडून गेल्यानंतर लागलीच झालें.' ती त्या वेळीं चांगली तेजस्वी व धट्टीकट्टी दिसत होती. गुजाबाई ह्मणाली तें मी आपलें सांगतें हो."

"हें ऐकून किती दिवस झाले बरें?" इंदिरेनें विचारिलें.

"आक्कासाहेब, तितकें मला पक्कें सांगतां येत नाहीं, पण तुमची माझी गांठ पडल्यानंतर लवकरच असेल."

"त्याच वेळीं मला कळविलें असतें तर बरें झालें असतें."

"तुम्हांला कळवायचें माझ्या मनांत होतें पण नाहीं कळवलें झालें. कळवून तुह्मांला त्रासच व्हायचा कीं नाहीं? बातमी तरी काय? खात्रीलायक असें कांहींच नाहीं. बरें, पुरती म्हणावी तर तशीही नाहीं. अगदींच तुटपुंजी बातमी. शिवाय मला असेंही वाटलें कीं, आपलें लग्न झालें ही गोष्ट तुम्हांला एकाएकीं कळू नये, हळू हळू आपणच तुम्हांला समक्ष कळवूं असेंही कमळाबाईच्या मनांत असेल, आणि म्हणून तिनें तुम्हांला पत्र पाठविलें नसावें. असें वाटणें साहजिक आहे कीं नाहीं

तुह्मीच सांगा. गुजाबाईनें आम्हांला ही बातमी सांगितली त्यापासून एवढा मात्र परिणाम झाला कीं, कमळाबाईची काय हकीगत झाली कोण जाणे, अशीं जी आम्हांला भीति वाटत होती तेवढी नाहींशी झाली."

"गुजाबाईची माझी गांठ पडेल काय?"

"छे छे छे! ती पुढें लवकरच पुनः आजारी पडली आणि त्यांतच मेली बिचारी!"

इंदिरेच्या मनांत विचारांवर विचार येऊं लागले. कमळजेचें लग्न झालें होतें, याबद्दल तिला आतां यत्किंचितूही शंका राहिली नाहीं. प्रश्न एवढाच कीं कोणाशीं? तिनें नंतर विचारिलें:—"लग्न करून घेण्याकरितां ती आपल्या घरांतून निघून गेली असें मानलें तर तिच्या नवऱ्याची व तिची अगोदरची ओळख असली पाहिजे असें अनुमान निघतें. मग ही ओळख कशी व कुठें झाली असावी? त्या माणसाची व तिची कुठें गांठ पडली असावी?"

"गुजाबाईनें मला ही हकीकत सांगितली त्या वेळीं माझ्या दिखील मनांत हीच गोष्ट आली. आणि मग मलाही समजून आलें कीं आमच्या घरीं ओळख [illegible] झाली असली पाहिजे. त्या वेळीं आमचे धाकटे भावोजी घरीं आले होते. त्यांची डाक्ततरकी[illegible] परीक्षा नुकतीच पास झाली होती व विश्रांति घेण्याकरतां म्हणून ते घरींच [illegible]हिले होते. त्यांचा स्वभाव भारी हौशी व थट्टेखोर, नेहमीं हसतमुख, कुणाल[illegible] म्हणजे ते नकोत, कुणाची त्यांची ओळख नाहीं असें नाहींच. जगमित्र[illegible]च म्हणायचे. किती तरी मंडळी त्यांच्याकडे येत जात! नेहमीं घर भरलेलें असायचें आणि धिंगाणा चालायचा. मला नसे तें आवडत; पण ते लवकरच आपल्या नोकरीवर रुजू होण्याकरतां जाणार होते, म्हणून मी का[illegible] नसे. त्या वेळीं माझ्या दोघी चुलत बहिणीही माझ्या घरीं आल्या होत्या. त्यांचा स्वभावही आनंदी. झालें. त्या, भावोजी आणि कमळाबाई एवढी मंडळी सदोदित खेळत बसलेली असायची."

"तुमचे भाऊजी कुठें आहेत आतां? त्यांच्या बरोबर नाहींना ती गेली?" इंदिरेनें मध्येंच विचारिलें.

"—आमच्या भावोजीबरोबर ? भलतेंच ! ते नाहीं हो असल्या फंदांत पडावयाचे ! शिवाय ते आपल्या नोकरीवर निघून गेले तेव्हां आमचीं माणसें त्यांना पोंचवायला स्टेशनावर गेलीं होतीं. तेव्हांही तिकडे कांहीं आढळून आलें नाहीं. त्यांचा स्वभावही फार उघड असे. गुपचुप तिथें कांहीं नाहीं. तसा कांहीं प्रकार असता तर त्यांनीं चोरून ठेवला नवडत केव्हांच ते बोलून गेले असते. पुढें लवकरच तिकडची हवा त्यां नवेना, आजारी पडले. सर्वच ग्रंथ आटपला, आतां काय त्या काचें नांव

इंदिराः—" एक शंका नाहींशी झाली. आणखी कांहीं येत होती म्हणालां नव्हे काय ? " ानें सांगतें कीं

" हो. किती तरी येत ! आमच्या भावोजींचे मित्रच फ. तरी असें बहुतेक डाक्तरकीच्या धंद्यांतलेच होते. कोणी शिकत होते, कोणी ज्यांचीं पास होऊन आले होते, आणि कोणी धंदा करीत होते. वयानें सगळे सारखे. अगदीं तरुण अशा मंडळींना एके ठिकाणीं जमून मजा मारायची, गप्पागोष्टी करायची किती हौस असते तुम्हांला माहीत आहेच. आतां इतक्या सर्वांची व आमची ओळख नव्हती. कारण भावोजींच्या खोलींत ते परभारें येत जात. पण त्यांपैकीं तीन चार जण मात्र आमच्या चांगल्या ओळखीचे झाले होते. ते भावोजींबरोबर घरांत दिखील येत असत. त्यांची आणि आमच्या घरच्या माणसांची बरीच घसट पडली होती. "

इंदिराः—"ते कोण बरें ? त्यांपैकींच कोणी तरी असावा. त्यांचीं नांवें सांगा पाहूं. "

" नांवें ? थांबा हो, आठवण करून पाहतें. भावोजी गेल्यावर मग कांहीं ते आम्हांला कुठें दिसले नाहींत. एकाचें नांव भय्यासाहेब. ते कुठें इंदुराकडे आहेत म्हणे. तिकडे त्यांचा नांवलौकिकही चांगला आहे. दुसरे एक मुरारराव म्हणून होते. भारी तिरसट व एककल्ली. ते कांहीं पुढें आले नाहींत म्हणा. आणखी एक आनंदराव म्हणून गृहस्थ येत असत—"

आनंदरावांचें नांव निघतांच इंदिरेला आश्चर्य वाटलें. तिनें एकदम विचारिलें:—" आनंदराव! त्यांचें आडनांव काय ? हे कोण, कुठें राहत होते ? "

" मुंबईंतच त्यांचे वडील डाक्तरकीचा धंदा करीत असत. भावोजींकडे ते नेहमीं असावयाचे, म्हणून आमची त्यांची बरीच ओळख होती. "

—" त्यांचें आडनांव ' देशमुख ' काय ? "

" असेल गडे. तेंच असावें. आक्कासाहेब, तुम्हांला त्यांची वाटतें ? "

एक बहीण मोहना म्हणून आहे तिच्या नवऱ्याचें नांव आनंद-मुख आहे. "

" मी म्हणतें ते आनंदराव फार हुषार, रूपानें सुरेख, वागणूक अगदीं सभ्यपणाची, बोलणें चालणें मितस्थ जिथल्या तिथें. पण पुढें ते कधीं कुठें आम्हांला दिसले नाहींत. थांबा हो. आणखी एक गृहस्थ भावोजीकडे येत. आतां मला आठवलें. त्यांचें आडनांव ' कुलावंत. ' पण ते आम्हांला आवडत नसत. पुढें ते कुठें गेले, त्यांचें काय झालें कांहीं माहीत नाहीं. "

" तेच जर आनंदराव देशमुख असतील तर सध्यां ते दत्तापूर गांवांत डाक्तरकीचा धंदा करीत असतात. मोहनेनें आनंदरावांशीं लग्न केलें खरें; पण घरीं कुणाला तिनें विचारलें नाहीं. आम्हांला कुण्णालाच तें आवडलें नाहीं. "

" मला नाहीं माहीत तेच हे आनंदराव कीं नव्हेत तें. पण एवढें खरें कीं भावोजी येथून जाण्यापूर्वींच त्यांचें आमच्या घरीं येणें अगदीं बंद झालें होतें. माझी अशी कल्पना आहे कीं कुठें तरी लांब कोठवाडाकडे ते जाऊन राहिले असावेत. "

इंदिरा:—" मी असें विचारतें कीं, त्या मंडळीपैकीं एखाद्याचें लक्ष्य माझ्या बहिणीवर असल्याचें तुमच्या नजरेस आलें होतें काय ?"

नाहीं नाहीं, मुळींच नाहीं. भावोजी व माझ्या त्या चुलत बहिणी कमळाबाई मास्तरिणीची थट्टा करीत; कलावंत व कमळाबाई यांचें जोडपें होणार म्हणून त्या हांसत. पण त्यांत कांहीं खरें नव्हतें. कमळाबाईला निव्वळ चिडविण्याकारितां त्या तिची थट्टा करीत. कारण तिला ते मुळींच आवडत नसत. त्यांना पाहिलें कीं इच्या कपाळाला आपल्या आंठ्या पडत; म्हणून म्हणतें, आम्हांला देखील तें कलावंत आवडत नव्हते. फक्त भावोजीची मात्र त्यांच्यावर मर्जी. ”

“ आणखी दुसऱ्या दोघांचीं नांवें आपण घेतलीं तीः—एकाचें नांव भय्यासाहेब, आणि एकाचें—काय तें ? इतक्यांत विसरलें. ”

“ मुरारराव. कोणी कां असेनात मसणे. पण मी खात्रीनें सांगतें कीं त्यांच्याबरोबर कमळाबाईनें लग्न करून घेतलें नाहीं. मला तरी असें वाटतें कीं त्यांच्यापैकीं—म्हणजे आमच्या घरीं जे येत असत व ज्यांचीं नांवें मीं तुम्हांला सांगितलीं, त्यांच्यापैकीं कुणाशींच कमळाबाईनें लग्न केलेलें नाहीं. भय्यासाहेबांचें तर त्या वेळीं लग्न झालेलेंच होतें. मुरारराव भारी तिरसट असून तितके हुषारही नव्हते. आनंदरावांविषयीं संशय यायचा. पण त्यांनीं एक दिवस सुध्दां वांकड्या नजरेनें कमळाबाईकडे पाहिल्याचें कीं तिच्याशीं थट्टेचा शब्द बोलल्याचें आपण कधीं पाहिलें नाहीं. मग कसें वाटावें ? राहता राहिले कलावंत. त्यांच्यासंबंधानें वादच नाहीं. त्यांना पाहिलें कीं, कमळाबाई नाक मुरडी आणि कपाळाला आंठ्या घाली. आतां इतकें असून, बाह्यात्कारी इतकी नापसंती असून आंतून तिचें त्यांच्यावर प्रेम होतें म्हणावें तर मग मोठेंच नवल म्हटलें पाहिजे. पण कमळाबाईच्या अंगीं इतका कुठला लपंडाव असायला ? ती अगदीं साधी, कुळशीळाची बायको. छक्केपंजे अगदीं नसत हो. आम्हांला तर ती भारी आवडत असे. बिचारी कधीं भेटते कुणास ठाऊक ! त्या वेळच्या एकंदर गोष्टींचा विचार केला तर आमच्या घरीं जी मंडळी येत त्यांपैकीं कोणाशीं तिनें लग्न केलें असेल असें मला तरी नाहीं वाटत.मग ईश्वरी सूत्र काय असेल तें असो. ”

इतकें बोलून बाई उठल्या. संध्याकाळ झाली. बोलण्याच्या नादांत

दिवस मावळून दिवे लागल्याचें सुध्दां त्यांच्या लक्ष्यांत आलें नाहीं. त्यांनीं प्रेमपूर्वक इंदिरेचा निरोप घेतला व त्या आपल्या गाडींत जाऊन बसल्या.

एवढीच काय ती बातमी ह्या बाईनीं इंदिरेला सांगितली. पण ही किती तुटपुंजी बातमी ! इंदिरा कांहीं वेळ मनन करीत तेथें राहिली व नंतर तीही गाडींत बसून घरीं गेली.

पुतळाबाई छोट्या जहागीरदारांना घेऊन सोलापुरास गेल्या व इंदिरा आणि लीला मुंबईहून निघून दत्तापुरास येऊन पोंचल्या. येथें आल्या-वर सुध्दां इंदिरेचे विचारतरंग चाललेच होते. तिनें सरतेशेवटीं असा सिध्दांत काढला कीं जी चार मंडळी आपल्या भावोजीकडे येत होती म्हणून शेटाणीबाईनीं सांगितलें, त्या मंडळींपैकींच कोणाशीं तरी कम-ळजेनें लग्न करून घेतलें असावें; त्यांतल्या त्यांत कलावंत म्हणून ज्यांना म्हणत त्यांच्याशींच तिचें लग्न झालें असावें ही गोष्ट ज्यास्त संभ-वनीय आहे.

पण मग आनंदरावांसबंधानें काय ? आतां जो मोहनेचा नवरा आहे तोच तो असेल काय ? त्याच्या स्वरूपाचें, घराण्याचें, वर्तनाचें वगैरे जें वर्णन त्या बाईनीं केलें तें सर्व बाजूंनीं ह्या आनंदरावांशीं जुळूं लागलें. नांव तेंच, वडीलही डॉक्टरकीचाच धंदा करणारे; चेहरेपट्टी सुध्दां तशीच; सर्व कांहीं जुळलें. इंदिरेला आतां मात्र कसेंसेंच वाटूं लागलें. तिला वाटत होतें कीं आडनांव तरी निराळें असेल पण तें सुध्दां जुळलें. राहून राहून इंदिरेला आतां त्या भयंकर स्वप्नाची आठवण होऊं लागली व त्याबरोबर तिच्या अंगावर शहारे येऊं लागले. त्या स्वप्नांत आपली बहीण 'कमळजा' ही मेली व त्यांत आनंदरावांचें अंग आहे असें तिनें पाहिलें होतें. तिच्या आतां कल्पना सुरू झाल्या. 'त्या तरुण चांडाळ चौ-कडीपैकीं कोणीतरी माझ्या भोळ्याभाबड्या कमळजेला भुलथाप देऊन तिच्याशीं लग्न केलें आणि नंतर तिचा घात केला असें झालें असेल काय ? व त्या कामांत आनंदरावांचें अंग असेल काय?' पण पुनः ती वि-चार करी, व असा वाईट व कुत्सित विचार आपल्या मनांत आला म्ह-

णून ती स्वतःला दोष लावून घेई. इंदिरेचा स्वभाव फार न्यायी; वावगें म्हणून तिला अगदीं खपत नसे. आनंदरावांसंबंधीं असा संशय घेण्यास सबळ कारण कांहीं नव्हतें; व केवळ स्वप्नावर विश्वास ठेवून अशीं कारणें शोधीत बसणें हें तिला बरें वाटेना. नंतर ती मनांत म्हणूं लागली कीं ह्या गोष्टीचा खुलासा; आनंदरावांना विचारिलें तर त्यांच्याकडूनच होईल. तेच आनंदराव आपण काय ? व जर असाल तर माझ्या दुसऱ्या बहिणीसंबंधानें—कमळाबाई मास्तरिणीसंबंधानें आपणाला कांहीं माहिती सांगतां येईल काय ? असा प्रश्न आनंदरावांना विचारावा व काय सांगतात तें पहावें असें शेवटीं इंदिरेनें आपल्या मनाशीं ठरविलें.

हा प्रश्न आनंदरावांना विचारावयाचा तर त्याला योग्य संधि कोणती, ओघाओघानेंच हा प्रश्न कसा काढावा, कोणत्या झोंकावर त्यांच्याशीं बोलावयाला सुरवात करावी, आपलें हृद्गत तर त्यांना कळूं नये, त्यांना संशय तर येऊं नये, अशा रीतीनें कसें बोलणें काढावें, बोलण्यांत कमळाबाईची किती माहिती विचारावी, कोणती विचारूं नये, कोणती विचारण्यास हरकत नाहीं, याचा ती दिवसानुदिवस विचार करीत असतांच गांवांत देवीची भयंकर सांथ सुरू झाली.





# प्रकरण ५ वें.

——:०:——

## मोहनेच्या खेपा.





ट्टुमदार व सुंदर दत्तापूर गांवास आतां मोठे वाईट दिवस प्राप्त झाले. येथील हवा फारच आरोग्यकारक व समशीतोष्ण असल्यानें लांब लांबचे लोक प्रकृति सुधारण्याकारितां या ठिकाणीं येत असत. अशा गांवांत सांथ उद्भवली ही आजपर्यंत कधीं न झालेली गोष्ट होय. ह्मणून गांवचे सर्व लोक अगदीं घाबरून गेले. तापही बराच तीव्र असल्यानें ठिकठिकाणीं डांबर जाळणें, धूप व ऊद घालणें, गंधक पेटविणें, वगैरे रोगप्रतिबंधक उपाय चालले होते व झाडलोट, साफसफाई इत्यादि जारीनें सुरू होतीं. डॉक्टर लोकांची तर रोगी पहाण्याकरितां फिरून फिरून तिरपीट उडाली.

लीलेला येथें आणली आणि ताप सुरू झाला ह्मणून इंदिरेला वाईट वाटूं लागलें. तिची प्रकृति बिघडेल, तिला ताप येईल, म्हणून इंदिरेला काळजी पडली असें नव्हे. कारण तिचा त्या सर्वशक्ति परमेश्वरावर पूर्ण विश्वास होता. 'आलीया भोगासी असावें सादर, देवावरी भार घालूनीया' असें तिचें ठाम मत झालेलें होतें. कोणतेंही संकट आलें तरी न डगमगतां ईश्वरावर भरंवसा ठेवून स्वस्थ राहणारे असे जे थोडे—व हेच लोक सुखी—आहेत. त्यांपैकींच एक इंदिरा होती. तिला वाईट वाटण्याचें कारण एवढेंच कीं गांवांत तापाची सांथ असल्यानें लीलेचे दिवस म्हणावे

तसे सुखानें व मजेनें जाणार नाहींत, व तिचें राहणें कंटाळवाणें होईल, याचेंच इंदिरेला वाईट वाटूं लागलें.

इंदिरेची राहणी पूर्वींप्रमाणेंच साधी व नेमस्तपणाची होती. सर्जेरावांनीं तिला चांगली नेमणूक करून दिली होती; आजीसाहेबांनींही आपल्या खासगीपैकीं बरीच मोठी रक्कम तिला बक्षीस दिलेली होती. परंतु तिनें आपला घरखर्च पूर्वींप्रमाणेंच बेतावर ठेविला होता. नाहीं म्हणायाला एक मोलकरीण मात्र तिनें नोकरीस जास्त ठेविली होती. तथापि आलागेला, पईपाहुणा, यांचा खर्च तिला बराच असे व तीही आपल्या थोर कुळास अनुसरून सर्वांचा चांगला परामर्ष घेई. दानधर्मांत, देवाकडेही तिचा पुष्कळ पैसा खर्च होत असे. तरी पण अभिमान किंवा डामडौल यांचा गंधसुद्धां तिच्या वर्तनांत नव्हता. बरोबरच आहे, जे खरे गर्भश्रीमंत असतात त्यांची वृत्ति अशीच कायम असते; तींत फेरबदल होत नाहीं.

लीला नेहमीं मुंबईत राहिलेली, तिला या एवढ्याशा गांवांत कसें चैन पडणार ! तशांतून आपल्या घरांत करमणूकीचें एकही साधन नाहीं; शिवाय गांवांत तापाची सांथ, मोकळ्या मनानें राहतां येणार नाहीं; तेव्हां येथें राहण्याचा लीलेला कंटाळा येईल याचीच इंदिरेला काळजी पडली. एके दिवशीं तिसऱ्या प्रहरीं कुठेंसें हळदीकुंकवाचें बोलावणें होतें, म्हणून त्या दोघी बहिणी तयारी करून बसल्या होत्या. लीला रूपानें अगोदरच सुरेख, तशांत उपवर झालेली व बाहेर जावयाचें म्हणून तिनें बराच थाटमाट केलेला होता. गळ्यांत मोत्यांचें पेंडें व हिऱ्याची चिंचपेटी, हातांत जडावाच्या पाटल्या व चमकणाऱ्या बांगड्या वगैरे दागिने लटकावून दिले होते. जाण्यास थोडा अवकाश होता म्हणून जाळीचें कापड घेऊन त्यावर कशीदा काढण्यास तिनें सुरुवात केली होती. इंदिराही तेथेंच बसलेली असून तिचा कांहीं विचार चालला होता. इतक्यांत एक मोलकरीण येऊन सांगून गेली कीं आज हळदीकुंकवाचा बेत राहिला; घरीं लहान मुलगा आजारी आहे, येऊं नका म्हणून कळवायला आलें. हा निरोप ऐकून इंदिरेला जास्तच वाईट वाटलें. ती म्हणाली:—“ नेहमीं घरकोंबड्या-

सारखें घरांत बसून रहायचें. म्हटलें, आज तरी तुला बाहेर जायला मिळेल. तितका ह्यानें वेळ गेला असता. पण त्यांचा मुलगाच कां आजारी पडावा! लीलाताई, तूं आलीस मजजवळ राहण्याकरतां, आणि गांवांत अशी धांदल, म्हणून मला वाईट वाटतें. आक्काकडे राहायला गेलें पण तिथें अगदीं कंटाळा येऊन गेला असें तूं पुढें म्हणत राहशील."

लीला हांसली:—"आक्का, गांवांत तापाची सांथ आली तर त्याला तूं तरी काय करणार? झालेंच, माझी करमणुकीचीं साधनें माझ्याजवळ आहेतच. वाचायला पुस्तकें आहेत आणि हा कशीदा तर आहेच नेहमींचा. मला नाहीं इथें इतकें कंटाळवाणें वाटत. मी आनंदांत आहें. पण आक्का, मी तुला एक विचारूं? रागावणार नसलीस तर विचारतें. तूं कसल्या विचारांत आहेस? जेव्हां बघावें तेव्हां काळजींत दिसतेस. मुंबईहून आल्यापासून मी पहातें आहें."

इंदिरा थोडी थांबून म्हणाली:—"होय बाई. मी एका विचारांत आहें. नाहीं ह्मणत नाहीं."

"कोणत्या?"

"मी नाहीं तें सांगत. इतकी कांहीं महत्वाची गोष्ट नाहीं. गोष्ट कली म्हणा, माझ्या मनांत एक शंका आली आहे व मी एका गोष्टीचा पत्ता काढण्याची खटपट करीत आहें. सदोदित माझें सर्व लक्ष तिकडेच असतें म्हणून मी अशी चिंताक्रांत दिसतें."

वाचकहो, इंदिरेच्या चिंतेचें मूळ तुम्हांला सांगण्याची जरूर नाहीं. तिची बहीण कमळजा इजशीं त्या चिंतेचा संबंध होता हें तुह्मीं ओळखलेंच असेल. कमळजेनें लग्न करून घेतलें होतें एवढी बातमी शेटजीणबाईंनीं तिला सांगितल्यापासून तिच्या मनाचा असा ग्रह झाला कीं दयाबाई नांवाची बाई ज्या मुलाला घेऊन आली आहे तो मुलगा कमळजेचाच होय. तिला असें वाटण्याचें कारण एवढेंच कीं त्या मुलाचे डोळे व एकंदर चेहऱ्याची ठेवण अगदीं कमळजेच्या चेहऱ्यासारखी हुबेहूब होती. (निदान इंदिरेला तरी तसें दिसलें.) त्या मुलाचे इतर अवयव सारखे नव्हते.—छे! अगदींच निराळे दिसत.

पण डोळे व डोळ्यांचें पाणी हुबेहुब कमळजेसारखे. इंदिरेचा असा ग्रह होण्यास जोडगण म्हटली म्हणजे त्या मुलाची आई ह्मणविणारी ती दर्याबाई—ह्या बाईचें संशयास्पद वर्तन हें होय. तिच्या वर्तनानें इंदिरेच्या कल्पनेला पुष्टी मिळाली. पहिल्यापासूनच इंदिरेला वाटे कीं इतक्या म्हाताऱ्या बाईला इतका लहान मुलगा असणें संभवनीय नाहीं; तरी पण दर्याबाईचा बांधा राठ, व चेहरा भारी रासवट होता; अशा बाया असतात त्यापेक्षां वयानें जास्त वृद्ध दिसतात हेंही इंदिरेला माहीत होतें. अशा शंका उपशंका उत्पन्न होत. मुंबईहून आल्यानंतर इंदिरा पुष्कळ वेळां दर्याबाईच्या दारावरून गेली होती; व दरवाजांत तो मुलगा उभा असतां त्याजबरोबर ती अनेक वेळां बोलली होती. एकदां तर ती आंत सुद्धां गेली होती—दर्याबाईनींच आग्रह करून तिला आंत बसावयाला बोलाविलें होतें—त्या वेळीं हा मुलगा कुठें जन्मला, ह्याचें आजोळ कुठें आहे, हा इतके दिवस लहानाचा मोठा कुठें झाला, वगैरे माहिती काढून घेण्याविषयीं इंदिरेनें आडून आडून पुष्कळ प्रयत्न केला. पण दर्याबाई किती वस्ताद ! त्या जणूं इंदिरेचें बारसें जेवल्या होत्या. त्यांनीं तिला बिलकुल थांग लागूं दिला नाहीं. त्यांनीं मुळींच हकीकत सांगितली नाहीं असें नाहीं; कांहीं सांगितली; त्या म्हणाल्याः—“ हा माझाच मुलगा. ह्याच्यापेक्षां एक मोठा होता तो देवी येऊन वारला. इंदुराकडे आमच्या माणसांना मोठी नोकरी होती तिकडेच हा लहानाचा मोठा झाला. पुढें गेल्या उन्हाळ्यांत तिकडे एकाएकीं ताप आला आणि सर्व कांहीं आटपलें. मग मी याला घेऊन इकडे आलें. ” इतकी हकीकत दर्याबाईनीं सांगितली. पण याशिवाय कांहींच मजकूर त्या सांगेनात. इंदिरेनें कांहीं विचारिलें कीं त्या बोलतनाशा होत व उत्तरच देत नसत. तरी आणखी एक दोन प्रश्न इंदिरेनें विचारिलेच. त्याबरोबर त्या संतापून म्हणाल्याः—“ माझें काय आहे, काय नाहीं तें माझें मला ठाऊक. दुसऱ्याला त्याची विचारपूस करण्याचें कारण नाहीं. ” असा खडखडीत जबाब मिळाल्यावर इंदिरा काय बोलणार ! तिला एकदां वाटे कीं या बाईनें जेवढी हकीकत सांगितली तेवढीच तिला माहीत असेल, पण दर्या-

बाईच्या एकंदर सांगण्यांत कांहीं तरी गूढ दिसत होतें, त्याचाच इंदिरेला संशय येत होता. पण ह्यापेक्षां जास्त माहिती विचारण्याला आतां इंदिरेला सबब राहिली नाहीं. ह्मणून सध्या जास्त कांहीं विचारूं नये; पुढें हळू हळू सर्व काढून घेतां येईल, असा विचार करून इंदिरा स्वस्थ बसली. पण वरचेवर ही गोष्ट तिच्या मनांत येत असे, यामुळें तिचा स्वभाव जरी बोलका नव्हता तरी ती अशी विचारमग्न होत असल्यामुळें नेहमीं स्तब्ध रहावयाची. इतकी कीं लीलेच्यासुद्धां ही गोष्ट लक्ष्यांत आली.

इंदिरेनें शेवटीं जें उत्तर दिलें त्यास उद्देशून लीलेनें विचारिलें:—"ताईसंबंधानें कांहीं आहे काय ?"

इंदिराः—"छे छे ! ताईसंबंधानें मुळींच नाहीं."

लीलाः—"आक्का, ताई सुखी आहे असें तुला वाटतें काय ग ? कधीं कधीं तर ती भारीच त्रास करून घेते; तिच्या जिवाला चैन असत नाहीं, ह्मणून म्हणतें."

इंदिराः—"माझी तर इच्छा आहे कीं तिनें सुखी असावें. तूं ह्मणतेस तसें मीं देखील पुष्कळ वेळां पाहिलें आहे, पण त्याचें कारण नाहीं मला ठाऊक."

लीलाः—"आनंदरावांचें मात्र तिच्यावर फार प्रेम आहे. तिच्या म्हणण्याबाहेर ते एवढें सुद्धां जात नाहींत."

आणि खरोखरच मोहनेवरील आनंदरावांचें हें फाजील प्रेम पाहून लीलेला सुद्धां आश्चर्य वाटत होतें. आनंदरावांच्या घरीं न जाण्याचा इंदिरेनें निश्चय केला होता तो त्यांच्याबद्दलच्या तिरस्कारामुळें असो, अगर इंदिरेच्या मानी स्वभावामुळें असो, कीं इतर कोणत्याही कारणामुळें असो, पण तो निश्चय इंदिरेनें फार कडकपणानें पाळिला. पण लीलेला तिनें कधीं नको ह्मटलें नाहीं. लीला नेहमीं आनंदरावांच्या घरीं जात असे. त्यामुळें त्यांचें आपल्या बायकोशीं—मोहनेशीं—वर्तन कसें असतें हें पहाण्याची लीलेला पुष्कळ संधि मिळाली होती. ती इंदिरेला म्हणालीः—"आक्का, मी लहान होतें त्यापेक्षां आतां आनंदरावांचें वर्तन मला फार आवडतें. त्या वेळीं आमचें सर्वांचेंच मन त्यांच्यासंबंधानें वाईट झालें

होतें, नाहीं ? पण आतां तसें नाहीं वाटतें. ताईवर तर ते किती प्रेम करतात ?" इंदिरेनेंही तें कबूल केलें. आनंदरावांची एकंदर वागणूक सभ्यपणाची आहे. त्यांचा स्वभावही प्रेमळ आहे असें इंदिरेनें म्हटलें. तिची व त्यांची आतांशा पुष्कळ गांठ पडत असे, व आनंदरावही तिच्याशीं प्रेमानें व मर्यादेनें बोलत असत. तरी पण इंदिरा अजूनही त्यांच्या घरीं जात नव्हतीच.

इतक्यांत कोणसें आलें ह्मणून इंदिरेनें व लीलेनें दरवाजाकडे पाहिलें, तर वसंतराव आंत येत असलेले दिसले. त्यांना पहातांच लीलेच्या मुखा-वर हास्य चमकूं लागलें व स्मित आणि लज्जा यांचें विलक्षण मिश्रण तिच्या ठिकाणीं दिसूं लागलें.

इंदिराः—" वसंतराव, तुह्मी बरेच वस्ताद दिसतां हो. मीं येतांना किती म्हटलें कीं चला म्हणून; पण माझी परीक्षा आली, अभ्यास केला पाहिजे, असें सांगितलेंत. आणि आतां कसे आलांत ? झाली का परीक्षा इतक्यांत ? तरी म्हटलें लीलेशिवाय इतके दिवस कसें चैन पडलें ?"

वसंतराव हांसून म्हणालेः—" चालूं दे थट्टा. मी कांहीं त्याकरितां आलों नाहीं. काकांनीं भेटायला बोलावलें म्हणून आलों."

" काकांनीं कांहीं बोलावलें नसेल; लीलेला भेटायला ह्मणून कांहीं तरी निमित्त काढून तुह्मीच आला झालें. अशी माझ्याजवळ चोरी नको." असें इंदिरा हांसत हांसत ह्मणाली. वसंतरावही हांसूं लागले. इंदिरेनें त्यांचें हृद्गत ओळखलें तेव्हां हांसण्यावारी घालविल्याशिवाय त्यांना दुसरा मार्गच राहिला नाहीं.

कांहीं दिवस लोटले, पण गांवांत तापाची सांथ वाढत्या प्रमाणावरच होती. वसंतरावांच्या येण्यानें विश्वासरावांना चांगली मदत झाली. कारण औषधें तयार करण्यांत व रोग्यांकडे जाऊन तब्येत पाहून येण्यांत वगैरे त्यांचा बराच उपयोग झाला. मधून मधून ते इंदिरेच्या घरीं येऊन घट-का दोन घटका बसून जात असत.

इकडे दर्याबाईच्या घराकडे मोहनेच्या दररोज खेपा होऊं लागल्या.

मत्सरानें ग्रस्त झालेल्या व संशयपिशाच्चिकेनें पछाडलेल्या स्त्रिया कोठें न जातील व काय न करतील हें कांहीं सांगतां येणार नाहीं. तिच्या मनानें घेतलेला तो भयंकर संशय—अखेरीस हा संशय कोणत्या थरावर जाणार होता व त्यापासून केवढें मोठें अरिष्ट ओढवणार होतें याची मोहनेला किंवा कोणालाही कल्पना सुद्धां नव्हती—म्हणजे आपल्या नवऱ्याशीं त्या मुलाचा कांहीं तरी संबंध आहे, हा संशय आतां इतका वाढला कीं, तो अगदीं मर्यादेच्या बाहेर गेला. त्याला आवरून दाबांत ठेवणें शक्यच नव्हतें. मोहनेची चित्तवृत्ति इतकी क्षुब्ध होऊन गेली होती कीं, तिला गवताच्या गंजीची उपमा देतां येईल. फक्त एक ठिणगी पडण्याचाच अवकाश कीं भडका झालाच!

त्या घराकडे मोहनेची खेप झाली नाहीं असा दिवसच जात नसे. रावपुऱ्याकडे ह्मणून ती जाई; तेथून खालीं येऊन दर्याबाईचें घर ज्या गल्लीला होतें, त्या घरावरून पलीकडे लांब एक लहानसें खोपट होतें, तिकडे जाई. तिकडून पुनः त्याच घरावरून परत येई. जणूं काय आपण त्या खोपटांत एक बाई होती तिच्याकडे जातों असें ती लोकांस दाखवीत असे. येतांना तो मुलगा दरवाज्यांत दिसला कीं, ती थांबे व त्याच्याबरोबर बोलत उभी राही. कामीण झालेल्या माणसाला सर्वच पिवळें दिसतें त्याप्रमाणेंच तिची स्थिति झाली होती. तिच्या संशयग्रस्त डोळ्याला त्या मुलाच्या चेहऱ्यांत व तिच्या नवऱ्याच्या चेहऱ्यांत अत्यंत साम्य दिसत होतें ह्मणून ती त्याच्या तोंडाकडे वरचेवर न्याहाळून पाही. तिला कधीं कंटाळाच येत नसे.

मोहना इकडे खेपा घाली ती केवळ मत्सरामुळें घाली असें नव्हे; तर त्यामुळें तिच्या मनाचा जो निश्चय झाला होता तो तडीस नेण्याकरितां ती इकडे वरचेवर येत असे. ह्या गोष्टीचा पुरता तपास लावायाचा, कांहीं गुप्त प्रकार असेल तर तो उजेडांत आणावयाचा, व मनाची एकदां पूर्ण खात्री करून घ्यावयाची असा तिचा पक्का निश्चय झालेला होता. पण ह्याकरितां कोणते उपाय योजावयाचे याचा मात्र विचार तिनें केला नाहीं.

खरी हकीगत काय आहे तेवढी समजली म्हणजे झालें. मग कांहींही होवो. अशी तिची वृत्ति झाली. तिचा स्वभाव इतका मानी, पण या वेळीं ती सर्व मान विसरली. "माझ्या पाळतीवर तूं असतेस!" अशी खोंच आनंदरावांनीं तिला मारिली होती. तरी सर्व गोष्टींचा तपास लावण्यासाठीं पाळत राखणेंचसें काय, पण याहीपेक्षां वाईट काम करण्यास ती तयार होती.

तिच्या डोक्यामध्यें हें वेडच शिरलें होतें. ह्याला रोग ह्मणावयास कांहीं हरकत नाहीं. ह्या गल्लीकडे रोज रोज येऊन काय मिळेल असें तिला वाटत होतें? तिला तरी निदान माहीत नव्हतें! तिला इतकेंच सांगतां आलें असतें कीं, हें ठिकाण सोडून आपणास राहवत नाहीं. एवढें मात्र खरें कीं, त्या घराकडे आनंदरावांच्या किती खेपा होतात हें समजून घेण्याची तिची इच्छा होती.

तिची इच्छा होती खरी, पण दैव तिला अनुकूल नव्हतें. कारण त्या मुलाला औषध देण्याकरितां आनंदराव तिकडे गेले असतांना एक दिवससुद्धां मोहनेच्या दृष्टीस पडले नाहींत. यदाकदाचित् त्यांची या घराशेजारीं गांठ पडली असती व 'इकडे कां?' असें त्यांनीं विचारिलें असतेंच तर तिची सबब तयार होतीच. त्या पलीकडच्या खोपटांत जी बाई होती, ती शिंपिणीचा धंदा करी. तिच्याकडे शिवण्याकरितां मोहनेनें कांहीं चोळ्या व पोलकीं टाकिलीं होतीं. यजमानांची गांठ पडली आणि त्यांनीं विचारिलें तर चोळ्या शिवून तयार झाल्या आहेत कीं नाहीं हें पाहण्याकरितां गेलें होतें, असें ती सांगणार होती.

अशीच एके दिवशीं मोहना त्या गल्लीनें जात असतां दर्याबाई दारांत उभ्या राहून रस्त्याकडे लांबवर नजर लावून पहात असलेल्या तिला दिसल्या. दर्याबाईनींही तिला पाहिलें. पण ही आनंदराव डॉक्टरांची पत्नी असें त्यांना अजून माहीत नव्हतें. मागें एकदां इंदिरा बरोबर असतांना तिचें व त्यांचें बोलणें झालें होतें. पण तेवढेंच. त्यानंतर कधीं बोलण्याचा प्रसंगच आला नव्हता. तेव्हां आतांही न बोलतां दर्याबाई तशाच रस्त्या-

कडे पहात उभ्या होत्या. त्या बोलल्या नाहींत म्हणून मोहनेला राग आला. मत्सरानें—सवती-मत्सरच म्हणावयाचा—ती अगदीं वेडी बनली होती, व त्या वेडाच्या भरांत तिनें असें अनुमान काढलें कीं, बाई आपल्या यजमानांचीच वाट पहात आहेत. मोहना संतापानें फणफणत तशीच पुढें चालली. शिंपिणीच्या खोपटाजवळ जाईपर्यंत तिनें मागें वळून पाहिलें नाहीं. बतावणी ठीक झाली पाहिजे म्हणून ती खोपटांत शिरली व तिनें शिंपिणीला कांहीं सांगितलें. पण शिंपिणीला कांहीं समजलें नाहीं. ती तिच्याकडे आश्चर्यचकित मुद्रेनें पहात राहिली. आपण काय बोललों हें मोहनेला सुद्धां समजलें नसावें. कारण नाहीं तर तिनें शिंपिणीची समजूत घातली असती. मोहना तशीच खोपटाच्या बाहेर पडली व भराभर पावलें टाकीत चालूं लागली. वाटेंत एक लहान हातगाडी उभी असून तींत तो मुलगा बसलेला तिनें पाहिला. मुलगा अगदीं अशक्त, रोडका व फिकट दिसला. अशा मुलाला रस्त्यांत एकटा कसा टाकला याचें तिला फार आश्चर्य वाटलें. त्या मुलानें तिला ओळखलें, व तो गालांतल्या गालांत हसूं लागला.

मोहनेनें त्याला म्हटलें:—"बाळ, तूं येथें रस्त्यांत असा कां अगदीं एकटा?"

मुलानें उत्तर दिलें:—"तो छत्री आणावयास गेला आहे."

"कोण तो?"

"डॉक्टरांनीं पाठवून दिलेला पोऱ्या. ते म्हणतात कीं, मी चालवेल तितकें चाललें पाहिजे. दमलों म्हणजे मग गाडींत बसावयाचें नि त्या पोऱ्यानें गाडी ढकलावयाची. तुम्हांला ठाऊक आहे का कीं, माझें ढोलगें फुटलें पण मी रडलों नाहीं. डॉक्टर म्हणाले कीं, मी तुला दुसरें आणून देईन. त्यांनीं तें आणलें कीं मग शिपाई परेड करतील."

"ते आंत आहेत का?" असें आनंदरावांना उद्देशून मोहनेनें त्यास विचारिलें.

"हो. ढोलगें फुटलें. पण वाजविणारा मोडला नाहीं. सगळे शिपाई मीं घरांत भिंतीशीं उभे करून ठेविले आहेत."

इतक्यांत छत्री घेऊन तो पोऱ्या आला. पूर्वीं आनंदरावांच्या घरीं तो कांहीं दिवस नोकरीला होता ह्मणून मोहनेनें त्याला ओळखून विचारिलें—" तूं रे कां इथें ? "

" ह्या मुलाची गाडी ढकलायपाईं मला ठेवलंया नव्ह जी ! डाकदार सायबानींच मला इकडं लाऊन दिलं. मुलगा पुन आज जरा लई बेमार हाय. डाकदारसावबी यायचं ! पुन अजून का आलं न्हाइत कीं ? "

हें ऐकून मोहना चट्कन वळली व चालूं लागली. तिला वाटूं लागलें कीं हा पोऱ्या मुद्दाम खोटें बोलून आपणाला फसवीत आहे; मुलगा सांगतो तेव्हां आपले यजमान आंत घरांत असलेच पाहिजेत. ती भराभर पावलें टाकीत निघाली पण 'डाक्टरांनीं पाठवून दिलेला पोऱ्या' हे त्या मुलानें उच्चारलेले शब्द तिच्या मनांत एकसारखे घोळूं लागले. ती आपल्याशींच म्हणूं लागली:—"या मुलाचा कांहीं संबंध असल्याशिवाय त्याची गाडी ढकलण्याकरतां पोऱ्या पाठवून देण्याची तिकडे इतकी काय गरज होती ?" अरेरे!!! खरी हकीकत तिला कळली असती तर ! आनंदरावांकडे यांत कांहीं तरी दोष होता काय ? मुलगा जास्तजास्त अशक्त होऊं लागला, तेव्हां आनंदरावांनीं दर्याबाईंना सांगितलें कीं या मुलाला मोकळी हवा द्यावयाला पाहिजे, सबब गाडींतून फिरावयास नेऊन आणलें तर बरें. म्हणून दर्याबाईंनीं एक लहानशी तीन चाकी गाडी तयार करविली, पण तिला फिरवावयाला कोणी मिळेना म्हणून त्यांनीं आनंदरावांजवळ रडगाणें गाइलें. त्यांच्या लक्ष्यांत हा पोऱ्या चटकन् आला व त्यांनीं त्याला दर्याबाईकडे नोकरीस जोडून दिलें. ही काय ती खरी हकीकत. पण मोहना मत्सरानें आंधळी झालेली असल्यानें तिचे नाहीं नाहीं ते तर्क सुरू झाले; व त्या दिशेनें ती प्रयत्न करूं लागली. पण आपण होऊन आपल्या स्वतःवर केवढें मोठें संकट ओढून घेत आहोंत हें तिच्या समजुतींत आलें नाहीं.

मोहना तडक घरीं जाऊन पोंचली. आंत गेल्याबरोबर यजमानांचा तिनें तपास केला. नोकरांनीं तिला सांगितलें कीं आनंदराव बाहेर गेले

नसून घरांतच खालीं तळघरांत कायसें करीत आहेत. पण मोहनेला तें खरें वाटेना. खोटें बोलण्याचा, आपणाला फसविण्याचा सगळ्यांनींच जणुं विडा उचलिला आहे असें तिला वाटलें. म्हणून 'चक्षुर्वै सत्यम्'; प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहून आपली खात्री करून घ्यावी व मग खोटें सांगणाऱ्या नोकरचाकरांची खरडपट्टी काढावी असा बेत करून ती तळघरांत उतरावयाचा जो जिना होता त्या जिन्याकडे वळली. हें तळघर म्हणजे एक लहानशी खोलीच होती, व तेथें विशेष सामानही नव्हतें. विषारी औषधें, नेहमीं न लागणारीं अशीं, आनंदराव ह्या तळघरांत ठेवीत असत; व तिकडे न जाण्याबद्दल आनंदरावांनीं सर्वांना ताकीद देऊन सोडिली होती. म्हणून कोणीही बिलकुल तिकडे जात नसत.

जिना उतरून मोहना तळघराच्या दारांत गेली व आंत डोकावून पाहूं लागली. तों एका लोखंडी पेटीचें दार उघडें असून आनंदराव त्यासमोर उभे असल्याचें व पेटींत कागदाचीं भेंडोळीं व पत्रें यांसारखें कांहीं असल्याचें तिला दिसलें. त्याबरोबर ती चपापली.

वाचकहो, ह्या तळघराची व तेथें असलेल्या लोखंडी पेटीची तुम्हांला माहिती आहेच. कलावतीची तब्येत बिघडल्याचें आनंदरावांना ज्या रात्रीं समजलें त्या रात्रीं—पुष्कळ वर्षांची गोष्ट—त्यांनीं या पेटींत आपल्या वडिलांकडून आलेलें महत्त्वाचें पत्र ठेविलें होतें. तळघरांत एक लोखंडी पेटी आहे ही गोष्ट मोहनेला माहीत होती; पण त्या पेटींत काय आहे हें समजून घेण्याची इच्छा तिच्या मनांत अद्यापि उत्पन्न झाली नव्हती. लग्न झाल्यानंतर आनंदरावांनीं एकदां सर्व घर दाखवीत दाखवीत तिला येथें आणली होती पण ह्या ठिकाणीं ती कधींच आली नव्हती.

ती एकदम चपापली; तिला पाहून आनंदरावही चपापल्यासारखे झाले. पेटीचें दार गडबडीनें लावून त्यांनीं मागें वळून म्हटलें:—"कोण आहे ? अं; आपली स्वारी काय ? आज इकडे येण्याची मेहेनत कशी घेतली ? काय पाहिजे आहे ?"

मोहनेच्या तोंडांतून खरें तेंच बाहेर आलें. "कांहीं नाहीं; मला वाटलें घरीं नसणार, म्हणून पहायला आलें." असें बोलत, अर्धवट बो-

लतच, ती जिना चढून वर गेली. आनंदराव आश्चर्यानें तिच्याकडे पहात राहिले. त्यांच्या कांहीं लक्ष्यांत येईना.

आनंदराव घरांत आहेत काय म्हणून मोहनेनें त्या मुलाला—सोन्याला—प्रश्न केला होता. पण त्याची समजूत न पडल्यामुळें त्यानें "हो" असें उत्तर दिलें हें उघड आहे.





# प्रकरण ६ वें.

—:o:—

## चमत्कारिक शब्द.





याच्या दुसरे किंवा तिसरे दिवशीं सकाळीं इंदिरा व लीला वेणी फणी करीत बसल्या होत्या. लीलेचें कपाळ थोडें दुखत होतें. ह्या दिवसांत कपाळ दुखलें कीं लोकांना संशय पडे व मोठी भीति उत्पन्न होई. लीलेची मलूल मुद्रा पाहून इंदिरेला चिंता उत्पन्न झाली. पण लीलेनें सांगितलें कीं रात्रीं चांगलीशी झोंप लागली नाहीं म्हणून कपाळ व डोकं जरा जड झालें आहे, घसा दुखत नाहीं तेव्हां सर्दीचें कांहीं लक्षण नव्हे, कांहीं वेळानें कपाळ राहील. इतक्यांत एक मनुष्य मोहनेकडून निरोप घेऊन आला कीं तिचा पाय मुरगळला आहे, अगदीं चालवत नाहीं, तेव्हां लीलाताईला पाठवून दिलें तर तितका वेळ जाईल. म्हणून इंदिरेला विचारून लीला तिकडे निघून गेली.

मोहना बिछान्यावर निजली होती. तिला लीलेनें विचारिलें:—" ताई, काय झालें आहे पायाला पाहूं ? असा कसा मुरगाळला ? "

मोहना:—" अग, असा कसा म्हणून काय विचारतेस ? ज्याचें कर्म त्याला भोंवलें. नसती उठाठेव मीं कशाला करायला जावें ? मग असें प्रायश्चित्त मिळायचेंच. "

लीला:—" ताई, तूं कसली उठाठेव केलीस ? "

मोहनाः—" अग, कसली नि काय ? आमचें दोघांचें आतांशीं सरळ नाहीं, थोडा बेबनाव झाला आहे. तूं अशी घाबरूं नकोस. म्हणजे आमचीं दोघांचीं रोज रोज भांडणें होतात असें नाहीं. पण पूर्वीसारखें प्रेम आतां राहिलें नाहीं. तिकडच्या कांहीं गुप्त गोष्टी आहेत, त्या तिकडून मला सांगायच्या नाहींत. तरी पण मला त्या सर्व समजल्या आहेत. मी म्हणतें, इतकी माझ्याजवळ चोरी कशाला ? सर्व उघडाउघड सांगावें. पण तें नाहीं ! मग मला कसें बरें चैन पडेल ! त्या सर्वांचा पुरता तपास लावल्याशिवाय मी कध्धीं राहायची नाहीं. मीं निश्चयच केला आहे—"

लीला आश्चर्यचकित होऊन ऐकत राहिली.

मोहना पुढें ह्मणाली—" पण—मी नाहीं तें सांगत बसत. असल्या गोष्टी तुझ्या कानांवर येणें बरें नव्हे. जाऊं दे तें, आमच्या घराला एक तळघर आहे, नि त्यांत एक लोखंडी पेटी आहे. त्या पेटींत कागद, पत्रें, असें जिन्नस ठेवलेले असतात. मला समजण्याचें कारण. काल मी सहज खालीं त्या पलीकडच्या जिन्यानें गेलें होतें. आंत वांकून पाहिलें तर तिथें कायसें करीत उभे रहाणार. मला पाहिल्याबरोबर घाबरून त्या पेटीचें झांकण घाईघाईनें लावलें, ह्मणून मला वाटूं लागलें कीं त्या पेटींत इतकें काय गुप्त आहे तें पहावें. तेव्हां काल रात्रीं मीं किल्ल्यांचा जुडगा घेतला नि हळूच खालीं गेलें—"

लीला आश्चर्यानें ह्मणालीः—" ताई, तुझ्या मनांत असें आलें तरी कसें ? आणि एवढें धाडस तूं कसें केलेंस ? "

मोहना खोंचून ह्मणालीः—"दम धर, आपल्या चोरट्या कृत्यांनीं संताप आणणारा नवरा तुला मिळाला म्हणजे पहातें मग तूं कसें करशील तें. मोठी आली आहे आजीला शिकवायला ! "

लीलेला पुढें बोलवेना. मोहना तिची वडील बहीण असल्यानें तिला ती अजून वचकत असे.

मोहनेनें सुरवात केलीः—" कोणाला समजेल ह्मणून मीं बरोबर दिवा घेतला नाहीं; अंधारांतच गेलें. आगपेटी मात्र घेतली होती; वाटलें तर

काडी ओढावी म्हणून. मी किल्ल्या चालवून पाहिल्या पण एक सुद्धां चालेना म्हणून मी निराश होऊन वर येण्याकरितां निघालें. तळघरांतून वर यायला तीन पायऱ्या चढाव्या लागतात. दोन पायऱ्या चढलें नि तिसरीवर पाऊल मात्र ठेवलें तर कायसें बुळबुळीत लागून पाय निसरला व मी तिनी पायऱ्यांवरून खालीं बद्दिशीं पडलें. पाय मुरगळा व कळा येऊं लागल्या. मला जाग्यावरून उठवेना सुद्धां. कोणाला हाक मारावी म्हटलें तर मग सर्वच चोरी बाहेर पडायची. म्हणून तशीच धडपडत कशीबशी उठलें व लंगडत टेंकत एकदांची जिना चढून वर येऊन पोंचलें. अशी हकीकत झाली. ''

लीला मुखस्तंभासारखी स्वस्थ ऐकत होती. मोहनेनें नंतर म्हटलें:— '' आज सकाळीं तिकडून काय झालें म्हणून मला विचारायचें झालें. पण 'पाय निसरून पडलें' एवढेंच मीं सांगितलें; जास्त बोललेंच नाहीं.''

थोडा वेळ गेल्यानंतर लीलेनें तो विषय बदलून म्हटलें:—'' काय ग ताई, आनंदराव इथलें बिऱ्हाड मोडून मुंबईला रहायला जाणार आहेत म्हणे. वसंतराव काल म्हणत होते. ''

मोहना:—'' असें कांहीं बोलणें मधून मधून निघतें खरें; पण मला कांहीं पक्कें ठाऊक नाहीं. खरोखरी, रहायला काय, उद्योग करायला काय, मुंबईसारखें दुसरें ठिकाण नाहीं. वसंतरावांची गोष्टच निघाली म्हणून विचारितें. त्यांच्यासंबंधानें इकडचें मन इतकें कसें बिघडलें आहे कोण जाणे ! त्यांचें नांव निघालें कीं पुरे, कपाळाला आंठ्या पडल्याच. परवां कोणसें आलें होतें त्यांच्याशीं बोलणें चाललें होतें कीं, वसंतराव माझ्या धंद्यांत विघ्नें आणतात म्हणून. तें मीं ऐकलें. वसंतरावांचें पोरवय. धडाधड आपले बोलून जात. आमच्या बाबांना यांनींच ह्या गांवांतून हाकललें असें ते मागें म्हणत होते. '' का

लीला:—'' पूर्वीं लोक तसें म्हणत होते खरे, पण आतां काय त्याचें! झाली गोष्ट होऊन गेली. त्या वेळीं वसंतराव लहान होते. आतां ते असें म्हणतील तरी कशाला, नि आनंदरावांच्या धंद्यांत विघ्नें तरी आणतील कशाला ! ''

लीला इतकें बोलली खरी, पण तिची चर्या बदलत होती. तिचें डोकें जास्तच जड झालें व घसाही सर्दीनें दुखूं लागला; अंग मोडून आलें व ती अंथरुणावर जाऊन निजली. दोन प्रहरीं तर ताप भरलाच. आनंदरावांनीं नाडी पाहून सांगितलें कीं एकंदर चिन्हांवरून हा ताप सांथीचाच दिसतो; सबब फार जपलें पाहिजे.

संध्याकाळीं लीला परत जावयाची होती,पण ताप आल्यामुळें गेली नाहीं. बरें, मोहनेनें तरी इंदिरेकडे निरोप पाठवावयाचा, पण निष्काळजीपणामुळें, व तशांत तिचा पाय दुखत असल्यामुळें तिला तिकडे कळविण्याचें बिलकुल सुचलेंच नाहीं. आनंदरावांनीं संध्याकाळीं शोध केला तेव्हां त्यांना समजलें. मग त्यांनीं त्याच वेळीं इंदिरेकडे चिठी पाठविली कीं लीलाताईंना ताप आला आहे, औषध दिलेलें आहे, काळजी करण्यासारखें कांहीं नाहीं.

इंदिरेला खरें सुद्धां वाटेना. सकाळीं विचारिलें तेव्हां कांहींच नव्हतें आणि संध्याकाळींच इतका एकाएकीं ताप कसा यावा, याचेंच तिला आश्चर्य वाटूं लागलें. लीलेला ह्या सबबीवर आपल्या घरीं ठेवून घेण्यांत आनंदरावांचा कांहीं तरी अंतस्थ हेतु असावा असें तिला वाटलें; व तिनें ही गोष्ट सारजेला एकांतीं कळविलीही. लीलेनें आजारी स्थितींत आनंदरावांच्या घरीं राहूं नये व त्यांनीं तिला औषधही देऊं नये असें तिचें मत होतें. लीला तेथें राहिली तर आपणालाही आनंदरावांच्या घरीं जावें लागणार ही गोष्ट इंदिरेला पसंत नव्हती. तिनें सर्व गोष्टींचा क्षणभर आपल्या मनाशींच विचार केला व नंतर सारजेला बरोबर घेऊन ती तशा रात्रीं आनंदरावांच्या घरीं जाण्याकरितां निघाली. जातांना विश्वासराव डॉक्टराकडे तिनें निरोप पाठविला कीं, ‘ लीलाताई आजारी आहे; आपण ताबडतोब आनंदरावांच्या घरीं या, मीही तिकडेच निघालें. ’

इंदिरा जाऊन पोंचली. लीलेच्या अंगांत ताप होतांच. डोकें दुखत होतें, व घसाही दुखत होता. तिच्या पाठीवरून प्रेमानें हात फिरवून इंदिरा म्हणाली:—“ थोडें बरें वाटेनासें झाल्याबरोबर तूं तिकडे निघून

यावयाचें " नंतर मोहनेकडे वळून ती म्हणालीः—" तुला तरी समजत नव्हतें का ? गाडींतून हिला तिकडे पाठवून द्यायची. "

मोहनेनें उत्तर केलें:—"आक्का,तिच्याकडेही चूक नाहीं नि माझ्याकडेही पण नाहीं. दोन प्रहरीं तिला थोडीशी कणकण आल्यासारखी वाटली त्याबरोबर मीं तिकडे कळविलें. तेव्हां लागलीच औषध दिलें. त्याचा परिणाम काय होतो तें पहावें नि मग तुला कळवावें असें माझ्या मनांत होतें. संध्याकाळीं पुनः तिची प्रकृति पाहिली तेव्हां सांगितलें कीं ताप सांथीचा आहे; श्रम अगदीं उपयोगी नाहींत, गाडींतून सुद्धां जाणें धोक्याचें आहे. तेव्हां मग तुझ्याकडे निरोप पाठविला. मी म्हणतें आक्का, झालें हें एका परीनें चांगलेंच झालें नाहीं का ? खुद्द डॉक्टरच्या घरांतल्या-पेक्षां दुसरीकडे कुठें तिची चांगली व्यवस्था होणार ? कुठें जायला नको नि कुठें यायला नको; सगळें कांहीं घरांतल्याघरांत. इथें तिला कांहीं कमी पडणार नाहीं. त्याची काळजी नको. " इतक्यांत आनंदरावही तेथें आले. इंदिरेला पहातांच त्यांना पराकाष्ठेचें आश्चर्य वाटलें. आतां कित्येक वर्षांत ती आपल्या घरीं आली नाहीं आणि आज कशी आली याचेंच त्यांना नवल वाटूं लागलें. त्यांना इंदिरा ह्मणाली:—" लीलेला घरीं घेऊन जातें. तिला इथें ठेवून भागायचें नाहीं. संध्याकाळीं इतका कांहीं ताप नसावा असें वाटतें. त्याच वेळीं गाडींतून परत पाठविली असती तर किती बरें झालें असतें ? मग जाऊं ना घेऊन आतां ? "

आनंदराव:—" छे छे ! त्यांच्या प्रकृतीला अपाय होईल. संध्याकाळ-पर्यंत इतका ताप नव्हता; पण मग एकदां भरला तो भराभर वाढूं लागला. आणखीही जास्त भरेल असें वाटतें."

हे शेवटचे शब्द ऐकतांच इंदिरेला जास्तच भीति वाटली. ती ह्मणाली:—" तर मग मीं तिला आतांच घेऊन जावें ह्मणतें. विश्वास-रावांनाही इकडे येण्याबद्दल निरोप पाठविला आहे. त्यांच्यावर माझी श्रद्धा आहे ह्मणून मी नेहमीं त्यांचेंच औषध घेतें. त्यांच्यासारखेच आपण हुषार आहांत; कांकणभर जास्तच म्हटलें तरी शोभेल. तरी पण लीलेला त्यांचेंच औषध सुरू करावें, असें माझें म्हणणें आहे. "

वरील शब्द उच्चारण्याची तिची तऱ्हा, तिचा बेफिकीरपणा, अभिमान व आपल्याबद्दल दिसून येणारा तिचा तिरस्कार इत्यादि पाहून आनंदरावांना बराच राग आला. ते कांहीं बोलणार इतक्यांत खालून निरोप आला कीं वसंतराव आले आहेत. त्याबरोबर इंदिरा जिना उतरून खालीं गेली. आनंदरावही पाठोपाठ आले.

वसंतराव इंदिरेला म्हणाले:—"निरोप पोंचला; काका बाहेर गेले आहेत ह्मणून मी आलों. कुठें आहेत लीलाताई ? ताप फार आहे काय ?" असें ह्मणून ते जिन्याकडे चालले.

येथें भांडणाला सुरवात झाली. आनंदरावांना संताप चढून ते वसंतरावांसमोर जाऊन उभे राहिले व त्यांनीं त्यांना जिना चढण्यास हरकत केली:—"वसंतराव, हें घर माझें आहे, मी तुम्हांला वर जाऊं देणार नाहीं. तुमचे काका आले असते तर मीं मोठ्या संतोषानें त्यांना परवानगी दिली असती. पण तुम्हांला मी नाहीं येथें पाऊल ठेवूं देणार. तुह्मी माझ्या घरांत कोणत्या हक्कानें पाय घातलात तेवढें सांगा पाहूं."

वसंतराव:—"आनंदराव, मी संतोषानें तुमच्या घरांत आलों नाहीं. लीलाताई आजारी आहेत असें समजलें ह्मणून त्यांना भेटण्याकरितां आलों."

आनंदराव:—"आलां असाल; पण तुमची व त्यांची गांठ पडणार नाहीं."

आनंदरावांचें मस्तक भडकलें आहे असें वाटून वसंतराव त्यांच्याकडे टक लावून पहात म्हणाले:—"त्यांची माझी गांठ पडणार नाहीं ! डॉक्टर, तुह्मी म्हणतां तरी काय ! नीट लक्ष्यांत घ्या. त्यांचें माझ्याशीं लग्न व्हावयाचें ठरलें आहे. चला व्हा बाजूला; मी नाहीं तुमची हरकत ऐकत."

असें ह्मणून वसंतराव तडक जिना चढूं लागले, पण आनंदरावांनीं त्यांना मागें ओढलें. त्याबरोबर दोघांची दंगामस्ती चालली. दंग्यांत कोणाचासा हात लागून अरगिणीची चिमणी फुटली व जिकडे तिकडे

अंधारच अंधार झाला. नोकर लोक भांडण ऐकून काय प्रकार आहे तो समजून घेण्याकरितां आंत आले. मोहना आपला दुखरा पाय घेऊन तशीच लंगडत लंगडत माडीवरून खालीं आली. कुणबिणी, मोलकरिणी, घाबरून किंकाळ्या फोडूं लागल्या. त्यांच्याबरोबर मोहनाही मोठमोठ्यानें ओरडूं लागली. एकंदरींत सर्वच घोंटाळा उडून गेला. पण त्याचें कारण मात्र कोणालाच बरोबर कळलें नाहीं.

वसंतरावांनीं तितक्या अंधारांत व दंग्यांत सर्वांना बाजूला सारून थेट जिन्याचा रस्ता धरिला. आनंदरावांनीं पुनः त्यांना अडाविलें असतें, पण त्यांच्या नोकरांनीं त्यांना धरून तिकडे जाऊं दिलें नाहीं. इतक्यांत त्यांच्या कानांत अगदीं हलक्या आवाजांत खालील चमत्कारिक शब्द पडलेः—
"एकीला विष घातलें त्याप्रमाणें हिलाही येथें ठेवून घेऊन विष घालण्याचा बेत आहे काय?"

ह्या शब्दाबरोबर दारांत कांहीं हालचाल झाली. कोणीं तरी आंत यावें अगर बाहेर जावें अशी चाहूल त्यांना ऐकूं आली.

वरील शब्द कानावर पडतांच आनंदरावांची त्रेधा उडाली. ते जागच्याजागीं स्तब्ध झाले. त्यांच्या सर्वांगाला दरदरून घाम सुटला, तोंडाला कोरड पडली, चेहरा निस्तेज झाला, व पाय लटपटूं लागले. म्हणून ते भिंतीला टेकून उभे राहिले. वसंतराव जिना चढून वर जातांना त्यांच्या बुटांचा आवाज आनंदरावांनीं ऐकला होता. अर्थातच वसंतरावांनीं ते शब्द उच्चारिले नाहींत हें खास. मग उच्चारिले तरी कोणीं? इतक्यांत कोणींशी काडी ओढली, त्याबरोबर दाराच्या आंतल्या बाजूस कोणी परका मनुष्य, दिसण्यांत अगदीं ओंगळ व घाणेरडा असा उभा असल्याचें आनंदरावांना दिसलें. त्यांना काय वाटलें कोणास ठाऊक; त्यांनीं चटकन उडी मारून त्या इसमास धरिलें व गद्‌गद् गद्‌गद् हालवून म्हटलेंः—
"चोरा, तूं कोण आहेस बोल; का देऊं एक ठोसा?"

असें म्हणून आनंदरावांनीं त्याला एक ठोसा तर दिलाच. त्या इसमाची अगदीं पांचावर धारण बसून गेली होती. तो गयावया करून म्हणालाः—"न्हय जी डाकदारसाब, असं काय जी ह्ये? मी आलोय कशा-

पाई. आन् घुसळून घुसळून माझा चेंदामेंदा भाईर काढला किंजी! रोज मी येनारा; कां वळख नाहीं, कां माहिती नाहीं? माज्याकड चूक कसली झाली त्ये तर सांगा."

आनंदराव शुद्धीवर येऊन पाहतात तों त्यांच्या शेजारींच पलीकडे राहणारा दगडू हजाम. त्यांनीं त्यास सोडून देऊन म्हटलें:—"दगडू, तूं काय? या वेळीं तूं इकडे कोणिकडे? मला वाटलें आतां कोणसा चोर आंत शिरून बाहेर निघाला तोंच तूं. माझ्याकडून अशी कशी बरें चूक झाली?" असें म्हणत आनंदराव चोहोंकडे पाहूं लागले पण त्यांना तेथें कोणी दिसेना.

दगडू हजाम आनंदरावांची चाकरी करण्याकरितां कधीं कधीं येत असे. तो म्हणाला:—"डाकदारसाब, मी तुमासनी बोलवायला आलुया. माजा मुलगा, त्यो धोंड्याजी, लई म्हंजी लईच आजारी पडला या बगा; आंग म्हंजी ऊन जाळ, जणुं इस्तुच. गांवांत सांथ आलीया न्हवं, त्योच ताप. म्हतलं आतां रातचं जाऊन तुमासनी कशाला तरास देऊं? पन् बायकु गप बसून दिईल तवा. तिनं अक्शी पाठ पुरविली 'हं जावा, उठा, डाक्दरकंड वक्कद आना, वक्तावर उपाव केलं पाह्यजेत.' एक का दोन. तिच्या ह्या बोलण्यानं जीव कावला. ही भगभग नग म्हून इकडे आलो बगा. हथं येतोय तर तुमीबी चोप काडलासा. आज सकाळच्या पारी कुनाचं त्वांड बगितलं होतं कीं चंडाळानं! व्हयजी, तसं न्हवं, मी का अस्वाल का डुक्कार, इक्त गदगद् हालवायला आन् ठोसा लगावायला?"

आनंदराव:—"तुला कोणी परकें माणूस दिसलें काय? किंवा आंतून बाहेर जातांना कोणाला पाहिलेंस काय?"

"व्हई, जी, कुनालाच बगाय नाहीं. मी भाईरनच दवाखान्याकड निघालों हुतों. पन् घरांत अंदार दिसला आन् बायका वराडलेल्या ऐकूं आलं म्हून हकड आलों. मला भीति पडली जणु कुनाचा खूनच व्हायला लागलाया!"

इंदिरा व मोहना हा सर्व प्रकार आश्चर्यानें पहात जिन्याच्या तळाशीं

उभ्या होत्या. त्यांना कांहींच उमज पडेना म्हणून त्यांनीं आनंदरावांस काय हकीकत आहे म्हणून विचारिलें.

आनंदरावः—" म-म मला वाटलें कोणी परका मनुष्य आंत आला; तशी चाहूल ऐकूं आली. कोणी तरी खात्रीनें आंत आलें होतें." असें म्हणत आनंदराव मोठ्या चमत्कारिक दृष्टीनें चहूंकडे पाहूं लागले.

आपली अजून दाद लागत नाहीं असें पाहून दगडू हजामानें पुनः विचारिलें:—" डाक्दारसाब, चलता न्हवं जी मुलाला बगाय ?"

" हो, हो; अरे मी विसरलोंच. येतों हं. तूं पुढें हो. एक घटकेच्या आंत येतो बघ."

इतका धीर मिळाला तेव्हां दगडू हजाम मुकाट्यानें निघून गेला.

वसंतराव जिना चढून वर निघाले ते थेट लीला निजली होती त्या खोलींत गेले. ती तापानें फणफणून राहिली होती. वसंतरावांनीं तिची नाडी पाहिली. ठोके फारच जलद पडत होते. वसंतरावांचें अंतःकरण फार कोमल असल्यानें त्यांना भय वाटलें व त्यांचें काळीज कांपूं लागलें. ' ह्या दुखण्यांत जर लीलेचा अंत झाला तर पुढें वाट काय ? प्राणापेक्षांही जास्त प्रिय अशा लीलेला जर त्या निर्घृण काळानें ओढून नेलें तर ! मग-मग ' असे कांहीं भलते भलतेच विचार मनांत येऊन वसंतराव मनस्वी कष्टी झाले. लीलेचेंही अंतःकरण भडभडून आलें व तिच्या नेत्रांतून अश्रुधारा चालल्या.

वसंतराव कांहीं बोलणार इतक्यांत विश्वासराव व इंदिरा अशीं दोघेंजण जिना चढून वर आलीं. त्यांना पाहतांच वसंतराव जरा दूर उभे राहिले.

लीलेला येथून हालवावी असें विश्वासरावांचें मत पडेना. ते म्हणाले:—" न्यावयाची होती तर संध्याकाळींच न्यावयाला पाहिजे होतें. पण आतां नेणें चांगलें नाहीं." तेव्हां इंदिरेचें काय चालणार ! तिला मुकाट्यानें गप्प बसावें लागलें. तथापि ' लीलेला आपणच आपलें औषध सुरू करावें' असें ती विश्वासरावांना म्हणाली. पण त्यांनीं हरकत घेतली. ते म्हणाले:—" आनंदरावांना तें बरें वाटणार नाहीं. शिवाय त्यांचें तुमचें

:

नातें आहे. त्यांच्याच घरांत राहून दुसऱ्या
बरोबर नाहीं. "

पण इंदिरेनें आग्रहच धरिला:—" तें कांहीं
कांहीं वाटो, लोकही काय पाहिजे तें ह्मणोत, मला त्यांचा
नाहीं. माझी लीला तेवढी बरी झाली म्हणजे झालें. तुमच्यावर
श्रद्धा आहे. ह्मणून मीं तुमच्या स्वाधीन तिला केली आहे. आनंदराव
मी नांवें ठेवितें असें नाहीं. पण तुमच्या औषधाचा मला पुष्कळ वेळां
गुण आला आहे. ह्मणून वाटतें कीं, तुह्मींच औषध सुरू करावें. आनंदरावांनीं अगदींच देऊं नये असें मी ह्मणत नाहीं. त्यांच्या मनांत असलें तर देईनात; पण तुमच्या सम्मतीनें, तुह्मांला विचारून द्यावें, येवढेंच माझें म्हणणें आहे. "

ही सूचना आनंदरावांना पसंत पडली व विश्वासरावांच्या सल्ल्यानें ते लीलेला औषध देऊं लागले. लीला त्यांची मेहुणी, त्यांच्याच घरांत येऊन आजारी पडलेली. तेव्हां आपणांखेरीज दुसऱ्या डॉक्टरनें येऊन तिला औषध द्यावें हें आनंदरावांना बरें वाटेना. शिवाय लीला ह्या आजारांतून बरी होईल अशी त्यांना पूर्ण खात्री होती. ह्मणून असला सुसाध्य रोगी आपल्या हातांतून जावा हें त्यांना रुचलें नाहीं. भिडेखातर त्यांनीं इंदिरेचें म्हणणें कबूल केलें. तथापि हा आपला इंदिरेनें अपमान केला, गांवांतील लोक टीका करतील, पाहिजे तसें बोलूं लागतील, कांहीं कमी करणार नाहींत असें आनंदरावांना वाटलेंच. व त्यामुळें त्यांच्या मनाला खंती वाटूं लागली.

लीलेला आनंदरावांच्याच घरीं ठेविलें पाहिजे, असें जेव्हां नक्की ठरलें तेव्हां इंदिरा मोहनेला ह्मणाली:—" ताई, ज्या अर्थीं तूं नि आनंदरावांनीं मिळून लीलेचें लिगाड आपल्यामागें लावून घेतलें आहे, त्याअर्थीं मी व सारजा अशा दोघी जणी इथेंच राहणार. लीलेची उस्तवारी, पथ्यापाण्याची व्यवस्था सारजा चांगली करील. लीला खडखडीत बरी

होईपर्यंत मी कांहीं या घरांतून हालणार नाहीं. जा म्हटलेंस तरी जाणार नाहीं. ”

मोहना आनंदानें टाळी वाजवून ह्मणाली—“ आक्का, ठीक झालें; हें माझ्या मनाजोगतें झालें. आमच्या उंबऱ्याच्या आंत पाऊल घालणार नव्हतीस नाहीं का ? आतां कशी आलीस ? तुला अभिमान होता नाहीं? फार छान झालें ! ”

इंदिराः—“ अभिमान ! छे ! अभिमानामुळें मी येत नव्हतें असें कांहीं नाहीं. ”

मोहनाः—“ तर कशामुळें ? संशयामुळें ? ”

इंदिराः—“ ताई, जाऊं दे ग तें ! मी कोणत्या काळजींत आहें नि तुझें आपलें तिसरेंच ! लीलेला आणखी ताप येईल असें विश्वासराव ह्मणत होते. ”

मोहनाः—“ होय. तिकडचें देखील तसेंच म्हणणें आहे. आणि म्हणूनच लीलेला येथें ठेवून घेतली आहे. आक्का, तुझी बरदास्त इथें चांगली राहिली पाहिजे अशी तिकडून ताकीद झाली आहे. बरें का, तुझ्यासंबधानें तिकडचें फार चांगलें मत आहे. नेहमीं मला म्हणायचं कीं, तुझ्या आक्कासाहेब स्वभावानें फार छान, वागणूक भारदस्त, विचार पोक्त. नेहमीं आपलें तुझें वर्णन चालतें. पण सारजेबद्दल मात्र तिकडचा ग्रह चांगला नाहीं. ”

इंदिराः—“ ह्या आमच्या सारजेबद्दल ! कां बरें ? तिनें असें काय त्यांचें घोडें मारलें आहे ? ”

मोहनाः—“ कांहीं केलें नाहीं नि सवरलें नाहीं. ती काय करते बिचारी ! पण तिची मुद्राच तिकडे आवडत नाहीं. तिला पाहिलें कीं नाक मुरडावयाचें. मला मात्र भारी आवडते हो. मोठी इमानी आहे. ”

आनंदरावांनीं पुष्कळ तपास केला पण आपल्या कानांत कोण बोललें हें त्यांना समजलें नाहीं. कोणी तरी आंत येऊन बाहेर गेलें, याबद्दल मात्र त्यांना संशय राहिला नव्हता. पण कोण आलें होतें हेंच त्यांना कळेना,

ह्मणून ते मोठ्या बुचकळ्यांत पडले. दगडू हजामाखेरीज आणखी कोण इसम आंत आला असें आनंदरावांना कां वाटलें हेंही घरांतील माणसां-पैकीं कोणालाही सांगतां येईना. आनंदरावांचा प्रश्न ऐकून सर्वांनाच मोठें आश्चर्य वाटूं लागलें.





# प्रकरण ७ वें.

——:o:——

## काळजी.





लेच्या प्रकृतीसंबंधानें आतां मोठी काळजी उत्पन्न झाली. ताप थोडेच दिवस आला. पण शक्तिपात झाल्यामुळें तिच्या जगण्याची आशा राहिली नाहीं. डॉक्टरांनीं शक्य ते प्रयत्न चालविले होते, पण कांहीं केल्या आराम ह्मणून पडेना.

आनंदराव मोठ्या आस्थेनें व कळकळीनें लीलेला औषधपाणी करीत होते. तें पाहून इंदिरेच्या मनांत त्यांच्याबद्दल कृतज्ञताबुद्धि उत्पन्न झाली. आतां जवळ जवळ ते तिला आवडूं लागले होते, असें म्हणण्यास हरकत नाहीं. लीला ह्या आजारांतून उठावी म्हणून आनंदरावांचे सारखे प्रयत्न चालले होते. ती त्यांच्याच देखरेखीखालीं होती. विश्वासरावांच्या नव्हती असेंच म्हटलें पाहिजे. कारण ती घरांतच असल्यामुळें तिची तब्बेत हरघटकेला पाहण्याची संधि आनंदरावांना मिळे. विश्वासराव काय ? दिवसांतून एकदां, दोनदां, फार झालें तर तीनदां येऊन जात, झालें. पण आनंदराव सर्व दिवस व रात्र घरींच असावयाचे ! इंदिरा चिंताक्रांत मुद्रेनें लीलेच्या बिछान्याजवळ सदोदित बसून असे. पण तिनें आशा सोडिली नव्हती. तिची त्या सर्वशक्ति परमेश्वरावर पूर्ण श्रद्धा होती व त्याच्या दयालुत्वावर तिचा सर्वस्वी विश्वास होता. ईश्वरावर सर्व हवाला टाकून, आलेले दिवस ढकलावेत असें तिचें पूर्ण मत बनलेलें होतें.

व त्याप्रमाणेंच तिचें वर्तन होतें. अशा रीतीनें जे त्या सर्वशक्ति परमेश्वरावर हवाला टाकतात त्यांची कधीं निराशा होत नाहीं. त्यांचा पाठीराखा तो कृपानिधि असतोच. ' लीलेची प्रकृति सुधारावी म्हणून सर्व प्रकारचे मानवी प्रयत्न सुरू आहेत. इतक्या खटपटीस जर यश आलें नाहीं तर त्या जगन्नियंत्या प्रभूची तशी मर्जीच असली पाहिजे; त्याबद्दल दुःख करून, वाईट वाटून तरी काय उपयोग ? ' असें इंदिरा आपल्या मनांत म्हणे. तिला अजूनही आशा वाटे. इतकी प्रकृति घसरली होती, डॉक्टरांनीं सुद्धां तिची आशा सोडिली होती, तरीसुद्धां सर्व कांहीं यथास्थित होईल असें ती समजत होती.

मोहनेलासुद्धां हा सांथीचा ताप आला पण त्याचें स्वरूप फारच सौम्य होतें. अंथरुणावर पडून राहण्याचो तर मुळींच आवश्यकता नव्हती. पण मोहना भारी हयवान असून तिच्या स्वभावाला चोचले फार आवडत. एवढेंसें कांहीं झालें कीं त्याचा मोठा बाऊ करावयाची तिला संवयच पडली होती. आनंदराव फार दक्ष व हुषार असल्यानें ते तिला मोठ्या आस्थेनें औषध देत होते. त्यांनीं प्रथमपासूनच ओळखलें होतें कीं ताप साधारण आहे, त्याची भीति बाळगण्याचें कांहीं कारण नाहीं, त्याप्रमाणें त्यांनीं मोहनेलाही सांगितलें. पण ह्याचा परिणाम वाईट झाला. ' माझ्यावर मायाच कमी, माझी काळजीच नाहीं, हृदयच काठिण ' असें ती बोलूं लागली. पण हें तिचें बोलणें मुळींच योग्य नव्हतें. आपल्या बायकोवर पूर्ण प्रेम करणारा, तिची काळजी घेणारा, असा कोणी असेल तर तो एक आनंदराव डॉक्टरच होय.

लीलेची प्रकृति अत्यवस्थ असतांना एक दिवस वसंतराव आपल्या काकाबरोबर तिच्या खोलींत गेले होते. तापाच्या भरांत ती ह्या कुशीवरून त्या कुशीवर होत होती, व तिला भ्रम झाला होता म्हणून तिनें त्यांना ओळखलें नाहीं. तिची ती वृत्ति व दीनावस्था पाहून वसंतरावांना अत्यंत दुःख झालें. लीलेचा प्राण वांचविण्याकरितां आपले पंचप्राण खर्ची घालण्यासुद्धां ते तयार होते; पण उपयोग काय ? इतक्यांत त्यांच्या डोक्यांत एक विचार आला. त्याबरोबर ते खोलींतून बाहेर पडून

स्टेशनावर गेले व त्यांनीं मुंबईस वडिलांना जरूरीची तार केली कीं लीलाताई तापानें हैराण आहेत, सबब ताबडतोब यावें. अशी तार करून वसंतराव घरीं आले व त्यांनीं इंदिरेला निरोप पाठविला कीं बाबांना जरूर येण्याबद्दल तार केली आहे; ते लवकरच येतील. लीलेला पहिल्या दिवशीं ताप आला तेव्हां रात्रीं वसंतरावांची व आनंदरावांची जी खडा-जंगी झाली तेव्हांपासून वसंतराव तिकडे फारसे जात नसत, आणि म्हणूनच आतां स्वतः न जातां त्यांनीं निरोपावरच भागविलें.

याच दिवशीं तिकडे दर्याबाईच्या घरीं सोन्याची प्रकृतिही बरीच हैराण होती. सोन्याचा उल्लेख मागें पुष्कळ वेळां आलेला आहे व त्याच्या चेहऱ्या-कडे पाहून कित्येकांच्या मनांत भलभलते संशय व नाहीं नाहीं ते विकल्प उत्पन्न झालेले होते, हें वाचकांना माहीत आहेच. हा मुलगा गेल्या आठ दिवसांत एकसारखा खंगत चालला होता. आनंदराव रोज तिकडे जाऊन तब्येत पहात होते. त्यांनाही समजून आलें कीं मुलगा आतां फार दिवस वांचणार नाहीं. घरीं त्यांची मेहुणी—लीला—आजारी, अगदीं अत्यवस्थ होती तिची काळजी; त्यांच्या चोंचलेखोर बायकोसंबंधानें तर पुसावयालाच नको; बाहेरही त्या दिवशीं आनंदरावांना फार दगदग पडली होती ह्मणून वरील दिवशीं ते त्या मुलाकडे गेले नव्हते. तिकडे जाऊन कमीजास्त पाहून येण्यास त्यांनीं आपल्या कंपाउंडरास पाठविलें होतें. तो सांगत आला कीं—“ मुलग्याचें आज जरा जास्त आहे. आई काळजी करीत बसली असून आपण आलां नाहीं ह्मणून ती फार रागावली आहे. उभा-उभीं कां होईना पण आपण एकदां येऊन जा असें तिचें म्हणणें आहे. ”

आनंदरावांनीं स्पष्ट असें कांहींच उत्तर दिलें नाहीं. “ जायला झालें तर जाऊं, पण इतकी फुरसत मिळेल असें वाटत नाहीं. ” असें कायसें ते पुटपुटले. शिवाय जाऊनही कांहीं उपयोग होणार नाहीं हेंही ते सम-जून होते.

सोन्याचा गुडघा आज जास्तच दुखत होता. तिसऱ्या प्रहरच्या सुमा-रास त्याला थोडी गुंगी आली ह्मणून अंथरुणावर निजवून दर्याबाई जवळच कायसें करीत बसल्या होत्या. इतक्यांत एक खप्पड तोंडाची

बाई दरवाजांतून आंत आली. दर्याबाईंनीं ह्या बाईला पूर्वीं पाहिलेलें होतें, पण त्यांना मुळींच आठवण नव्हती. वाचकांनाही तिची माहिती आहेच. बाजार पेठेंतील त्या तेरा नंबरच्या घराची मालकीण मावशीबाई, ती ही. मैनाई सुइणीची स्वारी त्या दिवशीं सकाळीं मावशीबाईच्या घरीं सहज गेली होती. भेटींत इकडच्या तिकडच्या गप्पा निघाल्या. शेवटीं दर्याबाई नांवाची परस्थ बाई एका मुलास घेऊन येथें येऊन राहिली आहे; तिचा बेत कांहीं निराळाच दिसतो; मागें कलावती नांवाची बाई बाळंत होऊन या घरांत मेली तिच्यासंबंधानें कांहीं तपास करण्याकरितां ती आली असावी, वगैरे हकीकत मैनाईनें मावशीबाईंना कळविली होती. मग काय? तिकडे जाऊन केव्हां एकदां दर्याबाईची गांठ घेईन व मागील सर्व ओळख निघेल असें मावशीबाईंना झालें. ह्मणून थोडें ऊन खालीं झाल्याबरोबर त्यांनीं दर्याबाईच्या घराचा रस्ता धरिला.

दर्याबाईंनीं मावशीबाईचें 'या बसा' म्हणून चांगलें स्वागत केलें; व पुढें घटका दोन घटका त्या दोघींचें मोकळया मनानें संभाषण झालें. दर्याबाईचा स्वभाव आंतल्या गांठीचा नव्हता मनांत असेल तें त्या घडाघड बोलून टाकीत. पण कलावतीच्या आकस्मिक मृत्यूची बातमी ऐकल्यापासून त्यांनीं साधारण मौन व्रतच धरिलें होतें असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्यांना असें वाटत होतें कीं कलावतीच्या मरणासंबंधानें जर खरोखरच कांहीं गुप्त व चोरटा प्रकार असला तर तो समजून घेण्यास आपण या गांवांत अगदीं अनोळखी आहोंत, आपला कोणाचा येथें संबंध नाहीं, आपण दूर मुलखांतल्या राहणाऱ्या असून येथें चार दिवस फक्त हवा पालटण्याकरितां आलों आहोंत अशी लोकांची समजूत करणें जरूर आहे, व त्याप्रमाणें त्यांनीं इतके दिवस बतावणीही पण केली. परंतु हा त्यांचा हेतु सिद्धीस गेला नाहीं. त्यांना आरंभीं जेवढी हकीकत कळली त्यापेक्षां पुढें कांहींच जास्त कळली नाहीं. अर्थातच त्यांनीं आतां मौन टाकून दिलें होतें. व म्हणूनच त्या मावशीबाईबरोबर अघळपघळ बोलूं लागल्या.

इतक्यांत सारजाही तेथें येऊन पोंचली. कायसें काम होतें म्हणून इंदिरेनें तिला आपल्या रावपुऱ्यांतील बंगल्याकडे पाठविलें होतें, व येतांना

दर्याबाईच्या घरीं जाऊन मुलग्याचें कसें काय आहे तें विचारून ये, आज फार हैराण आहे म्हणून ऐकलें, असें तिनें सारजेला सांगितलें होतें. कारण त्या मुलाबद्दल इंदिरेला एक प्रकारची काळजी वाटत होती व तिच्या मनांत त्याजविषयीं प्रेमभाव उत्पन्न झाला होता. इंदिरेनें सांगितल्याप्रमाणें सारजा बंगल्याकडून परत जातांना इकडे आली होती.

सारजेला पाहतांच दर्याबाईंना बरें वाटलें. कबूल केल्याप्रमाणें घटका तासाची सवड करून ती आली असावी, आतां फुरसतीनें बोलूं, मावशीबाईही आहेत, कलावतीच्या मरणासंबंधानें कांहीं तरी जास्त हकीकत समजेल असें त्यांना वाटलें. पण सारजेला तितकी फुरसत नव्हती. मागच्या खेपेप्रमाणें ती आजही गडबडींतच होती, कारण इंदिरेनें तिला लवकर परत ये ह्मणून सांगितलें होतें. सबब ती फार वेळ येथें बसली नाहीं.

सुमारें अर्धी घटका त्या तिघींचें बोलणें झालें. त्यांत मुख्य विषय म्हटला म्हणजे कलावतीचाच होता. शेवटीं आनंदरावांस दिसलेल्या त्या मनुष्याची हकीगत मावशीबाईंनीं सांगितली. दर्याबाईंनीं ह्या मनुष्यासंबंधानें इतके दिवस कांहींच ऐकिलें नव्हतें. ह्मणून फार आश्चर्य वाटून त्या म्हणाल्याः—" अरे देवा! आणि त्या चोराला कोणीच जाऊन धरलें नाहीं ? "

मैनाई सुइणीप्रमाणें मावशीबाईनाही—जिन्यांत कोणी मनुष्य आनंदरावांना दिसला ही गोष्ट खरी वाटत नव्हती. कोणी त्यासंबंधानें बोलूं लागलें कीं, त्या दोघीही फार संतापत असत. दर्याबाईचा प्रश्न ऐकून मावशीबाई त्रासून ह्मणाल्याः—" कुणाला धरायचें ? तेथें कुणी नव्हतेंच मुळीं. आनंदरावांनीं आमची अब्रू घेण्याचीच वेळ आणिली होती. काय ह्मणे आमच्या जिन्यांत कोणी माणूस लपून बसला होता, तो दिसला काय ? आमच्यासारख्या बायकांना असें विचारणें आनंदरावांसारख्यांना शोभतें कां हो ? त्या दिवसापासून त्यांचा असा मला राग आला आहे ! "

दर्याबाईः—" मावशीबाई, तुह्मी कांहींही ह्मणा; पण तिथें कोणीतरी होतें हें खास. आणि ह्याच तपास मला लागायला पाहिजे होता. मी

इतके दिवस असें आश्चर्य करीत होतें कीं, तो कसा तिकडे गेला नव्हता! कारण आजपर्यंत मला तसें कधींच कुणीं सांगितलें नाहीं. आतां तुमच्या तोंडूनच हें मी ऐकतें!"

मावशीबाई:—" मी समजलें नाहीं तुम्ही काय म्हणतां तें."

दर्याबाई:—" अहो समजायचें काय? माझें म्हणणें एवढेंच कीं, जिन्यांत जो मनुष्य लपून बसला होता म्हणतात तोच तिचा नवरा."

मावशीबाई:—" म्हणजे? त्या पोरीचा तो नवरा? इश्श! कांहीं तरीच!"

दर्याबाई:—" अहो, तोच. तोच तिचा नवरा. नि त्यानेंच तिला मारून टाकिली. याबद्दल माझी तर अगदीं पक्की खात्रीच होऊन गेली. पण त्या मैनाई सुइणीनें ही हकीकत कशी मला सांगितली नाहीं?"

मावशीबाई:—" ती कशी सांगेल? तिला हें खरेंच वाटत नाहीं. माझ्यासारखेंच तिलाही वाटतें कीं तिथें कोणी नव्हतेंच ह्मणून."

नंतर दर्याबाई सारजेकडे वळून म्हणाल्या:—" तूं तरी ही हकीकत मला सांगायला पाहिजे होतीस. या गोष्टीनें ह्या सर्व प्रकरणाचा बराच तपास लागणार आहे."

सारजा:—" सांगायची, पण मला फुरसतच मिळाली नाहीं. शिवाय ती गोष्ट मला देखील खरी वाटत नाहीं."

दर्याबाई:—" काय खरी वाटत नाहीं?"

सारजा:—"किं तिथें जिन्यांत कुणी मनुष्य लपून बसला होता ह्मणून."

दर्याबाई:—" तर मग आनंदरावांना तिथें कोणीच दिसलें नाहीं असेंच तुझें म्हणणें?"

सारजा:—" त्या वेळेपुरतें त्यांना वाटलें कीं कोणी तरी आपल्याला दिसलें म्हणून. पण मग पुढें त्यांचा असा ग्रह झाला कीं चांदण्याच्या योगानें आपणाला नुसता भास झाला."

दर्याबाई:—" पण नंतर त्याचा तपास सुद्धां केला नाहीं?"

सारजा:—" तें कां? केला तर. पुष्कळ तपास केला. पोलीस सुद्धां

किती तरी दिवस तपास करीत होते. पण कांहीं नाहीं. त्या माणसाचा कांहींच पत्ता लागला नाहीं."

"ह्मणून सगळेजण म्हणतात कीं तिथें कुणी मनुष्य नव्हताच असें" मध्येंच मावशीबाई जरा ताठ्यानें म्हणाल्या.

दर्याबाईना हें बोलणें कुठलें सहन व्हावयाला? त्यांनीं ठासून उत्तर दिलें:—"तर मग मी म्हणतें कीं तोच त्या कलावतीचा नवरा बरें? तोच, तोच. यांत काडीइतकी सुद्धा शंका नको. त्या वेळीं तो ह्या गांवांत आला होता एवढें मला माहीत आहे."

"हें तुम्हांला पक्कें माहीत आहे?" त्या दुसऱ्या दोघींनीं विचारिलें.

"हो. अगदीं पक्कें. कलावतीचा नवरा त्या वेळीं दत्तापुरास आला होता एवढें मला पक्कें माहीत आहे."

"तर मग तो सध्यां कुठें असतो सांगा पाहूं" मावशीबाईनीं विचारिलें.

"कुठें असतो हें मीं सांगूं? मग चांगलेंच. इतक्या वर्षांत त्याची कांहींच हकीकत मला कळली नाहीं. त्याच्या विषयी व तिच्याविषयीं कांहीं बातमी समजली तर पाहावी म्हणून तर मी इथें आलें आहें." असें दर्याबाईचें जरा रागांत उत्तर आलें.

मावशीबाई:—"तर मग सकाळीं मैनाई सुईण म्हणत होती तेंच खरें म्हणायचें. ती मला म्हणाली बरें का बाई, तुम्ही कांहीं उगीच निष्कारणी इथें आला नाहींत, तुमचें कांहीं तरी काम आहे. मग मी म्हणतें तुम्ही अशा स्वस्थ कां? तुमच्या ठिकाणीं मी असतें तर इथें येतां क्षणींच पोलिसांना वर्दी दिली असती; आणि मागें झालेल्या एकंदर गोष्टींचा पुनः तपास करायला लावला असता. ती बिचारी कलावती मेली त्या वेळीं तिचें जवळचें व कळकळीचें असें कोणी इथें नव्हतें, म्हणून पोलिसांना तितकी तपासाच्या कामीं मदत झाली नाहीं. निदान असें पुष्कळ लोकांचें म्हणणें आहे हो."

दर्याबाईः—“ पोलिसांना कळवायला अजून पुष्कळ वेळ आहे. तूर्त स्वस्थ राहून मीं माझा विचार चालवला आहे. मी कोण, कां आलें आहे, याबद्दल अजूनी कुण्णाला बातमी नाहीं. फक्त एक दोघांनाच मात्र माझ्याबद्दल शंका आलेली आहे. एक ही सारजा. हिनें मला लागलीच ओळखलें. ”

“ आणि दुसरी कोण ? मैनाई सुईण ? ”

“ छे छे ! तिनें तर मला प्रथम ओळखलेंच नाहीं. मला वाटतें आनंदरावांनीं माझें इथें येण्याचें कारण ओळखलें असावें. ”

“ तुह्मांला असें कां वाटतें बरें ? ”

“ वाटण्याचें कारण एवढेंच. मी प्रथम इथें आलें तेव्हां त्यांनीं मला किती तरी प्रश्न विचारले ! मी कोण, कुठें असतें, उत्पन्न किती आहे, इथें कशासाठीं आलें, एक ना दोन; त्यांनीं मला एकूण एक माहिती विचारली. मला वाटतें मी जर त्यांना सांगत बसलें असतें तर अजूनपर्यंत ते मला विचारीतच राहिले असते. एके दिवशीं तर हें माझें कपाट उघडून कायसें पहात असतांना मीं त्यांना पकडलें. तेव्हां काय म्हणतातः— मुलाच्या गुडघ्याला बांधायला फडकें शोधीत होतों म्हणून. हा काय फाजीलपणा मेला? त्या कपाटांत फडकीं कोणी तरी ठेवील काय हो ? ते कांहींही म्हणोत, मला आपलें वाटतें कीं कपाटांत कांहीं सांपडतें कीं काय हें पाहण्याकरितां त्यांनीं तें उघडलें असावें. ”

“ पण काय हो बाई ! त्या दिवशीं संध्याकाळीं तुमची नि आनंदरावांची स्टेशनावर गांठ पडली होती ना ? मागें चौकशी झाली, त्यांत ही हकीकत बाहेर आली होती. मला आठवतें. ” मावशीबाई म्हणाल्या.

“ मला भेटले ते हे आनंदराव काय ? ” दर्याबाई थोडें थांबून म्हणाल्या. ही गोष्ट त्या बहुतेक विसरल्याच होत्या. त्यांनीं पुनः आठवण करून म्हटलेंः—“ पण मला कांहीं ते ओळखूं आले नाहींत. त्या वेळीं बराच अंधार पडलेला होता. आतां आठवलें सारें. माझ्यापेक्षां त्यांची नजर चांगली ह्मणून त्यांनीं मला ओळखलें असावें. निदान मला तरी असें वाटतें. एरव्हीं त्यांनीं मला इतके प्रश्न कां केले असते ? ”

" कां म्हणजे ? असले प्रश्न विचारणें साहजिक आहे ह्मणून! खरी हकीगत काय आहे हें समजून घेण्याकरितां त्यांनीं विचारिलें असतील. मीं नाहीं विचारिलें ? "

" असेल, तसेंही असेल. एक दोन वेळां मी त्यांना सर्व हकीगत सांगण्याच्या अगदीं बेतांत होतें. पण तितक्यांत आवरलें. म्हटलें, इतक्यांतच नको. "

सारजा जाण्याकरितां उठली. तिकडे लीलेची तब्येत फार अस्वस्थ होती ह्मणून तिला जास्त वेळ बसतां येईना. शिवाय मावशीबाईंच्या देखत तिला दर्याबाईंना कांहीं हकीगतही विचारतां येईना.

मावशीबाईंनीं प्रश्न केलाः—" बाई, तें वातीसारखें मूल पुढें किती दिवस जिवंत होतें ? मैनाई म्हणत होती कीं, तें लागलीच मेलें ह्मणून."

" फार दिवस नाहीं जगलें, व जगेल असें वाटतही नव्हतें. सारजाबाई, तूं जरा थांबेनास ? अशी घाई कां ? "

" बसावें असें मला सुद्धां वाटतें, पण इलाज नाहीं. लीलाताईसाहेब फार हैराण आहेत. कांहीं काम लागतेंसवरतें तेव्हां घरांत असणें चांगलें. " असें सारजेनें उत्तर दिलें.

" सारजाबाई, गांवांत अशी वदंता आहे कीं, मोहनाबाई— "

मावशीबाई पुढें बोलणार इतक्यांत कोणींसा दरवाजा उघडला. ह्मणून त्यांचें सर्व बोलणें तसेंच राहिलें व त्या सर्वजणी तिकडेच पाहूं लागल्या. तों मैनाई सुइणीची अगडबंब स्वारी फांफूं करीत येत असलेली त्यांना दिसली. त्याबरोबर थोडा हशा पिकला. तिकडे सोन्याही जागा होऊन गुडघा दुखतो ह्मणून रडूं लागला. तेव्हां दर्याबाई त्याच्याकडे गेल्या. अर्थातच सारजेला निघून जाण्यास आयतीच चांगली संधि मिळाली.

सारजा रस्त्यानें निघाली असतां वाटेंत आनंदराव डॉक्टर गाडींतून येतांना तिला भेटले. ते दर्याबाईंच्या घराकडेच निघाले होते.





# प्रकरण ८ वें.

——:o:——

## प्रतापरावांचें आगमन.







संतरावांची तार पोंचल्याबरोबर पहिल्याच गाडीनें प्रतापराव डॉक्टर दत्तापुरास येण्याकरितां निघाले. मुंबईची आगगाडी फों फों करीत व कर्कश किंकाळी फोडीत स्टेशनांत येऊन धडकली. वसंतराव घोड्याची गाडी घेऊन स्टेशनावर गेले होतेच. दोघांची दृष्टादृष्ट होतांच 'तार केल्यानंतर कांहीं सुधारणा?' असें प्रतापरावांनीं चिरंजिवास विचारिलें 'सुधारणा तर नाहींच, उलट जास्तच आहे.' असें वसंतरावांनीं उत्तर दिलें. यानंतर विशेष बोलणें झालें नाहीं. हे दोघेजण गाडींत बसून वायुवेगानें दत्तापुर गांवांत येऊन दाखल झाले. गाडीच्या चाकांचा व घोड्याच्या टापांचा आवाज ऐकून गांवांतील लोक कोणी दरवाजांत, कोणी खिडकींत, कोणी गच्चीवर असे येऊन आश्चर्यानें पाहूं लागले. वसंतराव गाडी हांकण्याकरितां बसले असून त्यांचें सर्व लक्ष्य आनंदरावांचें घर केव्हां गांठतें इकडेच असल्यानें घोडा अगदीं बेसुमार वेगानें चालला होता. तें पाहून लोक आपआपल्यांत ह्मणूं लागले:—"अरे, हा वसंतराव, असा वेड्यासारखा कां गाडी हाकीत चालला आहे? याला झालें तरी काय?" पण वसंतरावांच्या शेजारीं बसलेल्या गृहस्थांना त्यांनीं

जेव्हां ओळखलें तेव्हां लोकांची समजूत पडली. " मुंबईचे सुप्रसिद्ध व नामांकित डॉक्टर, आपले प्रतापराव विश्राम, इतक्या घाईनें आले तेव्हां लीलाताईंची तब्येत फारच अस्वस्थ असली पाहिजे यांत शंका नाहीं. " असें ते ह्मणूं लागले.

गाडी थांबली. आनंदराव नुकतेच दर्याबाईच्या घराकडून परत येऊन ओसरीवर उभे होते, गाडी पहातांच त्यांना फार आश्चर्य वाटलें. प्रतापराव मुंबईहून या वेळीं कां यावेत हें त्यांना समजेना.

प्रतापराव गडबडीनें गाडींतून उतरले व पायऱ्या चढून वर आले. आनंदरावांस तेथें पाहून " कसें काय ? बरें आहे ? लीलाताई कोणत्या खोलींत आहेत ? " असें म्हणत म्हणतच ते जिना चढून वर गेले. आनंदरावांच्या मनांत, वसंतरावाप्रमाणें, प्रतापरावांनाही हरकत करावयाची होती कीं कसें समजत नाहीं; पण त्यांनीं केली नाहीं एवढें खरें. त्यांतून प्रतापराव जलदीनें निघून गेल्यामुळें तशी त्यांना संधीही मिळाली नाहीं. शिवाय आनंदरावांचें लक्ष्यही या वेळीं दुसरीकडे गुंतलेलें होतें. दर्याबाईच्या घरीं ते गेले असतांना तेथें घडलेल्या कांहीं किरकोळ गोष्टींनीं त्यांची चित्तवृत्ति द्विधा झाली होती. थोड्या वेळानें सर्व गोष्टी त्यांच्या ध्यानांत आल्या. लीलाताईंची तब्येत पहाण्याकरितां वसंतरावांनीं अगर विश्वासरावांनीं प्रतापरावांना तार केली असावी व म्हणूनच ते आले हें आनंदराव समजले. प्रतापरावांनीं येऊन लीलाताईंची तब्येत पहाण्यासंबंधानें खुद्द आनंदरावांची कांहीं हरकत नव्हती. पण ते आपल्याशीं असा विचार करूं लागले कीं आपणां दोघांपेक्षां—म्हणजे आनंदराव व विश्वासराव यांच्यापेक्षां—प्रतापरावांच्या आंगीं इतकी जास्त हुषारी व कर्तबगारी आहे काय ? त्यांना मुद्दाम मुंबईहून तारेनें बोलावण्याची जरूर कां भासली ? त्यांतून आपणांस न विचारितां, आपली यत्किंचितही सल्ला न घेतांच तार केली, याचा त्यांना विशेष राग आला.

इकडे प्रतापरावांनीं थेट लीलेच्या खोलींत जाऊन तिची नाडी पाहिली, छाती तपासली, डोळ्यांच्या पापण्या बघितल्या व जिभेवरून बोट फिरवून पाहिलें; त्यांना समजून चुकलें कीं प्रकृतींत कांहीं राम नाहीं.

मध्यरात्रीपर्यंत जर उतार पडला तर प्रकृति हाताला लागेल, नाहीं तर लीला हातची गेली असेंच समजावें असें ते मनांत म्हणाले. त्यांनीं कसलेंसें औषध तिला दिलें व तिची हालचाल पहात ते सुमारें तीन चार तास म्हणजे रात्रीचे बारा वाजेपर्यंत तिच्या बिछान्याशेजारीं बसून राहिले. मधून मधून ते खिशांतील घड्याळ काढीत व तिची नाडी पहात. मग छाती तपासीत, हातापायांस हात लावीत, नंतर कपाळाचा घाम पुसून काढीत, असा त्यांचा सारखा क्रम चालला होता. वेळ जातां जाईना. प्रत्येक क्षण कसा जातो याची विवंचना त्यांना पडली. बारा वाजण्याच्या सुमारास लीलेचा किंचित् डोळा लागला; त्याबरोबर प्रतापरावांच्या चेहऱ्यावर आनंदाचें तेज चमकूं लागलें. "आतां काळजी नाहीं, लीलाताईला आराम पडलाच ह्मणून समजा. मी आतां घरीं जातों" असें इंदिरेला सांगून प्रतापराव बाहेर पडले.

ते विश्वासरावांच्या घरीं जाऊन पोंचले. रात्रीच्यारात्र राहून उजेडल्याबरोबर मुंबईस निघून जावयाचें असा त्यांचा बेत होता. पण सकाळीं उठून पहातात तों गरजू लोकांनीं घर अगदीं गच्च भरून गेलेलें. लीलेप्रमाणें हा साथीचा ताप गांवांत बऱ्याच लोकांना आला होता. प्रतापराव आल्याची बातमी सर्व गांवांत हां हां म्हणतां पसरली. परत जाण्यापूर्वीं एकवार आपल्या घरीं येऊन आजारी माणसाची प्रकृति पहावी व चांगलें औषध द्यावें असें जो तो केविलवाणें तोंड करून व हात जोडून प्रतापरावांना विनवूं लागला. हल्लीं गांवांतील लोकमत याप्रमाणें बनलेलें होतें. कांहीं वर्षांपूर्वीं ह्याच प्रतापरावांना ह्याच गांवांतील लोकांनीं कलावतीस औषध देण्याच्या कामीं दुर्लक्ष्य केलें ह्मणून, मुंबईस हाकलून दिलें होतें. त्या वेळीं त्यांनीं, फुकट येतों, असें म्हटलें असतें तरी कोणीं पर्वा केली नसती. पण आतां ती स्थिति बदलली, व ते दिवसही निघून गेले. मुंबईंत गेल्यापासून त्यांचा नांवलौकिक वाढला; शेटसावकार, श्रीमंत व्यापारी, मोठमोठे अंमलदार वगैरे लोकांत त्यांची फार चहा होऊं लागली. प्रतापरावांचें नांव ज्याच्या त्याच्या तोंडीं ऐकूं येऊं लागलें, व त्यांची इभ्रत वाढली. तेव्हां "महाजनो येन गतः स

पंथाः" या न्यायानें दत्तापुर गांवांतील लोकांनीं मुंबईच्या लोकांचें अनुकरण करणें अगदीं साहजिक होतें.

प्रतापरावांनींही जाण्यास अगदीं कांकूं केलें नाहीं. ते सर्व ठिकाणीं गेले, व मोठ्या आस्थेनें व कळकळीनें रोग्यांची प्रकृति पाहून त्यांनीं औषधोपाय सांगितले. गरीबापासून श्रीमंतापर्यंत त्यांनीं कोणाकडूनही फी घेतली नाहीं. याप्रमाणें त्या दिवशीं सकाळपासून संध्याकाळपर्यंत त्यांचा क्रम चालला होता. दरम्यान ते दोनदां लीलेची प्रकृति पाहण्याकरितां आनंदरावांच्या घरीं गेले होते. पुनः संध्याकाळीं आणखी गेले. तिची प्रकृति आतां सुधारण्याच्या मार्गाला लागली होती. तापापासून हिला कांहीं भीति राहिली नाहीं; मात्र अशक्तता फार आली आहे, सबब पंधरा वीस दिवस चांगलें जपलें पाहिजे, नाहींतर पुनः ताप उलटेल; मग आवरणार नाहीं. असें सांगून ते घरीं जाण्याकरितां निघाले. पण इंदिरा त्यांना राहण्याबद्दल आग्रह करूं लागली. प्रतापरावांनीं लीलेला ह्या दुखण्यांतून वांचविलें असें तिच्या मनानें पूर्णपणें घेतलें. तिची समजूत घालण्याकरितां प्रतापराव ह्मणालेः—"मनुष्यानें किती खटपट केली म्हणून काय होणार ? तिच्या आयुष्याची दोरी बळकट, म्हणून ती ह्या आजारांतून उठली. मी आलों नसतों तरी सुद्धां ईश्वरकृपेनें तिची प्रकृति चांगली झाली असती." अशी कशी तरी इंदिरेची समजूत घालून तिचा निरोप घेऊन निघाले. आनंदरावांचा राग बराच शांत झालेला असल्यानें त्यांनींही त्यांना राहण्याबद्दल आग्रह केला. परंतु आपणास उद्यां सकाळीं लवकर निघून जाण्याचें असल्यानें येथें राहतां येत नाहीं असें सांगून प्रतापराव तेथून आपल्या घरीं निघून आले.

या वेळीं बरीच रात्र झाली होती. प्रतापराव दरवाजांत पाऊल ठेवतात तों तेथेंच आंतल्या बाजूस कट्ट्यावर एक गलेलठ्ठ बाई डुलक्या घेत बसलेली त्यांना दिसली. त्यांच्या बुटाच्या खाड खाड आवाजानें ती दचकून जागी झाली. तिच्याकडे प्रतापराव न्याहाळून पाहूं लागले.

"मला आपण ओळखलें नाहीं वाटतें ?" असें त्या बाईनें विचारिलें.

प्रतापरावः—"कां बरें ? मीं ओळखलें. इतक्या घसटीच्या माण-

साला मी विसरेन ? पुष्कळ वर्षें झालीं म्हणून काय झालें ? तुमचें नांव मैनाई सुईण, होय ना ? तुह्मीं तेथें पडून आपल्याशींच कसला विचार चालविला होता ? एकीच्या दोन झाल्यासारख्या दिसतां ? कापूस बराच सवंग झाला आहे, नाहीं ? बरें पण, कसलें काम आहे तुमचें माझ्याकडे तें तरी कळूं दे. लठ्ठ माणसांना बारीक करण्याची मुंबईंत एक गिरणी निघाली आहे गिरणी. आहे का ठाऊक ? त्या गिरणींत तुमची शिफारस करावयाची आहे काय ? " असें म्हणून प्रतापराव हासूं लागले. मैनाईही हांसूं लागली. तिनें प्रथम प्रतापरावांच्या घरची सर्व हकीकत विचारून घेतली व नंतर आपण कशासाठीं आलों हें ती सांगूं लागली. त्या वेळीं रात्रीचे दहा वाजले होते. प्रतापराव अगदीं थकून गेले होते तरी मैनाईनें आपलें चऱ्हाट सुरू केलेंच. तें संपतां संपेना.

प्रतापराव डॉक्टर मुंबईहून या गांवीं आल्याची बातमी दर्याबाई-च्याही कानांवर गेली होती; आनंदरावांचा पोऱ्या औषध पोंचतें करण्या-करितां आला होता त्यानें ही बातमी पोंचविली. मुंबईचे मोठे डॉक्टर, कोणी प्रतापराव म्हणून येथें आले आहेत, लीलाताईची तब्येत जास्त बिघडली म्हणून मुद्दाम तार करून त्यांना येथें आणलें आहे, सर्व गांवभर लोकांना औषधें देत हिंडत आहेत, असें तो मुलगा दर्याबाईजवळ बोलला. बाईनाही वाटलें कीं, ह्या डॉक्टरांना बोलावून आणून त्यांना आपल्या मुलग्याचा पाय दाखवावा. दर्याबाई दिसण्यांत जरी उग्र व कडक दिसत तरी त्यांचें अंतःकरण कोमल असून त्या मुलावर त्यांचें फार प्रेम होतें. मुलगा इतका खंगत चालला तेव्हां आपल्या हातचा खास जाणार असें त्या पूर्णपणें समजल्या होत्या. तथापि वरील बातमीमुळें त्यांना थोडी आशा वाटूं लागली. " न जाणो, कदाचित् ह्या डॉक्टरांच्या औषधानें मुलाला बरें वाटेल; कोणाचा हातगुण कसा असतो कोणास ठाऊक ? " असा विचार करून त्यांनीं ह्या डॉक्टरांना बोलावून आणावयाचा निश्चय केला. आनंदरावांसंबंधानें त्यांचें मत वाईट झालें होतें असें नाहीं. ते हुषार आहेत, ही गोष्ट दर्याबाईना कबूल होती. ते आपल्याकडून शक्य ते प्रयत्न व होईल तितकी खटपट करीत आहेत हें त्या समजून होत्या. पण

नामांकित, त्यांतून मुंबईच्या, डॉक्टरांच्या नांवांतच एक प्रकारची जादू असते; त्या जादूनें दर्याबाईचें मन भारून टाकिलें. त्यांनीं मैनाई सुइणीला सांगितलें कीं:—" तुह्मी घरीं जातांना ते प्रतापराव डॉक्टर कोठें राहतात त्याचा शोध घेऊन त्यांना इकडे यावयाला सांगा; त्यांनीं कितीही फी मागितली तरी तितकी मी देईन. त्याची काळजी नको ह्मणावें, बरें का. नाहीं तर गरिबाच्या घरीं कोण जातो असें ह्मणतील नि येणार नाहींत, ह्मणून ह्मणतें." मैनाईनें हा निरोप प्रतापरावांना सांगितला तेव्हां शेवटच्या म्हणजे फीबद्दलच्या शब्दावरच विशेष जोर देऊन ती सांगू लागली.

तथापि ज्या प्रकरणामुळें त्यांच्या वडिलोपार्जित घरांतून प्रतापरावांची हकालपट्टी झाली त्या प्रकरणांत जिचा विशेष संबंध होता तीच ही दर्याबाई आहे असें एका शब्दानें सुद्धां मैनाईनें प्रतापरावांना कळविलें नाहीं, कीं सुचविलें नाहीं. मैनाई सुईण मोठी चाणाक्ष बायको असून तिला तारतम्य भारी असे. मागच्या गोष्टीचा उल्लेख प्रतापरावांना रुचणार नाहीं हें तिनें ओळखलें. निदान आपण तरी त्यांना त्या गोष्टीची आठवण करून देणें बरें नाहीं असें तिला वाटलें. तिनें त्यांना एवढेंच सांगितलें कीं ती बाई नुकतीच परगांवाहून येथें येऊन राहिली आहे. तिचा मुलगा भारी आजारी आहे, अगदीं प्राणांतिक अवस्था झाली आहे, तेव्हां चलाच.

प्रतापराव:—" तें सगळें खरें, पण मला वेळ कुठें आहे ? उद्यां तर मी जाणार. त्या मुलाला काय झालें आहे ? ताप येतो ?"

मैनाई:—" ताप तरी कुठें आहे तितका ? पण आपला एकसारखा वाळत चालला आहे. आजची शक्ति उद्यां नाहीं, उद्यांची परवा नाहीं, अस्सें चाललें आहे. गुडघा सुजलेला असून कळ फार आहे. एवढी कृपा करा आणि तिथपर्यंत जाऊन या."

प्रतापराव:—"तर मग आपल्याच्यानें त्याला नाहीं बरें करतां येणार."

मैनाई:—" छे छे ! डाक्तर, असें म्हणू नका.प्रकृति बघायला चांगले डॉक्टर आले आहेत असें समजलें, म्हणजे आजाऱ्याला काय किंवा घरच्या माणसांना काय, भारी हुषारी वाटते. आतां डॉक्टर आल्याबरोबर एका घटकेच्या आंत आजारी माणूस खडखडीत बरा होतो असें नव्हे, पण

तितका धीर येतो. तितकें त्या बिचाऱ्या आईलाही बरें वाटेल. किती रडते बापडी! रडून रडून मुटक्यासारखे डोळे करून घेतले आहेत. म्हणून ह्मणतें आत्तां नाहीं तर उद्यां सकाळीं तरी जाऊन याच. नाहीं ह्मणूं नका."

"बरें, रात्रीं विचार करतों आणि फुरसत झालीच तर सकाळीं त्या बाईकडे जाऊन येतों. झालें आतां? जा." असें आश्वासन देऊन प्रतापरावांनीं एकदां मैनाईचें लचांड घराबाहेर घालविलें. ती निघून गेल्यानंतर तिच्या त्या अवजड व अगडबंब शरीरासंबंधानें प्रतापराव व विश्वासराव या दोघां भावांचें विनोदपर भाषण होऊन बराच हंशा पिकला.

सकाळीं उठल्यावर वसंतरावाला बरोबर घेऊन प्रतापराव दर्याबाईच्या घरीं गेले. ह्या बाईसंबंधानें अगर तिच्या त्या सोन्या बाळासंबंधानें कांहीं विशेष हकीगत आहे किंवा कांहीं संशय वाटण्याजोगा प्रकार आहे अशी वसंतरावांना यत्किंचितही कल्पना नव्हती. अद्यापपर्यंत हा संशय गांवांतील फारच थोड्या लोकांस आला होता. अमुक अमुक घरांत दर्याबाई नांवाची एक परस्थ बाई व एक मुलगा अशीं येऊन राहिलीं आहेत. एवढें त्यांनीं कोठेंसें सहज ऐकलें होतें. ह्या बाईची व गांवांत कोणाची ओळख नाहीं असेंच ते समजत होते.

मुलगा माजघरांत निजलेला होता. तो नुकताच जागा होऊन अंथरुणावर उठून बसलेला होता. दर्याबाई घरांत केरपोतेरें करीत होत्या. डॉक्टर इतक्या लवकर येतील असें त्यांना वाटलें नाहीं. ते दरवाज्यांतून आंत शिरून तडख माजघरांत गेले. मुलगा फार निस्तेज व अशक्त दिसत होता. त्यानें आपला डावा हात सदऱ्याच्या अस्तनींतून काढून तसाच बाहेर उघडा ठेविला होता. त्याच्या दंडावरील कांहीं खूण प्रतापरावांच्या नजरेस पडली. त्याबरोबर ते तिकडे लक्ष्यपूर्वक पाहूं लागले. तों पावट्याच्या डाळीएवढा एक तीळ, अगदीं काळा कुळकुळीत, त्यांना दिसला. ते त्या मुलास कांहीं विचारूं लागले. इतक्यांत दर्याबाई तेथें आल्या.

मुलग्याची प्रकृति पाहून प्रतापराव जाण्याकरितां निघाले. तेव्हां दर्याबाई हळूच ह्मणाल्याः—

" मग काय डॉक्टर, याच्या जगण्याची कांहीं आशा आहे का? अगदीं स्पष्ट सांगा."

" स्पष्ट सांगतों. बिलकुल आशा नाहीं. तो आतां फार दिवस वांचणार नाहीं."

दर्याबाई थोडा वेळ गप्प राहिल्या. पण नंतर त्यांनीं तोंड सोडिलें. " म्हणजे! बरेंच स्पष्ट सांगितलेंत म्हणावयाचें. अशा सांगण्यांत आईच्या जिवाला अंमळ बरें वाटेल असें कांहीं तरी आहे का?"

प्रतापराव:—" मी कां बरें स्पष्ट सांगूं नये? स्प[illegible] सांगा असें तुम्ही[illegible] ह्मणालां ना? ह्मणून मीं स्पष्ट सांगितलें. आणखी [illegible] सांगतों कीं, तुह्मी त्या मुलाची आई नव्हे."

दर्याबाई:—" मी त्याची आई नव्हे? तर कोण? तुह्मी?"

प्रतापराव:—" हो, हो. तुह्मी नव्हे त्याची आई! तो मुलगा माझा आहे, माझा. समजलें?"

दर्याबाई:—" म्हणजे? या असल्या बोलण्याचा अर्थ तरी काय?"

प्रतापराव:—" माझ्या बोलण्याचा अर्थ एवढाच कीं, ह्या मुलाला मीं जगांत आणिलें आहे. हा जन्मला तेव्हां जवळ मी होतों. हें पहा." असें ह्मणून प्रतापराव अंथरुणाजवळ गेले व त्या मुलाचा सदरा बाजूस करून त्यांनीं त्याच्या दंडावरील तीळ दर्याबाईंना दाखवून म्हटलें:— " ह्या खुणेवरून मीं त्या मुलाला ओळखलें. माझ्यासमोर हजार मुलें उभीं केलीं तरी मी ह्याला ह्या खुणेवरून ओळखून काढीन. कधीं चुकणार नाहीं."

बाई यावर कांहींच बोलल्या नाहींत. नंतर तीं दोघेंही ओसरीवर आलीं. तेथें वसंतराव उभे होते. त्यांना प्रतापराव म्हणाले:—" कांहीं वर्षांपूर्वीं पेठेंतील त्या मावशीबाईच्या घरीं जी दुर्दैवी बाळंतीण मेली ती—तिचें नांव कलावती—ती ह्या मुलाची आई. दुसऱ्या कोणास जरी आठवत नसेल तरी मला आठवण राहण्यास चांगलेंच कारण आहे."

दर्याबाई प्रतापरावांच्या तोंडाकडे पहात म्हणाल्या:—" पण मी त्या मैनाईला—तिनेंच तिचें बाळंतपण केलें होतें—किती विचारलें कीं मूल

उपजलें तेव्हां त्याच्या अंगावर कांहीं खुणा होत्या काय म्हणून, पण तिनें सांगितलें कीं कांहीं नव्हत्या."

प्रतापराव:—" मैनाईनें तुम्हांला काय वाटेल तें सांगितलें असेल. मी नाहीं त्याची इतकीशी फिकीर करीत. ही खूण ती विसरली असेल, किंवा त्या वेळीं तिनें ती पाहिली नसेल. पण मी सांगतों कीं हाच तो मुलगा."

यावर दर्याबाई कांहीं बोलल्या नाहींत. त्यांनीं तो विषयच सोडून दिला. निदान त्यासंबंधानें त्यांनीं पुढें वाद तरी केला नाहीं. नंतर त्यांनीं म्हटलें:—

" त्या बाळंतिणीला ज्यांनीं औषध दिलें तेच डाक्टर का आपण? नांव काय म्हटलेंत?"

प्रतापराव:—"हो हो,तेच. डाक्टर प्रतापराव विश्राम मीच तो.ज्याच्यावर झोंपेच्या औषधांत निष्काळजीपणानें विष मिसळून दिलें असा आरोप आला होता तोच मी."

दर्याबाई?—" आणि तुमच्या हातून तशी गोष्ट झाली नाहीं?"

प्रतापराव:—" माझ्या हातून? ह्या माझ्या हातून? अंः! भल्याबाई, तुह्मी त्या बाळंतिणीच्या ...णीही असा, मला माहीत नाहीं. पण मी सांगतों त्यावर तुमचा विश्वास असूं द्या. त्या वेळीं, आमच्यासमोर ती मरून, प्रेत होऊन, पडली असतांना, त्या सर्वसाक्षी परमेश्वराला स्मरून मीं सांगितलें कीं माझ्याकडून मीं औषध बरोबर तयार करून पाठविलें; त्यांत मीं विषारी पदार्थ मुळींच मिसळला नाहीं व हीच हकीकत पुनः आज रोजीं तिच्या ह्या आसन्नमरण मुलासमक्ष मी शपथेवर सांगत आहें."

दर्याबाई:—" तर मग तें कृत्य कुणाचें?"

" तें नाहीं मला माहीत." असें म्हणत प्रतापरावांनीं आपल्या खिशांतून कागद व पेन्सिल काढली व ते औषधाचें टिप्पण करूं लागले. लिहितां लिहितां 'दर्याबाई! दर्याबाई!' असे ते तोंडानें पुटपुटले. मागील गोष्टींची आठवण होऊन त्यांना बरेंच आश्चर्य वाटल्यासारखें दिसलें. नंतर " मुलाला घेऊन जाण्याकरितां दर्याबाई नांवाच्या ज्या बाई आल्या होत्या त्याच तुह्मी, होयना?"असें त्यांनीं विचारलें.

ही गोष्ट नाकबूल करण्यापासून कांहीं फायदा नाहीं, किंवा कबूल केली म्हणून तरी काय झालें, असें बाईंना वाटलें असावें म्हणून त्या म्हणाल्याः—

" असेन. मग त्याचें एवढें काय ? "

प्रतापराव त्या बाईकडे आश्चर्यानें पहात म्हणालेः—" त्याचें एवढें काय ? कां बरें ? बाई, तुमचा तपास लागण्याकरितां सर्व जग धुंडाळलें हें तुम्हांला माहीत आहे काय ? त्या प्रकरणांत तुमची फारच जरूर लागली होती. "

" कशाकरितां ? "

" काय माहीत असेल तें कोर्टासमोर सांगण्याकरितां. ती तरुण स्त्री कोण, कोठली राहणारी, कां आली होती वगैरे गोष्टी—ज्या अगदीं मुग्ध राहिल्या आहेत—त्यासंबंधानें कांहींतरी हकीकत बाहेर आली असती. "

" पण मला कांहींच माहिती सांगतां आली नसती. "

" मला नाहीं तसें वाटत. तुम्हांला सांगतां आली असती असें माझें मत आहे. "

दर्याबाईः—"तर मग, डाक्टर, तुमचें म[illegible]कीचें आहे. मी देवाची शपथ घेऊन सांगतें कीं ती बाई कोण, तिचें घर कुठें, तिच्या घरचीं माणसें कोणकोण आहेत, यासंबंधानें ह्या अजाण मुलाला जितकी माहिती आहे तितकीच मला आहे. याहून जास्त नाहीं. ही माहिती काढून घेण्या-करतांच तर मी सध्यां इथें येऊन राहिलें आहें. या गांवांत येईपर्यंत कलावती मेल्याची बातमी मला कळली नव्हती. मी समजत होतें ती इथेंच आहे म्हणून. "

" तिचा नवरा कोठें आहे ? " प्रतापरावांनीं जरा थांबून विचारिलें.

" मला देखील हेंच समजायला पाहिजे आहे. या गांवांतून तें मूल घेऊन गेल्यापासून मला इकडची कांहींच हकीकत कळली नाहीं. "

" तरी पण कलावतीसंबंधानें थोडी तरी माहिती तुम्हांला असलीच पाहिजे. अगदीं अनोळखी बाईकडून मूल नेण्याकरितां तुम्ही कांहीं आलां नसाल व त्या बाईनें तरी मग आपलें मूल तु[illegible]ीन कसें केलें असतें ? "

" ती आमच्या घरीं राहिली होती म्हणून तिला माझी माहिती होती, ही गोष्ट सांगायला कांहीं हरकत नाहीं," असें दर्याबाई थोड्या वेळानें म्हणाल्या.

" आणि तिचा नवरा? तो सुद्धां तुमच्या घरींच राहत होता काय?"

दर्याबाई:—" नाहीं. ती एकटीच होती. मी तुमच्या गळ्याची शपथ घेऊन सांगतें कीं ती कोण किंवा तिचा नवरा कोण हें कांहीं मला माहीत नाहीं. आतां इथें आल्यापासून दिखील तेंच हें मूल असें मी एका शब्दानेंसुद्धां कुणाजवळ बोललें नाहीं. कशाला बोलूं? अगदीं गुपचूप आहें. याचें कारण एवढेंच कीं ज्या गोष्टी मला माहीत नाहींत त्या विचारून विचारून लोकांनीं माझी पुरेवाट केली असती."

" आणि ती मेल्याचेंही तुह्मांला समजलें नाहीं?"

"नाहीं समजलें.मी या मुलाला घेऊन इंदुराकडे गेलें होतें.तिकडे आमच्या माणसांना मोठी नोकरी होती.आह्मांला नेहमीं असें आश्चर्य वाटे कीं कलावती आपल्या मुलाकरितां तरी अजून कशी आली नाहीं? आह्मांला वाटलें ती आपल्या नवऱ्याबरोबर हुबळी–धारवाडाकडे गेली असली पाहिजे. असें कांहीं बोलणें तिथें निघालें होतें."

" आणि तिच्या मरणासंबंधानें अगर कशी मेली वगैरेसंबंधानें तुह्मांला कांहीं माहिती नाहीं?"

दर्याबाई:—" कांहींच नाहीं. इथें आल्यानंतर जी काय समजली तेवढीच. कलावती मुंबईत माझ्याजवळच रहात होती, आणि एके दिवशीं अशी अकस्मातच निघून या गांवाकडे आली. पुढें एक दोन दिवसांनीं तिच्याकडून मला पत्र आलें कीं, मी लवकरच बाळंत होईन, तुह्मी येऊन मुलाला घेऊन जा; त्या मुलाला मीं जतन करावें असें तिचें माझें ठरलें होतें. इतकीच मला माहिती आहे."

प्रतापराव:—" पण ती या गांवांतच कां आली याची कांहीं माहिती?"

दर्याबाई:—" मला वाटतें कीं नवऱ्याला भेटायला ती इथें आली होती. तरी पण तिच्यासंबंधानें कांहीं तरी गूढ असलें पाहिजे, कारण नवऱ्याबद्दलची हकीकत ती मुळींच सांगत नसे."

दर्याबाईंना इतकीच माहिती आहे असें दिसलें, निदान एवढीच त्यांनीं सांगितली. ह्या माहितीनें प्रतापरावांच्या पूर्वींच्या माहितींत विशेषशी भर पडली नाहीं. काय माहिती असेल ती पोलिसांना कळवा अशी सूचना करून ते जावयाला निघाले. दर्याबाई म्हणाल्या:—" नाहीं तरी मी पोलिसांना कळविणारच आहें; पण तशी वेळ केव्हां येते याची वाट पहातें आहें. मग जरी ह्या गोष्टीचा थांग लागला नाहीं तरी माझ्याकडे दोष राहणार नाहीं."

प्रतापराव व वसंतराव दरवाजाच्या बाहेर पडतात इतक्यांत दर्याबाईंनीं त्यांना हाक मारून म्हटलें:—" डॉक्टर, आपण तसेच निघालां. फीचे रुपये मागितले नाहींत."

प्रतापरावांनीं हांसून उत्तर केलें:—" या गांवांत मी कोणाकडून फी घेत नाहीं. मीं तुम्हांला लिहून दिल्याप्रमाणें औषध द्या. तरी पण कशानेंही तो मुलगा जगणार नाहीं."

असें म्हणून प्रतापराव चालूं लागले. ह्या घरापासून थोड्याच अंतरावर त्यांची व आनंदरावांची वाटेंत गांठ पडली. तेही सकाळीं रोगी पहाण्याकरितां निघाले होते. " हे दोघे बापलेंक ह्या बाजूला कां बरें आले आहेत ?" असा प्रश्न आनंदरावांच्या चेहऱ्यावर दिसत होता. त्यांनीं अगदीं भीड न ठेवतां एकदम विचारिलें:—" आपण आमच्या रोग्याकडे गेलां होतां वाटतें ?"

प्रतापराव:—" तो तुमचा रोगी ! आम्हांला कांहीं माहीत नाहीं, व विचारावयाला फुरसतही झाली नाहीं. पथ्यामध्यें थोडासा फरक केला आहे, व औषधांचें एक टिप्पण करून दिलें आहे. तें तरी त्या बाईंना बरें वाटावें म्हणून. आतां कांहीं त्यांत अर्थ राहिला नाहीं."

"इकडे आपणाला कोण घेऊन आलें?" असें आनंदरावांनीं विचारिलें. या बाईच्या घरांत प्रतापरावांनीं यावें याचें आनंदरावांना खरोखरच भारी आश्चर्य वाटलें.

प्रतापराव:—" दर्याबाईंनीं मला बोलावणें पाठविलें ह्मणून मी आलों. तो मुलगा कोणाचा हें तुम्हांला समजलें असेलच ?"

आनंदराव थोडें थांबून म्हणाले:—" तो मुलगा कोणाचा ? तो फार दिवस जगणार नाहीं एवढें मला समजलेलें आहे, मग कोणीही डॉक्टर येवो, धन्वंतरी येवो व कितीही बदलून औषधें देवो."

प्रतापराव:—" माझें ऐका. मागें पेठेंतील मावशीबाईच्या घरीं एक तरुण व गरोदर स्त्री आली होती. तुह्मी येथें नव्हतां ह्मणून मी तिला औषध द्यावयाकरितां जात होतों. पुढें प्रशिक ॲसिड पोटांत गेल्यानें ती मरण पावली. त्या बाईचा हा मुलगा आहे, तिचाच."

" कांहीं तरीच ! " आनंदराव म्हणाले.

प्रतापराव:—" कांहीं तरी नाहीं. मी म्हणतों तें अगदीं खरें. माझी कल्पना चुकीची आहे असें भासविण्याचा दर्याबाईनीं प्रयत्न केला, पण शेवटीं मीं त्यांची खात्रीच करून दिली."

त्याबरोबर आनंदरावांचा चेहरा फिरला व त्यांची मुद्रा पालटली. कोंडींत गांठलेल्या सांबराप्रमाणें त्यांची स्थिति झाली. त्यांनीं वर पाहिलें तों वसंतराव त्यांच्या तोंडाकडे टक लावून पहात असलेलें त्यांना दिसलें.

" प्रतापराव, इतक्या वर्षांनंतर लहान मुलांना ओळखणें शक्य आहे, असें आपणाला वाटतें काय ? " असें शेवटीं आनंदरावांनीं विचारिलें.

प्रतापराव:—" नाहीं, हें मीही कबूल करतों. पण जर कांहीं विशेष खूण असेल तर मात्र ओळखतां येईल. कोठें मुलखावर जरी हा मुलगा मला दिसला तरी सुद्धां त्या खुणेवरून मी त्याला ओळखीन."

" कसली खूण आहे याला ? "

" डाव्या दंडावर, अगदीं मधोमध, एक मोठा तीळ आहे. एकदां पाहिला कीं कधींही कोणी विसरणार नाहीं. जा, पाहून या, जा."

असें ह्मणून प्रतापराव पुढें चालले. आनंदरावही दर्याबाईच्या घरीं जाण्याकरितां निघाले. दरवाजांत पाऊल ठेवणार इतक्यांत प्रतापरावांनीं त्यांना हांक मारून म्हटलें:—

" हें पहा आनंदराव. तेंच हें मूल आहे ही गोष्ट तुह्मी पोलिसांना जाहीर कराल तर बरें होईल. त्यापासून मागच्या प्रकरणाचा कांहीं तरी सुगावा लागेल. कदाचित् दर्याबाईनीं मला जेवढी हकीकत सांगितली

त्यापेक्षां तुम्हांला त्या जास्त सांगतील. विचारून तर पहा. त्या म्हणतात कीं, कलावती ह्या गांवांत आली ती आपल्या नवऱ्याला भेटायला म्हणून आली होती. ही गोष्ट खरी असेल असें मला वाटतें. जिन्यामध्यें लपून बसलेला मनुष्य तुम्हांला दिसला होता, त्याची आठवण करा. तोच तो नवरा असावा." इतकें सांगून प्रतापराव निघून गेले.

"त्या मनुष्याची आठवण करा" अशी सूचना आनंदरावांना करण्याची कांहीं जरूर नव्हती. कारण तो मनुष्य आनंदरावांच्या डोळ्यांसमोर नेहमीं इतका दिसे कीं, त्यांच्या मनाला त्यामुळें बिलकुल स्वस्थताच वाटत नव्हती.





# प्रकरण ९ वें.

—:o:—

## आनंदरावांची त्रेधा.





लीलेची प्रकृति आतां सुधारूं लागली. प्रतापराव मुंबईला निघून गेल्यानंतर आठ दिवसांच्या आंतच ती उठून बसूं लागली व खोलींतल्या खोलींतच का होईना थोड थोडी हिंडूं फिरूं लागली. साधारणपणें गांवांतील हवाही स्वच्छ होत चालली व सांथीचा जोर हळूं हळूं कमी होऊं लागला.

लीला हैराण असतांना वसंतराव आपल्या काकाबरोबर तिला भेटावयाला ह्मणून आले होते, पण तापाच्या भरांत त्यांना तिनें ओळखलें नाहीं, हें वाचकांना माहीत आहेच. त्या दिवसापासून या घरांत येण्याची एकदां सुद्धां त्यांना परवानगी मिळाली नाहीं. ह्मणून वसंतरावांना आनंदरावांचा फार राग आला होता. लीला आतां उठून बसते असें विश्वासरावांच्या तोंडून त्यांनीं ऐकलें होतें. ह्मणून एक दिवस ते तडक आनंदरावांच्या घरीं गेले, व नीट जिना चढून लीलेच्या खोलींत जाऊन बसले. आनंदराव घरांत नसल्यामुळें त्यांना कसलीही हरकत झाली नाहीं.

लीला बिछान्यावर तक्यास टेंकून बसलेली होती. वसंतराव तिच्या शेजारीं जाऊन बसले; पण दोघांच्याही तोंडांतून शब्द निघेना. पहिला गहिंवर येऊन गेल्यानंतर वसंतराव ह्मणाले:—" प्रिये, आलेलें अरिष्ट

टळलें. आतां सांगायला हरकत नाहीं. तुझ्या जगण्याची बिलकुल आशा वाटत नव्हती. पण आतां लवकरच तूं माझी होशील."

लीलाः—"तथापि! हे शरीरभोग माझे मींच सोसले पाहिजेत. दुसऱ्या कुणाला त्यांत भागीदार कसें होतां येईल?"

वसंतरावः—"येईल असें मी म्हणत नाहीं. पण तूं अशी आजारी पडलेली आणि तुझ्या समाचाराला सुद्धां येण्याची मला बंदी, म्हणजे किती वाईट स्थिति बरें! हा प्रसंग मी किती संकटानें घालविला, आनंदरावांच्या ह्या घराभोंवतीं तासाचे तास, रात्रीच्या रात्री मी कसा घिरट्या घालीत होतों, ह्या घराच्या खिडक्यांकडे पहात बाहेरच्या बाहेर मी कसा हिंडत होतों, हें सर्व मी तुला सांगत बसत नाहीं. एकदां तूं माझी झालीस म्हणजे मग तुला दुखणें आलें तरी मी भिणार नाहीं. तशा प्रसंगीं तुझी शुश्रूषा करण्याचा, तुझ्याजवळ बसून राहण्याचा मला हक्क तरी प्राप्त होईल. जगांतील दुसऱ्या कोणत्याही माणसांपेक्षां माझा हक्क श्रेष्ठ होईल. बहिणी, मैत्रिणी, पाहुणेमंडळी—हे सर्व माझ्या पासंगाला तरी पुरतील काय?"

मधुर हास्यपूर्वक ती त्यांच्या तोंडाकडे पाहून म्हणाली:—"आपणच मला या दुखण्यांतून वांचिवलें असें मी नेहमीं ह्मणेन."

वसंतरावः—"मीं वांचाविलें? तें कसें?"

लीलाः—"कसें म्हणजे? मुंबईला तार कोणीं केली? आक्का ह्मणते कीं, प्रतापराव आल्यानंतर थोडक्याच वेळांत माझ्या अंगाची तलखी कमी झाली नी चांगली झोंप लागली. त्यांनीं कसलीशी एक पूड पोटांत दिली व कपाळाला लावायचें तेल बदलून दुसरें दिलें. मला तरी काय ठाऊक? तीच सांगत होती."

वसंतरावः—"काका व आनंदराव करीत होते त्यापेक्षां जास्त कांहींच त्यांनीं केलें नाहीं. ते आले तेव्हां आराम पडावयाचाच होता."

लीलाः—"मी नाहीं तसें म्हणणार. आराम पडायाचा होता तर मग आधीं कां नाहीं पडला? आक्कासुद्धां असेंच म्हणते. माझें आयुष्य वाढलें

त्याचें सर्व श्रेय आपल्या वडिलांकडेच आहे. किंवा त्यांना आपण तार करून आणविलें म्हणून आपणांकडे आहे."

वसंतरावः—"बरें, तसें कां होईना ? त्याबद्दल उगीच वाद नको. कोणकिडून गुण आल्याशीं कारण."

इतका वेळ वसंतराव खुरमांडी घालूनच बसले होते. त्यांना तसे अवघडत बसलेले पाहून लीला ह्मणाली:—"असें बसून पाय नाहींत कां दुखायचे ?"

तिनें सप्रेम नेत्रांनीं वसंतरावांकडे पाहिलें. त्याबरोबर तिच्या गालांवर मंदहास्य चमकूं लागलें. त्याची तकाकी चुंबनानें काढून घेण्याच्या उद्देशानें वसंतरावांनीं आपली मान लववली. लोक कोणतीही खोडी करावयास प्रवृत्त होतात, अगर चौरकर्म करण्यांत गुंततात तेव्हां बहुतेक पकडले जातात असा सर्वसाधारण अनुभव आहे. तसाच प्रकार आतांही झाला. खोलीचें दार एकदम उघडलें व आनंदरावांची स्वारी बिछान्याजवळ येऊन उभी राहिली. त्याबरोबर तरुणीजनास योग्य अशी सलज्ज भीति लीलेच्या चेहऱ्यावर दिसूं लागली. वसंतरावांनीं मान न डगमगतां वर पाहून म्हटलें:—"आनंदराव, येथें आपलें काय काम आहे ?"

"काय काम आहे ! हें माझें घर आहे."

"तुमचें घर तर खरेंच. मी नाहीं म्हणत नाहीं. पण ही खोली सध्यां लीलाबाईची आहे."

त्या दोघांची कोठें ही गांठ पडो, तेथें खटका उडावयाचा, बोलाचाली तरी व्हावयाचीच हें अगदीं ठरून गेलें होतें. वसंतराव उठून आनंदरावांसमोर उभे राहिले.

आनंदरावः—"लीलाताई माझ्या बायकोची बहीण, माझी मेहुणी. त्यांना औषध देणारा डाक्टर, व त्या माझ्या घरीं आहेत तोंपर्यंत त्यांचें संरक्षण करणारा, अशा जोड नात्यानें मीच तुम्हाला विचारतों कीं, तुमचें येथें काय काम आहे? हें कांहीं बरें नव्हे. गैर, अगदीं गैर असें मी म्हणतों."

वसंतरावांनीं शांतपणानें उत्तर दिलें:—"त्याचा योग्य विचार करण्याचें काम माझें आहे. माझी भावी पत्नी या दृष्टीनें पाहिलें तर गैरशिस्त प्रका-

रापासून तिला जपण्याच्या कामीं माझ्यापेक्षां जास्त काळजी दुसऱ्या कोणास असणें संभवत नाहीं. म्हणे हें अगदीं गैर. आनंदराव, आपलीं नीतितत्वें आपणाजवळच राहूं द्या. "

या प्रमाणें बोलत बोलत वसंतराव पुनः बिछान्याशेजारीं बसले. खोलींतून बाहेर जाण्याचा आपला मुळींच हेतु नाहीं असें त्यांनीं दर्शविलें. आतां बोलणें जास्त वाढणार असें पाहून लीला आनंदरावांना म्हणाली:— " काय हवें आहे ? "

आनंदराव:—" लीलाताई, मी ह्या पुड्या घेऊन आलों आहें. उरांत जळजळतें असें तुम्ही सकाळीं म्हणालांना ! म्हणून या आणल्या आहेत. पाण्याच्या घोंटाबरोबर घ्यावयाच्या. आतां एक घ्या, आणि निजते वेळीं एक घ्या. यानें जरा बरें वाटेल. असें म्हणून त्यांनीं त्या पुड्या तेथेंच एका कोनाड्यांत ठेविल्या. "

" बरें आहे असूं देत. आतांच मी एक घेतें. " असें लीला ह्मणाली. तिला त्रास होईल ह्मणून त्या आगंतुक पाहुण्याशीं—वसंतरावांशीं—विशेष न बोलतां आनंदराव तेथून निघून गेले. वसंतरावांनीं त्या पुड्या उचलून घेऊन त्यांपैकीं एका पुडींतील चूर्ण आपल्या जिभेवर घेऊन चाखून पाहिलें. नंतर त्या सर्व पुड्या त्यांनीं सारजेकडे देऊन ( ती कसलेंसें काम होतें ह्मणून आंत आली होती, ) म्हटलें:—

" सारजाबाई, ह्या पुड्या ठेवा एके बाजूला. ह्यानें कांहीं उपयोग होणार नाहीं. मी दुसरें चांगलें औषध पाठवून देतों. "

सारजेनें त्या पुड्या फार सावधपणानें घेतल्या. जणुं काय त्या चावतील अशी तिला भीति वाटली. इतक्यांत इंदिराही आंत आली. नंतर घटकाभर इकडच्या तिकडच्या गप्पा झाल्यावर वसंतराव जावयाकरितां निघाले व जिना उतरून खालीं आले. दरवाजाच्या बाहेर पडणार इतक्यांत आनंदरावांनीं त्यांना हाक मारिली. ते मागें वळून पाहूं लागले. आनंदराव त्यांच्याजवळ जाऊन ह्मणाले:—" वसंतराव, एक मिनिटभर थांबा. हें पहा, तुमचें व माझें आपसांत समजून भागावें हें चांगलें. माझ्यासंबंधानें वाटेल तसें करतां येईल अशी तुमची समजूत झाली

आहे असें दिसतें. वाटेल तेव्हां तुम्ही माझ्या घरामध्यें येतां, माझ्या कामांत वाटेल तशी ढवळाढवळ करितां,हें बरें नाहीं.इतःपर असें होऊं नये."

" आक्कासाहेब आपल्या घरांत आहेत म्हणून त्यांच्याकडे मी केव्हां तरी येत असतों. एरवीं येऊन मीं त्रास दिला नाहीं. "

" यापुढें याहीपेक्षां कमी त्रास तुम्हीं मला द्यावा अशी माझी विनंति आहे. ही लपून छपून वागण्याची तऱ्हा मला नको आहे. मला ती आवडत नाहीं. "

" लपून छपून ! " वसंतरावांनीं आश्चर्यानें म्हटलें.

" हो. लपून छपूनच नव्हे तर काय ? माझ्या रोग्यासंबंधानें माझ्या परोक्ष दुसऱ्यांनीं चोंबडेपणा करावा हें मला पसंत नाहीं. माझ्या रोग्यांची योग्य ती व्यवस्था माझ्या हातून होईनाशी झाली म्हणजे मग दुसऱ्यांनीं हा लुडबुडेपणा करावा पाहिजे तर. तोंपर्यंत नको आहे. प्रतापरावांनीं त्या दर्याबाईच्या घरीं जाऊन त्या मुलग्याची प्रकृति पहाण्याची काय गरज होती? हा चोंबडेपणा, फाजीलपणा नव्हे काय ? "

वसंतरावांना हासूं आलें:—" त्याबद्दलची वाटाघाट दर्याबाईशीं करा. त्यांनीं बाबांना बोलावून नेलें व मीही त्यांच्याबरोबर गेलों. मीं जास्त कांहींच केलें नाहीं. त्या मुलग्याला सुद्धां मी पाहिले नाहीं. तुमच्या कामांत लुडबुडेपणा मीं केला, असें तुम्ही म्हणतां; पण आनंदराव, तसा लुडबुडेपणा केल्याचें मला तरी आठवत नाहीं. तुम्हीं नुकत्याच ज्या पुड्या आणून दिल्या त्या घेऊं नका असें मात्र मीं लीलाताईना सांगितलें. एवढा लुडबुडेपणा मीं केला खरा. पण त्यांचा व माझा संबंध काय आहे एवढें आपण ध्यानांत घ्या. "

"बरें पण, त्या पुड्या घेऊं नका असें तुम्हीं त्यांना सांगण्याचें कारण?"

" कारण हेंच कीं उरांतील जळजळीला तें उत्तम औषध आहे असें मला वाटत नाहीं. दुसरें औषध पाठवून देतों असें मीं त्यांना सांगितलें आहे. "

" वसंतराव, तुम्ही फार घमेंडखोर व मगरूर आहांत. एक दिवस तुम्हांला याचा जाब देणें भाग पडेल. " आनंदराव म्हणाले. वसं-

तरावांबद्दलचा द्वेषाग्नि त्यांच्या अंतःकरणांत जास्तच धुमसूं लागला. वसंतराव नेहमीं उद्दामपणानें बोलत. याचीच चिरड त्यांना आली होती.

वसंतरावांनीं उत्तर दिलें:—" कदाचित् जाब देण्याची वेळ येणारही नाहीं. आनंदराव, तुमचें माझें आज कित्येक वर्षें सरळ नाहीं. तरी पण उभयतांची गांठ पडली कीं, आम्हीं भांडावेंच असें नाहीं. तुमच्या घरांत तुमची संमति नसतां येऊन तुम्हांला त्रास द्यावा असा माझा बिलकुल हेतु नव्हता—आणि मी कबूल करितों कीं, तुमचा माझा संबंध लक्ष्यांत घेतला तर खरोखरच मीं आगळिकीचा गुन्हा केला आहे. पण सर्व परिस्थितीचा विचार करून आपण त्याबद्दल मला क्षमा करावी अशी माझी विनंति आहे. पुनः येथें न येण्याबद्दल मी प्रयत्न करीन. मला वाटतें आतां एक दोन दिवसांतच आक्कासाहेब आपल्या बंगल्यांत रहावयास जातील. "

असें बोलत बोलत ते दरवाजाबाहेर पडले. आनंदरावांनींही त्यांना हरकत केली नाहीं व भांडण एकदांचें मिटलें.

इकडे मोहना अद्यापि आपल्या खोलीच्या बाहेर पडत नव्हती. आपणास अजून चांगलें बरें वाटत नाहीं असें ती दाखवीत होती. बरें होण्याच्या मार्गांत मनुष्य असला म्हणजे त्याला ज्या सवलती मिळतात त्या घेण्याचें तिला फार आवडे. लोकांनीं नेहमीं येऊन आपला समाचार घ्यावा, घरांत आपणाला खावयाला चांगलें घालावें, निरनिराळ्या प्रकारचीं लोणचीं, धिरडीं वगैरे खमंग पदार्थ वाढावेत असें तिला वाटे. सकाळीं उशीरा उठावें पुनः दोन प्रहरीं तणगा लागावा, तिसऱ्या प्रहरीं आणखी शिरा, सांजा असें कांहीं तरी पाहिजेच. राहिल्या वेळांत पत्ते, सोंगट्या, गंजीफा ह्या चालावयाच्याच. इतके चोचले चालत होते तरी तिची तब्येत बरी होईना. याचें कारण प्रकृति सुधारण्याला तिची मनोवृत्ती अनुकूल नव्हती, निदान स्वस्थपणा तर बिलकुल नव्हता. दर्याबाईशीं, निदान त्या मुलग्याशीं आनंदरावांचा कांहीं तरी संबंध आहे, हा तिच्या मनानें घेतलेला संशय गेल्या एक दोन आठवड्यांत, तिला दुसरा

कांहीं व्यवसाय नसल्यामुळें, जास्तच दृढ झाला होता. आपली अब्रू गेली, मानखंडना झाली, हाच विचार मोहनेच्या मनाला संताप देत होता. पुरुषांचा नैतिक ढिलेपणा त्यांच्या बायकांवर मानखंडना आणतोच; तशांत मोहना स्वभावानें भारी तापट असल्यानें ह्या वेदना तिला फार तीव्र भासूं लागल्या. जहागीरदारांची मुलगी ह्मणून गांवांतील सर्व बायकांपेक्षां ती आपणांस श्रेष्ठ मानी, व आपल्या उच्च कुलाबद्दल तिला फार अभिमान वाटे; तशांत आनंदरावांचें तिच्यावर प्रेमही पुष्कळ होतें; इत्यादि गोष्टी ध्यानांत घेतल्या तर ही मानखंडना तिच्या हृदयांतरांत इतकी सलत होती याचें आश्चर्य वाटणार नाहीं. मत्सर, क्रोध, सूड वगैरे विकारांचा तिच्या मनाच्या ठिकाणीं झगडा चालला होता. आपल्या नवऱ्यावर उलट मानखंडना आणावयाची, अशी तिची जबरदस्त इच्छा होती. म्हणजे त्याच्यावर आरोप ठेवण्यास कांहीं तरी पुरेसें सबळ असें कारण शोधून काढावयाचें व नंतर त्याला शरण आणावयाचें, असा तिचा प्रयत्न सुरू होता. त्याला नाकबूल करितां येऊं नये, कीं नाशाबीत करितां येऊं नये असा पुरावा तिला पाहिजे होता. त्यानें आपल्या पायापाशीं लोळण घ्यावी, माफी मागावी, नाक घांसावें, चुकलों चुकलों ह्मणून तोंडांत मारून घ्यावी, नाकदुऱ्या काढाव्यात व हा सर्व प्रकार आपण आपल्या डोळ्यांनीं पहावा असें ती मनोराज्य करूं लागली, व या सर्व गोष्टी जुळून केव्हां येतात इकडेच तिचें सर्व लक्ष्य लागून राहिलें होतें.

कमळजेसंबंधानें कांहीं माहिती तुह्मांला सांगतां येईल कीं कसें अशाबद्दल इंदिरेनें आनंदरावांजवळ अद्यापपर्यंत गोष्टच काढली नव्हती. आनंदरावांना त्यांच्या कामधंद्यामुळें बिलकुल फावत नव्हतें, व मोहना आणि लीला ह्या दोघी बहिणी आजारी, ह्मणून इंदिरेचा बहुतेक वेळ त्यांच्याजवळ बसण्यांत व त्यांच्या पथ्यापाण्याचें करण्यांत जाई. यामुळें इंदिरेला सवडच झाली नाहीं. तथापि ह्या घरांतून जाण्यापूर्वीं तशी संधि साधून एकदां आनंदरावांना विचारावयाचें व आपल्या मनांतील मळमळ काढून टाकावयाची असें इंदिरेनें मनांत आणलें. इतक्या दिवसांच्या

सहवासानें तिच्यामध्यें व आनंदरावांमध्यें बराच सौजन्यभाव उत्पन्न झाला होता. ह्मणून तशी संधि लवकरच येईल अशी चिन्हें दिसत होतीं.

वरील दिवसाची म्हणजे वसंतराव बिगर परवानगीनें आनंदरावांच्या घरीं आले होते त्या दिवसाचीच हकीकत. संध्याकाळच्या वेळीं मोहना आपल्या खोलींत बसली होती व जवळच इंदिरा लोकरीच्या हातमोज्याची जोडी विणत बसली होती. हे दिवस थंडीचे होते. आनंदराव सहज एके दिवशीं इंदिरेशीं बोलतां बोलतां म्हणाले होते कीं, रात्रीच्या वेळीं बाहेर गेलों म्हणजे आपलीं बोटें थंडीनें गारठतात. तेव्हां, मी हातमोजे करून देतें असें इंदिरा त्यांना ह्मणाली होती आणि ह्मणून तिनें हे हातमोजे हातीं घेतले होते. कमळजेसंबंधानें इंदिरेनें मोहनेजवळसुद्धां गोष्ट काढिली नव्हती. कारण मोहना आतांशा बहुतेक आजारीच असे; आणि आजारी असली कीं, तिचा त्रासिकपणा वाढत्या प्रमाणावर असावयाचाच. ह्मणून इंदिरा इतके दिवस तिच्याजवळ बोलली नव्हती. आज मात्र मोहना, दिसण्यांत तरी कां होईना, थोडी शांत व आनंदी दिसत होती. तेव्हां इंदिरेनें ही संधि साधून घेतली,व मथुरा शेटजीच्या कुटुंबाची मुंबईत नुकतीच गांठ कशी पडली येथपासून सांगण्याला तिनें प्रारंभ केला. ही हकीकत मोहना निष्काळजीपणानें ऐकत होती. जणु काय तिचा त्यांत संबंधच नव्हता. पण सरतेशेवटीं कमळजेचें लग्न झालें असलें पाहिजे असा शेटजीणबाईंचा ग्रह झाला आहे ही हकीकत कानांवर पडतांच मोहना एकदम जागी झाल्यासारखी होऊन ह्मणालीः—“ लग्न झालें ? ”

इंदिराः—“ होय झालें. शेटजीणबाई म्हणाल्या त्यावरून तर कांहीं संशयच राहिला नाहीं. त्यांची मोलकरीण गुजाबाई जेव्हां भेटली तेव्हां कमळजेनेंच स्वतः तिच्याजवळ ही गोष्ट कबूल केली ह्मणे. ”

मोहना—“तर मग हा चांगलाच पुरावा मिळाला. आतां ठीक जुळलें. आपल्या स्वतःच्या मताप्रमाणें वागणारी आमच्या घरांत मी एकटीच नाहीं. माझ्या जोडीला कुणीतरी आहे. मीं फार वाईट गोष्ट केली असें तूं नि बाबा ह्मणत होतां नाहीं काय ? आतां हें कसें झालें ? बरें, तिचा नवरा तरी कोण, कुठें असतो सांग पाहूं. ”

इंदिराः—" तेंच पक्कें समजत नाहीं. त्या वेळीं त्यांच्या घरीं दोन चार जण, वयानें तरुण, डॉक्टरकीचा धंदा करणारे, असे येत असत. घरांतही त्यांची बरीच घसट पडलेली होती. त्यांपैकींच कुणाबरोबर तरी कमळजेचें लग्न झालें असावें. पण शेटजीणबाईचें म्हणणें तसें नाहीं. त्या म्हणतात कीं आपल्या भाऊजीकडे जे लोक येत त्यांच्यापैकीं कुणाशीं तिचें लग्न झालेलें नसावें, पण मला नाहीं तसें वाटत. त्यांपैकींच कोणीतरी असेल."

मोहनाः—" आणि तसेंच झालेलें असावें. पण एकदां लग्न झाल्यानंतर मग तरी तिनें घरीं कां कळवूं नये?"

इंदिराः—" तेंही खरेंच. मी याचाच विचार करून करून दमलें व कंटाळलें. कसेंही असो. हा थोडासा कां होईना पण सुगावा आहे, व या कामांत आपणांस कोणाची मदत होईल तें तुला सांगतें."

मोहनाः—" कोणाची?"

इंदिराः—" आनंदरावांची."

मोहनाः—" म्हणजे? ती कशी? आमची एक बहीण मास्तरिणीची नोकरी धरण्याकरितां घरांतून निघून गेली व तिचा अजूनी पत्ता नाहीं ही हकीकत आपणच कशी सांगायची? मीं मागें तुला सांगितलेंच आहे कीं कमळजेसंबंधानें चकारशब्द दिखील मीं तिकडे काढला नाहीं व पुढेंही काढणार नाहीं. मी काय म्हणतें आलें का ध्यानांत?"

इंदिरेनें तिला सगळी फोड करून सांगितली. फार वर्षांची गोष्ट, आनंदराव मथुराशेटजींच्या घरीं नेहमीं येत असत; शेटजींचे बंधु डॉक्टरच होते, त्यांचा व आनंदरावांचा फार लोभ असे; नेहमीं एके ठिकाणीं बसणें, उठणें, हांसणें, खेळणें चालावयाचें; 'कलावंत' म्हणूनही कोणसे गृहस्थ येत; तेही त्यांचे स्नेहीच; आणखीसुद्धां बरीच मित्रमंडळी तेथें जमत; कदाचित् ह्या कलावंतांचें व कमळजेचें लग्न झालें असावें, वगैरे हकीकत सांगून शेवटीं इंदिरा म्हणालीः—" त्यांच्या लग्नाची अगर पुढील हालचालीची माहिती आनंदरावांना असणें संभवनीय आहे."

पण मोहनेला ती गोष्ट पटली नाहीं. ती त्रासून म्हणालीः—

" खरोखर, आक्का, धड खरी ना खोटी अशी अर्धवट बातमी आणल्यापासून कांहीं फायदा नाहीं. मी म्हणतें ह्या योगानें आमच्या थोर घराण्याचा लौकिक मात्र जात आहे."

इंदिरा जरा संतापून म्हणालीः—" कमळजेचा तपास लावल्याशिवाय मी कधीं गप्प बसणार नाहीं. शेटजीणबाईंनीं दिलेल्या बातमीनें मला एक प्रकारची उचल दिली आहे. बाबांनींही तिचा शोध करण्याबद्दल मला बजावलें आहे. ती अजूनी जिवंत असेल, तिची हलाखी चालली असेल, आमच्याकडे खर्चायला मागण्याची तिला लाज वाटत असेल, किंवा तिचें कांहीं बरें वाईट झालें असलें तरी तिचीं मुलेंबाळें असतील, निदान एखादें तरी असेल. ताई, तुला राग येवो, वाईट वाटो. मी आनंदरावांना विचारणारच." मोहना नाक मुरडून म्हणालीः—" विचार बापडी, तुला वाटेल तर. कमळजेचा कांहींच पत्ता तुला लागणार नाहीं ही काळ्या दगडावरील रेघ. तरी पण, आक्का, ह्या एकंदर तुझ्या बोलण्यामध्यें कांहींतरी गूढ दिसतें."

इंदिराः—" होय, कांहीं तरी गूढ आहे असें मला देखील वाटतें, व हें काय गूढ असावें असें मनांत येऊन भीति वाटूं लागते. दर्याबाईंचा तो गुडघा सुजलेला मुलगा तूं पाहिला आहेस ना ?"

मोहनेनें होय म्हटलें. नंतर इंदिरेनें तिला सांगितलें कीं तो मुलगा कमळजेचा आहे असें आपल्याला वाटतें व हा विचार आपल्या डोक्यांतून जातां जात नाहीं; त्याचे डोळे अगदीं थेट कमळजेच्या डोळ्यांसारखे दिसतात. पण मोहनेला तसें वाटत नव्हतें. ती म्हणाली कीं तो मुलगा आपल्या नवऱ्यासारखा—आनंदरावांसारखा दिसतो, सबब तो त्यांचाच आहे. असें म्हणून आनंदरावांना व त्यांच्याबरोबर सर्व पुरुषजातीला तिनें शिव्यांची लाखोली वाहिली. याप्रमाणें त्या दोघींचा वाद चालला असतां तेथें सारजा आली. इंदिरेनें तिला त्या मुलाची प्रकृति कशी आहे तें पाहून येण्याकरितां दर्याबाईंच्या घरीं पाठविलें होतें ही गोष्ट मोहनेला माहीत होती. म्हणून सारजा येताक्षणींच तिनें विचारिलें:—" सारजाबाई, तूं त्या मुलाला पाहिला आहेस. कुणासारखा दिसतो ग तो ?"

सारजा उत्तर देण्याचें टाळूं लागली. पण मोहनेनें जेव्हां पाठ पुरविली तेव्हां तिनें शेवटीं सांगितलें कीं तो मुलगा आनंदरावांसारखा दिसतो खरा.

आतां इंदिरा काय बोलणार? ती अगदीं मुखस्तंभासारखी स्वस्थ बसली. असें उत्तर सारजेकडून येईल अशी तिची मुळींच कल्पना नव्हती. मोहना दिमाखानें तिच्याकडे पाहूं लागली. सारजेच्या साक्षीनें तिच्या मनांत जो संशय आला होता त्याला चांगलेंच पुष्टीकरण मिळालें. आनंदरावांवर गुन्हा पूर्णपणें शाबीद झाला असेंच तिला वाटूं लागलें. तिच्या अंतःकरणांत मत्सर व क्रोध या दोन विकारांचें प्राबल्य होऊन त्यांनीं तेथें हलकल्लोळ उडवून दिला.

त्या मुलाचा चेहरा जरी आनंदरावांच्या चेहऱ्यासारखा मोहनेला दिसला तरी तिनें जो तर्क बांधला आहे तो बरोबर नाहीं, माणसासारखीं माणसें पुष्कळ असतात आणि त्यांचा एकमेकांचा कांहीं संबंध असत नाहीं असें पुष्कळ वेळां होतें, असें इंदिरा मनांत म्हणाली. नंतर ती सारजेकडे वळली. तिच्यादेखत इतकें बोलणें झालें होतें तेव्हां आणखीही होणें इष्ट दिसलें:—

"सारजाबाई, आमची आणखी एक बहीण आहे पण तिचा कुठें पत्ता नाहीं. मागें एकदां तिच्यासंबंधानें मी तुझ्याजवळ बोललें होतें, तुला आठवत असेलच. तिची कांहींएक बातमी आह्मांला समजत नाहीं. परंतु अलीकडे मात्र मला थोडीशी माहिती मिळाली आहे त्यावरून माझा असा ग्रह झाला आहे कीं तिनें लग्न करून घेतलें असावें. त्या—त्या घरांत दयाबाई व एक मुलगा अशीं असतात तो मुलगा अगदीं आमच्या कमळजेसारखा दिसतो. तिचाच तो मुलगा आहे अशी माझी कल्पना झाली आहे ती जातां जात नाहीं." नंतर ती मोहनेकडे वळून म्हणाली:—"ताई, मी म्हणतें, कमळजा कुठें तरी आपल्या नवऱ्याबरोबर दूरदेशीं गेली असावी आणि मुलाला तिनें दाईच्या स्वाधीन केलें असावें, असें होणें अगदीं साहजिक आहे."

सारजेची मुद्रा एकदम पालटली:—“ आक्कासाहेब, आपण कोणतं नांव घेतलंत? कमळजा?”

“ हो, आमची कमळजाताई. कां बरें?”

“ मला तें नांव जरा चमत्कारिक वाटलें. दुसरें कांहीं नाहीं.”

“ खरेंच. हें नांव विशेष परिपाठांतलें नाहीं. तिनें कोणी ‘ कलावंत’ नांवाच्या गृहस्थाबरोबर लग्न करून घेतलें असें मानण्यास कारणें आहेत. पुढें तो नवरा कुठें दूरदेशीं गेला. तिकडे त्याचें काय झालें न कळे. सारजाबाई, तूं अशी कां पहाते आहेस?”

सारजा आश्चर्यानें पहात होती. ती म्हणाली:—“ आक्कासाहेब, ह्या नांवाचा एक गृहस्थ माझ्या आक्काच्या माहितीचा आहे. ती राहते त्या घरच्या मालकिणीकडे तो मागें येत असे. तिला त्याची सर्व माहिती असेल. विचारून पाहूं का?”

इंदिरेकडून तात्काळ रुकार मिळाला. तिलाही माहिती पाहिजेच होती.

याच दिवशीं संध्याकाळीं दिवे लावणीच्या सुमारास आनंदराव दवाखान्यांत लीलेचें औषध तयार करीत होते. कारण तिला लागणारीं सर्व औषधें विश्वासरावांच्या संमतीनें तेच देत असत. अंधार पडला असल्याकारणानें औषधांचें प्रमाण त्यांना बरोबर समजेना म्हणून त्यांनीं एक मेणबत्तीचें शामदान पेटवून खिडकींत ठेविलें, व औषध तयार करण्याकरितां एका हातांत ग्लास व दुसऱ्या हातांत सरबताची बाटली असे घेऊन ते दिव्याजवळ येऊन उभे राहिले.

पण औषध तयार करावयाचें सोडून आनंदराव त्या खिडकीकडेच कां पहात उभे राहिले?

खिडकीस भिंगाचें दार होतें. त्या दारास लागून बाहेरच्या बाजूनें एक चेहरा अस्पष्ट असा, त्यांना दिसला. चेहरा भयंकर व पांढरा फटफटीत दिसत होता व त्याला कांळेभोर कल्ले होते. असाच चेहरा मागें आनंदरावांना दिसला होता त्याची त्यांना आठवण झाली. त्याबरोबर ते भ्याले. तो चेहरा आपणाकडे पहात नसून आपण औषध कसें तयार करीत आहोंत हेंच पहात आहे असें त्यांना वाटलें. आनंदरावांची त्रेधा उडाली

व त्यांचा शक्तिपात होऊन शुद्धीही नाहींशी होत चालली. त्यांनीं एकदम एक भेसूर व कर्कश किंकाळी फोडली. त्यांचे हात थरथर कांपूं लागल्याकारणानें सरबताची बाटली व ग्लास जमिनीवर पडून कांचेचे तुकडे सर्व दवाखान्याभर पसरले. सरबताचा तर चंहूकडे सडाच झाला. त्यांचा कंपाउंडर येऊन पहातो तर डॉक्टरसाहेब कावरेबावरे होऊन खिडकीच्या दाराकडे टक लावून पहात आहेत असें त्याला दिसलें. त्याला कांहींच उमज पडेना.





# प्रकरण १० वें.

——:o:——

## मोहनेचें कपट.





व रील प्रकार झाल्यानंतर एक दोन दिवसांची गोष्ट. रात्रीं कडक थंडी पडली होती; अशा वेळीं दत्तापूर गांवाच्या पेठेंतून एक बाई गडबडीनें चालली होती. अंगास थंडी लागूं नये म्हणून तिनें लुगड्याची चौघडी अंगावर घेतली होती. रस्त्यानें जातांना ती तोंडानें पुटपुटत होती. त्यावरून अशा थंडीमध्यें बाहेर पडण्यास ती बरीच नाखूष असावी असें दिसलें:—" कुणाची होऊं नये बाईल, नि कुणाचें होऊं नये चाकर, असें म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. आमच्या बाईसाहेबांचा हा काय मेला लहरी स्वभाव ! थंडीचा कडाका कोण आणि अशा वेळीं मला त्यांनीं बाहेर पाठविलें. त्यांचा स्वभावच असा. त्यांचें त्यांनाच शोभतें; त्यांच्या मनांत आलें कीं पुरें, तें मग झालेंच पाहिजे. सोय बघायची नाहीं, गैरसोय बघायची नाहीं. जळलें तें कपाट ! त्या तिकडे गेल्या कशाला नि किल्ली हरवली कशाला ? "

चालतां चालतां एका मणेऱ्याचें दुकान उघडें असलेलें पाहून ती उभी राहिली. आंत एक दिवा मिणमिण जळत होता व दुकानाचा मालक अंगावर भली जाड दुलई पांघरून घेऊन तक्क्यास टेंकून रस्त्याकडे पहात बसलेला होता. त्याला त्या बाईनें म्हटलें:—" करीमभाई, झोंप लागली काय ? एक दाभण द्या पाहूं. "

करीमभाईः—" कोन ? आक्कूबाई ? अरे, तमी लोक इक्त्या अंदारांत नि थंडीमंदी कशी बाहीर पडते ? दाबण पाजे ? कशाला ? "

आक्कूः—" आह्मांला काय चाकर माणसाला ? सांगतील तें काम, सांगतील त्या वेळीं केलें पाहिजे. आमच्या बाईसाहेबांच्या खोलींत एक कपाट आहे त्याची किल्ली कुठें त्यांनीं हरवली. मघाशीं मला त्यांनीं विचारलें:—' आक्कू, या कपाटाची किल्ली कुठें आहे ग ! ' मीं म्हटलें 'किल्ल्यांच्या जुडग्यांत आहे.' त्या म्हणाल्याः—' त्यांत नाहीं, जा, आण, जा कुठें आहे ती. ' मीं किल्ल्यांच्या जुडग्यांत पाहिलें तर खरेंच. मग मला आठवलें कीं तिसऱ्या प्रहरीं ओढखणांत ठेवली म्हणून. पण त्यांतही नाहीं. त्यांनींच कुठें तरी हरवली झालें. "

करीमभाईः—" तशाच झाला असल. तेंच्या ध्यानामंदी नाहीं. "

आक्कूः—"तसेंच, दुसरें काय ? पेटीच्या सांदरीला, कपाटाच्या मागें कुठें तरी पडली असेल. सांपडेल सकाळीं उजेडल्यावर. मीं तसें त्यांना म्हटलें. पण छे. त्या म्हणाल्या, ' आत्तां कपाट उघडलें पाहिजे. दुकानांत जाऊन एक दाभण घेऊन ये जा; त्यानें उघडतें का पाहूं. ' म्हणून मी तशीच आलें. हं, आतां आटपा; उशीर झाला म्हणजे तिकडून आणखी बोलून घ्यायला लागेल. "

करीमभाईनीं एक दाभण आणून दिलें. आक्कूनें तें घेऊन त्याची किंमत देऊन टाकली व पुनः गडबडीनें ती निघून गेली.

जाववेल तितक्या जलदीनें आक्कू घरीं जाऊन पोंचली. मोहना तिची उतावळिपणानें वाट पहात बसली होती. तिला मोठी उत्कंठा लागलेली होती, व तिचे डोळे फार चंचल दिसत होते. आज तिनें कोणती गोष्ट करण्याचें मनांत आणलें होतें बरें ? वास्तविक म्हटलें तर तें कपाट आत्तांच रात्रीं उघडण्याची इतकी आवश्यकता होती असें नाहीं, सकाळीं उघडलें असतें तरी सुद्धां चालण्यासारखें होतें. मग किल्ली हरवली म्हणून ती इतकी अस्वस्थचित्त झाली हें संभवनीय आहे काय ? छे ! मोहनेच्या मनांत या वेळीं भलताच विचार आला होता. आणि म्हणूनच ती इतकी उतावळी व अस्वस्थ झालेली होती.

आक्कू धांवत पळत, धापा देत आली, तरी मोहनेनें म्हटलें:—"आक्कू, किती उशीर लावायचा ग? माणसानें मेली थोडी काळवेळ पाहिली पाहिजे." आक्कू बिचारी काय बोलणार? तिनें मुकाट्यानें दाभण पुढें केलें. तें घेऊन मोहना ह्मणाली:—"तूं अशी कशी किल्ली हरवलीस पण?" आक्कूनें सांगितलें:—"ताईसाहेब, किल्ली मीं ओढखणांतच ठेविली होती, मला पक्कें आठवतें. अशीच मागें एकदां चोळी देखील सांपडत नव्हती पण ती ताईसाहेबांनीं खालीं माजघरांत खुंटीवर ठेवली होती." आक्कूनें केलेला हा विसराळूपणाचा आरोप मोहनेला भारी झोंबला. ती संतापून ह्मणाली:—"लागली का तुझी जीभ आणखी चुरु चुरू करायला? होय मी विसराळू आहें, पण तुझें कां लक्ष असत नाहीं? मग तुम्हांला नोकरीला ठेवायच्या त्या कशाला? ओढखणांत ठेवली होती म्हणतेस तर दे आतां काढून. आक्कू ओढखण शोधूं लागली. मोहना वस्सादिशीं तिच्या अंगावर जाऊन म्हणाली–हं, पुरे आतां, पुष्कळ झालें हुडकणें, जा आपल्या कामाला. मी पहातें कपाट उघडतें का नाहीं तें.', असें म्हणून तिनें आक्कूला निरोप दिला. आक्कू खोलींतून बाहेर पडते इतक्यांत तिला पुनः हाक मारून मोहना म्हणाली:–" आक्कू. कुणाजवळ बोलूं नकोस बरें का? नाहीं तर विनाकारण बोभाटा व्हायचा."

"नाहीं" म्हणून आक्कू खालीं गेली. सारजा, वगैरे माणसें खालीं होतीं. त्यांनीं आक्कूला या वेळीं बाहेर जाण्याचें कारण विचारिलें. "ताईसाहेबांचें कांहीं काम होतें." एवढेंच आक्कूनें उत्तर दिलें. या वेळीं आनंदराव बाहेर गेले होते व इंदिरा लीलेच्या खोलींत होती. बाकी नोकरचाकर आपापल्या निजण्याच्या तयारींत होते.

इकडे मोहना थोडक्या वेळानें तें दाभण घेऊन बाजूस तळघरांत जाण्याचा जो जिना होता, त्या जिन्याकडे गेली. तिनें बरोबर एक काड्यांची पेटी व मेणबत्तीचा तुकडा घेतला होता. अंधारांत कोणीं ओळखूं नये ह्मणून काळ्या लुगड्याची घडी तिनें अंगावर घेतली व जिन्यावरून हळू व मोठ्या सावधगिरीनें पावलें टाकीत ती तळघरांत जाऊन पोंचली. तेथें गेल्यावर तिनें एक काडी ओढून मेणबत्ती पेटाविली.

मोहने ! अग मोहने ! अहो मोहनाताई ! तुह्मीं हें आरंभिलें आहे तरी काय ? आपल्या यजमानांच्या खाजगी गोष्टींत पडणें, तुमच्यापासून ज्या वस्तु दूर ठेवणें बरें असें त्यांना वाटलें त्या वस्तु शोधणें याला ह्मणावें तरी काय ! संभाळा हो ! वाईट रीतीनें ज्या गुप्त गोष्टी उघडकीस आणल्या जातात त्यांपासून उघडकीस आणणाऱ्याचा फायदा क्वचितच होत असतो.

पण या वेळीं मोहनेच्या मनाची स्थिति संभाळून राहण्यासारखी नव्हती. तूं करतेस हें वाईट आहे, तें सोडून दे, असें सांगण्याकरितां स्वर्गांतील देवदूत—नव्हे ब्रह्मदेव—जरी येऊन तिच्यापुढें उभा राहिला असता तरी सुद्धां त्याच्या म्हणण्याकडे तिनें लक्ष्य दिलें नसतें. तिचें मन या वेळीं संशयग्रस्त झालें असल्यानें आपल्या कृत्याचा परिणाम काय होईल याचा विचारच तिनें केला नाहीं. तिच्यासमोर असलेल्या लोखंडी पेटींत आनंदराव कोणते जिन्नस ठेवीत हें तिला मुळींच माहीत नव्हतें. पण मागें एके दिवशीं मोहना सहज त्या तळघराच्या दारांत गेली होती तेव्हां आनंदरावांनीं गडबडीनें त्या पेटीचें दार बंद केलेलें तिनें पाहिलें होतें. या क्षुल्लक कारणावरूनच तिच्या मनांत संशय उत्पन्न झाला होता, व त्या वेळेपासून ती पेटी उघडून आंत काय आहे तें पहावयाचें असा तिचा निश्चय झाला होता. त्याप्रमाणें ती एके दिवशीं संधि साधून रात्रीच्या वेळीं तिकडे गेली होती.परंतु ती पायरीवर पाय निसरून पडली वगैरे हकीकत वाचकांना माहीत आहेच. त्यानंतर आजारीपणामुळें तिला आजपर्यंत तिकडे जातां आलें नाहीं. अलीकडे तिच्या मनांत जी एक प्रकारची विलक्षण शंका आली होती तिची शहानिशा करण्याच्या कामीं त्या पेटींत असलेल्या वस्तूंपासून कांहीं उपयोग होईलच असें जरी तिला खात्रीपुरःसर वाटत नव्हतें, तरी तो मुलगा आनंदरावांसारखा आहे असें सारजेनें सांगितल्यापासून तिची मनोवृत्ति फारच अस्वस्थ झाली होती, आणि म्हणूनच एकदां मनाचा संशय फेडून घ्यावयाचा असा निश्चय करून ती आजच्या कृत्यास उद्युक्त झाली होती.

" दाभणाच्या योगानें मोहनेनें ती लोखंडी पेटी तर उघडली आणि

मेणबत्तीच्या उजेडांत आंतील वस्तु उलथ्यापालथ्या करून ती पाहूं लागली. ह्या पेटीला दोन कपे होते. एका कप्पांत चांदीचीं भांडीं, सोन्यामोत्यांचे दागिने, वगैरे मूल्यवान् जिन्नस होते. दुसऱ्या कप्प्यांत महत्त्वाचे कागदपत्र व दस्तऐवज वगैरे होते. शिवाय एक लहानशी बंद केलेली पेटी होती, व एक कातड्याचें लहानसें पाकीटही होतें. मोहनेनें ती पेटी हातांत घेऊन हालविली. सोन्या-रुप्याचा आवाज कांहीं ऐकूं आला नाहीं. तेव्हां असल्याच तर नोटा असतील. नंतर तिनें तें पाकीट घेऊन त्याचा खटका दाबला त्याबरोबर तें उघडलें. त्यांत तिनें पाहिलें तर सर्व सटरफटरच तिला वाटलें. कांहीं औषधांचीं टिपणें होतीं, दुकानदारांस पैसे दिल्याबद्दलच्या कांहीं पावत्या होत्या. आणखीही कांहीं खासगीसंबंधाचे कागद होते. म्हणजे मोहनेच्या मत्सरी मनाला जो प्रकार असावा अशी भीति वाटत होती, त्यावर परिणाम होण्यासारखें असें कांहीं त्यांत नव्हतें. पाकीट बंद करणार इतक्यांत बाजूस एक कपा असल्याचें तिला दिसलें. आपल्या बोटांनीं तिनें तो कपा उघडून आंतून एक पत्राचें फोडलेलें पाकीट बाहेर काढलें. ह्या कप्प्यांत या पत्राशिवाय दुसरें कांहीं नव्हतेंच.

पाकिटावर “ डॉक्टर आनंदराव देशमुख ” असा पत्ता लिहिलेला होता. आंतील पत्र मागाहून फुरसतीनें वाचूं असें म्हणून तिनें तें पाकीट चट्दिशीं आपल्या पोलक्याच्या खिशांत घातलें.

परंतु तिला एकदम कशाची आठवण झाली म्हणून तिनें तें पाकीट पुनः बाहेर काढलें, व पत्त्याचें अक्षर आपल्या डोळ्यांनीं ती निरखून पाहूं लागली. तिची बहीण कमळजा इच्या अक्षरासारखें तें अक्षर आहे असें तिला वाटलें. पण मनाची पक्की खात्री करून घेण्यास या वेळीं सवड नव्हती. कारण तळघरांतून कोणी न पाहतां एकदाची धडपणीं मी कशी बाहेर पडतें असें तिला होऊन गेलें होतें. तें कातड्याचें पाकीट तिनें जेथल्या तेथें ठेवून दिलें. नंतर आणखी कांहीं सांपडतें कीं काय हें पाहण्याकरितां ती दुसऱ्या कप्प्यांत शोधूं लागली. इतक्यांत जिन्यांत आनंदरावांच्या बुटांचा आवाज तिला ऐकूं आला, त्याबरोबर ती दचकली.

पण आनंदराव पायऱ्या उतरतां उतरतां मध्येंच थांबले. दवाखान्यांतील पोऱ्यास कीं कांपाउंडरास कायसें सांगण्याकरितां म्हणून ते उभे राहिले. मोहनेला तितकी आयतीच सवड मिळाली. तिनें त्या पेटींतील सर्व जिन्नस जागच्या जागीं ठेविले, दार झटदिशीं लावून टाकिलें, व कोठें तरी लपून बसण्याजोगी जागा ती चोहोंकडे पाहूं लागली. एका कोंपऱ्यांत एक भलें मोठें पीप तिला दिसलें. तिनें मेणबत्ती मालवून हातांत घेतली, ते दाभणही घेतलें व हळूच पिपाच्या पाठीमागें भिंतीस चिकटून ती निजून राहिली. तिची छाती धडधड करूं लागली. आजन्मांत तिला इतकी भीति वाटली नव्हती.

आनंदरावांनीं आपणास पहावें त्यापेक्षां मरण आलेलें बरें असें तिला वाटलें. कारण चोरटें कर्म करीत असतांना सांपडणें हें तिच्या मानी स्वभावाला अत्यंत दुःसह झालें असतें. वडिलांप्रमाणेंच तिच्याही स्वभावाला असलीं नीच कृत्यें अगदीं पसंत नसत. परंतु केवळ मत्सरग्रस्त झाल्यामुळें व संशयानें तिच्या मनाची स्वस्थता नाहींशी केल्यामुळें ती अशा कृत्याला प्रवृत्त झाली होती. या वेळेसही आपण करतों हें गैर आहे, अगदीं तिरस्करणीय आहे, अतिशय वाईट व नीचपणाचें आहे असें तिला वाटलेंच. तरी मत्सराचें प्राबल्य झाल्यामुळें तिची सदसद्विवेकबुद्धि जागच्या जागीं थिजून गेली होती. तथापि असें कृत्य करीत असतांना सांपडणें म्हणजे आपल्यास अत्यंत कमीपणाची व लांछनाची गोष्ट आहे असें तिच्या मनांत येऊन तिला फार वाईट वाटलें.

आनंदराव हातांत एक मेणबत्तिचें शामदान घेऊन आले. खिशांतील किल्ल्यांचा जुडगा काढून त्यांनीं एक किल्ली त्या लोखंडी पेटीच्या कुलपांत घातली. पण कुलूप बसविलेले नव्हतें असें त्यांना आढळून आलें. त्यावेळेवर—" अर्रर्र, हें काय? भूतचेष्टा तर नव्हे? मी असेंच ठेऊन गेलों, वाटतें. " असें ते आपल्याशींच थोडे मोठ्यानें व थोडे निष्काळजीपणानें म्हणाले.

नंतर त्यांना कांहीं संशय आल्यासारखा दिसला. त्यांनीं वळून सभोंवार न्याहाळून पाहिलें. त्यांच्या बायकोला हा सर्व प्रकार दिसत होता.

आपण त्यांच्या नजरेला पडतों कीं काय असें वाटून ती अगदीं घाबरून गेली. तिच्या जिवांत जीव नाहींसा झाला.

पण मोहनेचें दुर्दैव अद्यापि ओढवलें नव्हतें. पिपाच्या पाठीमागें अंधारांत ती दडून राहिली होती. शिवाय तिच्या अंगावरील लुगडेंही काळेंच असल्यामुळें आनंदरावांच्या डोळ्याला ती दिसली नाहीं. आनंदरावांनीं त्या पेटीचें कुलूप तपासून पाहिलें. तें दुरुस्त असल्याचें त्यांना दिसलें. मग ज्या कामाकरितां ते आले होते तें करण्यास त्यांनीं सुरवात केली. त्यांना औषधांचें एक टिप्पण पाहिजे होतें म्हणून ते शोधूं लागले. इतक्यांत त्यांच्या कांपाउंडराची हाक त्यांना ऐकूं आली म्हणून ते लक्ष्य देऊन ऐकूं लागले:—

" डॉक्टरसाहेब, अहो डॉक्टरसाहेब, दर्याबाईकडून मनुष्य आला आहे तो सांगतो कीं मुलगा फार हैराण आहे, अगदीं मरायला टेंकला आहे."

आनंदराव कळवळून आपल्याशींच ह्मणाले:—" लवकर मरेल तितकें चांगलेंच. बिचारा यातनांतून सुटेल तरी! मीं किती औषधें दिलीं, लेप लावले तरी कांहीं उपयोग होत नाहीं. गुडघ्याची कळ तरी कमी व्हावी पण तेंही नाहीं. मी तरी काय करणार?" नंतर " कोण आलें आहे त्याला सांग मी आलोंच " असें मोठ्यानें कांपाउंडरास ऐकूं जाईल असें ते ह्मणाले.

सर्व जिन्नस जागच्या जागीं तसेच ठेवून आनंदराव गडबडीनें निघून गेले. दर्याबाईकडून आलेल्या माणसाबरोबर थोडें बोलून इतक्यांत आपण परत येऊं असा त्यांचा बेत होता. त्यांच्या पावलांचा आवाज हळू हळू कमी होत जाऊन अखेरीस जेव्हां अजीबात ऐकूं येईनासा झाला तेव्हां मोहना पिपाच्या आडून बाहेर आली व कांहीं आवाज न करितां जिना चढून वर गेली, व इकडे तिकडे न पाहतां नीट बाजू बाजूनें आपल्या खोलींत जाऊन पोंचली. खोलींत जातांच तिनें बिछान्यावर अंग टाकलें. इतकी तिला धाप लागली होती. बऱ्याच वेळानें—म्हणजे सुमारें अर्ध्या तासानें तिची छाती धडधडण्याचें जरा कमी झालें. तेव्हां ती

बिछान्यावर उठून बसली व खिसा चांचपून त्यांतून तिनें कायसें बाहेर काढिलें.

ज्या कपाटाची किल्ली हरवली म्हणून मोहनेनें दाभण आणण्याकरितां आक्कूला पाठविलें होतें त्याच कपाटाची ती किल्ली. इतका वेळ ती मोहनेच्या खिशांतच होती. आक्कूला समजलें असतें तर तिनें काय बरें म्हटलें असतें ? मोहनेनें हलकेंच त्या किल्लीनें कपाट उघडलें व दार तसेंच उघडें ठेवून तिनें ती किल्ली तेथेंच एका पेटीच्या सांदरीला टाकून दिली. सकाळीं खोलींतील झाडलोट करावयाला आक्कू आली कीं तिच्या नजरेला ही किल्ली पडेल अशा बेतानें मोहनेनें ती किल्ली टाकली.

नंतर ती दिव्याजवळ येऊन बसली व तळघरांतून आणलेलें पत्राचें पाकीट खिशांतून काढून ती पत्ता वाचूं लागली. तो वाचून झाल्यानंतर आंतील पत्र बाहेर काढणार इतक्यांत इंदिरा खोलींत येऊन म्हणाली:—" ताई, लीलेला चांगली झोंप लागली आहे. मीही निजावें म्हणते. तुला माझें कांहीं काम लागायाचें नाहीं ना ? "

मोहनाः—" नाहीं, कांहीं काम नाहीं, नीज जा. पण अजून दहा सुध्दां वाजले नाहींत. आज निजायची गडबड दिसते ? "

इंदिराः—" मला फारच दमल्यासारखें वाटत आहे, व डोकेंही थोडें दुखत आहे. आतां लीलेच्या प्रकृतीसंबंधानें वाटत असलेली काळजी थोडी कमी झाली. तेव्हां आठ पंधरा दिवसांचा शीण व त्रास मला भासूं लागला आहे. ताई, तूं नीज, मीही जाऊन निजतेंच. "

मोहनेनेंही झट्दिशीं तिला " जा " म्हटलें. कारण पत्र वाचून पाहण्याची तिला मोठी उत्कंठा लागलेली होती. इंदिरा बाहेर जाते इतक्यांत आनंदराव आले. अर्थातच चोरून आणलेलें पत्र पुनः खिशांत चुरमडून घालणें तिला भाग पडलें.

आनंदराव अगदीं दमून गेले होते. कारण आज सर्व दिवसभर त्यांना विश्रांति म्हणून नव्हतीच; पुनः रात्रीं जेवण झाल्यावर त्यांना कोठलेंसें बोलावणें आलें होतें. तिकडून परत येऊन ते औषधांचें टिप्पण पाहण्याकरितां म्हणून तळघरांत गेले होते, तेथें दर्याबाईकडून आणखी

मनुष्य आल्याचें समजलें म्हणून ते पुनः त्या मुलाला पाहण्याकरितां बाहेर पडले होते. तिकडून ते आतां परत आले होते. याप्रमाणें त्यांची सारखी धांवपळ चालली असल्यामुळें त्यांना फारच थकवा आला होता. त्यांनीं मोहनेला विचारिलें:—" आज तुला कसें काय वाटत आहे ? "

" रोजच्यापेक्षां आज जरा बरें आहे. " असें तिनें उत्तर दिलें. त्यांच्या एकपत्नीत्वाबद्दल तिच्या मनांत संशय उत्पन्न झाल्यापासून ती त्यांच्याशीं अलीकडे तुसडेपणानें वागत असे. पण नुकतेंच तिनें जें कपट-वर्तन केलें होतें तें लपविण्याकरितां ती आज त्यांच्याबरोबर प्रेमानें व लडिवाळपणानें बोलूं लागली:—" आज फारच दमल्यासारखे दिसतां. "

आनंदराव:—" दमलों इतकेंच नव्हे तर अगदीं थकून गेलों आहे. आज माझ्या रोग्यांनीं माझी चांगलीच फजीती केली. पायाला खळ नाहींसा झाला. त्यांत घोडा आजारी ! सगळेंच जुळलें आणि काय ! "

मोहना:—" इतका थकवा आला आहे, तेव्हां म्हटलें थोडा चहा घेतला तर ! तितकें हें वाटेल ! "

आनंदराव:—" तसेंच करणार आहें. मी खालीं जातों आतां. तूं निजत नाहींस का ? "

मोहना त्रासून ह्मणाली:—" मेलें निजायचें तरी किती ! निजून निजून कंटाळा आला आहे. निजेन आतां ! "

आनंदराव विनोदानें हांसून म्हणाले:—" तुला कांहीं काम नाहीं, ह्मणून तूं कंटाळलीस आणि मला काम फार पडतें ह्मणून मी कंटाळलों. मला वाटतें आह्मां दोघांनाही थोडासा पालट पाहिजे आहे. लवकरच कुठें तरी दुसरीकडे रहावयास जाण्याचा माझा विचार आहे. "

आनंदराव थोडा वेळ तेथें बसून नंतर खालीं गेले. मोहनेनें तें पत्र पुनः खिशांतून बाहेर काढिलें व दारास आंतून कडी लावून घेऊन ती दिव्याजवळ जाऊन बसली व आपल्याशींच पुटपुटली:—" आतां तरी स्वस्थपणानें वाचावयास मिळेल कीं नाहीं ? "

तिनें तें पत्र स्वस्थपणानें वाचलें खरें. पण मग मात्र तिच्या मनाचा स्वस्थपणा नाहींसा झाला. पत्रांतील मजकूर वाचतांच तिच्या अंतःकर-

णामध्यें वेदना सुरू झाल्या. तिनें तें पत्र उलटेंसुलटें केलें, पुनः पुनः वाचलें, पत्ता नीट लक्षांत ठेविला. आंतील अक्षर व पत्त्याचें अक्षर सारखेंच आहे अशाबद्दल तिनें आपली खात्री करून घेतली. सही तर कमळजेचीच होती, याबद्दल प्रश्नच नव्हता.

तिनें नंतर असें अनुमान काढलें कीं, जरी पाकिटावर पत्ता आपल्या यजमानांचा—आनंदरावांचा—आहे, तरी आंतील पत्र त्यांना लिहिलेलें नसून, कलावंत या नांवाच्या गृहस्थालाच लिहिलेलें आहे व त्या कलावंताबरोबरच कमळजेचें लग्न झालें असलें पाहिजे.





# प्रकरण ११ वें.

—:o:—

## इंदिरेचें स्वप्न.





मोहना तें पत्र घेऊन तशीच इंदिरेच्या खोलींत गेली. तिला पाहून इंदिरेला आश्चर्य वाटलें. ती नुकतीच तिच्याकडे जाऊन आली होती, तेव्हां मी आतां निजते, तूंही नीज जा, असें मोहनेस सांगून ती आली होती. म्हणून निजावयाचें सोडून ती कां आली असें साहजिकच इंदिरेला वाटलें. मोहनेनें आल्याबरोबर इंदिरेला म्हटलें:—" कमळजेच्या लग्नाबद्दल तूं जो तर्क काढलास तो बरोबर आहे. तिनें लग्न करून घेतलें हें खास. " इंदिरा म्हणाली:—" हें तूं कशावरून म्हणतेस ? आनंदरावांना विचारलेंस कीं काय? " तेव्हां मोहनेनें सर्व हकीकत सांगितली:—"आमच्या घरीं एक तळघर आहे. तिथें एक लोखंडी पेटी आहे. त्या पेटीमधें एका पाकिटांत कागदपत्र असें सटरफटर कांहीं आहे. कसले कागद आहेत हें पहात असतां त्यांत एक पत्र मला सांपडलें. तें पत्र कमळजेनें आपल्या नवऱ्याला लिहिलेलें आहे. तूं म्हणतेस त्याप्रमाणें 'कलावंत' नांवाच्या गृहस्थाबरोबर तिचें लग्न झालें असावें. त्या पत्रावरून ती ह्या गांवांत आली होती; तिला इकडूनच औषध देणें होत होतें असें दिसतें. यावरून सारजा म्हणते त्याप्रमाणें तिची बहीण ज्या घरांत राहते त्याच घरांत ती उतरली होती असें वाटतें. कारण त्या पत्रावर पेठेंतल्या

घराचाच पत्ता लिहिलेला आहे. तुला दाखवूं तें पत्र ?" असें ह्मणून मोहनेनें तें पत्र इंदिरेच्या हातांत दिलें. इंदिरा तें वाचूं लागली:—

"मु० दत्तापूर, बाजार पेठ, घर नंबर १३

"ता० १० मार्च सन—इ. रोज शुक्रवार.

"प्रियकर प्राणनाथांचे सेवेशीं विज्ञापना विशेष. मी ह्या गांवांत आतां अशीच सुखरूप येऊन पोंचलें. आपणास थोडें आश्चर्य वाटेल व रागही येईल हें मी जाणून आहें पण माझा नाइलाज झाला. उभयतांची गांठ पडली म्हणजे सर्व खुलासा होईल. येथें आल्याबरोबर मीं डाक्टरांचा तपास केला. विश्रामबंधूंची लोकांनीं बरीच शिफारस केली. पण मी म्हटलें आनंदराव डॉक्टरचें औषध घेणार. आपलें मत काय आहे तें समजावें. त्यांनीं आज संध्याकाळींच येऊन माझी प्रकृति पहावी अशी चिठी त्यांना पाठविणें मला जरूर वाटत आहे. कारण गाडीच्या हादऱ्यानें माझें अंग फार ठणकत आहे व मला कसेंसेंच वाटत आहे. ह्मणून ते लवकर येतील अशी माझी खात्री आहे.

"प्राणप्रिया, माझें बाळंतपण परमुलखांत, आपणापासून लांब अशा ठिकाणीं व्हावें असें आपलें म्हणणें होतें, पण तें मला वाजवी वाटलें नाहीं. माझी नीट व्यवस्था होणार नाहीं, परठिकाणीं माझे हाल होतील असें वाटलें ह्मणून आपलें म्हणणें बाजूस ठेवून मी येथें आलें. नीटपणें एकदाची सुटका झाली म्हणजे पुनः मी परत जाईन हवी तर. मग आमच्या लग्नाची गोष्ट जाहीर करण्यास अनुकूल अशी स्थिति नसली तरी कांहीं हरकत नाहीं. कारण मी माझें खरें नांव अद्यापि कोणास कळविलेलें नाहीं. आपण व इतर आपली स्नेही मंडळी मला गमतीनें ज्या नांवानें हाक मारीत होतां त्याच नांवानें माझी येथें चौकशी करावी.

"आतां अगदीं उशीर न लावतां तावडतोब अर्ध्या तासाच्या आंत निघून यावें. मला फार चमत्कारिक वाटूं लागलें आहे.

"बहुत काय लिहिणें श्रुत होय ही विज्ञापना.

"आपली सदैव लाडकी भार्या

"कमळजा."

इंदिरेचें पत्र वाचून संपतांच "ह्या पत्रांतील आरंभाच्या मजकुरासंबंधानें मीं मागें ऐकलें आहे." असे शब्द सारजेच्या अगदीं ओंठावर आले होते, पण तिला काय वाटलें कोणास ठाऊक, तिनें तितक्यांत आवरलें. पत्र वाचून झाल्यावर त्यांतील मजकुरासंबंधानें इंदिरा मनन करूं लागली. नंतर तिनें पाकिटावरील पत्ता पाहिला तर तो आनंदरावांचा. तेव्हां ती बुचकळ्यांत पडली. तिची समजूत घालण्याकरितां मोहना म्हणालीः—"आक्का, कमळजेनें कलावंताशींच लग्न केलें यांत शंका नाहीं. आतां पाकिटावर इकडचा पत्ता आहे, पण कलावंताचा व इकडचा घरोबा असल्यानें पाकिटाची व आंतील पत्राची अदलाबदल झालेली असावी. हें पत्र त्या पाकिटांत व तें पत्र ह्या पाकिटांत असें कांहीं तरी झालें आहे. सारजाही ह्मणतेंच कीं, आपल्या बहिणीच्या घरीं कलावंत मागें येत असत ह्मणून. झालें, जुळलेंच सगळें. त्या घराचा नंबर तेराच ना?" हा शेवटचा प्रश्न तिनें सारजेला केला. पण "त्या घराचा नंबर चवदा आहे" असें सारजेनें उत्तर दिलें. त्यावर मोहना ह्मणालीः—"तेरा काय नि चवदा काय? पर ठिकाणीं घराच्या नंबरांत अशा चुका होतातच." पण इंदिरेची समजूत पडेना. ती ह्मणालीः—"ह्या पत्रावरून तिचा नवरा या गांवांत येऊन राहिला होता असें निष्पन्न होतें. पण सारजा आपल्या बहिणीच्या यजमानणीला विचारून आली. ती म्हणते कीं, कलावंत येथें कधींच राहिले नाहींत; कधीं तरी भेटायला ह्मणून येत असत. त्यांचें लग्नही होऊन बरींच वर्षें झालीं होतीं ह्मणे. शिवाय त्या वर्षीं फेब्रुवारी महिन्यांतच ते आपल्या नोकरीवर रुजू होण्याकरितां काठेवाडाकडे कीं कलकत्त्याकडे गेले आणि हें पत्र तर मार्च महिन्यांत लिहिलेलें आहे. सगळाच मेला घोंटाळा!" आणि खरोखरच हें पत्र वाचून इंदिरेला मोठाच घोंटाळा पडला. थोडा विचार करून ती मोहनेला ह्मणालीः—"ताई, माझ्यानें आतां धीर धरवत नाहीं. मी जाऊन आनंदरावांना विचारतेंच. यापूर्वींच विचारायला पाहिजे होतें. एकदां सोक्षमोक्ष काय तो कळेल तरी." असें ह्मणून इंदिरा उठलीच.

आनंदराव चहा पिऊन एका आराम खुर्चीवर पडून चैनींत विडीचा

धूर सोडीत होते. थंडी फार पडली होती ह्मणून जवळच रसरसलेल्या कोळशांची शेगडी उबेकरितां आणून ठेविली होती. आनंदराव नेहमीं ह्मणत कीं आपणास विडी ओढण्याचें कांहीं व्यसन नाहीं. परंतु एखादे दिवशीं जर विडी ओढण्यास मिळाली नाहीं तर त्यांना कसेसेंच वाटे. आजही सर्व दिवसभर फार काम असल्यामुळें स्वस्थपणानें विडी ओढण्याला त्यांना फुरसत मिळाली नव्हती. ह्मणून रात्रीं तरी मनमुराद ओढावयाला सांपडेल असें समजून ते या वेळीं आराम खुर्चीवर धूम्रपान करीत चैनीनें पडले होते. इंदिरेला पहातांच त्यांनीं तोंडांतील विडी फेंकून दिली व चट्दिशीं उठून "आतां रात्रीं खालीं कां फेरी झाली ?" असें त्यांनीं विचारिलें.

इंदिरेनें उत्तर दिलें:—"मला कांहीं माहिती पाहिजे आहे व ती आपल्याकडून मिळेल असें मला वाटतें. ही माहिती मिळविण्याबद्दल मी फारच उत्सुक झालें आहें. कांहीं वर्षांपूर्वीं मुंबईमध्यें गिरगांवांत मथुराशेटजीच्या घरच्या माणसांची व आपली चांगली ओळख होती, नाहीं ? तिथें माझी बहीण होती. तिनें कुणाबरोबर लग्न करून घेतलें तेवढें येईल का आपणाला सांगायला ?"

या वेळच्या आनंदरावांच्या चेहऱ्याचें वर्णन योग्य रीतीनें करण्यास कोणतीच लेखणी समर्थ होणार नाहीं. त्यांची अगदीं घांदल उडून गेली. एकतर मथुरा शेटजींच्या घराण्याची माहिती असल्याचा आरोप आला. व दुसरें असें कीं इंदिरेनें आपल्या बहिणीसंबंधानें माहिती विचारिली. त्यांची मुद्रा कावरीबावरी झाली. त्यांनीं शेवटीं उत्तर दिलें:—"यासंबंधानें मला कांहींच माहिती नाहीं."

इंदिरा:—"आनंदराव, मला वाटतें कीं आपणाला थोडी तरी माहिती सांगतां येईल. कदाचित् माझें ह्मणणें आपणाला नीट समजलें नसेल. आपली व शेटजींच्या बंधूंची तर चांगली ओळख होती ?"

आनंदराव थोडें थांबून ह्मणाले:—"ओळख होती पण फारशी नाहीं. सहजासहजीं झालेली तोंडओळखच ह्मणावयाची. ते आपल्या नोकरीवर रुजू झाले व पुढें लवकरच तिकडे वारले."

इंदिरा:—" फारशी नाहीं कशी ? आपण त्यांच्याकडे नेहमीं जात होतां असें शेटजीणबाईच ह्मणत होत्या. बाईच्या चुलत बहिणीची व आपलीही चांगली ओळख होती. आणखीही कलावंत ह्मणून कोणसे आपले स्नेही तिथें येत असत. माझी बहीणही तिथेंच रहात होती. आह्मांला असा संशय येतो कीं माझ्या बहिणीनें त्या कलावंताशीं लग्न करून घेतलें असावें. ही गोष्ट आपणांला माहीत आहे काय ?"

आनंदरावांना अजून कांहींच समज पडत नाहींसें दिसलें. ते ह्मणाले:—" आक्कासाहेब, तुह्मी काय ह्मणतां हेंच मला नीट समजलें नाहीं. शेटजींच्या घरीं तुमची बहीण होती ? नांव काय तिचें ? कुठली बहीण ही ?"

इंदिरा:—" बरें, आपण कमलाबाईला तरी पाहिलें आहे ?"

आनंदराव एकदम शेगडीजवळ गेले व हातांत लोखंडी सळई घेऊन निखारे वरखालीं करूं लागले. " बरें मग " असें शेवटीं त्यांनीं विचारलें.

इंदिरा:—" मग काय ? कमलाबाईसंबंधानेंच माझें बोलणें आहे. तीच माझी बहीण."

आनंदरावांच्या हातांत सळई तशीच होती. ते चटकन् वळून ह्मणाले:—" कमळाबाई तुमची बहिण ! आक्कासाहेब, तुह्मीं माझी थट्टाच आरंभिली असें वाटतें. मेहुणीचें नातेंच आहे खरें."

इंदिरा दुःखानें बोलली:—" थट्टा नव्हे हो, खरोखरीच मास्तरिणीची नोकरी धरण्याकरितां ती घरांतून बाहेर पडली व आपलें खरें नांव बदलून तिनें दुसरें धारण केलें. तिचें खरें नांव कमळजा पण मागाहून ती आपणास कमळाबाई ह्मणवून घेऊं लागली."

आनंदरावांच्या चेहऱ्यांत विलक्षण फरक पडला. पण इंदिरेच्या समोरून त्यांनीं आपलें तोंड बाजूस फिरविलें. इंदिरा पुढें ह्मणाली:—"कमळजेचें लग्न झाल्याचें समजलें तेव्हां आह्मांला वाटलें कीं कलावंताशींच तिचें लग्न झालें असावें. बरें मी विचारतें. माझी बहीण या गांवांत आली होती तेव्हां तिनें कोणतें नांव धारण केलें होतें ? एवढें तरी आपणांला सांगतां आलेंच पाहिजे."

आनंदरावः—"ती ह्या गांवांत कधीं आलीच नाहीं. निदान मला तरी कांहीं माहीत नाहीं."

इंदिराः—"आनंदराव! ती या गांवांत आली होती, व ही गोष्ट आपणांला माहीत असलीच पाहिजे. ती इथें आली त्याच दिवशीं तिनें औषध देण्याकरितां आपणांला बोलावलें होतें. पेठेंतील त्या तेरा नंबरच्या घरांत उतरली होती. होय ना?"

आनंदरावांच्या हातांतील सळई एकाएकीं खालीं जमिनीवर पडली. अकस्मात् पडली कीं त्यांचे हात कांपू लागले ह्मणून पडली? ती उचलून घेण्याकरितां आनंदराव खालीं वांकले त्या वेळीं त्यांचा चेहरा सहज विस्तवाच्या प्रकाशांत इंदिरेच्या नजरेस पडला. चेहरा अगदीं निस्तेज, काळवंडलेला असा दिसला. इंदिरा फसली तर नसेल ना? त्यांनीं ती सळई उचलून घेतली व नंतर इंदिरेकडे वळून शांतपणानें ते ह्मणाले:— "मला तुमच्या त्या बहिणीसंबंधानें बिलकुल माहिती नाहीं. ती काळी का गोरी हें सुद्धां ठाऊक नाहीं. मला तिची माहिती आहे असें तुह्मांला कां वाटतें? तुह्मी मलाच कां विचारतां?"

ह्या प्रश्नाचें उत्तर इंदिरेला देतां येईना. कारण मोहनेनें जें पत्र तिला दाखविलें त्या पत्रासंबंधीं आनंदरावांजवळ आपण अगदीं बोलणार नाहीं असें त्याच वेळीं इंदिरेनें मोहनेजवळ कबूल केलें होतें.

इंदिराः—"त्या वेळीं माझी बहीण या गांवांत—गिरजाबाई—आमच्या सारजाबाईची बहीण—राहते त्या घरांत येऊन उतरली. तेव्हां आपण तिला औषध द्यायला जात होतां असें मानण्याला कारणें आहेत. त्या वेळीं तिनें कोणतें नांव धारण केलें होतें एवढेंच मला समजायला पाहिजे आहे." आनंदरावांची मुद्रा पुनः आश्चर्यपूर्ण दिसूं लागली. त्यांच्या लक्ष्यांत कांहींच येईना असें दिसूं लागलें. ते म्हणाले:—"आक्कासाहेब, मी शपथपूर्वक सांगतों कीं तुह्मी मला ज्या गोष्टी विचारीत आहां त्याबद्दलची मला मुळींच माहिती नाहीं. मी त्या गिरजाबाईच्या घरीं आजन्मांत कधीं गेलों नाहीं. विश्वासरावांचें तिकडे जाणें येणें असतें."

इंदिराः—" पण कमळजेला ते विश्वासराव डाक्तर नको होते. तिनें तुह्मांलाच पसंत केलें होतें. ज्या घरांत ती उतरली तिथेंच ती बाळंत झाली नव्हे काय ?"

आनंदराव कपाळावरून एकदां हात फिरवून म्हणालेः—" तुमची काय गैरसमजूत झाली आहे कळत नाहीं. तुह्मी कोठें तरी चुकतां आहां खास. तुमच्या बहिणीची, किंवा ती येथें आल्याची, अगर तिच्या बाळंतपणाची मला यत्किंचितही माहिती नाहीं. त्या गिरजाबाईची सुद्धां मला कांहीं माहिती नाहीं."

इंदिराः—" बरें, शेटजींच्या घरीं कमळाबाई नांवाची एक मास्तरीण होती ती तरी आहे का माहीत ?"

आनंदरावः—" होय. तेवढें आठवतें. त्या नांवाची एक बाई मास्तरीण होती खरी. आतां आलें ध्यानांत. किती वर्षें झालीं त्या गोष्टीला ! ती का तुमची बहीण ? आक्कासाहेब, तुमची कांहीं तरी चूक होते आहे."

इंदिराः—" आनंदराव, चूक नाहीं. खरोखरच ती आमची बहीण हो. ताईनें ही गोष्ट आपणाजवळ कधींच काढली नाहीं वाटतें. नसेल कदाचित्. तरी पण आज इतकीं वर्षें आह्मी तिचा सारखा तपास करीत आहोंत."

आनंदरावः—" माझ्याजवळ तिनें ही गोष्ट न सांगण्याचें कारण ?"

इंदिराः—" कारण कसलें ? अभिमान, दुसरें काय ? प्रथम तिनें सांगितलें नसेल. मग नंतरही सांगू नये असें तिला वाटलें असेल. पण आपणाला कांहींच कां सांगतां येत नाहीं ? एवढीच माहिती पाहिजे आहे. आठवण होत असेल तर पहा." आनंदरावांना त्रास आल्यासारखें दिसलें:—" आक्कासाहेब, मला कांहींच सांगतां येत नाहीं. कमळाबाई शेटजींच्या मुलीची मास्तरीण, माझी नव्हे. मला फक्त एवढेंच सांगतां येते कीं कलावंताबरोबर जर तिचें लग्न झालें असेल तर मला त्यांतली कांहींच माहिती नाहीं. माझ्या समजुतीनें तरी कलावंताचें त्यापूर्वींच पुष्कळ दिवस लग्न झालेलें होतें. मी या गांवांत आल्यानंतर त्या मंडळीपैकीं माझी व कोणाचीच गांठ नाहीं."

इंदिराः—“ परंतु आपणाला कांहीं तरी सांगतां यावें. गिरजाबाईच्या घरीं जाऊन आपण तिला औषध दिलें नाहीं काय ? आपणाला बोलावणें तरी आलें होतें खरें ? ”

आनंदरावः—“ तुह्मांला असें वाटायला काय कारण आहे ? मला कोणीं बोलावलें होतें ? ”

इंदिरेच्या तोंडाला पुनः खीळ पडली. नुकत्याच वाचलेल्या पत्रासंबंधानें तिला कांहीं बोलतां येईना. ती बोलत नाहीं असें पाहून आनंदराव म्हणाले:—“ आक्कासाहेब, आतां उत्तर द्यावयाचें म्हणजे इतका वेळ मीं जें सांगितलें त्याचीच पुनरावृत्ति करावयाची. पुनः सांगतों कीं जन्मादारभ्य मीं त्या गिरजाबाईच्या घरांत पाऊल ठेवलें नाहीं कीं तेथें कोणास औषध दिलें नाहीं; व मला त्या घरीं कोणीं बोलावूनही नेलें नाहीं. ”

इंदिराः—“ तर मग आपल्याच्यानें कांहींच सांगवत नाहीं ? ”

आनंदरावः—“ नाहीं, खरेंच नाहीं. मला कांहींच माहिती नाहीं. ”

इंदिरा जावयास निघाली पण तिच्या मनाचें समाधान झालें नाहीं, ह्मणून—“ आनंदराव, तुह्मी राग येऊं देऊं नका. मला आपलें वाटतें कीं तुमच्या मनांत असतें तर तुह्मीं मला जास्त सांगितलें असतें. कसेंही असो, माझी बहीण हल्लीं जिवंत असो कीं मेलेली असो, तिचा तपास मला लावलाच पाहिजे. अलीकडे माझ्या मनांत एक विलक्षण कल्पना येत आहे कीं, दर्याबाई ज्या मुलाला घेऊन आल्या आहेत तो मुलगा कमळजेचा आहे. माझ्याकडून मी तपास करीतच आहें. आपणाकडूनही शक्य तितकी मदत मिळावी अशी माझी इच्छा आहे. ” इतकें बोलून इंदिरा निघून गेली. नकारदर्शक अशी आनंदरावांनीं आपली मान हालवून तिला निरोप दिला.

इंदिरा आपल्या खोलींत गेली. तेथें मोहना तिची वाट पहात बसलेली होतीच. तिनें विचारिलें:—“ आक्का, झालें एकदां विचारून ? काय सांगितलें ? ”

इंदिराः—“एकतर आनंदरावांना कांहीं माहिती तरी नसावी, अगर ते मुद्दाम सांगत तरी नसावेत. दुसरेंच बहुधा खरें असावें. ”

मोहनाः—“ म्हणजे ? आमच्या कमळजेची नि तिकडची ओळख आहे ? कांहीं तरीच ! ”

इंदिराः—“ कमळाबाई म्हणून त्यांना माहीत आहे. कमळजा नाहीं. मला वाटतें, ते येथपर्यंत खरें बोलले. ही आमची बहीण होती ही गोष्ट त्यांना खरी वाटत नाहीं. ते म्हणतात कीं आपण आजन्मांत गिरजाबाई रहाते त्या घरीं गेलों नाहीं. ताई, माझ्या मनांत त्यांना हें पत्र दाखवून काय म्हणतात तें पहायचें होतें. ”

मोहनाः—“ छे छे ! तसें मात्र व्हायचें नाहीं. हें पत्र मीं त्यांच्या अगदीं गुप्त ठिकाणांतून काढून आणलें आहे. ” असें म्हणून मोहना हासूं लागली.

इंदिराः—“ ताई, अशा वेळीं तुला कसें हांसूं येतें कोण जाणे ? मला वाटत आहे कीं कांहीं तरी गुप्त प्रकार अगदीं उघडकीस येणार होता. ”

मोहनाः—“ तो कोणता ? ”

इंदिराः—“ कोणता हें मी कसें सांगूं ? पण सांगावें असें वाटतेंच. ताई, तूंच पहा; सारजाबाई, तूंही ऐक; हा सर्व सरळ व बिनभानगडीचा प्रकार होता तर मी प्रश्न विचारूं लागलें तेव्हां आनंदरावांची इतकी चलबिचल झाली ती कां ? उत्तरें देण्याचें त्यांनीं कां टाळलें ? माझ्या प्रश्नामुळें ते अस्वस्थ झाले यांत मुळींच शंका नाहीं. ताई, माझ्या मनांत तर असा भयंकर संशय येतो कीं त्या चांडाळचौकडीनें, शेटजीच्या बंधूकडे जी चंगीभंगी मंडळी येत त्या मंडळींनीं, कमळजेला भुलथाप देऊन, अखेर तिला फसवून, तिच्या कुळशीलाला कमीपणा आणणारें असें लग्न करायला लावलें—आणि हा त्यांचा बेत आनंदरावांना पूर्णपणें माहीत होता ! ”

मोहना तिरस्कारपूर्वक म्हणाली:—“ आक्का, तुला असें वाटतें काय कीं असलें नीचपणाचें व दुष्टपणाचें कृत्य करून आपल्या आब्रूला काळोखी आणण्याजोगा तिकडचा स्वभाव आहे ? तिकडच्या अंगांत दोष असतील; नाहींत असें मी म्हणत नाहीं. तरी पण अशा वाईट कामांत कधींच कोणी पडणार नाहीं हें तूं पक्कें समज. ”

इंदिराः—" पण हेंही ध्यानांत ठेव कीं कमळजा तिथें अगदीं एकटी; जवळ पैसा नाहीं, आप्त–इष्ट कोणी नाहींत; त्यांतून मास्तरिणीची नोकरी धरलेली. या चांडाळचौकडीला काय ? असल्या निराश्रित मुलीशीं वाटेल तसें वागण्याची आपणास पूर्ण मुभा आहे,—नव्हे, वागण्याचा पूर्ण अधिकार पोंचतो, असेंच वाटत असतें. तें कांहीं असो ह्मणा, त्या मंडळीपैकींच कोणीं तरी–त्यांतल्या त्यांत कलावंतानें कमळजेचा घात केला असावा व ही गोष्ट आनंदरावांना माहीत असून ते ती छपवून ठेवीत आहेत असें मला वाटतें. मला जें भयंकर स्वप्न पडलें त्यांत हा सर्व प्रकार दिसला. त्या दुष्ट कृत्यांत आनंदरावांचें अंग आहे,असें मला स्वप्नांत दिसलें."

"आक्का, तें स्वप्न तरी एकदां सांग. ऐकूं तर खरी." असें मोहना उत्सुकतेनें ह्मणाली. एरव्ही स्वप्नाचीच नव्हे तर ज्यांना स्वप्न पडलें त्यांची सुद्धां पुरी टर व फटफजीती उडविण्यांत ती बिलकुल कसूर करीत नसे; तरी आजच्या रात्रीची वेळ व इंदिरेच्या मनांत वाटत असलेली भीति यांचा परिणाम मोहनेच्या मनावर झाला. इंदिरेनेंही स्वप्न सांगण्यास एकदम सुरवात केली. हें जरा चमत्कारिकच ह्मणावयाचें. सारजा लांब उभी होती, पण तिलाही ऐकावेंसें वाटलें व ती जवळ येऊन उभी राहिली.

स्वप्न सांगावयाला सुरवात करितांच इंदिरेच्या अंगावर शहारे आले. ती ह्मणालीः—" बरें का, ताई, त्या दिवशीं सोमवार होता. रात्रीं आवशीची गोष्ट. मार्च महिन्याची तेरा तारीख होती. मला पक्कें आठवतें. त्या दिवशीं संध्याकाळपासूनच माझें कपाळ दुखत होतें ह्मणून जेवण न करतां नुसता चहाच घेऊन मी निजलें. त्या वेळीं रात्रीचे नऊ साडेनऊ वाजले असतील. थोडक्याच वेळांत माझा डोळा लागला व स्वप्न पडलें. स्वप्नांत कमळजा माझ्या शेजारीं येऊन उभी राहिली. पांढरें पातळ तिनें नेसलें होतें, कुंकवाचा मळवट भरला होता व केंस मोकळे सोडलेले होते. ताई, लक्ष्य आहे ना ? मला बरें वाटत नाहीं, मी अंथरुणावर निजलें आहें, मला झोंप लागली आहे हें सर्व मला स्वप्नांत आठवत होतें. कमळजा माझ्याजवळ येऊन उभी राहिली तेव्हां मी जागी झालें. स्वप्नांतच—पण तिचा तो विचित्र–सवाष्ण स्त्री मेल्यानंतर असतो तसा—वेष पाहून मी मुळीं देखील

भ्यालें नाहीं. मीं तिला विचारलें:—" तूं इथें कां आलीस ?" ती ह्मणाली:—" मी निघून गेलें हें तुला कळविण्याकरितां आलें." असें ह्मणून तिनें आपल्या तोंडाकडे व नेसलेल्या वस्त्राकडे बोट दाखविलें. पण ती मेली असें मी समजलें नाहीं, निदान जागी झाल्यावर तरी मला तसें वाटल्याचें आठवलें नाहीं. ती कुठें तरी दूरदेशीं प्रवासास गेली एवढीच माझी कल्पना झाली. मीं तिला म्हटलें:—" तूं आम्हांला न सांगतांच कां गेलीस ?" तेव्हां ती ह्मणाली:—" मला त्यांनीं सांगू दिलें नाहीं. त्यांनीं फार गडबड केली." "कोणीं?" असें मी म्हटलें. तेव्हां तिनें आपला फटफटीत चेहरा वळवून खोलीच्या दाराकडे पाहिलें. त्या वेळीं ताई, मला जो दचका बसला व जी भीति वाटली ती सांगतां येत नाहीं. " इकडे ये तुला दाखवितें " असें कमळजा म्हणाली व दरवाजाकडे सरकूं लागली. मीही अंथरुणावरून उठून—स्वप्नांतच हं—तिच्या मागून गेलें; नाहीं म्हणण्याचा मला धीरच होईना. तिचें तें प्रेतासारखें तोंड व ताठलेले डोळे पाहून माझी बाई पाचांवर धारण बसली. ती मागें वळून मला खूण करूं लागली. मीं दरवाजापलीकडे पाहिलें तेव्हां मला जें भय वाटलें तें कांहीं पुसूं नकोस. मी अगदीं घाबरून गेलें. मला वाटलें कमळजा माझ्यापुढें गेली. ती जशी मला माझ्या इच्छेविरुद्ध नेत होती, तसेंच तिलाही कोणी तरी जबरीनें ओढून नेत होता. त्याच्या हुकुमाप्रमाणें ती निघून गेली. ताई, बरें कां सारजाबाई, हें सर्व पाहण्यापेक्षां मी मेलेली पुरवलें असें मला वाटलें. परंतु इतकें झालें तरी नाहीं म्हणण्याची मला छाती होईना. दरवाजाबाहेर तिची वाट बघत तो उभा होता—"

सारजा अतिशय घाबरून गेली व तिचा चेहरा गोरामोरा झाला. हें पाहून मोहनाही फार भ्याली. इंदिरेनें सारजेकडे पाहिलें तेव्हां सारजा म्हणाली:—" कांहीं नाहीं, आक्कासाहेब, माझ्या प्रकृतीला थोडें बरें नाहीं. त्यांत असलीं भयंकर स्वप्नें ऐकलीं कीं मला भारी भय वाटूं लागतें."

इंदिरा पुढें म्हणाली:—" ज्यानें तिला आह्मांस सांगूं दिलें नाहीं व ज्यानें तिला फार घाई केली तो गृहस्थ तिची वाट पहात बाहेर उभा होता. ताई, तो कोण समजलें ? आनंदराव. ते डोळे वटारून तिच्याकडे पहात

होते व एका लांबच्या,. अगदीं काळाकुट्ट अंधार असलेल्या जागेकडे जाण्याविषयीं तिला खुणावीत होते. झालें. याच्यापुढें मला कांहीं आठवत नाहीं. मी दचकून जागी झालें. अंगाला दरदरून घाम सुटला; छाती धडधडूं लागली; तरी पण मी ओरडलें नाहीं. कारण बाबा फार आजारी होते, त्याना त्रास होईल ह्मणून मी ओरडलें नाहीं. डोक्यावरून पांघरूण घट्ट गुरगुटून घेऊन मी तशीच अंथरुणावर पडलें. अर्धा पाऊणतासपर्यंत डोळे उघडून पहाण्याचा मला धीरच होईना."

"आक्का, स्वप्न चमत्कारिक खरें. पण यांत कांहीं अर्थ दिसत नाहीं." असें मोहना जरा विचार करून म्हणाली.

इंदिराः—"मी सुद्धां असेंच म्हणत होतें. कमळजा कुठें मुंबईत होती, आणि आनंदराव या दत्तापूर गांवांत. त्याच दिवशीं संध्याकाळीं रात्रीं आठ वाजण्याच्या सुमाराला ते आमच्या घरीं येऊन बाबांजवळ बसले होते. मला स्वप्न पडलें तें दहा वाजण्यापूर्वीं. कारण जागी झाल्यावर मीं दहाचे ठोके ऐकले. आनंदराव मला पूर्वीं आवडत नव्हतेच. कां ह्मणून विचारलें तर मात्र सांगतां येणार नाहीं. आवडनिवड ही नुसती मनावर अवलंबून आहे—आणि त्या स्वप्नापासून तर ते मला अगदींच नकोसे झाले. त्या दिवसापासून मला आपली त्यांची भीति वाटते. विनाकारण, असें तूं म्हणशील. ह्मण बापडी. दुसऱ्या कुणाबरोबरही तूं लग्न केलें असतेंस तरी बरें झालें असतें, असें मला वाटतें. त्या स्वप्नांत कांहीं तरी अर्थ आहे असें आतां मला वाटूं लागलें आहे; कारण कमळजा या गांवांत आली असली पाहिजे; तिचें तें पत्र दहा तारखेचें म्हणजे स्वप्नाच्या मागच्या शुक्रवारचें आहे."

मोहनाः—"आक्का, तूं खुळी तर नाहींस? अग बोलूनचालून स्वप्न तें. त्यांत अर्थ कसला नि काय कसलें?"

इंदिराः—"माझा तर्क नीट चालत नाहीं. त्या चांडाळचौकडीनें आमच्या कमळजेवर घोर प्रसंग आणला, व त्यांत आनंदरावांचें अंग आहे इतकीच माझी कल्पना होते."

पण मोहनेला ही कल्पना मान्य होईना. ती इंदिरेची थट्टा करूं लागली.

" भोळी रे भोळी " असें ह्मणून तिनें तिची अगदीं टर उडविली व " संभाळ हो, नाहीं तर आज आणखी एखादें स्वप्न पडेल, " असें हांसत हांसत बोलून ती निजावयाकरितां आपल्या खोलीकडे निघून गेली. पण इंदिरेला स्वस्थता वाटेना. ती शेवटीं ह्मणाली:—" उद्यां सकाळीं उठल्याबरोबर मी स्वतःच त्या गिरजाबाईच्या घरीं जातें. "

" जाऊन कांहीं उपयोग होणार नाहीं. आपल्या पहाण्यांत हा जिन्नस कधीं आला आहे काय ? " असें ह्मणून सारजेनें आपल्या पदराखालून मोत्यांचें मंगळसूत्र काढून इंदिरेला दाखविलें.

इंदिरेनें पाहिल्याबरोबर कमळजेचें हें मंगळसूत्र असें ओळखलें. नंतर हें तुझ्याजवळ कसें आलें तें सांग असें ती सारजेला ह्मणाली. तेव्हां सारजेनें उत्तर दिलें:—" आक्कासाहेब, ती हकीकत फारच भयंकर व दुःखदायक आहे. ती ऐकून आपल्याला बरें वाटणार नाहीं. "

" सांग, सांग, सारजाबाई, सांग ग. कशीही असू दे, सांग एकदांची. " असें इंदिरा काकुळतीस येऊन ह्मणाली.

सारजाः—" ज्यांच्यासंबंधानें या गांवांत मागें इतकी वाटाघाट झाली, त्या बाई, आपण स्वप्न पडलें म्हणतां त्याच रात्रीं माझी गिरजाक्का असते त्या घरांत नव्हे, त्याच्या शेजारच्या मावशीबाईच्या घरीं वारल्या, व त्या बाईनींच मला हें मंगळसूत्र दिलें—"

इंदिरा आश्चर्यचकित झाली. तिला कांहींच उमज पडेना. ती एक-सारखी सारजेच्या तोंडाकडे टकमका पाहूं लागली.

सारजाः—" आक्कासाहेब, प्रतापरावांनीं पाठवून दिलेलें झोंपेचें औषध प्याल्याबरोबर ज्या बाई मेल्या त्यांच्यासंबंधानें मी बोलतें. त्यांचें नांव कलावतीबाई. "

इंदिराः—" तर मग ती माझी बहीण नव्हे."

सारजाः—" आक्कासाहेब, तीच असावी असें मला वाटतें, खात्रीनें वाटतें. मघांशीं मोहनाताईनीं जें पत्र आणलें तेंच पत्र मागें खटल्याच्या चौकशीच्या वेळीं पुढें आलें होतें. सबंध पत्र नव्हतें, थोडासा भाग होता. "

इंदिरेची शक्ति नाहींशी झाली व तिच्या मनाला मोठा धक्का बसला. "मी हें काय ऐकतें ?" असें ह्मणून ती अत्यंत कष्टी झाली व तिच्या डोळ्यांतून घळघळ अश्रुधारा चालल्या. सारजा तिचें समाधान करूं लागली.





# प्रकरण १२ वें.

——:०:——

## इंदिरा आणि दर्याबाई.





"कलावती " हें नांव ऐकतांच इंदिरेला असें स्पष्ट वाटूं लागलें कीं शेठाणी ह्मणत होत्या त्या 'कलावंत' नांवाच्या गृहस्थाबरोबरच कमळजेनें लग्न करून घेतलें. तरी सुद्धां अजूनी मेळ बसेनाच. तिनें आपल्या नवऱ्याला जें पत्र पाठविलें त्यांत आपण आपलें खरें नांव बदलून दुसरेंच धारण केलें आहे असें लिहिलें होतें आणि कलावती असें ती आपणास ह्मणत होती. अर्थातच कलावती हें तिचें खरें नांव नव्हे. मग याचा अर्थ काय? अशा विचारांतच इंदिरेची रात्र निघून गेली. सारजेनें जी हकीगत तिला सांगितली त्याबद्दल किंवा त्या मंगळसूत्रासंबंधानें मोहनेजवळ इंदिरा कांहींच बोलली नाहीं. दुसरे दिवशीं उजाडल्याबरोबर आनंदरावांच्या घरांतून आपलें बिऱ्हाड हालवून ताबडतोब निघून जावयाचें व बरोबर लीलेलाही न्यावयाची असें तिनें ठरविलें, व त्याप्रमाणें तिनें तयारी चालविली. मोहनेनें दिलेल्या पत्रांतील मजकुरावरून कमळजेचा नवरा दत्तापूर गांवांत आला होता; त्या कृतांतरात्रीच्या वेळीं तो जिन्यांत लपून बसला होता. त्यानेंच त्या विचारीचा घात केला आणि आनंदरावांची त्या कामांत पूर्ण मदत होती असें इंदिरेचें ठाम मत होऊन बसलें. अर्थातच आनंदरावांपासून दूर रहावें असें तिला वाटूं लागलें.

निघते वेळीं इंदिरा आनंदरावांचा निरोप घ्यावयाला गेली त्या वेळीं ते तिला ह्मणाले:—" आक्कासाहेब, अगदीं एकाएकींच जावयाचें काढलें! येथें रानांत पडलां होतां कीं काय! मला वाटलें आणखी चार दिवस तरी रहाल. पण संभाळा हो! लीलाताईची तब्यत अजून चांगली बरी झाली नाहीं."

इंदिरा:—" आनंदराव, ती जबाबदारी मी माझ्या अंगावर घेतें. तुह्मीं आमची फार उत्तम बरदास्त ठेवलीत, अगत्य व प्रेम दाखविलेंत, लीलेला काळजीनें औषध दिलेंत याबद्दल तुमचे फार फार उपकार आहेत. तरी पण आपल्या घरीं जाऊन एकदां पडावें असें मला वाटत आहे. तुम्हांला तरी किती त्रास द्यायचा? काल रात्रीं मीं कळविलेंच आहे त्याप्रमाणें आमच्या कमळजेचा तपास लावण्याच्या कामांत आपणाकडून मदत मिळेलच. तिची पुढें वाट तरी काय झाली याचा शोध मी करणार आहें, व त्याकरितां मला थोडी स्वतंत्रता पाहिजे आहे, म्हणून मी जातें. आनंदराव, आपण मोकळ्या मनानें मला सर्व हकीगत सांगितली असतीत तर जायची मीं इतकी घाई केली नसती." आनंदरावांची मुद्रा त्रासलेली दिसली. " आक्कासाहेब, या गोष्टीची मला माहिती आहे असा आग्रह धरणें फार विलक्षण दिसतें." इतकेंच ते बोलले.

इंदिरा:—" तुम्हांला माहिती आहे अशी माझी खात्री आहे. पण काल रात्रीं माझ्याकडूनच जरा चुकलें. कमळजा या गांवांत आली तेव्हां गिरजाबाईच्या घरीं उतरली नसून शेजारींच मावशीबाईचें घर आहे त्या घरांत उतरली होती, व तिथेंच बाळंत होऊन ती मेली."

आनंदराव कांहीं न बोलतां इंदिरेच्या तोंडाकडे टकमका पाहूं लागले. इंदिरा पुढें म्हणाली:—" तिनें इथें आल्यावर आपलें नांव 'कलावती' म्हणून सांगितलें त्यावरून माझा असा ग्रह झाला आहे कीं, शेटजींच्या घरीं जो कलावंत म्हणून गृहस्थ येई त्याच्याशींच तिचें लग्न झालें. आनंदराव, तो गृहस्थ तुम्हांला माहीत असेल. कोणत्या प्रकारचा होता तो?"

आनंदराव आपल्याच विचारांत गर्क होते; ते म्हणाले—" कोणत्या प्रकारचा मनुष्य? किंचित् ठेंगणा होता, सशक्त होता, केंस थोडे पिंगट

होते. निदान माझी आठवण तरी अशी आहे. शेटजींच्या घरीं तो येई, तेथली माझी त्याची ओळख. त्यानंतर माझी त्याची गांठ नाहीं कीं वार्ता सुद्धां नाहीं. आक्कासाहेब, ती मेलेली बाई आपली बहीण असें तुम्हांला वाटायला काय कारण आहे ?" "ठेंगणा, सशक्त, व केंस थोडे पिंगट काय ?" असें इंदिरा उलट म्हणाली—इतर शब्दांकडे तिचें लक्ष्यच नव्हतें:—"तर मग जिन्यावर जो मनुष्य तुम्हांला दिसला तो तोच असावा."

आनंदराव संतापून म्हणालेः—"तो नव्हे तो. जिन्यावर जो चेहरा मला दिसला—खरोखरच तिथें असला तर हो—तो चेहरा माणसाच्या चेहऱ्यासारखा मुळींच दिसला नाहीं."

इंदिराः—"कमळजेनें, कमळाबाई मास्तरिणीनें म्हणा पाहिजे तर, कुणाशीं लग्न केलें हें तरी सांगतां येईल ?"

आनंदरावः—"नाहीं, मला कांहीं माहिती नाहीं."

इंदिराः—"आनंदराव, या मागच्या गोष्टीची तुम्ही सांगतां त्यापेक्षां तुम्हांला जास्त माहिती आहे अशी माझी झालेली कल्पना अजूनी माझ्या डोक्यांतून जात नाहीं. मला हा सर्व तपास लावायाचा आहे. तुम्हांला कांहीं माहिती सांगतां आली असती, पण ती तुम्ही सांगत नाहीं. असें कां ? कलावतीकडून आपणाला बोलावणें आलें होतें एवढें खास. मागें चौकशी झाली त्या वेळीं आपण हें कबूल केलें आहे."

आनंदरावः—"मला बोलावणें आलें होतें ही गोष्ट खरी, पण—पण ती बाई तुमची बहीण असें जें तुमच्या मनानें घेतलें आहे, तें चुकीचें आहे असें मला वाटतें. तें कसेंही असो. माझी तुम्हांला अशी सल्ला आहे कीं तुम्हीं या गोष्टीची आतां जास्त वाटाघाट करूं नये. तुम्हीं कितीही तपास केलात तरी त्यापासून कांहींही निष्पन्न होणार नाहीं. मेलेलें मनुष्य आतां थोडेंच जिवंत होणार ! शिवाय हें सर्व मागील प्रकरण पुनः उपस्थित केल्यानें तुम्हांला किंवा तुमच्या बहिणीला म्हणजे माझ्या बायकोला हितकर होणार नाहीं. सर्वांना त्रास मात्र होईल. जाऊं द्या तें. द्या सोडून, समजलें !"

"मी कधींच सोडून देणार नाहीं. त्यामुळें माझ्या मनाला त्रास होईल खरा—पण तेवढा सोसला पाहिजे." असें इंदिरा ह्मणाली. तिचा निश्चय झाल्यासारखें दिसलें.

"मग तुमची मर्जी; वाटेल तसें करा. मला यापेक्षां जास्त कांहींच सांगतां येत नाहीं." असें आनंदराव बेफिकीरपणानें ह्मणाले.

इंदिरा निघून गेली. पण तिला आतां शंका येऊं लागली कीं ती मेलेली बाई कदाचित् कमळजा नसावी. तथापि ह्याचा एकदां पुरता तपास लावावयाचा हा तिचा निश्चय कायमच झाला. लीलेला घरीं आणल्यापासून जरा बरें वाटतें असें पाहून इंदिरा दर्याबाईकडे गेली. तो मुलगा कलावतीचाच आहे, आपला नव्हे ही गोष्ट शेवटीं दर्याबाईंनीं कबूल केली असें सारजेनें इंदिरेला सांगितलें होतें.

नेहमीं म्हटलें तर दरवाजा उघडा असावयाचा, पण आज बंद केलेला होता. इंदिरेनें हाक मारतांच दर्याबाईंनीं येऊन तो उघडला. इंदिरा म्हणालीः—"म्हटलें, फुरसत असली तर घटकाभर बोलत बसूं म्हणून आलें."

दर्याबाईः—"आतां फुरसतीला काय तोटा? सगळा वेळ रिकामाच. सोन्या होता तंवर सगळें कांहीं करावें लागत होतें. आतां काय? झाला एकदाचा थंड! त्या मेल्या काळानें शेवटीं त्याला नेलेंच!!"

इंदिराः—"म्हणजे? मी समजलें नाहीं. मुलगा गेला?"

दर्याबाईः—"होय बाई, एक घटका झाली त्याचा प्राण गेला. किती हाल झाले बिचाऱ्याचे!"

त्याबरोबर इंदिरेला रडें कोसळलें:—"आई आई! हा मुलगा माझ्या बहिणीचा-माझा भाचा-हें आतां मला समजलें. अगोदर कळलें असतें तर मी पोटभर त्याला घेऊन तरी बसलें असतें." असें ह्मणून ती शोक करूं लागली. दर्याबाईंना कांहींच उमज पडेना. 'इंदिरा म्हणजे जहागीरदाराची मुलगी आणि त्या मुलाची आई अगदीं गरीब मास्तरीण होती. ती हिची बहीण कशी?' असा संशय त्यांना उत्पन्न झाला. नंतर मावशीबाईंच्या घरीं ह्या मुलाची आई मेली ह्मणतां, तिचें खरें नांव काय?'

असें इंदिरेनें विचारिलें. पण ' मला माहीत नाहीं. ' असें दर्याबाईनीं स्वच्छ सांगितलें. तें ऐकून इंदिरेला फारच वाईट वाटलें. ' नेहमीं असेंच व्हावयाचें काय ? तपास लागण्याच्या कामांत अशा हरकतीमागून हरकती यावयाच्याच काय ? असा प्रकार किती दिवस चालावयाचा ? ' असा विचार ती करूं लागली. नंतर ती किंचित् त्रासून म्हणाली, " दर्याबाई, तुम्ही मला आतां काय असेल तें खरें सांगा; चोरून ठेवूं नका. अशी माझी तुम्हांला विनंति आहे. मी तुमच्या पुढें पदर पसरतें. मला एवढी भीक घाला. इतक्याउपर खरा प्रकार जर तुम्हीं मला सांगितला नाहीं तर मग मला पोलीसांना कळवावें लागेल. लग्नाच्या अगोदर किंवा लग्न झाल्यानंतर तिचें खरें नांव तुम्हांला कळलें नाहीं ? विचार करून बोला. "

इंदिरेचें हें निकराचें बोलणें ऐकतांच दर्याबाईही थोड्या मऊ आल्या. त्या म्हणाल्या:—" तिचें खरें नांव काय असेल सांगवत नाहीं. तरी तिनें जें नांव धारण केलें होतें तें आहे मला माहीत. मुंबईत नरोत्तमदासाच्या घरांत ती प्रथम मास्तरीण म्हणून राहिली होती. तिथें माझी तिची ओळख झाली. तिचें नांव कमळाबाई— "

" तीच हो माझी बहीण ! " असे उद्गार इंदिरेच्या तोंडांतून निघाले. तिच्या मनाची खात्री होऊं लागली. तिनें नंतर विचारिलें:—" तिनें कुणाबरोबर लग्न करून घेतलें ? "

" तें मला कळलें तर मग काय ? मागाल तें देईन. "

" बरें, मुलाला एकदां पाहूं कुठें आहे तो ? " असें इंदिरा म्हणाली, म्हणून दर्याबाईनीं तिला माजघरांत नेलें. मुलगा प्रेत होऊन अंथरुणावर पडलेला होता. इंदिरेनें त्या मुलाला प्रेमानें कुरवाळलें, पोटाशीं घट्ट धरलें, व त्याच्या तोंडाकडे पाहून ती रड रड रडली." बाई, तुम्हीं मला अगोदरच कां कळाविलें नाहीं ? माझी बहीण नाहींशी झाली म्हणून मी तळमळत होतें; या मुलाकडे पाहून तरी मीं समाधान मानून घेतलें असतें. "

दर्याबाई:—" आक्कासाहेब, मला कां दोष देतां उगीच ? ह्याच्या आईचें नि तुमचें नातें आहे असें मला स्वप्न का पडलें होतें ? ती मास्तरीण

होती एवढें मला ठाऊक. इथें आल्यापासून रस्त्यानें जातां येतां 'हा मुलगा कुणाचा ? तुम्ही कुठल्या ?' असें लोक विचारीत. पण मला वाटे, आम्ही इथें अगदींच परकी, तशांत मुलगा इतका आजारी, म्हणून ते विचारीत असतील. तुम्हींही त्याच हेतूनें विचारलें असेल असें मला वाटलें."

नंतर इंदिरेनें तिची बहीण कमळजा इच्यासंबंधानें सर्व हकीकत सांगून म्हटलें:—" दर्याबाई, मीं ही मागची हकीकत सांगितली. आतां याच्या-पुढची तुम्ही सांगा. काय माहीत असेल ती खडा न् खडा सांगा."

दर्याबाईनीं सुरवात केली:—" आक्कासाहेब, तुम्ही तिच्या कोण हें जर मला कळलें असतें तर मागेंच मीं तुम्हांला सारी हकीकत सांगितली असती. नरोत्तमशेटजींच्या घरीं माझी तिची प्रथम ओळख झाली, हें मीं मघाशीं सांगितलेंच. शेटाणीबाई व मी दोघीही एकाच गांवच्या. त्यांच्या वडिलांचें कापडाचें दुकान होतें नि माझ्या बापाचें हिंग, जिरें, मिरें विकण्याचें दुकान असे. बाई पण मोठी जहांबाज हो ? वागणें अगदीं शिस्तवार, बोलणें बेतासबेत. पण स्वभाव मात्र भारी गर्विष्ठ. लहानपणापासूनच त्या अशा. किराण्या जिनसाच्या दुकानापेक्षां कापडाचें दुकान जास्त मानाचें असें त्या म्हणत नि माझ्याकडे पाहून नाक मुरडीत. मुरडीनात बापड्या, आणखी इतकें मुरडूं देत. पुढें आमचीं दोघींचीं लग्नें झालीं. त्यांचें सासर मुंबईतच म्हणून त्या मुंबईस गेल्या. पुढें माझ्या माणसांनींही मुंबईत एका वखारींत नोकरी धरली, म्हणून आम्हीही मुंबईत जाऊन राहिलों. तिथें गेल्यावर मी कधीं कधीं शेठाणीबाईला भेटायला जाई. पण 'आला का पाटलीणबाई ? बिचाऱ्या पूर्वींपासून आहेत तश्शाच आहेत हो !' असें म्हणून त्या माझी थट्टा करीत. पुढें पुढें तर त्या बोलल्या बोलल्या, नाहीं नाहीं, असें करूं लागल्या. माझें तरी त्यांच्यावांचून थोडेंच अडत होतें. मीं तिकडे जाणें सोडून दिलें. पुढें बाईना एक भयंकर दुखणें आलें तेव्हां त्यांनीं मला मुद्दाम बोलावणें पाठवून नेलें. मग मात्र त्या माझ्याशीं ममतेनें वागूं लागल्या. तिथें माझी व कमळाबाईची ओळख झाली. पोरगी पण किती मोड म्हणून सांगूं ? स्वभाव भारी छान. मीं अशी कुठें बघितली नाहीं. वागणें किती सभ्य व मर्यादेचें ! मला ती फारच आवडत होती. पण शेठाणीबाई तिच्याशीं ताठ्यानें वागत, म्हणून

ती थोडी त्रासलेली दिसे. मी तिथें एक महिनाभर होतें. पुढें त्यांना जसें बरें वाटूं लागलें तशी मी आपल्या बिऱ्हाडीं गेलें. आह्मी पालवाच्या रस्त्यावर एका चाळीत राहिलों होतों. 'तिथें मी एकदां येऊन भेटेन' असें कमळाबाईनें माझ्याजवळ कबूल केलें होतें. त्याप्रमाणें ती आली, भेटली; होती तासभर. ती ह्मणाली कीं, ती नोकरी आपण सोडली. कारण शेठाणीबाईचा एक धटिंगण पुतण्या आहे, तो आपल्याशीं भारी फाजीलपणा करीत असतो. बाईंना सांगितलें तरी त्या मनावर घेईनात ह्मणून तिथली नोकरी सोडून मथुराशेटजींच्या घरीं नोकरी पतकरली असें ती ह्मणाली. यानंतर कित्येक महिन्यांत तिची माझी गांठ पडली नाहीं. पुढें एका वर्षानें ती माझ्याकडे आली आणि आपल्याला एक चांगलीशी जागा पाहून द्या, मला बिऱ्हाड करायचें आहे असें ती ह्मणाली. मला आश्चर्य वाटलें. मग तिनें सांगितलें कीं आपलें लग्न झालें, आतां आपण स्वतंत्र बिऱ्हाड करणार; पण कुणाजवळ बोलूं नका. मीं ह्मटलें 'मग यांत चोरी कां?' तेव्हां ती हांसून ह्मणाली, 'याला दोन कारणें आहेत. एक असें कीं माझे मामंजी पैशाच्या कामांत भारी चिकट, ह्मणून त्यांचें व इकडचें—बापलेकांचें—जुळत नाहीं; अगदीं खटका उडाला आहे. तेव्हां लग्न करून घेतल्याची गोष्ट मामंजींना कळवायचें मनांत नाहीं. दुसरें असें कीं माझें घराणें उंच कुलशीलाचें असें आहे. घरांत कळलें तर रागावतील, कमी दर्ज्याच्या माणसाशीं लग्न करून घेऊन हिनें कुळाला बट्टा लावला ह्मणतील, नांव बुडविलें, अब्रू घालविली ह्मणतील, काय पाहिजे तें ह्मणतील, ह्मणून तूर्त त्याचें नांवच काढूं नये, पुढें तिकडचा धंदा चांगला चालला व पैसे रगड मिळूं लागले, आणि सुखानें, थाटानें, रहातां येऊं लागले, ह्मणजे मग लग्नाची गोष्ट फोडतां येईल; मग कुणाची भीति रहाणार नाहीं—"

इंदिरेनें मध्येंच विचारिलें:—"तिनें आपल्या नवऱ्याचें नांव काय सांगितलें? आडनांव तरी?"

दर्याबाई:—'तिनें कांहींच सांगितलें नाहीं. ती मला ह्मणाली, 'तुह्मांला सांगितलें कीं तुह्मी, सहज कां होईना, नरोत्तमदासांच्या घरीं

बोलाल, तिथून मथुराशेटजींच्या घरीं कळेल नि मग चहूंकडेच समजेल. ह्मणून मी मुळींच कांहीं सांगत नाहीं ' मग आह्मी रहात होतों त्याच चाळींत तिला मीं एक खोली भाड्यानें पाहून दिली. तिथें ती या गांवाला येईपर्यंत रहात होती. पुढें माझा मुलगा आजारी पडला. त्याच्या आजारीपणांत ती नेहमीं त्याच्याजवळ बसून राही आणि—"

"पण इतक्या दिवसांत तिचा नवरा तिथें कधीं आला नाहीं कीं तुह्मीं त्याला कधींच पाहिलें नाहीं ?" असें इंदिरेनें आश्चर्यानें विचारिलें.

दर्याबाई:—"नाहीं, तो तिथें कधीं आला नाहीं, निदान मीं तरी त्याला कधीं पाहिलें नाहीं. कधीं कधीं विस्मरणानें एखादा शब्द सहज तिच्या तोंडांतून येई, त्यावरून मीं ताडलें कीं तिचा नवरा मुंबईस नसून कोठें दुसऱ्या गांवांत रहावयास गेला आहे. तो कधीं कधीं मुंबईतही येई तेव्हां मला सांगून ती एक दोन दिवस त्याला भेटण्याकरितां ह्मणून जात असे. पण ती कुठें जात असे हें मात्र मला समजलें नाहीं, व तितका तपासही मीं केला नाहीं ?"

इंदिरा:—"बरें पण, तिला पत्रें तरी येत असलीं पाहिजेत. त्यावर पत्ता काय असे ?"

दर्याबाई:—"पत्रें येत असतील पण मी कशाला पहायला जाऊं ? शिवाय डाकेची वेळ झाली कीं ती खालीं जाई व टपालवाल्याकडून आपलीं पत्रें घेऊन येत असे. एकदां तिचें पत्र यायचें होतें नि ती बरीच आजारी होती, डोहाळे लागले होते व बाहेर कुठें जाववत नव्हतें. ह्मणून तिनें मला हाक मारून पत्राचा शोध करण्यास सांगितलें. इतक्यांत टपालाचा शिपाई येऊन त्यानें एक पत्र दाखविलें त्यावर "कमळाबाई दे." एवढेंच लिहिलेलें होतें. तिला विचारतां "आपलेंच तें पत्र" असें ती ह्मणाली. नंतर मीं तिला विचारलें कीं तुझ्या नवऱ्याचें आडनांव "देशमुख" काय ? तेव्हां ती हांसली. तेवढ्यावरून तें "देशमुख" आहे, असेंच धरून मी चालत आहें. पुढें तिला सातवा महिना जसा लागला तशी मात्र ती घाबरली. खरें ह्मटलें तर आणखी दोन महिने संपल्यावर तिचे बाळंतपणाचे दिवस. पण कित्येक बायका सातव्या महिन्यांत सुद्धां बाळंत

होतात; न जाणो आपणही दिवस भरायच्या आंतच बाळंत होऊं अशी तिला भीति वाटूं लागली. नवरा एकीकडे, आपण एकीकडे, अशा स्थितींत पर ठिकाणीं बाळंत होणें तिला आवडलें नाहीं. आपण आपल्या घरीं जाणार,मग तिकडे राग येवो अगर कांहीं होवो,असें ती ह्मणाली. मीं तिला किती सांगितलें कीं, तूं इथेंच रहा, नवऱ्याच्या मनांत नाहीं तर तूं कशाला जातेस ? त्याच्याच मर्जीप्रमाणें कां होईना ? मी तुझें बाळंतपण करीन, कसलीही काळजी करूं नकोस; शिवाय तुझी तब्येतही चांगली नाहीं, प्रवासाची दगदग सोसणार नाहीं. पण तिनें आग्रहच धरला. मग मींही जिकीर केली नाहीं. माझा मुलगा त्याच सुमाराला गेला होता, त्या दुःखांत मी होतें. तिनें जाण्याचें नक्की ठरविलेंच. तुला मूल झालें ह्मणजे मी त्याला संभाळीन; माझ्या स्वाधीन करशील ना ? असें मीं तिला विचारलें, कारण मला मुलाची भारी हौस आहे. तिनें माझ्याच घरीं रहावें, जाऊं नये असें मी ह्मणत होतें. न जाणो ती एकदां गेली ह्मणजे तिचें मूल आपल्याला मिळायचें नाहीं अशी मला भीति वाटत होती. तेव्हां मीं मग तिच्याकडून वचन घेतलें कीं आपलें मूल मी तुमच्या स्वाधीन करीन ह्मणून."

इंदिराः—"मग ती गेली ?"

दर्याबाईः—"गेली. तिला मोडा घालून कांहीं उपयोग झाला नाहीं. तिनें आपले सगळे जिन्नस एका मोठ्या ट्रंकमध्यें भरले, पत्रेंबित्रें होतीं तीं सारीं जाळून टाकलीं; व निघून गेली. वार, तारीख सुद्धां माझ्या चांगली लक्ष्यांत आहे. त्या दिवशीं शुक्रवार होता; मार्च महिन्याची दहावी तारीख होती. दुसरे दिवशीं ह्मणजे शनिवारीं माझ्या घरीं एक पाहुणी आली होती, तिला राणीचा बाग दाखविण्याकरितां मी घेऊन गेलें होतें. तिकडून यायला बरीच रात्र झाली. घरीं आलें तर कमळा-बाईकडून एक पत्र आलेलें होतें. मुक्काम या गांवचाच होता. "माझी प्रकृति बरी नाहीं, मला कसेंसेंच वाटत आहे, तुह्मी ताबडतोब निघून या" असा मजकूर त्या पत्रांत होता. लागलींच रात्रीच्याच गाडीनें मी निघून इथें आलें, तर ती बाळंत झाली होतीच. मूल पण किती लहान

होतें ह्मणून सांगूं ? इतकें लहान मूल मी नव्हतें कधीं पाहिलें ! मी तिला फार रागें भरलें. मला आवरेनाच. विनाकारण तिनें आपणाला संकटांत पाडून घेतलें. बरें, नवरा तरी इथें असायचा होता तर तोही नाहीं, कुठल्याशा गांवाला गेला होता ह्मणे. ”

इंदिराः—“ इथें नव्हता ? ”

दर्याबाईः—“ असें तीच ह्मणाली. तिच्या माझ्या बोलण्यांत एखादा दुसरा शब्द तिच्या तोंडांतून निघे त्यावरून मला एवढें समजलें कीं तिचा नवरा डॉक्टर असावा. परंतु माझी खात्री नव्हती. त्याच दिवशीं संध्याकाळीं मुलाला घेऊन मी गेलें. रहायला सवडच नव्हती. कारण घरीं अंगांत नीट नव्हतें, ह्मणून मी गडबडीनें निघून गेलें. ”

इंदिराः—“ तिनें कलावती हें नांव धारण केलें होतें तें तुह्मांला माहीत आहे ? ”

दर्याबाईः—“ हो. त्या नांवावरूनच आपला पत्ता विचारीत या असें तिनें पत्रांत लिहिलें होतें. इथें आल्यावर मीं तिला विचारलें कीं हेंच तुझें खरें नांव काय ? ती ह्मणाली—‘ जसें कमळाबाई नांव उसनें आणलेलें तसेंच हेंही उसनेंच आहे. मथुराशेटजींच्या घरीं कलावंत नांवाचे जे गृहस्थ येत त्यांचा मला भारी तिटकारा वाटे, ह्मणून मला चिडविण्याकरितां शेटजींचे बंधु मला कलावती–कलावंताची कलावती–असें ह्मणत, ह्मणून मला हें नांव सुचलें. ’ मला तिचा भारी राग आला. लग्न झालें, सगळे सोहाळे सुद्धां झाले, बाळंत देखील झाली आणि मेली नवऱ्याचें नांव सांगायला कां चोरी ? आणि तिचा नवरा तरी पहा कसला असला चमत्कारिक तो ? अंधारांत केलेलें कर्म उघडकीला यायचें तें आलें आणि आतां चोरून ठेवून काय होणार ? हें त्या नंदीबैलाला समजायला पाहिजे होतें कीं नाहीं ? पण तिनें आपल्या नवऱ्याचीच बाजू घेतली. ती ह्मणाली, ‘ आमचें सर्व कांहीं यथास्थित व्हायचें. तसें ठरलेंच होतें. पण दिवस पुरे गेले नाहींत त्याला काय करायचें ? ’ नंतर, आपल्याकडून पत्र येईपर्यंत तुह्मी मला पत्र पाठवूं नका, कोणाबरोबर निरोप सुद्धां पाठवूं नका अशी तिनें मला ताकीद दिली. पुनः निघतेवेळीं तिचें माझें

आणखी भांडण झालें. भाड्याचे पैसे ती मला देऊं लागली. पण मी कशाला ते घेऊं ? देवानें मला कांहीं कमी केलें नाहीं. मुलाला घेऊन मी मुंबईस गेलें. पण त्या दिवसापासून बरा कीं वाईट शब्द सुद्धां तिच्या-कडून मला कळला नाहीं. ”

इंदिराः—“ कधीं नाहीं ? ”

दर्याबाईः—“ नाहीं. मुळींच नाहीं. इथून गेल्यावर आम्ही कांहीं दिवस मुंबईस होतों. मग तिकडची प्रकृति बरी झाल्यानंतर इंदुराकडे गेलों. तिकडे बरींच वर्षे राहिलों. मुंबईहून जातांना माझा पत्ता लिहून मी कमळाबाईच्या नांवानें एक पत्र लिहून शेजारच्या घरीं ठेवलें. कधीं आलीच तर तिला कळावें ह्मणून. पण तें पत्र न्यायला ती आलीच नाहीं. पत्र तसेंच तिथें पडलें होतें. ”

इंदिराः—“ तर मग ती इतके दिवस अगदीं गप्प राहिली, तुह्मांला पत्र सुद्धां पाठवलें नाहीं, याबद्दल, तसेंच ती मुलाला टाकून राहिली या-बद्दल तुह्मांला काय वाटलें ? ”

दर्याबाईः—“दुसरें काय वाटायचें? दोन्हींपैकीं एक कारण असावें असें वाटलें. एक तर ती आपल्या नवऱ्याबरोबर कुठें तरी दूर देशीं गेली असावी—मुंबईंत माझ्या शेजारीं रहात असतांना असें कायसें ती एकदां बोलली होती—व तिथून तिनें पाठविलेलीं पत्रें मला पोंचलीं नसावींत. किंवा—मी बोलतें त्याचा राग येऊं देऊं नका हो—तिचें लग्नच मुळीं झालेलें नसावें. ह्मणून तें मूल ‘ आपलें ’ असें म्हणण्याला तिला लाज व भय वाटलें असावें. असें होतें पुष्कळदां. एकदां पाऊल वांकडें पडलें ह्मणजे मग मनुष्य तें सुधरायला लागतें. मला कांहीं असें वाटलें नाहीं खरें. पण माझीं माणसें असें म्हणत. तिनें मुलाला टाकलें पण आह्मीं नाहीं हो कधीं त्याची हेळसांड केली. अगदीं फुलासारखें वागविलें. पुढें गेल्या उन्हाळ्यांत तिकडची प्रकृति एकाएकीं बिघडून आमचा सर्व संसार आटपला. आणि मग या मुलाला घेऊन मी इकडे आलें. हेतु हा कीं याच्या आईचा कांहीं तपास लागल्यास पहावा आणि दुसरें असें कीं याची प्रकृति इतकी अशक्त, नेहमीं रोगी, तेव्हां उपजल्या गांवची हवा

तरी मानवते का पहावें, म्हणून. इथें येऊन शोध करतां कलावती बाळंत झाल्यावर चवथे कीं पांचवे दिवशींच वारली म्हणून समजलें. झालें आईच्या मागून मुलगाही आज गेलाच! शिव शिव! केलें काय नि झालें काय असें मला होऊन गेलें आहे. ती मेल्याचें ऐकल्याबरोबर माझ्या मनाला जो धक्का बसला तो मी कधीं सुद्धां विसरणार नाहीं. मला राहून राहून आश्चर्य वाटतें तें हेंच कीं, इतके दिवस झाले तरी तिच्या नवऱ्या-संबंधानें कांहींच हकीकत कशी कळूं नये? मी या गोष्टीचाच तपास लावावा ह्मणतें, पण अजूनी जुळणीच बसत नाहीं. त्या रात्रीं जिन्यामध्यें तिच्या खोलीशेजारींच एक काळा मनुष्य दिसला म्हणतात तोच तिचा नवरा असावा व त्यानेंच तिचा घात केला असावा. मेल्याचें निसंतान होऊं दे!" असें म्हणून दर्याबाईनीं कडकडकड बोटें मोडलीं.

इंदिराः—"कांहीं समजत नाहीं. तुह्मी सांगूं लागल्यापासून माझ्या मनांत निराळीच भीति वाटूं लागली आहे व माझ्या अंगावर कांटा येऊं लागला आहे."

खरोखरच निरनिराळ्या प्रकारची भीति, वेगवेगळे विचार, मागच्या आठवणी इत्यादि अनेक गोष्टींनीं इंदिरेच्या मनांत खळबळ उडवून दिली. आनंदरावांशीं मोहनेचें लग्न झाल्यानंतर पुढें लवकरच चोळ्यांच्या खणांत एक पत्राचा तुकडा मोहनेला सांपडला होता त्याची आठवण इंदिरेला झाली. मोहनेचें ह्मणणें नेहमीं असे असें कीं आपल्या बाबांकडून व आक्काकडून कपडे आले त्यांतून तो चिटोरा आला असावा, एरव्हीं येण्याचा संबंध नाहीं. पण आतां मात्र इंदिरेला असें वाटूं लागलें कीं तो कागद मोहनेचें लग्न होण्यापूर्वींच त्या ओढखणांत असला पाहिजे, (हा संशय तिला पूर्वींच यावयाचा; पण ही गोष्ट अगदीं असंभवनीय असें तिला वाटत होतें) व तेथेंच नजरचुकीनें पडून राहिला असावा; किती दिवस हें मात्र सांगतां येणें कठीण. बाब क्षुल्लकच, तरी पण त्यायोगानें इंदिरेच्या मनांत बराच घोंटाळा उत्पन्न झाला. तें पत्र कलावंताला लिहिलेलें असावें काय? आनंदरावांना लिहिलेलें नाहीं हें खचित. पण मग ह्यांच्या घरांतल्या कपाटांत तें कसें जावें? कदाचित् त्या वेळीं कलावंत

आनंदरावांना भेटावयाला आला असेल काय ? त्यांची त्याची ओळख होतीच; तो भेटावयाला आला असावा व पत्र त्यांच्या घरींच विसरून गेला असावा. पण कमळजेच्या पत्रावरून कलावंत तिचा नवरा असल्याचें दिसत नाहीं. तर मग यांतलें खरें काय ? व या सर्व प्रकरणांत आनंदरावांचें किती व कशा प्रकारचें अंग असावें याच प्रश्नानें इंदिरेच्या मनांत चलबिचल करून सोडली.

नंतर आणखी थोडें बोलून इंदिरा घरीं निघून आली.





# प्रकरण १३ वें.

—:०:—

## सारजेचा खुलासा.





इंदिरा दर्याबाईकडे गेली असतांना वसंतराव तिच्या घरीं आले. दुसरे दिवशीं त्यांचा मुंबईला परत जाण्याचा बेत झाला होता ह्मणून निरोप घेण्याकरितां ते आले होते. लीलेचें व त्यांचें लग्न होण्याचें पूर्वींच ठरलें होतें. दरम्यान लीलेची प्रकृति अतिशय बिघडल्याकारणानें ती आतां आपल्या हातची जाते कीं काय अशी वसंतरावांना भीति पडली होती; ईश्वराच्या कृपेनें हें मोठें अरिष्टही टळलें. आतां थोड्या दिवसांची गोष्ट; लीलेची प्रकृति लवकरच पूर्वींसारखी खडखडीत बरी होऊन आपणां दोघांवर अक्षता पडतील, मग आपण दोघेंजण सप्रेम विवाहसौख्य अनुभवूं. वगैरे मनोराज्यांत वसंतरावांची स्वारी अगदीं गुंग झाली होती.

वसंतरावांना पाहतांच लीलेच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले. याचें कारण असें कीं—आधले दिवशीं रात्रीं, मागें कलावती नांवाची जी बाई या गांवांत बाळंत होऊन मेली तीच आपली बहीण कमळजा होय असें समजल्यावर इंदिरेला फार दुःख झालें, व सकाळीं ती सहज लीलेच्या देखत बोलून गेली कीं ही गोष्ट जर खरी ठरेल तर जुळलेलें लग्न विसकटण्याचा संभव आहे, कारण प्रतापरावांनीं औषध तयार करण्यांत चूक केल्यामुळें जर कमळजेला मरण आलें असलें तर त्यांच्याच मुलाशीं लीलेचें लग्न होणें बरें नाहीं. लीलेच्या कानावर हे शब्द पडतांच ती मोठ्या

संकटांत पडली. अर्थातच वसंतरावांना पाहिल्याबरोबर लीलेला दुःखाचा गहिंवर आला, व ही सर्व हकीकत तिनें त्यांना सांगितली. ती ऐकतांच वसंतरावांना बराच राग आला. इतक्यांत इंदिराही दर्याबाईच्या घराकडून परत आली. तिला त्यांनीं स्पष्ट सांगितलें कीं आपल्या वडिलांकडून बिलकुल चूक झाली नाहीं, गुन्हेगार निराळाच, त्याच्याकरितां आह्मांला प्रायश्चित्त नको. त्या वेळीं तेथें सारजाही होती. लीलेचें व वसंतरावांचें परस्परांवरील प्रेम तिनें पाहिलें होतें; त्या दोघांचा जोडाही चांगला शोभत होता. वसंतरावांचें कळकळीचें भाषण ऐकून सारजेलाही वाईट वाटलें व ती आपण होऊनच इंदिरेला ह्मणाली:—"आक्कासाहेब, या दोघांची ताटातूट करणें बरोबर नाहीं. अपराध्याकरितां निरपराध्याला शिक्षा काय ह्मणून?"

इंदिरा हळूंच ह्मणाली:—"अपराध्याकरितां? अपराधी कोण आणि निरपराधी कोण हें कसें समजणार?"

सारजा थोडा वेळ स्तब्ध राहिली. तिच्या चेहऱ्यावर अनिश्चितपणा व उत्सुकता या दोहोंच्या विलक्षण मिश्रणाची छटा दिसूं लागली. तिनें एकदां इंदिरेच्या तोंडाकडे पाहिलें, मग वसंतरावांकडे पाहिलें आणि नंतर तिच्या हातांत इंदिरेची शाल होती ती एकदम फेंकून देऊन ती मोठ्यानें बोलूं लागली; तिच्या अंगांत संचार झाल्यासारखें दिसलें:—"आक्कासाहेब, मी आतां बोलून टाकतेंच. मला जी हकीकत माहीत आहे ती सारी सांगतें. चोरून ठेवीत नाहीं. काल रात्रींपासून सांगून टाकावी असें मला वाटत आहे. मागेंच सांगितली असती तर बरें झालें असतें असें आतां वाटूं लागलें आहे. आक्कासाहेब, अपराधी कोण आहे हें कसें समजायचें असें आपण म्हणालां, नाहीं? खरा अपराधी कोण हें मला आहे माहीत. मला वाटतें आनंदरावच खरे गुन्हेगार आहेत ही गोष्ट मीं त्याच वेळीं सिद्ध केली असती."

हें ऐकतांच सर्वजण तिच्या तोंडाकडे पाहूं लागले. सारजा स्वभावानें किती शांत व शहाणी? पण ही अशी कां बडबडते, हिला आज झालें तरी काय? आनंदराव खरे गुन्हेगार आहेत म्हणते याचा अर्थ काय असें ते मनांत म्हणूं लागले.

वसंतराव धिटाईनें म्हणाले:—" सारजाबाई, तुला खरी हकीकत माहीत होती तर आज इतकीं वर्षें आमच्या बाबांवर आलेला आरोप तूं तसाच कां राहूं दिलास ? "

सारजा०:—" मला बोलण्याचा धीर झाला नाहीं. मी काय, यःकश्चित् गरीब बायको, माझी पत कसली ! आनंदराव किती मोठे, श्रीमंत, डॉक्टर-कीचा धंदा करणारे, सर्वांना हवेसे झालेले. त्यांचा नांवलौकिक केवढा ? अशा मोठ्या तालीवार माणसांसंबंधानें मी जर बोलूं लागलें असतें तर माझें बोलणें कुणी ऐकून तरी घेतलें असतें काय ? मग खरें मानण्याची गोष्टच नको. शिवाय आनंदरावासंबंधानें मला जरी संशय आला होता तरी ते खरोखरच अपराधी आहेत या गोष्टीवर माझा विश्वास बसेना. मला वाटे मीच कुठें तरी चुकत असेन व माझीच कांहीं तरी गैरसमजूत झाली असावी. मला अशी भीति पडली कीं, मी बोललें नि माझ्याच अंगावर बाजू उलटून आली तर फुकट मीच गुन्हेगार ठरून मलाच शिक्षा व्हायची. फट् म्हणतां ब्रह्महत्त्या म्हणतात तसें व्हायचें. "

तिला असलेली माहिती आजपर्यंत कितीही वर्षें तिनें आपल्या मनांतच ठेवलेली असली तरी आतां ती सविस्तर सांगितल्याशिवाय गत्यंतरच नव्हतें. लीला आश्चर्यानें तिच्या तोंडाकडे पाहूं लागली, इंदिरा विचारांत गुंग अशी खालीं मान घालून बसली, व वसंतराव उत्सुकतेनें सारखे तिच्याकडे पहात राहिले.

सारजेनें आरंभ केला:—" आक्कासाहेब, आनंदरावच खरे गुन्हेगार आहेत, असें मी माझ्या तोंडानें म्हणत नाहीं. मीं जें काय या माझ्या डोळ्यांनीं पाहिलें आहे व कानांनीं ऐकलें आहे तेवढेंच सांगतें. त्यापासून काय अनुमान काढायचें तें लोकांनीं काढावें पाहिजे तर. आनंदरावच खरे अपराधी आहेत असा जो माझा ग्रह झाला आहे तो कदाचित् सर्वस्वी चुकीचा ठरेल. अगदीं आरंभापासून सांगूं ? "

" हो, आरंभापासून ते अखेरपर्यंत सर्व हकीकत सांग. आतां शिल्लक ठेवूं नकोस. " वसंतराव जरा जोरानें म्हणाले.

सारजाः—" बरें आहे. अगदीं पहिल्यापासून सांगतें. आदितवारची गोष्ट. बरें का ? म्हणजे ती बिचारी कलावतीबाई बाळंत झाली त्याच्या दुसरे दिवशीं रात्रीं अशी आठ नऊ वाजण्याच्या सुमाराला तिचा समाचार घेऊन यावा म्हणून मी गेलें होतें. त्या वेळीं माझी दाढ फार सुजली होती व अतिशय ठणका लागला होता, म्हणून फार वेळ न बसतां नुसता समाचार घेऊन येऊन मी निजणार होतें. मावशीबाई व मैनाई सुईण ह्या दोघी स्वयंपाकघरांत फराळ करीत बसल्या होत्या. मला खिडकींतून दिसलें. हांक मारून त्यांना उगाच कशाला त्रास द्यावा असें मनांत येऊन कांहीं न बोलतां मुकाट्यानें मी जिना चढून वर गेलें. ग्यालरींत चांदणें पडलेलें होतें. वर जाऊन पाहिलें तों बाळंतिणीच्या खोलींत अंधार दिसला. मीं बाईंना हांक मारली पण त्या कांहीं बोलल्या नाहींत, त्यांना झोंप लागली होती; म्हणून मी खोलींतच पडद्याशेजारीं थोडा वेळ हातानें माझी दाढ दाबून धरीत बसून राहिलें. इतक्यांत खालीं कोणसें आलें, त्यांना घेऊन मावशीबाई माडीवर आल्या. मी आंतल्या बाजूला होतें. मला वाटलें प्रतापराव डॉक्टर आले असतील. पण मावशीबाईंचें आणि त्यांचें बोलणें झालें त्यावरून ते आनंदराव आहेत असें मला समजलें. मावशीबाई पुनः खालीं गेल्या नि मग आनंदराव दिवा न घेतांच आंत आले. त्यांची चाहूल झाल्याबरोबर कलावतीबाई जाग्या झाल्या व बाजेवर उठून बसल्या असें मीं बाजल्याच्या करकर आवाजावरून ओळखलें. आनंदराव बाजेशेजारीं येऊन म्हणाले:—' जागी आहेस ना ? या गांवांत तूं आलीस हा केवढा मूर्खपणा, केवढा अविचार केलास ? आणि नांवें तरी किती बदलावयाचीं ? कमळजेची कमळाबाई झालीस, कमळाबाईची झालीस कलावती, आतां कलावतीची कोण होणार ? ' बाळंतीण म्हणाली:—' गांठ पडली बरें झालें. मी इथें आलें म्हणून राग व्हायला नको. आपलें गुपित आपण फोडूं नका म्हणजे झालें. म्हणून तर कलावती असें नांव मीं इथें सांगितलें आहे. आपण इकडे व मी दूर कुठेंतरी बाळंत होऊन चार दोन महिने एकटें पडावें हें मला बरोबर वाटलें नाहीं. म्हणून मी निघून आलें. झालें. घड-

पणीं सुटकाही झाली. आतां कांहीं काळजी नाहीं. मुलगा पण किती सुरेख आहे ? ऐकलें का ? ' पण आनंदराव त्रासल्यासारखें करून म्हणाले:—' छे छे छे छे ! ही तूं मोठी चूक केलीस !' यापुढें त्यांचें बोलणें मीं ऐकलें नाहीं. कारण मी खोलींतून उठून बाहेरच्या दारानें निघून गेलें. जातां जातां ' कोण आहे तिकडे ? ' असें आनंदरावांनीं विचारल्याचें मीं ऐकलें, पण मी कांहीं न बोलतां तशीच निघून गेलें. अगदीं आवाज न करितां गेलें. आपलें बोलणें कुणीं ऐकलें असें त्यांना वाटूं नये अशी माझी इच्छा होती. स्वयंपाकघराजवळून जातांना मावशीबाईंचें व माझें थोडें बोलणें झालें. मला आठवण आहे. स्टेशनावरून येतांना त्या रात्रीं आनंदरावांवर केवढें अरिष्ट आलें होतें, त्यांचा घोडा पडला, गाडी मोडली वगैरे हकीकत त्यांनीं मला सांगितली; परंतु मी कांहीं बोललें नाहीं. माझी दाढ भारी दुखत होती म्हणून मी घरीं जाऊन निजलें. पण ठणका जास्त होता त्यामुळें व नुकतेंच बाळंतिणीच्या खोलींत जें मीं बोलणें ऐकलें होतें त्यामुळें मला स्वस्थ झोंप लागली नाहीं. कलावती इथें आली तेव्हां, या गांवांत आपलें कुणी ओळखीचें नाहीं, असें ती म्हणाली होती. मग तिनें डॉक्टर कोण कोण आहेत त्याचा तपास केला. आनंदरावांचें नांव तिला सांगितलें त्या वेळीं त्यांची आपली माहिती नाहीं असेंही ती बोलली होती. असा प्रकार असून आनंदरावांचें व तिचें इतकें सलगीचें बोलणें कसें झालें याचेंच मला राहून राहून आश्चर्य वाटूं लागलें व मला मोठें गूढच येऊन पडलें. मीं मनांत म्हटलें कीं ही आनंदरावांची ...यको असेल. पण मग माझी अशी कल्पना झाली याबद्दल मी आपणास दोष लावून घेऊं लागलें. तथापि त्यांत माझा कांहीं संबंध नव्हता म्हणून आपण जें काय ऐकलें तें आपल्या मनांत ठेवावें, कुणाजवळ बोलूं नये असें मला वाटलें. लक्ष्य आहे ना ? ”

इंदिरा म्हणाली:—“ आहे. चालूं दे तुझें. ”

थोडी आठवण केल्यासारखें करून सारजेनें पुनः सुरुवात केली:— “ दुसरे दिवशींही मला बरें वाटत नव्हतेंच. कारण रात्रीं डोळ्यास डोळा लागला नव्हता व दाढेनें तर काय, माझी पुरेवाट करून सोडली. दोन-

प्रहरनंतर माझ्या दोनी गालांना सूज चढूं लागली. संध्याकाळीं प्रताप-राव डॉक्टर बाळंतिणीची तब्येत बघायला आले तेव्हां त्यांना मीं माझी दाढ दाखविली. ते म्हणाले—सूज आली आहे, त्याला गरम कांहीं तरी बांधायला पाहिजे. त्या वेळीं सात वाजले होते, आनंदरावही तेव्हां येणार होते म्हणून साडेसात वाजेपर्यंत प्रतापरावांनीं त्यांची वाट पाहिली; तरी आनंदराव आले नाहींत. बाळंतिणीला त्या दिवशीं थोडा ताप आला होता. प्रतापराव माझ्यावर व मैनाई सुइणीवर फार रागावले. म्हणाले कीं तुह्मी बाळंतिणीबरोबर फार बोलत बसतां, तिला स्वस्थ पडूं देत नाहीं ह्मणून तिला त्रास होऊन हा ताप आला. आह्मीं म्हटलें—त्यांना बरें वाटतें ह्मणून त्याच बोलत बसतात, आमचें ऐकत नाहींत, झोंप येत नाहीं म्हणतात. तेव्हां ते म्हणाले कीं घरीं जाऊन झोंपेचें औषध पाठवून देतों. असें सांगून ते निघून गेले. मीही तोंडाला गरम कापड बांधावें म्हणून घरीं आलें. इकडे तिकडे पाहिलें पण लोकरीचें कापड कुठें दिसेना. इतक्यांत खुंटीवर माझी नजर गेली. माझ्या भावाचा एक काळ्या लोकरीचा गळपट्टा लोंबत होता त्याला दोनी बाजूंला लांब व बारीक दशा होत्या. तो गळपट्टा मीं घेतला व हनुवटीखालून एक तिढा घेऊन दोन्ही गालांवरून व डोकीवरून दोन्ही बाजूंनीं दोन पदर आणून तोंडाच्या खालच्या बाजूस गांठ दिली व अंगावर काळ्या लुगड्याची चौघडी पांघरून घेतली. त्या वेळीं माझी मूर्ति अगदीं पहाण्यासारखी होती. दोन्ही गाल सुजून लठ्ठ झालेले; डोकीवरून व गालांवरून ते गळपट्ट्याचे तिढे दिलेले आणि नाकाच्या दोन्ही बाजूंस ते लांब दशांचे ओवट. आक्का म्हणाली सुद्धां कीं कुणीं पाहिलें तर वाटेल हिला एकाएकीं इतक्या लांब कल्लेदार मिशा केव्हां आल्या! आणि खरेंच, मी जाऊन आरशांत पाहिलें तर हुबेहूब तसेंच मला दिसलें. जणुं शिमग्यातलें सोंगच. त्या दिवशीं मला बरें वाटत नव्हतें म्हणून निजावें असें माझ्या मनांत आलें. पण बाळंतिणीकडे एकदां जाऊन कांहीं पाहिजे असल्यास विचारून यावें म्हणून तिकडे गेलें. आघले रात्रींप्रमाणेंच मावशीबाई व मैनाई अशा दोघी-जणी स्वयंपाकघरांत बसलेल्या असून त्यांच्या गप्पा चालल्या होत्या. मी

कांहीं न बोलतां जिना चढून वर गेलें. बाळंतिणीच्या खोलीपुढें दुसरी खोली होती, त्या खोलींत कांहीं चाहूल मला ऐकूं आली. मला आश्चर्य वाटलें. 'कांहीं तरी जिन्नस पाहिजे असेल म्हणून बाळंतीणबाई बाजेवरून उठून या खोलींत आली असावी. अजूनी पांचवी सुद्धां झाली नाहीं आणि ही खोलींतून बाहेर पडते. वेडी तर नव्हे ?' असें आपलें माझ्या मनांत आलें. म्हणून बाळंतिणीच्या खोलीला जें बाहेरून दार होतें त्याच्या चिरुंडींतून मीं पाहिलें तर बाळंतीण बाजेवर स्वस्थ निजलेली होती. नंतर दुसऱ्या दारांतून पुढच्या खोलींत पाहिलें.—आंत दिवा होता. या खोलीच्या व बाळंतिणीच्या खोलीच्या दरम्यान जें दार होतें तें लावलेलें होतें. या पुढच्या खोलींत एक फडताळ असून त्यांत दिवा ठेवलेला होता, आणि तिथेंच औषधांच्या कांहीं बाटल्याही होत्या. त्या फडताळाच्या एका बाजूस आनंदराव उभे असल्याचें मला दाराच्या फटींतून दिसलें. त्यांच्या डाव्या हातांत एक अगदीं लहानशी कुपी होती व उजव्या हाताच्या बोटांनीं त्या कुपीचें बूच ते घट्ट बसवीत होते. बूच घातल्यानंतर त्यांनीं ती कुपी आपल्या जाकिटाच्या खिशांत ठेवली. मग त्यांनीं फडताळांतील औषधाच्या बाटल्यांपैकीं एक बाटली उचलून घेतली, व तिचें बूच फडताळांतच पडलेलें होतें ते जलदीनें घेऊन त्या बाटलीला बसविलें, आणि रात्रीचें औषध ज्या ठिकाणीं ठेवायचें त्या ठिकाणीं ती बाटली त्यांनीं ठेवून दिली, नि बाहेर येण्याकरितां ते निघाले. मी दाराच्या फटींतून तशीच पहात होतें. ते इतक्या गडबडीनें आले कीं बाजूला जाण्यास मला अवकाश मिळाला नाहीं. ते आंत काय करीत होते मला समजलें नाहीं. त्यांच्या हातून कांहीं भलतेंसलतें दुष्टपणाचें कृत्य झालें असेल असा संशय सुद्धां त्या वेळीं माझ्या मनाला शिवला नाहीं. मीं दाराच्या फटींतून पाहिलें तें सहज पाहिलें. त्यांत माझा लबाडीचा, किंवा चोरटेपणाचा हेतु नव्हता. पण मला आपलें वाटलें कीं आपण काय केलें तें दुसऱ्यानें पहावें हें त्यांना आवडावयाचें नाहीं, म्हणून ते आलेले पहातांच मी थोडी बाजूला सरकलें व भिंतीशीं अगदीं चिकटून उभी राहिलें. पण ती जागा फारच वाईट. चंद्राचें चांदणें आपलें नेमकें माझ्या तोंडावर ! दरवाजा

उघडून ते बाहेर पाऊल टाकणार इतक्यांत त्यांनीं मला पाहिलें. पण माझ्या तोंडाशिवाय त्यांना कांहींच दिसलें नाहीं. कारण मीं अंगावर काळ्या लुगड्याची घडी घेतलेली होती. शिवाय मानेपासून खालीं अंधारच होता. माझा चेहरा पाहिल्याबरोबर ते घाबरल्यासारखे झाले. ‘ तूं कोण ? येथें का ? असें ते पुटपुटले. पण मीं मनांत म्हटलें, उत्तर न द्यावें हें उत्तम. म्हणून मी जागच्याजागीं गप्प उभी राहिलें. मागें वळून ते खोलींत दिवा आणण्याकरितां म्हणून गेले. या अवकाशांत तिथेंच एक चोर खोली आहे त्यांत मी जाऊन लपून बसलें. ”

इंदिरा मध्येंच म्हणालीः—“ तर मग सारजाबाई, ज्याच्यासंबंधानें इतकी वाटाघाट झाली तो जिन्यावरचा चेहरा तुझाच तर ! ”

सारजाः—“ होय आक्कासाहेब, तो माझाच चेहरा. दुसऱ्या कुणाचा नव्हे. त्या वेळीं इतकी फोड करून मीं कुणाला सांगितलें नाहीं. कारण मला मग लोकांनीं विचारून विचारून पुरे पुरे केलें असतें. आनंदराव दिवा घेऊन आले व त्यांनीं चहूंकडे पाहिलें. मला त्यांची चाहूल आंत ऐकूं येत होती. पण मी त्यांना दिसण्याजोगी नव्हतें. बोलूनचालून ती चोरखोली. माहितगार मनुष्याशिवाय अगर बारकाईनें लक्ष देऊन पाहिल्याशिवाय कुणाच्या लक्षांतच यावयाची नाहीं. चोहोंकडे पाहून झाल्यावर ते खालीं गेले व जिन्यावर काळेभोर कल्ले असलेल्या मनुष्यासंबंधानें मावशीबाईंना कांहीं विचारीत असल्याचें मला ऐकूं आलें. ही सर्व गंमत पाहून माझें मलाच हांसूं येऊं लागलें. मीं जें कांहीं केलें तें जाणूनबुजून, बुद्धिपुरःसर केलें नव्हतें. तरी पण तें मीं केलें हें कुणाला समजूं नये असें मला वाटलें. खालीं चौकशी करून आनंदराव निघून गेले; व मावशीबाई दार लावून घेऊन मैनाबाईशीं बोलत बसल्या. तेव्हां मी हळूंच जिना उतरून खालीं आलें. तोंडाभोंवतीं बांधलेला गळपट्टा सोडून मीं पदराखालीं घेतला नि मग स्वयंपाकघराच्या दारावर थाप मारली, व जणुं मी आत्तां अशीच आलें, असें त्या दोघींना दर्शविलें. मीं थाप मारतांच वे म्हणून ही असाबाई ! म्हणून दचकून उठल्या व मावशीबाईंनीं दार उघडलें. पण त्या माझ्यावर भारी रागावल्या—म्हणाल्या, मुकाट्यानें यायला काय होतं !

हीं का येण्याची रीत! मीं जास्त कांहींच बोललें नाहीं. बाळंतिणीचा समाचार घेण्यासाठीं आलें असें सांगून मी पुनः माडीवरती गेलें. तेव्हां कलावतीबाई जाग्याच होत्या. माझें सुजून लठ्ठ झालेलें तोंड पाहून त्या हांसल्या. मीं मनांत म्हटलें माझे कल्ले ह्यांनीं पाहिले असते तर हांसून हांसून त्यांची मुरकुंडीच वळली असती."

वसंतराव सारजेच्या तोंडाकडे नजर लावून प्रत्येक शब्द काळजीपूर्वक ऐकत होते. ते मध्येंच ह्मणाले:—"औषधांत कांहीं तरी लबाडी झाली असावी असें त्या वेळीं तुला वाटलें नाहीं काय? संशय सुद्धां आला नाहीं?"

सारजाः—"नाहीं, लबाडी झाली असें वाटलें नाहीं. संशय तरी कसा यावा? आनंदराव म्हणजे इथले नामांकित डॉक्टर नव्हेत काय? औषधांत त्यांनीं कांहीं मिसळलें हें मला समजलेंच नाहीं; आणि जरी समजलें असतें तरी मला वाटलें असतें कीं ते डॉक्टरच आहेत, औषधांत कांहीं फेरबदल करणें त्यांना जरूर वाटलें असेल म्हणून त्यांनीं त्यांत कांहीं घातलें असेल. झालें?"

इंदिराः—"बरें, पुढें काय झालें?"

सारजाः—"नंतर मी घरीं जाऊन निजलें. सकाळीं उठतें तर गिरजाआक्कानें मला सांगितलें कीं प्रतापरावांनीं रात्रीं झोंपेचें औषध पाठवून दिलें होतें तें घेतल्याबरोबर बाळंतीण एकाएकीं मेली. हें ऐकल्याबरोबर मला जें काय झालें तें सांगतां येत नाहीं. आनंदरावांनीं त्या औषधांत कांहीं कमजास्त केलें असेल काय, असा एक भयंकर संशय माझ्या मनांत येऊन गेला. नंतर मला समजलें कीं औषध आणलें तेव्हांच त्याला विषाचा वास आनंदरावांना आला म्हणे. त्यावरून मला वाटलें कीं त्यांत पूर्वींच विष घातलेलें असावें. खोलींत आनंदराव एकटेच असून त्यांच्या हातांत बाटली असल्याचें मीं पाहिलें होतें. मला वाटूं लागलें कीं ते पुनः वास घेत असतील. एवढी मात्र माझी खात्री झाली कीं प्रतापरावांच्या हातून कांहीं चूक झालेली नाहीं. चौकशी होईपर्यंत माझ्या मनाची जी

आतां सांगतें, पण लोक खरा मानतील काय! बिलकुल मानणार नाहींत."

इंदिरा:—" तें खरें ग. पण मग आमची ताई तरी त्यांच्यासंबंधानें सावध राहिली असती. " असें ह्मणून इंदिरेनें सुस्कारा टाकला.

सारजा:—" पण माझें ऐकून तरी घ्या आक्कासाहेब. ताईसाहेबांनीं आनंदरावांच्या भुलथापांना भाळूं नये ह्मणून मीं माझ्याकडून शक्य तेवढे प्रयत्न केले. मी आपल्या घरीं प्रथम नोकरीला राहिलें तेव्हां आपला तो हुजऱ्या हैबती एकदां सहज बोलला कीं मोहनाताई रोज संध्याकाळीं अंधार पडला म्हणजे चोरून बागेंत जाऊन आनंदरावांशीं बोलत बसतात. सें ऐकल्यापासून माझ्या मनाला तळमळ लागून राहिली. आनंदरावांना उघडपणें मला प्रतिबंध करतां येईना, ह्मणून त्यांना भय दाखवावें व मोहनाताईनाही सूचना द्यावी अशी मीं युक्ति काढली. एके रात्रीं म्हणजे ते दोघेजण घरांतून पळून गेले त्याच्या आधले दिवशींच संध्याकाळीं मी हैबतीचा काळा झुबला अंगांत घातला, व तोंडाभोंवतीं तो लांब दशांचा काळा गळपट्टा बांधला, डोकीला हैबतीची ती टोपी घातली व त्यांची भेटण्याची जी जागा होती तिथें गेलें. ताईसाहेब एकट्याच होत्या; आनंदराव निघून गेले होते. जिथें पुष्कळ अंधार होता व जिथून मी त्यांना दिसणार नाहीं अशा ठिकाणीं जाऊन मी उभी राहिलें, व आपला आवाज बदलून घोगरा आवाज काढून आनंदरावांशीं जपून वागा अशी मीं त्यांना ताकीद केली. तुह्मी जाऊन ताईसाहेबांना विचारा पाहिजे तर. तिथून मी परत जात असतांना आनंदराव येत होते त्यांनीं मला पाहिलें. तितक्यांत मीं माझ्या डोकीची टोपी काढून हातांत घेतली. चंद्राच्या प्रकाशांत त्यांनीं माझा चेहरा पाहिला, त्याबरोबर ते घाबरले. मागें त्या रात्रीं जिन्यांत जो चेहरा आपणाला दिसला तोच हा असें त्यांनीं ओळखलें असावें. नंतर ते तिथून निघून जाईपर्यंत मी तशीच झाडांमध्यें लपून राहिलें. यानंतर सुद्धां याच वेषांत एक दोन वेळां मी त्यांच्या दृष्टीस पडलें आहें. आक्कासाहेब, धनीसाहेब वारल्यानंतर आम्ही मुंबईहून इथें आलों त्या रात्रीची आपणास आठवण असेलच. स्टेशनावरून येतांना आनंदरावांच्या घरावरून आलों, तिथें ताईसाहेब उतरून गेल्या, पण त्यांची पेटी गाडींत

राहिली ती त्यांच्याकडे पोंचती करून ये म्हणून आपण सांगितलेंत; आठवतेंना ? पेटी नेऊन मी देवडीवर त्यांच्या गड्याच्या स्वाधीन केली नि परतलें तर खिडकींत उजेड दिसला म्हणून सहज आंत पाहिलें. त्या वेळींही माझी दाढ सुजलेली असल्यामुळें मागच्या प्रमाणेंच मी तोंडा-भोंवतीं गळपट्टा बांधला होता. खिडकीला भिंगाचीं दारें होतीं त्या दारांतून, भिंगास नाक लावून मी आंत पाहूं लागलें, तर आनंदराव कायसें करीत उभे होते. त्यांना माझा चेहरा अर्थात् रुंद व कळे असलेला असा दिसला. पूर्वी ज्या चेहऱ्यानें आपणास दोन वेळां भय दाखविलें तोच हा चेहरा असें त्यांनीं ओळखलें असावें. ते फारच घाबरून गेलेले दिसले. मग मी झटदिशीं तेथून चालती झालें. तरी जातां जातां आनंदराव घाबरून ओरडल्याचें मीं ऐकिलें—"

वसंतरावः—" सारजाबाई, तुला पाहून त्यांना भय कां वाटावें, सांगतां येईल ? "

सारजाः—" हो असें पहा. त्या रात्रीं जिन्यांत प्रथम त्यांनीं मला पाहिलें—नव्हे, माझा चेहरा त्यांनीं पाहिला, कारण मला त्यांनीं ओळखलें नाहीं—तेव्हां औषधांत आपण विष घातलेलें ह्या गृहस्थानें—म्हणजे मीं—पाहिलें कीं काय कोण जाणे असें त्यांना भय वाटलें. मग त्यांनीं चौकशी केली तेव्हां घरांत कोणीच परकें माणूस आलें नाहीं, अगर सांपडलें नाहीं असें जेव्हां त्यांना आढळून आलें तेव्हां मग ते म्हणूं लागले कीं आपणाला निव्वळ भास झाला, किंवा कांहीं तरी भूतचेष्टा झाली असावी. माझी तर कल्पना अशी झाली आहे कीं, तो चेहरा खरोखरीच्या, चालत्या बोलत्या माणसाचा असावा असें एकदां त्यांना वाटलें असावें. एकदां खरा नसून भास झाला असेंही वाटलें असावें, याप्रमाणें त्यांच्या मनांत एकसारखी खळबळ उडालेली असावी व दोनींचीही पूर्ण भीति त्यांना वाटली असावी."

" असें असेल." असें म्हणून वसंतरावांनीं मान हालविली.

सारजा पुढें म्हणालीः—" ह्या गोष्टीला पुष्कळ वर्षे लोटलीं. पण मला आपली नेहमीं एकप्रकारें आनंदरावांची भीतिच वाटे. मला वाटूं लागलें कीं त्यांच्या जवळ कोणीच सुरक्षित राहणार नाहीं. हा माझा वेडे-

पणाच म्हणायचा. पण मला तसें वाटे एवढें खरें. लीलाताईंना ताप आला आणि आनंदरावांनीं त्यांना आपल्या घरींच ठेवून घेतलें, तेव्हां मला भारी भय वाटलें. न जाणो त्यांचेंही कांहीं बरेंवाईट करण्याचा त्यांचा हेतु असेल, असें मला वाटलें. म्हणून वसंतरावांची व त्यांची रात्री खडाजंगी उडाली आणि त्या दंगलींत दिवा गेला तेव्हां अंधारांत आनंदरावांच्या कानांत मी कांहीं शब्द पुटपुटलें ते त्यांना रुचले नाहींत. मला त्यांची भीति वाटली म्हणून मीं असें केलें. पुनः एक दोन दिवस गेल्यावर मी तो गळपट्टा आणखी तोंडाभोंवतीं बांधला. हा गळपट्टा मीं इतके दिवस जपून ठेवला होता. पहिल्या दिवशीं जिन्यांत मी जशी त्यांना दिसलें तशीच दिसावी म्हणून गळपट्टा बांधून दिवाणखान्याच्या खिडकीबाहेर अंधारांत मी उभी राहिलें—"

"परंतु त्यांनीं तुला एकदां सुद्धां ओळखलें नाहीं हें फारच चमत्कारिक!" वसंतराव म्हणाले.

सारजा:—"यांत चमत्कारिक कांहीं नाहीं. तो लांब लांब दशा असलेला गळपाट्टा तोंडांभोंवतीं बांधला म्हणजे माझा चेहरा किती बदलतो याची तुम्हांला कल्पना नाहीं. हुबेहूब पुरुषाप्रमाणें माझें तोंड दिसतें. शिवाय आनंदरावांनीं पाहिलें तेव्हां उजेड चांगलासा नव्हता, साधारण अंधारच म्हणावयाचा. तरी पण मला वाटतें कीं त्यांनीं मला, ओझरतें कां होईना, पण ओळखलें असावें. कारण त्या दिवशीं ताईसाहेब हासत हासत सांगत होत्या कीं, तुझ्याकडे पाहिलें कीं माझे यजमान नाक मुरडतात म्हणून, त्यावरून म्हणतें. इतकें झालें तरी आक्कासाहेब, मी खरोखरी सांगतें, मावशीबाईच्या घरीं बाळंतपण होऊन बाई मेल्या त्याचा या आपल्या घराशीं काहीं तरी संबंध असावा, आपलें त्यांचें काहीं नातें असावें, असें माझ्या मनांत सुद्धा कधीं आलें नाहीं हो. खरेंच, कद्धीं कद्धीं नाहीं."

असें म्हणून सारजा डोळ्याला पदर लावून हुंदके देऊं लागली. तिला जें काय सांगावयाचें होतें तें तिनें एकदाचें सांगून टाकलें. हा खरा प्रकार ऐकून सर्वांना फारच आश्चर्य वाटलें, व थोडा वेळ सर्वत्र सामसूम झालें. प्रत्येकजण आपआपल्या परी विचारांत गर्क होऊन गेला.



# प्रकरण १४ वें.

—:०:—

## वकिलांची तार.





आनंदरावांच्या अपराधित्वाबद्दल आतां कांहीं शंकाच राहिली नाहीं. सारजेची हकीकत सांगून झाल्यानंतर इंदिरा व वसंतराव आपआपल्या मनाशीं विचार करूं लागले. एकमेकांच्या तोंडाकडे पहाणें सुद्धां त्यांना बरें वाटेना. सारजा तेथून निघून गेली होतीच. लीला अंथरुणावर जाऊन पडली. ती वयानें लहान असून जगाचा अनुभव तिला कांहींच नव्हता. आपल्या आनंदरावांच्या हातून असा भयंकर प्रकार झाला असेल हें तिला खरें वाटेना, व हें काय गौडबंगाल आहे तिला कळेना. तिला कसेंसेंच वाटूं लागलें व हुडहुडी भरून तापही आला.

वसंतरावांनीं प्रथम बोलण्यास सुरवात केलीः—" आक्कासाहेब, मागें माझी व आनंदरावांची रस्त्यांत खडाजंगी उडाली. तुह्मी सहज तेथें जवळच आपल्या बंगल्याच्या दरवाजांत उभ्या होतां. तुह्मांला आठवत असेल. मी त्यांना जे शब्द बोललों ते तुमच्या लक्षांत आहेत काय ? "

इंदिराः—"हो, तुह्मीं आनंदरावांवर जो आरोप केला तो नेहमीं माझ्या मनांत येतो."

वसंतरावः—" ह्या हकीकतीशीं तें सर्व जुळतें."

पुनः थोडा वेळ दोघेही स्तब्ध राहिले. नंतर इंदिरा पुटपुटली:— "आनंदरावांशींच कमळजेचें लग्न झालें असलें पाहिजे."

वसंतराव:—"त्यांत कांहीं संशयच नाहीं. ती जर त्यांची बायको नसती तर तिला आपल्या मार्गांतून दूर करून टाकण्याची त्यांना आवश्यकताच वाटली नसती. आम्हीं आतां असेंच मानिलें पाहिजे कीं, त्यांनीं जें केलें तें दुसरीशीं लग्न करतां यावें म्हणून. दुसरा संभवच दिसत नाहीं." असें जरा भीत भीत वसंतराव ह्मणाले.

ही दुसरी बायको कोण हें लक्ष्यांत घेतलें म्हणजे वसंरावांनीं हे शब्द भीत भीत कां उच्चारिले तें कळून येईल. इंदिरा स्फुंदस्फुंदून रडूं लागली. तिला दुःख आवरेना. ती नंतर ह्मणाली:—"आज इतकीं वर्षें सारजेनें ही भयंकर गोष्ट आपल्या मनांत कशी ठेवली कोण जाणे!"

वसंतराव:—"अक्कासाहेब, मला नाहीं त्याचें इतकेंसें वाटत. मागील सर्व गोष्टी लक्ष्यांत घेतल्या म्हणजे मला असें वाटतें कीं, सारजाबाईला दुसरें कांहीं करतां येणें शक्यच नव्हतें. मला सुद्धां प्रथम असें वाटलें कीं, तिला ही हकीकत माहीत होती तर त्याच वेळीं तिनें कां सांगितली नाहीं व ती सांगून माझ्या बाबांना दोषमुक्त कां केलें नाहीं? पण त्याबद्दल आतां निर्विकार मनानें विचार केल्यावर मला वाटूं लागलें आहे कीं मी तिच्यावर विनाकारण रागावलों. तिनें हकीगत सांगितली असती तर ती म्हणते तसेंच झालें असतें. तिचें सांगणें कोणींच खरें मानलें नसतें व लोकांनीं उलट तिची छी थू केली असती."

इंदिरा:—"पण आनंदरावांची व कमळजेची पहिली भेट झाली तेव्हां त्या दोघांचें जें बोलणें झालें तें तिनें सांगितलें असतें तर? त्यावरून त्या दोघांची पूर्वींची ओळख होती, संबंध होता, इतकें तरी सिद्ध झालें असतें व मागच्या सर्व गोष्टी समजून आल्या असत्या."

वसंतराव:—"होय, पण जर तिचें सांगणें खरें वाटलें असतें तर! त्यांतच सर्व आहे. माझें तरी असें मत आहे कीं पुष्कळ हिश्शांनीं तिचें बोलणें कोणीं खरेंच मानलें नसतें. आनंदरावांनीं तिच्या केव्हांच चिंधड्या उडवून दिल्या असत्या व आपलेंच म्हणणें खरें केलें असतें."

" बरें, आतां पुढें काय करायचें ? " इंदिरा डोळे पुशीत ह्मणाली.

वसंतरावः—" करायचें काय ? कांहीं करावयाचें नाहीं. आनंदरावांवर फिर्याद करणें, त्यांच्यावर काम चालविणें तुह्मांला बरें वाटणार नाहीं. आतां तुमचा त्यांचा संबंध निराळा आहे."

इंदिराः—" आनंदरावांवर फिर्याद ? छे छे ! माझ्या बोलण्याचा तसा उद्देश नाहीं. ही गोष्ट देखील माझ्या मनांत नाहीं, समजलें ? कमळजा काय नि मोहना काय, मला सारख्याच. दोघीही माझ्या सख्या बहिणी. कमळजा मेली गेली, सगळें झालें. तिच्याबद्दलचा सूड मोहनेवर घेणें बरें नव्हे. माझ्या बोलण्याचा तसा अर्थ नाहीं. माझें म्हणणें एवढेंच कीं आतां आमच्या ताईची वाट काय ? तिनें आनंदरावांजवळ याउपर राहणें ठीक नाहीं."

हा फार नाजूक विषय असल्यानें त्यासंबंधानें विशेष चर्चा करणें बरें नव्हे असें वाटून वसंतराव म्हणालेः—

" आक्कासाहेब, मी या गोष्टींत बोलणार नाहीं. इतकीं वर्षें त्यांच्याजवळ त्या नाहीं का राहिल्या ? मग आतांच काय झालें ? "

नंतर इंदिरेनें मोहनेल्या सांपडलेला पत्राची हकीकत वसंतरावांना सांगून म्हटलेंः—" आनंदरावांनीं तें पत्र इतके दिवस आपल्या पेटींत कसें जपून ठेवलें ! हें त्यांचें धारिष्टच म्हणायचें ! "

वसंतरावांनीं चटकर उत्तर दिलेंः—" हेंच तर समजत नाहीं. अपराधी माणसें नेहमीं अशा कांहीं विलक्षण चुका करितात कीं त्याचें सर्वांना आश्चर्य वाटतें. तशापैकींच ही चूक असावी. त्यांच्या बुद्धीला कांहींतरी भ्रंश होतो व तोच मग त्यांच्या नाशाला कारणीभूत होतो; म्हणच आहे—' आधीं जाते बुद्धि आणि मग जातें भांडवल."

पण वसंतरावापेक्षां माझे वाचकच—जर त्यांना बरोबर आठवत असेल तर—या गोष्टीचा बरोबर खुलासा करूं शकतील. आनंदरावांनीं या कामांत स्वतःस विघातक अशा पुष्कळ चुका केल्या असतील. नाहीं म्हणवत नाहीं तरी पण ही चूक तशी नव्हती. त्यांनीं हें पत्र कांहीं हेतुपुरःसर ठेविलें नव्हतें. त्यांनीं तें पुष्कळ हुडकलें पण त्यांना तें सांपडलें नाहीं ही

हकीकत वाचकांना आठवत असेलच. त्यावरून त्यांचा असा ग्रह झाला कीं इतर किरकोळ पत्रें, चिठ्या वगैरे कागद आपण जाळले त्यांतच हेंही पत्र जाळून टाकलें असावें. एक पत्र मात्र त्यांनीं या पेटींत जपून ठेविलें होतें खरें. हें पत्र आपल्या वडिलांचें आहे, जपून ठेवावें, पुढें मागें त्याचा उपयोग होईल असें मनांत आणून त्यांनीं तें ठेवलें होतें. पण वास्तविक स्थिति अशी होती कीं त्यांनीं वडिलांचें म्हणून जें पत्र ठेविलें तें हें पत्र. व खरोखरी वडिलांचें जें पत्र होतें तें त्यांनीं जाळून टाकिलें. असा हा पत्रांचा घोंटाळा झाला. येथें त्यांची मोठी चूक झाली. आतां ही चूक सहज झाली, कधीं व्हावयाची नाहीं असें कोणी म्हणतील. म्हणूं देत, पण नेहमींचा असा अनुभव आहे कीं असे भयंकर स्वरूपाचे मोठेमोठे गुन्हे जेव्हां उघडकीस येतात तेव्हां असल्या क्षुल्लक परंतु सहजासहजीं घडलेल्या गोष्टीच त्यांत फार असतात. वडिलांचें म्हणून जपून ठेवलेलें पत्र पुनः पाहण्याचें आनंदरावांना कारणच पडलें नाहीं. अर्थातच तें पत्र जागच्याजागींच तसेंच पडून राहिलें आणि शेवटीं त्यांच्या दुराग्रही व मत्सरग्रस्त पत्नीनें तें बाहेर काढलें. आनंदरावांनीं आपल्या बायकोचें मन दुखविलें नसतें व आपल्या वर्तनानें तिच्या मनांत संशय उत्पन्न केला नसता तर आजन्मांत हा गुन्हा त्यांच्यावर कधींच शेकला नसता. कारण ह्या पत्रामुळेंच सर्व प्रकार बाहेर आला, ज्या ठिकाणीं अपराध स्थापन होणें योग्य होतें तेथेंच नेऊन या पत्रानें भिडविलें व जो मनुष्य खराखुरा गुन्हेगार त्याला याच पत्रानें जगाच्या पुढें आणलें. या एकंदर प्रकरणाचा जो तपास लागला त्यांत बुद्धि, चातुर्य व कल्पकता अगदींच दिसून आली नाहीं असें नाहीं, तथापि यापेक्षां काकतालीय न्यायानेंच सर्व गोष्टी उघडकीस आल्या हेंच म्हणणें जास्त शोभेल.

इंदिरेनें तें पत्र वसंतरावांना दाखावेलें असतें,पण तें तिच्याजवळ नव्हतें. ती दर्याबाईकडे गेली होती तेव्हां त्यांनीं तें तिच्याकडून मागून घेतलें होतें. तथापि त्या पत्रांतील एकंदर मजकूर इंदिरेनें वसंतरावांना सांगितला. त्याबरोबर त्यांनीं चटकन् जुळणी बसविली:—" आक्कासाहेब, खरें हो खरें. हें पत्र तिनें आपल्या नवऱ्याला—म्हणजे आनंदरावांनाच लिहि-

आहे. परंतु तुह्मी सांगतां त्यावरून पत्राची भाषा विनोदी दिसते, ला माहिति आहे त्यालाच समजेल; दुसऱ्याला कांहीं समजणार नाहीं. तील 'प्राणनाथ' व 'बोलावणें पाठविलेले डॉक्टर' हे दोघे मिळून च व्यक्ति आहे हें सहसा कोणाच्या लक्ष्यांत येणार नाहीं. आक्कासाहेब, त्र एकदां बाबांना दाखवावें म्हणतों."

इंदिराः—"हो, दाखवायला काय हरकत आहे? मात्र त्या पत्राचा योग आनंदरावांविरुद्ध तुमचे वडील करणार नाहींत एवढी खात्री झाली म्हणजे झालें."

आपल्या वडिलांच्या—प्रतापरावांच्या—हातून असा प्रकार केव्हांही हो- नाहीं, त्यांचा स्वभाव दयाळू आहे, त्यांतून तुमचा व आमचा आणि नंदरावांचा पाहुणेपणाचा संबंध लवकरच जुळणार असल्यानें, आनंद- वांच्या विरुद्ध त्या पत्राचा उपयोग प्रतापरावांकडून बिलकुल होणार हीं, त्याबद्दल तुह्मी निर्धास्त अ ना असें वसंतरावांनीं इंदिरेला आश्वा- न दिलें.

तें पत्र व त्याबरोबर सर्वच प्रकरण गुप्त राखण्याचा इंदिरेनें व वसंत- वांनीं जरी इकडे बेत केला तरी त्याच्या अगदीं उलट खटपट दुसरी- सुरू झाली. इंदिरेनें आणलेलें पत्र पाहिल्याबरोबर दर्याबाईंना नंदरावांचें कृष्णकारस्थान पूर्णपणें समजून चुकलें व हा सर्व प्रकार पुढें आणण्यासाठीं व न्यायाच्या कोर्टापर्यंत त्याची मजल नेऊन पोंच- ण्यासाठीं त्यांचे भगीरथ प्रयत्न सुरू झाले.

काय चमत्कार आहे पहा! सहज घडून आलेल्या गोष्टी, सहजीं च्चारलेले शब्द, दिसण्यांत अगदीं क्षुल्लक, पण त्यापासून केवढाल्या यंकर गुन्ह्याचा तपास लागलेला आहे! आपल्या मधघरांतील फडताळ घडून त्यांत आनंदराव कांहीं शोधीत असल्याचें पाहिल्यापासून दर्या- ईना त्यांचा संशय आला होताः—कलावतीचे हेच यजमान, निदान सर्व मागच्या प्रकरणाशीं यांचा कांहीं तरी गुप्त संबंध आहे, असा रदस्त संशय त्यांना आला होता. तशांत त्या लहान मुलग्यानें—सोन्यानें— ना आणखी सांगितलें कीं मधघरांतील पेट्या, कपाटें हीं सुद्धां डॉक्ट-

रांनीं शोधून पाहिलीं असावीं. ते कांहीं खडबड करीत होते व
माडीवरही गेले होते. यायोगानें तर दर्याबाईंना फारच आश्चर्य वा
व त्यांचा संशय दुणावला. त्यांनीं या गोष्टीचा आपल्या मनाशीं पु
विचार केला आणि जेव्हां वेळ आली—आतां ती आलीच म्हणावयास
व मागील गोष्टींशीं संबंध जोडणारा असा नवीन लेखी पुरावा जे
त्यांच्या हातांत आला, तेव्हां आनंदरावांसंबंधानें बरेंच काळें त्यां
मनांत आलें.

मागें एके दिवशीं तिसऱ्या प्रहरीं दर्याबाईच्या घरीं दर्याबाई, माव
बाई व सारजा यांचें त्रिकूट जमलें होतें; काम आहे म्हणून सारजा नि
गेली तरी तिची जागा मैनाईनें भरून काढल्यामुळें पुनः त्रिकूटचें
कूट कायम राहिलें. सारजेला वाटेंत आनंदराव भेटले. तेही द
बाईच्या घराकडेच निघाले होते. तिकडून आनंदराव घरीं आले
दर्याबाईच्या घरीं कांहीं कमी जास्त प्रकार होऊन त्रासलेले दिसत हो
वगैरे सर्व हकीगत आमच्या वाचकांच्या ध्यानांत असेलच. आनं
रावांना इतका त्रास येण्याचें कारण असें झालें कीं, मावशीबाईचें
आनंदरावांचें सहसा कधीं भाषण होत नसे. पण काय असेल तें अस
त्या दिवशीं आनंदराव आल्याबरोबर मावशीबाईनीं कलावतीसंबंधानें बोल
ण्याला सुरवात केली. त्या एकदां बोलूं लागल्या म्हणजे काय बोलावें व बो
नये याचा ताळ त्यांना राहत नसे. मावशीबाईनीं आनंदरावांना स्पष्ट सांगि
तलें कीं मागें मुलाला घेऊन गेल्या त्याच ह्या दर्याबाई. इतकेंच नव
तर डॉक्टरांना रुचणार नाहीं अशा तऱ्हेची मागील प्रकरणासंबंधीं बडब
त्यांनीं सुरू केली. त्यांच्या जोडीला मैनाईही मिळाली व त्या दोघीं
मिळून सवड सांपडली तितकें बोलून घेतलें; त्यांत बिलकूल कसूर के
नाहीं. मावशीबाईच्या शेवटच्या भाषणानें तर कळसच झाला:—" डॉक्ट
ती या गांवांत आली त्याच दिवशीं तुमची व तिची माहिती असल्या
ऐसलें, कारण, कलावतीनें—"

आनंदराव इतका वेळ सोन्याच्या गुडघ्याला मलम चोळीत हो
रील शब्द ऐकतांच त्यांनीं डोळे वटारून मावशीबाईकडे पाहिलें, त्या

लेलेंी त्या थोड्या थबकल्या; पण त्यांना धोरण कमी असल्यानें आनंद-
ज्यांचा उद्देश त्यांना कळला नाहीं, व त्यांनीं आपलें चऱ्हाट सुरू
पत्रांचः—" कलावतीनें विचारलें-इथें डॉक्टर कोण कोण आहेत ? तेव्हां
एकामबंधूचें व तुमचें नांव मीं तिला सांगितलें. मग तिनें तुमच्या नांवानें
तें पो लिहिली नि मला सांगितलें कीं, एवढी पोंचती कर म्हणून—मी
ीं खोटें सांगत नाहीं. इतके नकोत माझ्यावर डोळे वटारावयाला !
उपासी इतके वटारलेत ह्मणून तुमच्या डोळ्यांत मी रहावयाची नाहीं,
अरे डॉक्टर ! मी ती चिठी घेऊन खालीं आलें नि सारजेला 'वाच'
लें. 'डॉक्टर आनंदराव देशमुख' असा पत्ता तिनें वाचला. पण
णा मोठें आश्चर्य वाटलें डॉक्टर, तुमचें आडनांव तिला काय टाऊक
आ सारजा म्हणाली कीं त्या अडुळशाशेजारच्या बाईनें तिला सांगितलें
रावें ह्मणून. पण मीं मग त्या बाईलाही विचारलें. ती म्हणाली कीं
नाण सांगितलें नाहीं. तेव्हां मग—"

सतक्यांत आनंदराव संतापून ह्मणाले:—" दर्याबाई, मुलगा इतका
ारी असतांना असा दंगा येथें चालणें बरें नव्हे. त्याला त्रास होतो.
राणचार दिवस बंद राहूं द्या. समजलें ?"

कआनंदरावांचें हें त्रासिकपणाचें बोलणें ऐकून मावशीबाई बऱ्याच दब-
अशा. आनंदरावांनीं मुलाच्या गुडघ्याला औषध लावून वरती गरम
जकें बांधलें व पथ्यापाण्यासंबंधानें दर्याबाईजवळ कांहीं सांगून ते तेथून
बिनें घरीं गेले.

आनंदराव दरवाज्याच्या बाहेर पडतांच मावशीबाई नाकपुड्या फुल-
उ म्हणाल्याः—" यांना इतका राग येण्यासारखें मीं केलें तरी काय ?
भाकोपीच मेले !"

उदर्याबाई:—" तें असो खरें. पण त्यांच्या आडनांवासंबंधानें तुह्मी
बा ह्मणत होतां, तें सांगा पाहूं. मी पूर्वीं कधीं ऐकलें नाहीं."

त्मावशीबाई:—"विशेष कांहीं नाहीं. पाकिटावर 'डॉक्टर आनंदराव
जमुख' असा पत्ता लिहिला होता. ह्मणून मला वाटलें कीं त्यांचें आडनांव
तामुख' हें तिला कसें कळलें? याचें अजून देखील मला आश्चर्य वाटतें."

दर्याबाई:—" आनंदरावांचें आडनांव ' देशमुख ' का ? "

मावशीबाई आश्चर्यानें ह्मणाल्या:—" म्हणजे ? तुम्हांला उ माहीत नाहीं ? सगळ्या गांवाला माहीत आहे. " सगळ्या गांवाला म असलें तरी दर्याबाईना माहीत नव्हतें एवढें खरें. त्यांनीं पूर्वी कधीं असेल पण त्यांच्या ध्यानांत तरी नव्हतें.

दर्याबाईना आनंदरावांचें आडनांव समजलें ही दिसण्यांत क्षुल्लक गोष्ट; पण त्यामुळें आणि मावशीबाईच्या बोलण्याचा आनंदरा राग आला यामुळें दर्याबाईच्या मनावर विलक्षण प झाला. त्यांना वाटलें, कलावतीचेंही आडनांव तेंच होतें, तेव्हां आनंद तिचे यजमान असावेत; तथापि त्यांची खात्री होईना. इंदिरा त्य कडे आज सकाळीं गेली होती त्या वेळीं " या गोष्टीचा तपास लावाव मनांत आहे पण जुळणीच बसत नाहीं " असें दर्याबाई ह्मणाल्या. इंदिरेनें स्वतःजवळ असलेलें पत्र त्यांना दाखविलें. तें पाहतांच दर् विचारांत मग्न झाल्या व किती वेळ तरी पत्राकडे नजर लावून ब आणि शेवटीं इंदिरेला म्हणाल्या:—" तास दोन तास हें पत्र म जवळ असूं द्या. कांहीं हरकत नाहीं ना ? निवांतपणीं मी त्यास विचार करणार आहें. "

इंदिरेची कांहीं हरकत नव्हतीच. तिनें तें पत्र दर्याबाईजवळ व ती निघून गेली. ती गेल्यानंतर दर्याबाई हातांत तें पत्र घेऊन करीत बसल्या. त्या कोणत्या गोष्टीसंबंधानें विचार करीत होत्या ? दराव खरोखर अपराधी आहेत अगर नाहींत, या गोष्टीचा नव्हे, पत्रांतील मजकुरानें या प्रश्नाचा निकालच लाविला होता. तर अ रावांवर अपराध कसा शाबीत होईल व त्यांना शिक्षा कशी होई गोष्टीचा त्या विचार करीत होत्या. कलावतीचा-कमळाबाईचा ज्यानें घात तो इसम जर सांपडेल तर त्याला न्यायाच्या कोर्टासमोर आणावया असा दर्याबाईचा पूर्णपणें निर्धार झाला होता. तो इसम म्हणजे रावच अशी आतां त्यांची खात्री झाली. तिकडे सारजेनें सांगितलेली कत ऐकून आनंदराव गुन्हेगार आहेत असें इंदिरेला वाटलें आणि

सारजेची हकीकत न ऐकतां अन्य तऱ्हेनें दर्याबाईच्या मनाची खात्री झाली. मुलगा मेल्याची बातमी मैनाई सुइणीच्या कानावर पडतांच ती समाचारासाठीं ह्मणून दर्याबाईकडे आली, व तिनें नक्राश्रु ढाळले; नंतर तिच्या माहितीनें पुढील सर्व व्यवस्था दर्याबाईनीं उरकून घेतली. संध्याकाळच्या वेळीं त्या दोघीजणी मागील सर्व प्रकरणासंबंधीं बोलत बसल्या होत्या. 'आतां पुढें काय करावें? कोर्टांत जाऊन एकदम फिर्याद मांडावी कीं अगोदर वकिलाकडे जाऊन त्याची सल्ला घ्यावी!' असा विचार मनांत येऊन दर्याबाईनीं विचारिलें:—"इथें मॅजिस्ट्रेट कोण आहेत?" हा प्रश्न ऐकून मैनाईला आश्चर्य वाटलें. ती म्हणाली:— "मॅजिस्ट्रेट हो कशाला! मुलगा मेल्याचें चावडीवर जाऊन कळविलें म्हणजे झालें. मी जातां जातां सांगून पुढें जाईन. समजलें?" दर्याबाई म्हणाल्या:—"त्यासाठीं नव्हे. माझें कांहीं दुसरेंच काम आहे. बरें, इथें वकील तरी कोण कोण आहेत? अगदीं हुषार; हातखंडा हो! कज्जा हातांत घेतला कीं जिंकल्याशिवाय रहायचाच नाहीं असा वकील सांगा. फी लागेल तितकी देईन, त्याची नको काळजी." नंतर यशवंतराव रोडे ह्मणून 'हुषार अनुभविक व कायदेपंडित' अशा वकिलाचें नांव मैनाईनें सांगितलें. त्याबरोबर दर्याबाईनीं जाऊन त्यांची गांठ घेतली.

आडनांव 'रोडे' पण स्वारी अंगानें बरीच स्थूल दिसली. वकीलसाहेब मुद्दाम तयार करविलेल्या एका प्रशस्त खुर्चीवर बसलेले होते. पुढें एक टेबल असून त्यावर बरेचसे कागदपत्र व एके बाजूस पुष्कळशीं पुस्तकें ठेवलेलीं दिसत होतीं. दर्याबाईनीं आपण येण्याचें कारण कळवून पहिल्यापासून शेवटपर्यंत सर्व हकीकत सांगितली. ती ऐकून वकीलांना फार आश्चर्य वाटलें. 'यांत कांहीं चूक नाहीं ना? ही खरी खरी हकीकत काय?' असें पुनः पुनः त्यांनीं विचारिलें. आनंदराव म्हणजे नामांकित डॉक्टर, वर्तन सचोटीचें, बोलणेंचालणें गोड. सर्व गांवाला हवे असलेले! आणि त्या आनंदरावांनीं कलावतीचा जीव घेतला! ती कलावती आनंदरावांची बायको, व इंदिरा आक्कासाहेबांची बहीण, जहागीरदारांची मुलगी! म्हणजे काय हें! नाटकांत, कादंबऱ्यांमध्यें असा

विलक्षण प्रकार पाहण्यांत व वाचण्यांत येतो, पण खरोखर अशी हकीकत घडल्याचें आपण तरी कधीं पाहिलें नाहीं व कधीं ऐकलेंही नाहीं असें वकीलसाहेब मनांत म्हणाले.

दर्याबाईनीं शांतपणानें वकिलाच्या एकंदर प्रश्नांचीं समर्पक उत्तरें दिलीं. व शेवटीं " आज इंदिरा आक्कासाहेबही माझ्याकडे सकाळीं आल्या होत्या, त्यांनीं एक पत्र मजकडे दिलें आहे, हें पहा." असें ह्मणून दर्याबाईनीं तें पत्र वकिलांच्या हातांत दिलें. पत्र वाचून झाल्यावर त्यांना वाटूं लागलें कीं दर्याबाई म्हणतात त्याप्रमाणें प्रकार घडला असावा, निदान यांत कांहीं तरी भानगड खास आहे. कलावतीच्या मरणाची इत्थंभूत हकीकत त्यांना माहीत होती, कारण ते तेथचे होते. त्यांनीं मागच्या सर्व गोष्टी ध्यानांत आणिल्या व नंतर विचारिलें:—" इंदिरा आक्कासाहेबांना आनंदरावांचा संशय येत आहे काय ?"

दर्याबाई:—" त्यांना नाहीं येत. कलावतीचा नवरा आनंदराव अशी मुळीं त्यांना कल्पनाच नाहीं. कलावतीचें लग्न कोणा कलावंत नांवाच्या गृहस्थाबरोबर झालें असावें असें त्यांच्या मनानें घेतलें आहे. तरी पण त्यांना असेंही वाटतें, कीं त्या कलावंताचे आनंदराव हे स्नेही असून लग्न झाल्याचें त्यांना माहीत आहे आणि कलावतीच्या मरणासंबंधाचीही बरीच हकीकत त्यांना ठाऊक आहे; पण ते ती सांगत नाहींत."

वकील:—" बरें तसें कां होईना ? तुह्मी ह्मणतां त्याप्रमाणें आनंदरावांना जास्त माहिती आहे असें जरी ग्रहीत धरलें तरी त्यांनीं त्या बिचाऱ्या कलावतीचा घात कां करावा ? त्यांत त्यांचा हेतु काय ? हें कोडें तुह्मी कसें सोडवितां तें सोडवा अगोदर." असें म्हणून वकीलसाहेबांनीं टेबलावर हात आपटले.

दर्याबाई:—" हेतु कसला समजावयाचा नि कोडें कसलें सोडवायचें ? आपण रहातों त्या गांवीं ती आली, आतां आपले बेत फसतील, तिचें आपलें पूर्वीं लग्न झालें आहे ही गोष्ट उघडकीस येईल, अशी त्यांना भीति वाटली असावी; दुसरें काय ?"

वकील मिशीला पीळ देऊं लागले. विचारांत असले म्हणजे असें

करण्याची त्यांना संवयच पडली होती. थोड्या वेळानें ते ह्मणाले:—"हें पहा, बाई, ती त्यांचीच बायको, तिचें त्यांच्याशीं लग्न झालें होतें असें खात्रीलायक कोठें सांगतां येतें ?"

दर्याबाई झणकाऱ्यानें बोलल्याः—"आणखी खात्रीलायक खात्रीलायक तें काय ? मला आहे त्याची खात्री. तुमचें लग्न झालें आहेना ? माझेंही झालें आहे. तुमच्या किंवा आमच्या लग्नासंबंधानें जितकी खात्री देतां येईल तितकीच तिच्या लग्नाबद्दल देतां येईल."

वकील शांतपणानें ह्मणाले:—"बाई, अशी घाई करूं नका. यांत मुख्य गोष्ट ही आहे कीं पुरावा चांगला झाला पाहिजे. मग त्यावरून हेतु काढतां येईल. बरें, त्या दोघांचें लग्न कुठें झालें याची कांहीं माहिती तुह्मांला आहे का ?"

दर्याबाई:—"नाहीं. पण मला आठवतें, एकदां मुंबईत असतांना तीर्थक्षेत्रें, व लग्नें यासंबंधानें तिचें माझें बोलणें चाललें होतें. तेव्हां ती हांसत हांसत ह्मणाली:—'लग्न करायला व्यंकोबाची गिरी उत्तम. केव्हां पाहिजे तेव्हां जावें नि लग्न करावें.' असें म्हणण्यांत तिचा कांहीं हेतु असेल असें मला वाटलें नाहीं, पण आतां वाटतें कीं गिरीला जाऊनच तिनें लग्न केलें असावें."

त्यावरोबर वकीलसाहेबांचे पाणीदार डोळे चमकूं लागले व त्यांनीं आपल्या खिशांतील नोटबुकांत ही हकीकत टिपून घेतली. नंतर आणखी पुष्कळ प्रश्न त्यांनीं दर्याबाईंना विचारिले व आणखीही कांहीं मजकूर त्यांनीं टिपून घेतला. नंतर उद्या सकाळीं पुनः येऊन भेटा, आतां रात्र झाली असें ह्मणून वकिलांनीं दर्याबाईंना निरोप दिला. थोड्या वेळानें वकीलांनीं गिरी येथें खालील मजकुराची तार पाठविली:—

"व्यंकटाचार्य, गिरी.—रोडे वकील, दत्तापूर. १८९० सालची कीर्द पहा. लग्नाचा दाखला पाहिजे. आनंदराव देशमुख व कमळजा अगर कमळा. मिळाल्यास मुद्दाम कारकुनाबरोबर जरूर पाठवा."

---



# प्रकरण १५ वें.

---:o:---

## पकडण्याचें वारंट.





दुसरे दिवशीं सकाळीं उजाडल्याबरोबर दर्याबाई वकील-साहेबांच्या घरीं गेल्या आणि दोन प्रहरीं कोर्ट भरल्याबरोबर फिर्याद दाखल करावी व आनंदरावांना पकडण्याकरितां वारंट मागावें असा त्यांनीं आग्रह धरिला. वकिलांचें मत तसें नव्हतें. इतका उतावळेपणा करण्याचें त्यांना कारण दिसेना. ते म्हणालेः—" हें पहा, बाई, पक्क दशेला येण्यापूर्वींच ही गोष्ट जर बाहेर फुटूं द्याल तर तुमचा सर्व बेत फसेल. हल्लीं कज्जाचें स्वरूप आहे तेवढ्यावरून मॅजिस्ट्रेट वारंट देतील असें मला वाटत नाहीं. आनंदराव म्हणजे यःकश्चित् मनुष्य नव्हे. मॅजिस्ट्रेटसाहेबांजवळ सुद्धां त्यांचें चांगलें वजन आहे. अशा मनुष्याला पकडण्याचें वारंट मागणें व देणें म्हणजे फार नाजूक व जबाबदारीचें काम आहे. शिवाय एकदा कोर्टांत फिर्याद गुदरली कीं मग ह्या टोंकापासून त्या टोंकापर्यंत सर्व गांवांत पुकारा होईल व आनंदरावांनीं मनांत आणलेंच तर त्यांना पळून जाण्यास कठीण जाणार नाहीं. मी काय म्हणतों आलें का ध्यानांत ? "

दर्याबाई खोकून ह्मणाल्याः—" आणि मीं कांहीं कानडींत नव्हतें सांगितलें. मी म्हणतें तें हेंच. पळून जातां येऊं नये असाच तर बंदोबस्त केला पाहिजे. जर एकदम वारंट मिळालें तर मग त्यांना पळून जातां येईल का ? "

वकील:—" परंतु वारंट मिळेल अशी माझी खात्री नाहीं. बाई, तुम्हीं काल हकीगत सांगितली ती सारखी माझ्या मनांत घोळत आहे. रात्रीं मला स्वस्थपणें झोंप देखील लागली नाहीं. फारच विलक्षण! शंका-वर शंका माझ्या मनांत येऊं लागल्या. शेवटीं मला वाटूं लागलें कीं, यांत कांहीं तरी चूक झालेली असली पाहिजे; ही कांहीं खरी हकीगत नव्हे."

दर्याबाई:—" मग तुमच्या मनांत कज्जा चालवायाचा नाहीं तर? आधींच समजलें असतें, तर तुह्मांला माझी हकीगत ऐकून घेण्याची मीं तसदी तरी दिली नसती. आणि मीहि सांगण्याच्या भानगडींत पडलें नसतें. मग जातें तर मी आतां. कालपासून इतकी वाटाघाट व कंठ-शोष केला आणि शेवटीं ऑफस्!"

वकील:—" माझें बोलणें तुमच्या लक्षांत आलें नाहीं. कज्जा चाल-वायला माझें काय जातें? ही सर्व हकीगत मी कोर्टापुढें मांडतों. मग ते वाटेल तसें करतील. पण हें कांहीं काम करणें नव्हे. माझें म्हणणें असें कीं, लोखंड चांगलें तापून लाल झालें म्हणजे मग घणाचे घाव घातले तर उपयोग, एरव्हीं नाहीं. तसेंच आमचा सर्व पुरावा चांगला जुळला म्हणजे मग फिर्याद मांडायला काय उशीर? अशी घाई करूं नका. आनंदराव् म्हणजे जहागीरदारांचे जामात, त्यांची पत केवढी! गांवांतील सर्व लोकांचा त्यांच्यावर विश्वास. अशा माणसावर फिर्याद केली तर कोर्ट सहसा वारंट देणार नाहीं. नुसत्या संशयापेक्षां कोर्टापुढें कांहीं तरी सबळ पुरावा पाहिजे."

दर्याबाई:—" नुसत्या संशयाखेरीज यांत कांहींच का नाहीं? मग मात्र शर्थ झाली!"

वकील:—" अगदींच नाहीं असें नाहीं. आहे, पण मी ह्मणतों, लग्न झाल्याचाच जर दाखला मिळाला—म्हणजे लग्न लागल्यावर जोशाला, उपाध्यायाला दक्षिणा दिल्याचा जर दाखला मिळाला—तर मग अगदीं खात्रीच. कसला संशयच रहात नाहीं. आणि यासाठींच मीं काल गिरी

येथें व्यंकटाचार्यांना कीर्द वगैरे पाहून दाखला पाठविण्याविषयीं जरूरीची तार केली आहे. मिळालाच तर चार दिवसांत दाखला येईल. ”

पण इतका धीर दर्याबाईंना कुठला निघावयाला ? त्या संतापानें लाल होऊन म्हणाल्याः—“ पण त्याचा काय नेम आहे ? असा दाखलाच मिळाला नाहीं तर ? सशाचें शिंग कधीं कुणाला मिळालें आहे काय ? त्यांतलीच ही गोष्ट. शिवाय गिरीसच त्यांचें लग्न झालें, याची तरी खात्री कुठें आहे ? गिरीचें नांव सहज तिच्या तोंडांतून आलें असेल. ती खरो-खरीच जर गिरीला गेली असती तर मला नसतें का कळलें ? निदान संशय तरी आला असता. दुसऱ्या कुठें तिचें लग्न झालें असलें तर ? ”

वकीलः—“ असें कां म्हणतां ? तिच्या बोलण्यांत कांहीं तरी अर्थ आहे. आह्मां वकिलांच्या ध्यानांत या गोष्टी चट्कन् येतात. निदान यांत कांहीं अर्थ आहे कीं नाहीं हे पहावें असें तरी आमच्या मनांत येतें. ”

दर्याबाईः—“ वकिलांच्या मनांत असें येतें का ? तर मग मी वकील झालें नाहीं हें बरेंच झालें म्हणायचें. ”

वकील शांतपणानें ह्मणालेः—“ बाई, आमच्या धंद्याला नांवें ठेवूं नका. यांतही बुद्धिचातुर्य लागतें. बरें तें असो. तो दाखला जर आम्हांला मिळाला तर मात्र तो दाखविल्याबरोबर कोर्टानें वारंट दिलेंच पाहिजे. म्हणून म्हणतों, चार दिवस वाट पाहून नंतर फिर्याद द्यावी. ”

दर्याबाईः—“ पण मी सांगतें ना कीं मी कांहीं चार दिवसांची वाट पहाणार नाहीं. एक दिवसाची—नव्हे एक तासाची—घटकेची सुद्धां मी वाट पहाणार नाहीं, साफ सांगतें. कोर्टाचे दरवाजे उघडले व मॅजिस्ट्रेट-साहेब खुर्चीवर येऊन बसले कीं मीं अर्ज गुदरलाच समजा. स्वतः येण्याचें तुमच्या मनांत नसेल तर नका येऊं बापडे. मी जातीनें हजर राहून गुदरीन. दुसऱ्याच्या तोंडानें पाणी पिणारी ही बायको नव्हे, समजलें का वकीलसाहेब ? ”

दर्याबाईंना येथें येऊन इतके दिवस झाले होते; मग आजच त्यांनीं इतका उतावीळपणा करण्याचें कारण काय ? आनंदरावांना सुगावा लागून ते फरारी होतील असें त्यांना वाटलें असेल काय ? कदाचित् असेंही

असेल कीं इतके महिने दररोज आनंदराव आपल्या घरीं येत असून त्यांचा आपणांस आजपर्यंत कसा संशय आला नाहीं, इतके आपण मठ्ठ कसे झालों, याचीच दर्याबाईंना चीड आली असावी. एवढें मात्र खरें कीं ह्या एकंदर प्रकरणांत आनंदराव डॉक्टरच पूर्णपणें गुन्हेगार आहेत या गोष्टीची दर्याबाईंच्या मनाची इतकी बालंबाल खात्री होऊन गेली, व त्यामुळें त्यांना त्यांचा इतका संताप आला होता कीं, बाईंना तसा अधिकार असता तर त्यांनींच आनंदरावांच्या मुसक्या आंवळून त्यांना बांधून घातलें असतें, किंबहुना त्यांना त्यांनीं फांसावरसुद्धां चढविलें असतें. कायद्याच्या भानगडींत मग त्या मुळींच पडल्या नसत्या.

शेवटीं दर्याबाईंच्या म्हणण्यास रुकार देणें वकिलांना भाग पडलें. त्यांनीं बाईंच्या नांवची एक फिर्याद अर्जी तयार करविली व दोन प्रहरीं मॅजिस्ट्रेट कोर्टांत येतांच बाईकडून ती गुदरविली. सोबत आपल्या नांवचें वकीलपत्रही हजर केलें आणि सर्व कच्ची हकीकत कोर्टास सांगण्याला सुरवात केली.

इकडे आनंदराव रोजच्याप्रमाणें गांवांत हिंडावयाला गेले होते. आपणांस जरव्ब आवळून टाकण्याकरितां जाळें तयार झालें आहे, आपल्या शत्रूंनीं आपल्या नाशाकरितां व्यूह रचिला आहे हें त्यांना मुळींच कळलें नव्हतें. ते नेहमींप्रमाणें रोग्याबरोबर प्रेमानें व आनंदानें बोलून घरीं आले. रोजच्यापेक्षां आज परत यावयास जरा उशीर झाला होता म्हणून ते थोडे त्रासलेले दिसत होते. दिवाणखान्यांत जाऊन पोषाख उतरून ते एका आराम खुर्चीवर हुश्श करीत पडले; इतक्यांत जिच्यावर त्यांची बहाल मर्जी ती त्यांची प्रिय पत्नी जेवणाची तयारी आहे हें कळविण्याकरितां वर आली. तिला पाहतांच आनंदराव म्हणाले:—" आतां आपण लवकरच मुंबईस जाऊन रहाणार. दररोज उठून ही धांवपळ करावी कोणीं? व करावयाची तरी किती? शिवाय त्या मानानें प्राप्तिही नाहीं."

मोहना:—" असे बेत आतां किती तरी दिवस चालले आहेत!"

आनंदराव:—"आतां अगदीं लवकरच जाण्याचा निश्चय केला आहे. तूं काल रात्रीं लवकर निजलीस?"

" माझें कपाळ दुखत होतें," मोहनेनें टाळाटाळीचें उत्तर दिलें. खरें म्हटलें तर इंदिरा तिच्या घरांतून एकाएकीं निघून गेली याचा तिला राग आला होता आणि म्हणूनच ती लवकर जाऊन निजली होती.

मोहना नंतर म्हणाली:—" मुलगा गेला म्हणे!"

" कोणता मुलगा?" आनंदरावांनीं विचारिलें. त्यांच्या मनांत दुसरेच विचार घोळत असल्यानें त्यांच्या चटकन् लक्ष्यांत आलें नाहीं.

मोहना:—" जसें कांहीं माहीतच नाहीं! तो—दर्याबाईचा—"

आनंदराव:—" होय होय, मेला बिचारा! काल सकाळीं मेला. त्याच्या आईनें तर काय रडण्याचा कळसच केला."

मोहना:—" आतां मी विचारूं? तो मुलगा मेला, गेला, सगळें झालें. त्या मुलाचा नि इकडचा खरेंच कांहीं संबंध नाहीं? मी काय म्हणते समजलें?"

आनंदराव:—" समजलें, सगळें समजलें. मागें एकदां मीं याचें उत्तर दिलें आहे व त्या वेळीं तुझी खात्रीही पण झाली होती. आतां आणखी तशाच भलत्या भलत्या कल्पना करावयाच्या असतील तर कर बापडी! मी मात्र माझ्या डोक्याला त्रास करून घेणार नाहीं."

खात्री झाली होती! छे छे! वास्तविक स्थिति अगदीं उलट होती. तिच्या मनामध्यें मत्सराग्नीनें पेट घेऊन जो धुमाकूळ उडवून दिला होता, त्याची आनंदरावांना कल्पनाही नव्हती.

मोहना नंतर म्हणाली:—" त्याच्या आईनें फारच हाय घेतली आहे म्हणे!"

आनंदराव:—" मुलाचा प्राण गेल्यानंतर कांहीं वेळ तिनें तसें केलें खरें; रडून रडून अगदीं आकांत केला. पण मग दोनप्रहरनंतर आली जरा बेतावर."

" तिच्या मनाचें समाधान इकडूनच झालें वाटतें?" असें म्हणून मोहनेनें आपले ओंठ चावले.

आनंदरावांनीं चटकन् आपल्या बायकोकडे पाहिलें. तिचा एकंदर

हावभाव व संतप्त झालेला चेहरा पाहतांच त्यांनीं ओळखलें कीं कांहीं तरी मूर्खपणाचा विचार तिच्या मनांत आला आहे. दर्याबाईच्या संबंधानें असा संशय येणें म्हणजे केवढा मूर्खपणा असें मनांत येऊन आनंदरावांना थोडें हांसू आलें. ते म्हणाले:—“ आतां या संशयाला काय करावें? ती थेरडीबाई माझी आजी शोभेल आणि एवढा तरी नाजूकपणा! जणुं घोरपडच!”

हे अगदीं साधे सहज उच्चारिलेले शब्द पण त्यापासून परिणाम चांगला झाला. एक तासभर जरी आनंदराव तिच्याशीं उरस्फोड करीत बसले असते, त्यांनीं आणाशपथा घेतल्या असत्या तरीसुद्धां त्यांच्या बायकोला आपणाकडून मूर्खपणा झाला, चूक झाली, असें वाटलें नसतें; पण ह्या सरळ व साध्या शब्दांनीं मोहनेचे डोळे चांगलेच उघडले. तिची चूक तिला दिसून आली व सलज्ज दृष्टीनें तिनें त्यांच्याकडे पाहिलें. ते म्हणाले:—“ मी शपथपूर्वक सांगतों कीं त्या बाईची व माझी बिलकुल ओळख नाहीं. मीं मागेंही सांगितलेंच आहे व आतांही सांगतों तुझ्या मनांत अशी कुत्सित कल्पना कां येते समजत नाहीं.”

आणि मोहनेला तरी कुठें समजलें होतें? तिच्या मनांत असा विचार येत होता एवढें खरें. आतां तिला वाटलें कीं आपली गैरसमजूत झाली, व आपण आपल्या नवऱ्याचें मन विनाकारण दुखविलें. याबद्दल तिला आतां पश्चात्ताप होऊं लागला. आपल्या मनांत आलेला संशय आपण इंदिरेला सांगितला, सारजेलाही कळविला, त्याचप्रमाणें आपल्या नवऱ्याच्या गुप्त पेटीचें आपण कुलूपही काढलें याची तिला लाज वाटूं लागली, व तिच्या डोळ्यांत पाणी भरलें. आनंदराव तिच्या हनुवटीस हात लावून म्हणाले:—“ हें पहा, आपण आतां लवकरच येथून दुसरीकडे कुठें तरी रहावयाला जाऊं या. जरा पालट झाला म्हणजे मनाला थोडा आराम वाटेल, व येथला विसरही पडेल.” असें म्हणून आनंदरावांनीं दस्तरुमालानें तिच्या डोळ्याचें पाणी पुसलें. इतक्यांत जेवणाची तयारी असल्याची त्यांना आठवण झाली म्हणून खालीं जाऊन ते जेवावयाला बसले.

त्यांचा पहिला भात झाला असेल अगर नसेल इतक्यांत देवडीवरील भय्या आंत डोकावून पहात असल्याचें त्यांना दिसलें. भय्याची मुद्रा कावरीबावरी, घाबरलेली दिसत होती म्हणून आनंदरावांनीं त्याला विचारिलें:—“ भय्या, तुम क्या देखता है? तुमकूं क्या होना?”

भय्या:—“ हां. कुच बात करनेकी है ”

आनंदराव:—“ दवाखानेमें कुई दवा मंगता है? अच्छा, हं आते है अब्बी.”

“ नही, नही, दवाकी बात नही है. तुमसे बात करनेका है ” असें अडखळत अडखळत भय्या बोलूं लागला. क्षणोक्षणीं त्याची मुद्रा जास्तच भयभीत दिसूं लागली.

भय्याची ही तऱ्हा पाहून आनंदराव तसेच हात धुऊन गडबडीनें बाहेर आले. कांहीं तरी अपघात झाला, मोठी जखम झाली असें त्यांना वाटलें. ओसरीवर येऊन पाहतात तर दोन पोलीस शिपाई तेथें उभे असलेले त्यांना दिसले. शिपायांनीं लागलीच आनंदरावांना वेढा दिला व त्यांपैकीं एकानें हळू हळू बोलत एक कागद काढून आनंदरावांना दाखविला. इतक्यांत मोहना काय प्रकार आहे हें समजून घेण्याकरितां मधघरच्या दारांत येऊन उभी राहिली. तिला पाहतांच त्या शिपायांना घेऊन आनंदराव जवळच्या खोलींत गेले व त्यांनीं दरवाजा बंद करून घेतला.

मोहना घाबरून म्हणाली:—“ भय्याजी, काय आहे हें?”

भय्या:—“ बाईसाब, भोलानाथकी मरजी!”

मोहना:—“ हे पोलीस शिपाई कां इथें आले आहेत? तूं इतका घाबरलेला कां दिसतोस? ते काय म्हणाले? तूं काय ऐकलेंस?”

भय्या:—“ बाईसाहेब, ओ सब बात बहोत खराब है. सुननेकूं आच्छी नही.”

मोहना:—“ भय्याजी, काय असेल तें सांग. नाहीं म्हणूं नकोस. बोल, बोल लवकर.”

भय्याः—" ये गांवमे पीछे एक खून हुवा, ओ तपास चला है. हमारा मालिकसाबका जबाब होने का है. इसवास्ते शिपाई आया है."

मोहनेला तें खरें वाटलें नाहीं. इतक्यांत खोलीचें दार उघडून आनंदराव बाहेर आले व ह्मणाले—" मी कांहीं कामाकरितां कोर्टांत जाऊन येतों. फार वेळ लागावयाचा नाहीं."

मोहना मोठ्यानें रडूं लागली.—" कसलें काम आहे? भय्या म्हणतो कीं खुनासंबंधीं कांहीं भानगड आहे म्हणून."

आनंदरावः—" छे छे! भय्याला काय समजतें? तसें कांहीं नाहीं. कोणीं तरी मूर्खपणाची फिर्याद केली आहे असें वाटतें. त्याला कशाला भ्यायला पाहिजे? मी जाऊन लागलीच व्यवस्था करून हा असाच परत येतों. तूं जेवून घे जा." इतकें बोलून आनंदराव बाहेर पडले. रस्त्यांत गेल्याबरोबर एक पोलीस शिपाई त्यांच्याबरोबर चालूं लागला व दुसरा मागें झाला.

हा अकस्मात् झालेला प्रकार पाहून मोहनेला फारच आश्चर्य वाटलें. तिचा कांहींच तर्क चालेना. ती गरीब गाय झालेली, दुःखानें हंबरडा फोडूं लागली. ती घरांतून रस्त्यावर गेली व आपल्या यजमानास पोलीस कुठें नेतात हें समजेल ह्मणून त्यांच्याकडे पाहूं लागली. मोहनेला आतां समजून आलें कीं आनंदरावांबरोबर नुसते दोन पोलीस शिपाईच नसून बरींच माणसें त्यांच्या मागोमाग चाललीं आहेत. कारण फिर्याद झाल्याची व आनंदरावांस पकडण्याकरितां वारंट सुटल्याची बातमी सर्व गांवांत पसरली होती, आणि ह्मणूनच लोक, काय प्रकार आहे तें पाहण्याकरितां जमले होते. त्या गर्दीतून मैनाई सुईण येत असलेली मोहनेला दिसली. घराजवळ येतांच मोहनेनें काय हकीकत आहे ह्मणून तिला विचारलें.

मैनाई मोहनेला घेऊन घरांत आली व तिनें हकीगत सांगण्याला आरंभ केलाः—" काय सांगूं बाई, हरीची करणी अगाध आहे ह्मणून म्हणतात ना, त्यांपैकींच ही एक. माझ्या वयाला आज इतकीं वर्षें झालीं, पण आनंदरावांसंबंधानें कधीं तरी संशय! छे! राम शिवा गोविंदा! आणि ते तर दररोज दर्याबाईच्या घरीं जाऊन त्या मुलाला पहात असत!

पण किती झालें तरी खून तो. लवकर येवो, उशीरा येवो, बाहेर हा येणारच. तुमच्यावर मात्र प्रसंग खडतर आला, बाई ! ”

मोहना फारच अधीरी झाली होती; त्यामुळें तिची कल्पना कोणीकडच्या कोणीकडे धांवली. त्या दिवशींच सकाळीं तो मुलगा मेल्याचें तिनें ऐकलें होतें. ती म्हणालीः—“ त्याचा खून झाला ? दर्याबाईच्या त्या मुलाचा ? ”

मैनाईः—“ त्याचा नव्हे हो. तो मुलगा गुडघ्याच्या दुखण्यानेंच मेला. ती–त्या मुलाची दुर्दैवी आई, हो. तिचा खून झाला म्हणे. ”

“ ती मेली ? ती दर्याबाई ? ” असें मोहनेनें विचारिलें. तिच्या मनांत जास्तच भयंकर विचार उत्पन्न झाले.

मैनाईः—“ अहो ती नव्हे. दर्याबाई त्या मुलाची मुळीं आईच नव्हे म्हणे, असें आतां बाहेर आलें आहे–”

“दर्याबाई त्याची आई नव्हे ?” असें मोहनेनें मध्येंच विचारिलें. पूर्वीप्रमाणें आतांही तिचा मूर्खपणा,–मत्सराचा परिणाम–तिला दिसूं लागला.

मैनाईः—“ नव्हे, नव्हे. मी जशी तशी तीही त्याची कोणी नव्हे. मीं जिचें बाळंतपण केलें, पेठेंतील मावशीबाईच्या घरीं विष घातलेलें औषध पिऊन जी मेली ती त्या मुलाची आई. लोक म्हणतात कीं, आनंदरावांनींच तिच्या औषधांत विष घातलें. आणखी तिचें नांव–बाई, पण तुमची दशा मात्र कठीण खरी ! ”

मोहनाः—“ तिचें नांव काय होतें ? ”

मैनाईः—“ नांव होय ? कलावती तर मुळींच नव्हे ! तिचें नांव कमळजा म्हणे. नि ती आनंदरावांची पहिली बायको म्हणे ! सगळाच मेला चमत्कार ! ”

ही हकीकत ऐकतांच मोहनेला अत्यंत भय वाटलें. पण मैनाई इतक्या कोमल वृत्तीची नव्हती. ती एकदां बोलूं लागली कीं दहा असामींना कंटाळा आणून टाकी. ती पुढें म्हणालीः–“बाई, नशिबाचा खेळ म्हणतात तो हा. हा सर्व प्रकार एका पत्रामुळें बाहेर आला. तें पत्र आज कित्ती तरी वर्षें आनंदरावांच्या पेटींत पडलें होतें म्हणतात, नि शेवटीं

तुह्मींच तें हुडकून काढून इंदिरा आक्कासाहेबांच्या स्वाधीन केलेंत म्हणे. त्या पत्रावरून हा सर्व गुन्हा तुमच्या यजमानावर लागू झाला आणि म्हणूनच मॅजिस्ट्रेटसाहेबांनीं त्यांना पकडण्याचें वारंट दिलें."

मोहनेच्या लक्ष्यांत आतां सर्व गोष्टी आल्या. चौरकर्म करून तिनेंच तें पत्र तळघरांतून बाहेर आणलें आणि अशा रीतीनें नवऱ्याचा घात केला. कृतकर्मांचा तिला आतां पश्चात्ताप होऊं लागला व ती अगदीं काळीठिक्कर पडली. दुर्दैवी बिचारी मोहना! जन्मभर ही गोष्ट तिच्या स्मरणांतून गेली नाहीं.

मैनाई नंतर कळवळून म्हणालीः—" बाई, आतां अशा रडत बसूं नका. दुःख काय मेलें सगळ्यांच्या मागें लागलेलेंच आहे. नवरा नाहीं म्हणून कुणी रडतात, आणि नवरा असून कुणाला सुख नसतें. एकपुती रडे आणि सातपुती रडे म्हणतात तें हेंच. उठा, तोंड किती वाळून गेलें, पाहिलें? उभें दिखील राहवत नाहीं. थोडा चहा घ्या. अंगांत शक्ति तरी राहिली पाहिजे. उठा, तुह्मी थोडा घ्या; मीही थोडा घेईन. आज मला कसेंसेंच वाटत आहे. मेले एकेक दिवस येतात ते असे वाईट!"

स्वयंपाकीण बाईनें चुलीवर चहाचें आधण ठेविलें. इकडे मैनाईची टकळी सुरू होतीचः—" बाई, ही बातमी ऐकून मला दिखील कित्ती वाईट वाटलें म्हणतां? काय प्रकार आहे तो समजून घेण्याकरितां मी तुमच्याकडे येण्यासाठीं निघालें ती त्या गर्दींत सांपडलें. लोक तरी काय घटिंगण मेले! एका कारस्थानें येऊन माझ्या पावलावर आपल्या बुटाचा पाय दिला. त्यानें बघा कशीं सालडीं निघालींत तीं!"

इतक्यांत इंदिराही तेथें आली. दुःखातिशयामुळें तिला बोलवेना. ती हुंदके देत देत म्हणालीः—" ताई, माझ्याबरोबर घरीं चल. मी तुला न्यायला आलें आहें. मरते वेळीं बाबांनीं हें भाकीत केलें होतें. ते म्हणालेः— " वेळ आलीच तर मोहनेला संभाळ. तिला मीं तुझ्या स्वाधीन केली आहे. चल!"

मोहना एकदम संतप्त होऊन म्हणालीः—" आक्का, तूंच त्यांचें नांव सांगितलेंस म्हणे. पत्र यासाठीं का बरोबर नेलें होतेंस? दुसऱ्यांना

दाखवून असा घात करायला? चांगलें केलेंस, बहीण होऊन माझा कैसानें गळा कापलास!"

इंदिरेनें शांतपणानें उत्तर दिलें:—" ताई, तुझ्या नवऱ्याचें नांव मी सांगेन? मरेपर्यंत मीं ही गोष्ट माझ्या मनांतच ठेविली असती. इतक्या थराला जिनें आणलें ती निराळीच आहे."

मोहनेला दुःख आवरेना. ती इंदिरेच्या उरावर मान टाकून मोठ्यानें रडूं लागली. आपण आक्कूकडून दाभण कसें आणविलें, त्या दाभणानें तळघरांतील लोखंडी पेटीचें कुलूप कसें काढलें, आंतील जिन्नस पाहतां पाहतां तें पत्र कसें सांपडलें वगैरे सर्व गोष्टी तिनें इंदिरेजवळ कबूल केल्या. आपला आपणच घात करून घेतला याबद्दल तिला फारच वाईट वाटूं लागलें. इकडे मैनाई सुईण हा प्रकार पाहून अगदीं खिन्न झाली व चरफडत निघून गेली. चुलीवर ठेवलेलें आधण फुकट गेलें, हातचा चहा गेला, तिला फार वाईट वाटलें.

---

# प्रकरण १६ वें.

—:o:—

## चौकशीला सुरवात.





दर्याबाईनीं फिर्याद केल्याची हकीकत वसंतरावांना कळतांच त्यांनीं आपले वडील प्रतापराव यांना मुंबईस तार केली कीं—" प्रसिक ॲसिडसंबंधाचें गूढ बाहेर येण्याच्या बेतांत आहे, सबब आपण जरूर यावें. माझा तर्क बरोबर होता असें आईलाही कळवावें." आनंदरावांविरुद्ध कांहीं खटपट करावी असें त्यांच्या मनांत नव्हतें; इतकेंच नव्हे तर शक्य

असतें तर त्यांनीं तो सर्व व्यूह जागच्या जागीच दबवून टाकिला असता. परंतु फिर्याद तर झालीच होती व चौकशी होऊन सोक्षमोक्ष काय तो होणारच होता. तर मग आपल्या वडिलांवर जो आरोप आला होता, तो धुऊन जात असतांना त्यांनीं हजर असणें बरें असें साहजिकच वसंतरावांना वाटलें. आणि ह्मणूनच त्यांनीं ही तार केली होती.

प्रतापरावांनीं ती तार दोनदां वाचली. नंतर आपल्या कुटुंबास ते ह्मणाले:—" काय चमत्कार आहे पहा! इतक्या वर्षांनीं तें गूढ बाहेर येत आहे. बरें पण, माझा तर्क बरोबर होता, घरांत कळवावें ह्मणतो याचा अर्थ काय ? "

पण कुटुंबाकडून समाधानकारक उत्तर आलें नाहीं. आनंदरावांसंबंधानें वसंताला संशय आला होता, पण तो योग्य नाहीं, उतावीळपणाचा आहे, असें वाटून बाईनीं कोणाजवळही ती गोष्ट काढली नव्हती. व आतांही काढण्याचें त्यांच्या मनांत नव्हतें.

प्रतापरावांनीं लागलीच दत्तापुरास जाण्याचा बेत ठरविला व त्याप्रमाणें ते निघाले. आपण पूर्णपणें निर्दोषी आहोंत ही गोष्ट तेथल्या लोकांच्या नजरेस आणून दाखविण्यास ते फारच उत्सुक झाले होते.

इकडे पोलीस शिपायांनीं आनंदरावांना कोर्टांत नेऊन मॅजिस्ट्रेटच्या समोर उभें केलें. आपण अब्रूदार गृहस्थ, आपली पत मोठी, शिवाय तसा पुरावाही कोर्टासमोर नाहीं, सबब लायक जामीन घेऊन आपणास सोडून द्यावें असा अर्ज आनंदरावांनीं दिला. परंतु खुनासारख्या भयंकर गुन्ह्याची फिर्याद झालेली आहे, शिवाय कज्जा सेशन कोर्टाकडे पाठवावा लागणार, सर्व परिस्थितीचा विचार करितां आरोपीस जामीन घेऊन खुलें करणें योग्य दिसत नाहीं असें ह्मणून कोर्टानें आनंदरावांचा अर्ज नामंजूर केला. नंतर फिर्यादीच्या साक्षीदारांस समन्सें काढण्यांत आलीं. कज्जाची तारीख दुसरे दिवशींचीच नेमण्यांत येऊन आरोपीस—आनंदरावांस—तोंपर्यंत अटकेंत ठेवण्यासाठीं तुरुंगाकडे पाठविण्यांत आलें.

दुसरे दिवशीं बरोबर अकरा वाजतां कोर्टाच्या कामाला सुरवात झाली. फिर्यादीतर्फें काम चालविण्यास यशवंतराव रोडे वकील हजर होतेच.

आनंदरावांनींही आपल्यातर्फे काम चालविण्याकरितां, त्यांचे एक स्नेही अमृतराव ह्मणून ठाणें मुंबईकडे प्रख्यात वकील होते, त्यांना तार करून ताबडतोब आणविलें.

कोर्टाची इमारत बरीच प्रशस्त होती. परंतु आज हा कज्जा ऐकण्यासाठीं जेवढे लोक जमले होते त्यांपैकीं एकदशांश लोकांचा सुद्धां त्या इमारतींत समावेश झाला नाहीं. अर्थातच बाकीच्या लोकांना कोर्टाच्या इमारतीच्या आसपासच आपली सोय करून घ्यावी लागली. आजच्यासारखी चळवळ त्या गांवांत कधींच झाली नव्हती. मागें कलावती मेली तेव्हांही बरीच गर्दी झाली होती; परंतु आजच्या मानानें ती कांहींच नव्हे.

वसंतराव, आपले चुलते विश्वासराव यांच्याबरोबर कोर्टांत येऊन बसले होते. प्रथमतः फिर्यादी दर्याबाई यांची साक्ष झाली. त्यांनीं आपणास जी हकीकत माहीत होती व जो संशय आला होता तो सर्व खुलासेवार सांगितला, व त्यांचीं कारणेंही त्यांनीं समर्पक दिलीं. नंतर सारजेची साक्ष घेण्यांत आली.

ही साक्ष चालली असतांना आनंदरावांनीं बऱ्याच हरकती घेतल्या. वास्तविक म्हटलें तर त्यांनीं मध्यें बोलण्याचें कांहींच कारण नव्हतें. कारण त्यांच्यातर्फे त्यांचे परमस्नेही, मुद्दाम तार करून आणलेले प्रख्यात अमृतराव हे काम चालवीत असून आपल्याकडून शिकस्त करीत होते. अर्थातच त्यांच्या संमतीशिवाय आनंदराव मध्यें मध्यें फार बोलूं लागल्याकारणानें वकिलांचा व आनंदरावांचा बराच खटका उडत असे.

सारजेनें दाराच्या फटींतून जो प्रकार पाहिला होता तो ती सांगूं लागली. त्याबरोबर आनंदराव आणखी ह्मणाले.—" या बाईच्या साक्षीस माझी हरकत आहे. मी ह्मणतों—मागेंही मीं असेंच सांगितलें आहे कीं जी बाई बाळंत होऊन मेली तिची माझी बिलकुल ओळख नव्हती, तर मग तिला असलें विषारी औषध मी कां—"

त्याबरोबर त्यांचे वकील कपाळावरील घाम दस्तरुमालानें पुसून काढून त्रासून ह्मणाले:—" आनंदराव, आतां मला हें खपणार नाहीं. तुम्ही असेंच कराल तर मी आपला निघून चालता होईन. मग तुम्ही जाणे,

आणि तुमचा कज्जा जाणे. मी मघांपासून तुह्मांला सांगतों आहें तरी तुमचें आपलें आहे तेंच आहे. माझ्यावर भरंवसा ठेवून स्वस्थ रहा."

आनंदराव पुनः तणतणूं लागले:—"पण माझी व त्या बाईची ओळख नव्हती हें नको का सांगावयास? कां साक्षीदार सांगेल तें निमूटपणें ऐकावयाचेंच? मी असें ह्मणतों कीं माझा कोणता हेतु—"

इतका वेळ मॅजिस्ट्रेट स्वस्थ बसले होते, पण आतां बोलल्याशिवाय भागत नाहीं असें पाहून ते ह्मणाले:—

"आनंदराव, तुमचें बोलणें आह्मी नाहीं ऐकणार. तुमची काय तक्रार आहे ती तुह्मी योग्य वेळीं पुढें आणा. अशा तऱ्हेनें कोर्टाच्या कामाची खोटी करणें बरें नाहीं. त्यापासून तुमचा कांहीं फायदा नाहीं. साक्षीदाराची साक्ष चालू द्या त्याला तुमची हरकत नको." नंतर ते सारजेकडे वळून ह्मणाले:—"सारजाबाई, चालू दे. तूं सांगितलेंस कीं, आपण दाराच्या फटींतून पाहिलें तेव्हां आंत आनंदराव होते. होय ना? यशवंतराव, पुढें विचारा."

वकील:—"ते आंत काय करीत होते?"

साक्षीदार:—"त्यांच्या हातांत एक अनदीं लहानशी कुपी होती. दिव्याच्या उजेडांत मला दिसली. आनंदराव तिला बूच घालीत होते. बूच घातल्यानंतर त्यांनीं ती आपल्या जाकिटाच्या खिशांत ठेवली. नंतर तेथें जवळच दुसरी एक बाटली होती ती त्यांनीं घेतली, व बूच खालीं पडलें होतें तें घेऊन त्यांनीं त्या बाटलीस बसविलें. प्रतापराव रात्रीचें औषध ज्या बाटलींतून पाठवीत तेवढीच ही बाटली होती."

प्रश्न:—"पुढें काय झालें?"

उत्तर:—"बूच घालून ती बाटली आनंदरावांनीं एके बाजूला ठेविली व ते झटकन् खोलींतून बाहेर यायला निघाले, नि इतक्या जलदीनें आले कीं मला तिथून जायला अवकाशच मिळाला नाहीं. म्हणून मी तिथेंच भिंतीशीं टेंकून उभी राहिलें."

प्रश्न:—"म्हणजे जिन्यांतून खालीं जातांना ते तुमच्याजवळूनच गेले?"

उत्तरः—" नाहीं, माझ्याजवळून गेले नाहींत. मी तिथें उभी राहिलेली त्यांना दिसलें–निदान माझें तोंड तरी त्यांना दिसलें, व त्यांनीं ' कोण आहे ? ' म्हणून विचारलें. पण मीं उत्तरच दिलें नाहीं. म्हणून ते भ्याल्यासारखे दिसले. ते दिवा आणण्यासाठीं आंत गेल्याबरोबर, शेजारींच केरसुण्या वगैरे ठेवण्याची एक लहानशी खोली आहे त्या खोलींत मी जाऊन बसलें." मॅजिस्ट्रेटनीं आश्चर्यानें विचारिलें:—"जिन्यांत एक कल्लेवाला काळा मनुष्य उभा होता असें दुसऱ्या साक्षींत आलें आहे तो मनुष्य तूं नव्हेस तर ?"

सारजाः—" होय. मीच तो मनुष्य, निदान आनंदरावांना पुरुषासारखी दिसलें ती मीच. माझी दाढ दुखत होती व बरीच सूजही आली होती म्हणून मी काळ्या लोंकरीचा गळपट्टा तोंडाभोंवतीं बांधला होता. त्याला लांब लांब दशा होत्या. त्या कल्ल्यासारख्या दिसत होत्या." मॅजिस्ट्रेटनीं पुनः विचारिलें:—" पण हें असलें सोंग तूं कां घेतलेंस ? यांत तुझा हेतु काय ?"

सारजाः—" सोंग घ्यावें असा मुळींच माझा हेतु नव्हता. माझ्या मनांत तसला विचार सुद्धां नव्हता. तोंड फार सुजलें म्हणून व ठणकाही राहीना म्हणून प्रतापरावांनीं गरम कपड्यानें बांधावयास सांगितलें त्याप्रमाणें मीं बांधलें. दुसरा कांहीं हेतु नाहीं."

प्रश्नः—" बरें पुढें काय झालें ?"

उत्तरः—" आनंदराव दिवा घेऊन आले व त्यांनीं चहूंकडे पाहिलें. मला त्यांची चाहूल आंत ऐकूं येत होती. कोणी दिसलें नाहीं म्हणून ते खालीं गेले व त्यांनीं मावशीबाईनाही विचारलें. मला ऐकूं येत होतें. बाईनीं सांगितलें कीं वर कोणी गेलें नाहीं नि आलें नाहीं म्हणून. नंतर आनंदराव आपल्या घरीं निघून गेले."

प्रश्नः—" पुढें तुम्ही केव्हां गेला ? बाळंतीण मेल्याचें तुम्हांला केव्हां व कुठें समजलें ?"

उत्तरः—" मी त्या चोर खोलींतून लागलीच बाहेर आलें नि खालीं गेलें; तर मावशीबाई व मैनाई स्वयंपाकघरांत बोलत बसल्या होत्या. मीं

खालीं जाऊन दारावर एक जोराची थाप मारली. मावशीबाईनीं दार उघडलें पण त्या माझ्यावर रागावल्या. म्हणाल्या कीं, मुकाट्यानें यायला येत नाहीं काय? नंतर मी पुनः माडीवर गेलें. बाळंतीण जागीच होती. कांहीं पाहिजे आहे काय म्हणून विचारून मी घरीं जाऊन निजलें. सकाळीं उठल्यावर, कलावतीबाई रात्रीं औषध प्याल्याबरोबर एकाएकीं मेल्या, असें माझ्या आक्कानें मला सांगितलें."

प्रश्नः—"मूल घेऊन गेलेल्या बाई कोण, सांगतां येईल?"

उत्तरः—"हो, ज्यांनीं हल्लीं फिर्याद केली आहे त्याच त्या दर्याबाई. मीं त्यांना इथें आल्याबरोबर ओळखलें. मैनाई सुइणीनें सुद्धां ओळखलें."

येथें फिर्यादीतर्फेचे प्रश्न संपले. नंतर आरोपीतर्फे वकिलाची उलट तपासणी झाली. गुन्हा भयंकर, साक्षीदार महत्त्वाचा आणि वकील फार हुषार, तरतरीत, व अनुभवशीर; अर्थातच उलट तपासणी अतिशय कडक झाली; अगदीं कीस निघाला त्यांपैकीं कांहीं मुख्य व मुद्दयाचींच प्रश्नोत्तरें येथें नमूद केलीं आहेतः—

वकिलांनीं उलट तपासणीचा आव तर मोठा घातला. हातांत पेन्सिल घेऊन ते मोठ्या ऐटीनें उभे राहिले, अदबीनें माजिस्ट्रेटसाहेबांकडे नजर टाकून एकदां ह्या बाजूकडे व एकदां त्या बाजूकडे असे ते वळले व मागाहून अस्तन्या जराशा वर सारून त्यांनीं प्रश्न विचारण्याला सुरवात केली.

प्रश्नः—"सारजाबाई, औषधाची बाटली आनंदरावांनीं उचलून घेऊन बूच घालून एकीकडे ठेवली असें तुह्मीं मघाशीं सांगितलें. मी आतां असें विचारतों कीं प्रतापरावांनीं ज्या बाटलींतून औषध पाठवून दिलें तीच ती बाटली असें तुह्मी खात्रीपूर्वक सांगतां काय?"

उत्तरः—"नाहीं. मी तरी तसें कुठें सांगितलें? पण मला वाटतें कीं तीच ही बाटली. त्यावरचा कागद मला दिसला, आंत औषधही होतें. त्या रात्रीं औषधानें भरलेली अशी दुसरी बाटलीच तिथें नव्हती, असें मैनाई म्हणत होती."

प्रश्नः—"मैनाई काय म्हणत होती तें ती सांगेल. तुह्मीं नको सांगावयाला. तुह्मीं जें प्रत्यक्ष पाहिलें आहे तेवढेंच सांगा. समजलें ! सांगा तर मग. तुम्हांला आनंदरावांनीं पाहिलें तर मग ओळखलें कसें नाहीं ? तुमची त्यांची पूर्वीची ओळख होती ना ? "

उत्तरः—" नाहीं. रस्त्यानें गाडींतून जातांना मीं बरेच वेळ त्यांना पाहिलें होतें पण त्यांनीं मला कधींच पाहिलें नव्हतें. शिवाय माझें तोंड सुजलेलें होतें म्हणून मी काळा गळपट्टा गालांवरून बांधला होता, त्यामुळें माझा चेहरा फारच विलक्षण दिसत होता. आक्कानें सुद्धां पाहिला. आणखी मी उभी होतें तिथें अंधार होता. "

प्रश्नः—" पुनः आणखी तेंच. मैनाई गेली; आतां आक्का आली का ? मैनाईची जशी आम्हांला गरज नाहीं तशी तुमच्या आक्काचीही पण नाहीं. " नंतर वकील कोर्टाकडे वळून म्हणालेः—" साक्षीदार नीट उत्तरें देत नाहीं, आढेवेढे घेत आहे व विनाकारण कोर्टाचा मौल्यवान वेळ घालवीत आहे याबद्दल कोर्टानें रिमार्क करून ठेवावी. " पुनः साक्षीदाराकडे वळून ते म्हणालेः—" आनंदराव आंत काय करीत होते तें तुह्मीं दाराच्या फटींतून पाहिलें म्हणतां. यांत तुमचा हेतु काय होता ? "

उत्तरः—" खरोखर माझा कांहीं हेतु नव्हता. मीं मुद्दाम ह्मणून कांहीं पाहिलें नाहीं. जिना चढून वर गेलें तर पुढल्या खोलींत मीं कांहीं हालचाल ऐकली. बाळंतीण उठून आपल्या खोलींतून बाहेर आली कीं काय असें मला वाटलें. अजून पांच दिवस सुद्धां झाले नाहींत आणि इतक्यांतच बाहेर आली, हा काय खुळेपणा, असें मला वाटून मीं आंत पाहिलें. आनंदराव आंत असतील अशी माझी कल्पना दिखील नव्हती ! "

प्रश्नः—" कोण आहे, असें त्यांनीं विचारल्यावर तुह्मी कां बोलला नाहीं ? लपून कां बसलां ? "

साक्षीदारानें सरळ व निष्कपटपणानें उत्तर दिलें:—" यांतही माझा कांहीं हेतु नव्हता. मला वाटलें, मी आड उभी राहून पहात होतें हें आनंदरावांना समजणें बरें नाहीं; म्हणून मी बाजूला सरकलें. दुसरा मुळींच हेतु नव्हता."

प्रश्नः—" त्या औषधांत आनंदरावांनीं कांहीं कमजास्त केल्याचें तुह्मीं पाहिलें नाहीं; पण तुम्हाला संशय तरी आला काय ? "

उत्तरः—" नाहीं. माझ्या मनांत सुद्धां आलें नाहीं. दुसरे दिवशीं सकाळीं निजून उठल्यावर मला समजलें कीं औषध प्याल्याबरोबर रात्रीं बाळंतीण मेली म्हणून. मग बरीक मला संशय आला. आदल्या रात्रीं आनंदरावांचें व बाळंतिणीचें बोलणें मीं ऐकलें होतें तें माझ्या ध्यानांत आलें. त्यावरून त्यांची पूर्वींची चांगलीच ओळख होती असें मला वाटलें—"

" तें नको मला. मी विचारतों तेवढेंच सांगा. " असें आरोपीचे वकील दरडावून बोलले, पण मॅजिस्ट्रेटसाहेबांनीं ' सांगू द्या, सांगू द्या, ' असें म्हटल्यावरून सारजा पुढें म्हणालीः—" पण आनंदराव असलें नीचपणाचें कृत्य करतील असें मला वाटलें नाहीं. पुढें चौकशी चालली त्यांत आनंदरावांनीं शपथेवर निव्वळ खोटा मजकूर जेव्हां सांगितला तेव्हां मात्र मला संशय येऊं लागला. "

प्रश्नः—" औषधांत आनंदरावांनीं कांहीं घातल्याचें तुह्मीं पाहिलें नाहीं, होय ना ? होय. आतां स्पष्ट सांगा कीं, आनंदरावांनीं त्या औषधांत विष घातलें असें तुमचें म्हणणें नाहीं ना ? "

उत्तरः—" माझें नाहीं तसें म्हणणें. मीं असें सांगितलें तरी कुठें ? त्यांच्याजवळ कुपी व बाटली असलेली तेवढी मीं पाहिली असें सांगितलें. यापेक्षां जास्त मीं कांहींच सांगितलें नाहीं. "

प्रश्नः—" बरें, आतां असें सांगा. इतकी हकीकत जर तुह्मीं प्रत्यक्ष पाहिली होती तर त्याच वेळीं तुह्मीं कां सांगितली नाहीं हो, सारजाबाई ? "

उत्तरः—" याचें कारण माझें सांगणें कुणाला खरें वाटलें नसतें. मी यःकश्चित् गरीबाची मुलगी. माझें म्हणणें कोण खरें मानणार, वकीलसाहेब ? शिवाय मला त्या वेळीं आनंदरावांचा कांहींच संशय आला नाहीं. पुढें चौकशी झाली तेव्हां आला; पण मला वाटूं लागलें, कीं मी पूर्वीं ही हकीकत कोणास कळविली नाहीं तेव्हां आतांही कळवूं नये. अजूनपर्यंत तूं कां दडवून ठेवलीस असें कोर्ट मला म्हटलें असतें. त्यांतून आनंद-

रावांनींच हें सर्व केलें अशी माझी पक्की खात्रीही झाली नव्हती. आतांच पहाना? इतका पुरावा जमला आहे, तरी मी सांगतें हें आपणाला कुठें खरें वाटतें? मी लबाड बोलतें असेंच आपण म्हणत असाल. मग तेव्हां तर काय? आनंदरावांविरुद्ध कांहींच पुरावा नव्हता. उलटी माझ्याच गळ्यांत बाजू आली असती!"

त्याबरोबर आनंदरावांच्या वकिलांनीं फार्सच केला. पूर्वीं कुठल्याशा नाटकांत ते प्रसिद्ध नट होते म्हणे; त्यावेळची आठवण त्यांना झाली असेल कदाचित्. ते चवताळले काय, माना काय हालवूं लागले, डोळे किती गरगर फिरवूं लागले, टेबलावर हात काय आपटूं लागले, नानाप्रकार त्यांनीं केले; परंतु त्यांना विशेष सवलत मिळाली नाहीं. मॅजिस्ट्रेटनीं त्यांना शांतपणानें म्हटलें:—" आणखी कांहीं विचारावयाचें असल्यास लवकर विचारा. व्यर्थ वेळ दवडणें बरें नव्हे." त्याबरोबर स्वारी बरीच नरम आली. नंतर ते म्हणाले:—" ह्या साक्षीदारास मला आतां कांहीं विचारावयाचें नाहीं. पण साक्षीदार न विचारतां आपण होऊनच हकीकत सांगते, शिवाय मागें सांगण्याची संधि मिळाली असतां तिनें ती सांगितलेली नाहीं. आणि का सांगितली नाहींस म्हणून विचारितां बेजबाब बोलते, सबब या साक्षीदाराबद्दल रिमार्क होणें अगदीं जरूर आहे. मघांशीं एकदां मी कोर्टाला विनंति केलीच आहे. पुनः आणखी करीत आहें, तरी माझ्या विनंतीचा योग्य विचार व्हावा." असें म्हणून ते खालीं बसले व सारजा बाहेर निघून गेली. साक्षीदाराच्या एकंदर वर्तनावरून रिमार्क करणें योग्य होईल असें कोर्टास वाटलें नाहीं हें सांगावयाला नकोच.

नंतर कोर्टाचा वक्त गुदरला म्हणून कज्जा दुसरे दिवसापर्यंत तहकूब ठेवण्यांत आला.

कोर्टाची इमारत रिकामी होऊं लागली. प्रेक्षक लोक बाहेर येऊन जागजागीं घोळका करून उभे राहिले व मन मानेल तशा गप्पा सुरू झाल्या. कोणी म्हणूं लागले, " हा कज्जा सगळा बनावट आहे; आरोपीचे वकील केव्हांच त्याचा धुरळा उडवून टाकतील." कोणी म्हणत,

" कज्जांत तसा जोम आहे. आनंदरावांवर शेकल्याशिवाय कधीं रहावयाचा नाहीं." कोणी असेंही म्हणत होते कीं—फौजदारी कज्जाचा काय नियम आहे? अमुकच निकाल होईल असें सांगतां येणें कठीण! सारांश कोणी कांहीं, कोणी कांहीं, असें लोक आपआपल्यांत कुजबुजूं लागले. पण एक जण मात्र कोणाशीं कांहीं न बोलतां तडक कोर्टांतून बाहेर पडून तबेल्यांत गेला व त्यानें कोचमनास सांगितलें कीं आताच्या गाडीनें आपले बाबा येणार आहेत; कालच येणार होते पण कांहीं नडीमुळें राहिले, आज येतों म्हणून मुंबईहून त्यांची उलट तार आली आहे, सबब गाडी जोड. प्रतापराव डॉक्टर येणार असें समजतांच त्याला फार आनंद झाला व त्यानें ताबडतोब गाडी जोडून आणली. वसंतरावाना केव्हां एकदां स्टेशनावर जाईन असें झालें होतें. ते चटकन् गाडींत बसले व गाडी पार निघून गेली.

वसंतराव स्टेशनावर जाऊन पोंचतात तों मुंबईची आगगाडी येऊन धडकली व प्रतापराव डब्यांतून उतरले. ते दोघे गाडींत जाऊन बसल्यावर काय हकीकत आहे म्हणून प्रतापरावांनीं चिरंजिवांस विचारिलें तेव्हां वसंतरावांनीं उत्तर दिलें:—" बाबा, आपण निर्दोषी आहांत असें आतां बाहेर आलें आहे. आणि खरा गुन्हेगार सांपडला आहे. त्यांत आश्चर्य एवढेंच कीं तो इसम इतके दिवस अगदीं डोळ्यासमोर असून कसा सांपडला नाहीं! म्हणजे ज्यानें तुम्हीं पाठविलेल्या औषधांत प्रासिक ॲसिड घातलें तो इसम."

प्रतापराव:—" त्यानें बुद्धिपुरःसर घातलें?"

वसंतराव:—" मुद्दाम, मुद्दाम; त्यांत संशयच नाहीं. त्या बाळंतिणीचा जीव घेण्याच्या इराद्यानेंच घातलें."

प्रतापराव ऐकावयाला फार उत्सुक झाले होते:—" बरें, तें कोठें घातलें? आमच्या पोऱ्याला फसवून कोठें दुसरीकडे तरी नेलें नव्हतें ना? त्यानें नाहीं म्हणून सांगितलें खरें, पण उगीच विचारितों."

वसंतराव:—" नाहीं, नाहीं, त्यानें औषध अगदीं सुरक्षित पोंच-

विलें. त्यांत जें कांहीं मिसळलें तें खोलींत औषध असतांनाच मिसळलें आहे."

प्रतापराव आवेशानें म्हणाले:—" तर मग जिन्यावर दिसलेल्या त्या माणसाचेंच हें कृत्य. तो कांहीं भ्रम नव्हे. आनंदरावांसारख्या सुशिक्षित व हुषार माणसाला उगीच असें वाटणें संभवतच नाहीं. मला वाटतें तोच तिचा नवरा व त्याचेंच हें कृत्य."

वसंतराव:—" होय, औषधांत ज्यानें ढवळाढवळ केली तोच तिचा नवरा. पण जिन्यामध्यें जो मनुष्य दिसला तो तिचा नवरा नव्हे. जो खरोखर गुन्हेगार तोच तिचा नवरा—म्हणजे आमचे आनंदराव देशमुख डॉक्टर साहेब, आलें का ध्यानांत ?"

प्रतापराव इतका वेळ गाडींत एका बाजूस थोडे कलंडले होते. ते नीट सावरून बसून ह्मणाले:—" छेत ! असें कांहीं तरी बडबडूं नये."

वसंतराव:—" नाहीं, बाबा. अगदीं खरें. आनंदरावांचेंच हें कृत्य !"

प्रतापराव:—" कशावरून ?"

नंतर वसंतरावांनीं आपल्या वडिलांना शक्य तितक्या विस्तृत रीतीनें सर्व हकीकत सांगितली. ती ऐकून प्रतापरावांना फारच आश्चर्य वाटलें. " पण मी ह्मणतों कीं आनंदरावांचा इतके दिवस कोणालाच कसा संशय आला नाहीं !"

वसंतराव:—" मला आला संशय. खरोखरच आला. कलावती मेल्यावर तिच्या सभोंवतीं आम्ही उभे होतों तेव्हांच मनांत संशय आला. आनंदरावांनाही वाटलें कीं याला आपला संशय आला आहे. तेव्हां ते मला खोलींतून बाहेर घालवूं लागले; पण काकांनीं ' असूं दे, कांहीं हरकत नाहीं' असें म्हटलें, बाबा, हें तुह्मांला आठवतें ना ?"

प्रतापराव:—" शिव शिव शिव ! पण तुला कसा संशय आला ?"

वसंतराव:—" तें कांहीं सांगतां येत नाहीं. त्यांच्या बोलण्यावरून व एकंदर वर्तनावरून मला वाटलें कीं आनंदरावांना जास्त हकीकत माहीत आहे, पण ती ते चोरून ठेवतात, खरें सांगत नाहींत. पुढें

त्यांची साक्ष झाली. तेव्हां तर माझी खात्रीच झाली. ही हकीकत मीं आईला कळविली; पण तिनें तिकडें लक्ष्यच दिलें नाहीं!"

प्रतापराव:—" तर मग तूं मोठा विलक्षणच मनुष्य ह्मणावयाचा!"

वसंतराव:—" मीं आनंदरावांना सुद्धां त्यांच्या तोंडावर स्पष्ट सांगितलें कीं कलावतीच्या मृत्यूशीं तुमचा कांहीं तरी संबंध आहे, व तिच्या औषधांत विष घातलें हें तुमचेंच कृत्य. तेव्हां त्यांनीं माझ्या पाठींत छडी मारिली. ही गोष्ट इंदिरा आक्कासाहेबांना सुद्धां माहीत आहे. कारण त्यांच्या बंगल्याच्या बाहेरच्या बाजूलाच आमचें दोघांचें मांडण झालें; व त्या आंतल्या अंगास उभ्या होत्या. पण बाबा, यापेक्षांही वाईट बातमी अजून सांगावयाचीच आहे."

प्रतापराव:—" ती कोणती?"

वसंतराव:—"फारच वाईट! सांगावयाचें माझ्या जिवावर आलें आहे. ती बिचारी बाळंतीण, कलावती, आनंदरावांची पहिली बायको म्हणे, आणि—आणि सरदार सर्जेरावांची नाहींशीं झालेली मुलगी कमळजा ती तीच."

प्रतापराव:—" खुळसटच आहे! असें बडबडूं नये."

वसंतराव:—" नाहीं, बाबा, मी बडबडत नाहीं, खरेंच तें. ही हकीकत समजल्यामुळें इंदिरा आक्कासाहेबांना काय वाटलें असेल बरें! पण यांत आनंदरावांकडे तितका दोष दिसत नाहीं. जी काय हकीकत बाहेर पडली आहे तेवढ्यावरून असें दिसतें कीं, ती सर्जेराव जहागीदारांची मुलगी ही गोष्ट त्यांना बिलकूल माहीत नव्हती. तिचें नांव कमळाबाई, ती एक मास्तरीण आहे एवढेंच त्यांना माहीत होतें व अशा समजुतीवर त्यांनीं तिच्याशीं लग्न केलें."

प्रतापराव:—" आजन्मांत असली शोचनीय हकीकत मीं कधीं ऐकली नाहीं. पण कायरे वसंत, त्यांनीं असें कशाकारितां—अरेरे काय गडबड आहे ही!"

प्रतापराव एकदम आश्चर्यानें ओरडले ते उगीच नाहीं. वेशीच्या तोंडाशीं गांवांतील पुष्कळ लोक मशाली, दिवट्या, वाजंत्री, बँड वगैरे घेऊन

मोठ्या जमावानिशीं येऊन उभे होते. वसंतराव गाडी घेऊन प्रतापरावां-ना आणण्याकरितां स्टेशनवर गेले ही बातमी हां हां म्हणतां सर्व गांवांत पसरली. पूर्वीं प्रतापरावांवर सर्व लोकांचें फार प्रेम होतें. अशा सच्चा मनुष्यावर केवळ आपण वृथारोप केला व त्यामुळें त्यांना गांव सोडून मुंबईचा रस्ता धरावा लागला याबद्दल त्यांना आतां पश्चात्ताप झाला होता, आणि म्हणूनच प्रतापरावांचें मनोभावानें स्वागत करण्याक-रितां लोकांना इतकी उत्सुकता प्राप्त झाली होती. प्रतापरावांची गाडी दिसतांच सर्वांनीं एकदम जयजयकार करून गाडीस वेढा दिला व पुष्पांचा वर्षाव सुरू केला. मंडळींनीं लागलीच त्यांच्या गाडीचे घोडे सोडून दिले व गाडी ओढण्याचा मान आपणास मिळावा अशाबद्दल त्यांच्या त्यांच्यामध्यें अहमहमिका सुरू झाली. 'प्रतापराव चिरायु होवोत' 'त्यांना उदंड ऐश्वर्य येवो' वगैरे प्रकारचे जयघोष चहूंकडून ऐकूं येऊं लागले. अशा थाटानें गर्जना करीत व जयजयकार करीत लोक प्रतापरावांची गाडी मोठ्या प्रेमानें व औत्सुक्यानें गांवांतून ओढीत नेऊं लागले.

इतका आपला बडेजाव व्हावा हें प्रतापरावांच्या साध्या व निरभिमानी स्वभावाला आवडलें नाहीं. त्यांनीं लोकांना पुष्कळ प्रकारांनीं, आर्जवानें सुद्धां सांगितलें पण त्याचा परिणाम उलटच झाला. टाळ्यांचा गजर ज्यास्त होऊं लागला, व लोकांची उत्सुकता वाढूं लागली. तेव्हां काय होईल तें होवो असें म्हणून प्रतापरावांना स्वस्थ बसावें लागलें.

याप्रमाणें टाळ्यांच्या प्रचंड गजरांत, प्रेमाच्या जयजयकारांत व आशी-र्वादयुक्त घोषांत मोठ्या समारंभानें, थाटानें व उत्साहानें लोकांनीं प्रताप-रावांना घरीं आणून पोंचविलें. सुमारें सात आठ वर्षांपूर्वीं या गांवच्या लोकांनीं ज्यांची हाकालपट्टी केली होती तेच हे डॉक्टर प्रतापराव विश्राम! तेव्हां तसें व आतां असें! इतका सर्व प्रकार होण्यास कारण आनंदरावच.

तिकडे आनंदरावांना रात्रीं अटकेंत ठेवण्याकरितां शिपायांनीं एका इमारतींत नेलें. ही इमारत चांगली भक्कम व पक्क्या बंदोबस्ताची होती. गांवचे लोक या इमारतीला 'कैदखाना' असें म्हणत असत.



# प्रकरण १७ वें.

—:०:—

## विचार करण्यावर तहकूब.





नंतर चौकशीचें काम पुढें तीन चार दिवस चाललें होतें. फिर्यादीतर्फे आणखी बरेच साक्षीदार घेण्यांत आले. मैनाई सुईण, मावशीबाई यांच्याही साक्षी झाल्या. पण त्या सविस्तर देण्याचें कांहीं प्रयोजन नाहीं. कारण मागें त्यांनीं जो मजकूर सांगितला होता त्याचेंच चर्वितचर्वण होणार. फक्त मूल घेऊन जी बाई गेली तीच ही फिर्यादी दर्याबाई, तिला आपण ओळखलें, एवढाच काय तो नवा मजकूर त्यांच्या साक्षींत होता. कलावतीच्या मरणावरून प्रतापरावांवर जो खटला चालला होता, त्याचेंहि कागदपत्र पुराव्यांत दाखल करण्यांत आले. विशेषेंकरून त्यांतील पंचनामा शाबीत करून घेण्यांत आला. प्रेताची फाड करून ज्या डॉक्टरांनीं अभिप्राय दिला होता त्यांचीही साक्ष पुनः घेण्यांत आली. व त्यांनीं केलेलीं टिपणें कज्ज्यांत दाखल करण्यांत आलीं. गेडे वकिलांनीं गिरीस तार केली होती, त्याप्रमाणें व्यंकटाचार्यांचा कारकून सुब्बाराव कीर्द-खतावणी घेऊन साक्षीस हजर झाला. त्यानें कीर्दींत पाहून सांगितलें कीं आनंदराव देशमुख व कमळजाबाई ह्या दोघांचें लग्न गिरी येथें झालें, ही गोष्ट खरी आहे. या लग्नाची संभावना पंचवीस रुपये आलेली आचार्यांच्या आज्ञेवरून आपण नांवनिशीवार कीर्दीस जमा केलेली आहे, ही कोर्टानें पहावी, असें ह्मणून त्यानें कीर्द व

खतावणी कोर्टास दाखविली. नंतर तो ह्मणाला कीं लग्नाच्या वेळेस आपण समक्ष हजर होतों ! हल्लींचे आरोपी हेच नवरदेव. लग्न लागलेलें आपण प्रत्यक्ष पाहिलें. लग्न चोरटें असावें असा त्याच वेळीं आपणांस संशय आला! कारण उभय पक्षाकडीलही मंडळी कोणीच नव्हती. फक्त नवरा व नवरी अशीं दोघेंजण आलीं होतीं. बाई पण रूपानें फारच सुंदर होती. कोणा श्रीमंताची असावी असें त्याच वेळीं आम्हांला वाटलें. वगैरे मजकूर कारकुनानें आपल्या साक्षींत सांगितला.

फिर्यादीतर्फेच्या पुराव्याचें काम संपल्यानंतर मॅजिस्ट्रेटनीं आरोपीची पुरशीस घेतली. खुद्द आरोपी विरुद्ध जो मजकूर उलट बाजूनें आला होता त्याचा खुलासा कोर्टानें आरोपीकडून करून घेतला.

सवाल:–"आनंदराव, लग्नाचा दाखला हजर झालेला आहे, त्यासंबंधानें तुमचें काय म्हणणें आहे ?"

जबाब:—"माझें कांहींच म्हणणें नाहीं. ज्याची मला यत्किंचित्‌ही माहिती नाहीं असा पुरावा जर माझ्याविरुद्ध हजर झाला तर त्याचें खंडन करण्यास माझी कशी तयारी असूं शकेल ?"

सवाल:—"ज्या लग्नाचा हा दाखला आहे त्या लग्नासंबंधीं आपणास कांहीं माहिती नाहीं असें तुम्हांला म्हणतां येणार नाहीं. ती हतभागिनी तरुण स्त्री तुमची बायको होती ही गोष्ट तुह्मी अजूनही नाकबूल करतां काय ?"

आरोपीनें जरा गुळमुळून उत्तर दिलें.

जबाब:—"जरी ती माझी बायको असली तरी त्यावरून मींच तिला विष घातलें ही गोष्ट शाबीद होत नाहीं."

शाबीद नाहीं तरी त्या बाजूलाच धोरण दिसंत असा कांहीं विचार मॅजिस्ट्रेटच्या डोक्यांत आला असावा. कारण त्यांनीं मानेला एक हिसका दिला व नंतर 'असें, असें' म्हणून दुसऱ्या मुद्दयासंबंधानें विचारण्यास सुरवात केली. दयाबाईनीं जें पत्र–इंदिरेनें मोहनेकडून घेऊन त्यांना दिलेलें–पुराव्याला हजर केलें होतें, तें पत्र कोर्टानें आनंदरावांस दाखवून म्हटलें:—"ह्या पत्रासंबंधानें तुमचें काय म्हणणें आहे ?"

पत्र हातांत घेऊन पहातांच आनंदरावांच्या पोटांत धस्स झालें. फार वर्षांपूर्वींच जें पत्र जाळून टाकलें असें ते समजत होते तेंच पत्र पुनः पाहून त्यांना परमावधीचें आश्चर्य वाटलें. पत्र हातांत घेऊन ते उलटें सुलटें करूं लागले. मागें मॅजिस्ट्रेटसमोर चौकशी चालली होती त्या वेळीं या पत्राच्या नकलेचा अर्धा भाग आनंदरावांच्या हातांत–तेव्हां ते साक्षीदार होते–कोर्टानें दिला होता. त्या वेळींही त्यांची अशीच धांदल उडून गेली होती. आतांचें पत्र आनंदरावांनीं समग्र वाचलें व अक्षरही निरखून पाहिलें. पत्र लिहून आज इतकीं वर्षें झाल्यामुळें कांहीं कांहीं शब्द थोडे उडालेले होते. पत्र वाचून संपल्यावर आनंदराव मोठ्या घोंटाळ्यांत पडले व त्यांची मुद्रा कावरीबावरी झाली. कोर्टास कांहींच उमज पडेना. फक्त आश्चर्य–मूर्तिमंत आश्चर्य–आनंदरावांच्या चेहऱ्यावर दिसूं लागलें. थोडा वेळ गेल्यानंतर मॅजिस्ट्रेट आणखी म्हणाले:—"पत्र फार महत्त्वाचें आहे. याचा समाधानकारक खुलासा तुह्मांला करतां येईल काय ?"

जबाब:—"मी शपथपूर्वक सांगतों कीं मला या पत्राची बिलकुल माहिती नाहीं. हें पत्र माझें नव्हेच मुळीं."

सवाल:—"आनंदराव, तुह्मी सध्यां आरोपी आहांत व आरोपीस शपथ अगर प्रतिज्ञा देऊं नये असा कायद्याचा निर्बंध आहे; तरी पण तुह्मी आपण होऊनच शपथेवर सांगतों म्हणतां तर कांहीं हरकत नाहीं. हें पत्र तुमच्या तळघरांत असलेल्या लोखंडी पेटींत सांपडलें. या पत्राबद्दल काय हकीकत आहे ?"

जबाब:—"हें पत्र त्या पेटींत सांपडलें नाहीं, खास नाहीं. मी ही गोष्ट अगदींच खोटी म्हणतों. हें किंवा ह्यासारखें पत्र मला कधींच कोणाचें आलेलें नाहीं. मग माझ्या पेटींत सांपडलें कुठलें ? माझें असें म्हणणें आहे कीं माझ्या विरुद्ध ही सगळी रचना झालेली आहे; माझ्या शत्रूंनीं माझ्या नाशाकरितां हा व्यूह रचला आहे."

सवाल:—"पण आनंदराव, हें पत्र कोणाकडून आलें, कोणाला आलें, अक्षर कोणाचें वगैरे कांहींच ओळखूं येत नाहीं ?"

जबाबः—“ जें पत्र मीं पूर्वीं कधींच पाहिलें नाहीं तें मला कसें ओ-ळखतां येईल ? अगदींच अशक्य. ”

सवालः—“ पण त्या पत्राचा एक भाग तुह्मीं पूर्वीं पाहिलेला आहे. कलावतीच्या मृत्यूसंबंधानें चौकशी झाली तेव्हां या पत्राचा कांहीं भाग कोर्टापुढें आला होता; हें तुमच्या लक्षांत असलेंच पाहिजे. आतां फिर्यादी-तर्फेच्या वकिलांनीं असें अनुमान काढलें आहे कीं त्या पत्रावर शाईचा ठिपका पडला म्हणून तें पत्र तसेंच अर्धें टाकून तिनें हें दुसरें लिहिलें. दोहों-मधील शब्द सारखेच आहेत; अक्षरही सारखेंच आहे. तारीख, महिना, मुक्काम वगैरे अगदीं तोच आहे. हें पहा, पूर्वीच्या चौकशीचे सर्व कागद हल्लीं कोर्टापुढें हजर आहेतच. याचा तुह्मी कसा खुलासा करतां तो करा. ”

जबाबः—“दोन्ही पत्रें अगदीं सारखीं आहेत. होय, खरेंच. मी अग-दींच विसरलों. त्याला पुष्कळ वर्षें झालीं. पण हल्लीचें हें पत्र मलाच लिहिलेलें आहे असें दिसत नाहीं. ”

सवालः—“ वरील पत्ता पहा. तुमचाच आहेना ? मग ? ”

जबाबः—“ पाकिटावर माझें नांव लिहिलेलें आहे. पण माझें नांव वर कां असावें समजत नाहीं. आंतील पत्राच्या मजकुरावरून तें मला लिहिलें आहे असें दिसत नाहीं. त्या बाईनें तें आपल्या नवऱ्याला लिहिलेलें आहे. कोर्टानीं तें एकदां पहावें. ”

सवालः—“ पण फिर्यादीतर्फेचें म्हणणें आहे कीं तुह्मीच तिचे यज-मान व पत्रही तुम्हांलाच लिहिलें आहे. ”

जबाबः—“ फिर्यादीतर्फेचें म्हणणें तसें असावयाचेंच. त्यांत कांहीं नवल नाहीं. मींच त्या बाईचा जीव घेतला म्हणून जर माझ्यावर फिर्याद झालेली आहे, तर मग तें पत्र तिनें मला लिहिलेलें आहे असें म्हणाव-यालाच पाहिजे. फिर्यादी पक्षाकडून काय पाहिजे तें सांगण्यांत येईल पण त्याचा विचार कोर्टानीं करावयाचा आहे. ”

सवालः—“ आनंदराव, मागें चौकशी झाली त्या वेळीं तुम्हीं सांगि-

तलें कीं या पत्राची किंवा ह्या अक्षराची आपणास बिलकूल माहिती नाहीं म्हणून. आतां तुमचें ह्मणणें काय आहे ?"

लग्नाचा दाखला कोर्टापुढें प्रत्यक्ष हजर असतांना आनंदरावांचें काय ह्मणणें असणार? शाबीद झालेल्या अपराधाचें दुःखपूर्ण चित्र असे ते उभे राहिले होते. हें पत्र कोर्टात कसें यावें, फिर्यादीच्या हाताला कसें लागावें याचाच विचार त्यांच्या मनांत घोळूं लागला. त्यांना असें वाटलें कीं, जें पत्र आपण जाळून टाकलें होतें तें पत्र फिरून जिवंत होणें ही एक भूतचेष्टाच ह्मणावयाची ! त्यांनीं उत्तर केलें:—

"मला त्या पत्रासंबंधानें अजून सुद्धां कांहीं माहिती नाहीं. माझ्यावर हा सर्व कज्जा बनावट रचलेला आहे. माझ्या शत्रूंनीं माझ्याविरुद्ध हा कट केला आहे, व त्या कटाला मी कदाचित् बळी पडेन. अजूनही सर्व गोष्टी बाहेर येतील, मग कोर्टाची खात्री होईल."

यापुढें आणखीही बरेच प्रश्न आरोपीस कोर्टाकडून विचारण्यांत आले. परंतु आनंदरावांविरुद्ध जो पुरावा फिर्यादीतर्फे आला होता त्याचा समाधानकारक खुलासा त्यांच्याकडून झाला नाहीं. तथापि आपण अपराधी आहोत असें कबूल करणें शक्य नव्हतें. अर्थातच त्यांनीं गुन्हा कबूल केला नाहीं. येथें आरोपीची तपासणी संपली. गुन्हा खुनाचा असल्यानें त्याचा इनसाफ सेशन कोर्टाकडूनच व्हावयाचा होता. म्हणून कज्जा त्या कोर्टाकडे कमिट करावा किंवा न करावा अशाबद्दल उभयपक्षांतर्फे तक्रारी मॅजिस्ट्रेटनीं ऐकून घेतल्या. पैकीं आरोपीतर्फे ज्या तक्रारी सांगण्यांत आल्या त्याच विशेष महत्त्वाच्या असल्यानें तेवढ्याच आपण पाहूं. त्यांतल्यात्यांत सारजेची साक्ष, दर्याबाईनीं हजर केलेलें पत्र व गिरी येथून कारकुनानें आणलेला लग्नाचा दाखला, यांवरच आरोपीतर्फेच्या वकिलांचा विशेष कटाक्ष होता, व त्यावर त्यांनीं बरेच आक्षेपही घेतले. त्याचेंच थोडें दिग्दर्शन येथें बस्स होईल.

आरोपीतर्फे अमृतराव:—"मी आतां सारजाबाईच्या साक्षीकडे वळतों. या बाईनें किती चमत्कारिक हकीकत सांगितली आहे, याचा कोर्टानींच विचार करावा व या बाईची साक्ष कोर्टानीं विशेष लक्ष्यांत घ्यावी अशी

माझी विनंति आहे. ती जी हकीकत सांगते ती फारच विलक्षण व अगदींच अविश्वसनीय अशी आहे. माझें तरी मत असें आहे कीं ती हकीकत सर्वस्वी संशयास्पद आहे. लहान मुलें चिमणी-कावळ्याची गोष्ट सांगतात त्यांतलीच ही तऱ्हा दिसते. सारजाबाई ह्मणते कीं आनंदरावांचें व कलावतीचें प्रथम प्रेमाचें भाषण झालेलें आपण ऐकलें—म्हणजे हां-सण्यासारखीच गोष्ट नव्हे काय ? खरें ह्मटलें तर डॉक्टर या नात्यानेंच आरोपीला त्या बाईनें बोलावणें पाठविलें होतें. तें पत्रच सांगत आहे. हातच्या कांकणाला आरसा कशाला पाहिजे ? कोर्टानीं तें पत्रच एकवार नीट लक्ष्य देऊन वाचावें. विशेषेंकरून, 'येथें आल्यावर मीं डॉक्ट-राचा तपास केला' येथपासून पारिग्राफ संपेपर्यंतचा मजकूर वाचून प-हावा. त्यावरून काय सिद्ध होतें बरें ? डॉक्टर या नात्यानेंच आपली प्रकृति पहाण्याकरितां व आपणास औषध देण्याकरितां कलावतीनें आरो-पीस बोलावलें होतें ही गोष्ट अगदीं अगदीं निर्विवाद आहे असें असून सारजाबाई ह्मणते कीं त्यांचें दोघांचें प्रेमाचें भाषण चाललेलें आपण ऐकलें हें किती बेभरंवशिक आहे सहज बोलण्यांत या साक्षीदार बाईला प्रेम दिसावें ह्मणजे केवढें आश्चर्य ? जेथें तेथें प्रेम दिसणारी बाई कोणत्या चालीची असावी याचें सहज अनुमान निघतें. अर्थातच तिची साक्ष बिलकुल भरंवशाची मानतां येणार नाहीं. पुढें ह्या बाईनें कुपीचा व बाटलीचा जो मजकूर सांगितला आहे तो तरी किती विलक्षण ! लहान मुलांना खेळवतात तसें साक्षीदार कोर्टाला खेळवूं पहात आहे. अगोदर मला हें समजलें पाहिजे कीं पहिल्या दिवशीं रात्रीं ही सारजाबाई बाळंतिणीच्या खोलींत अंधारांत लपून कां बसली होती ? बरें, तें असो. पुनः दुसऱ्या दिवशीं रात्रीं तशीच अंधारांत चोरून जिना चढून कां गेली ? व तीही आनंदराव तेथें थोडा वेळच होते तेवढ्या मुदतींत कशी आली ? बरें. खरोखरच ती जर आली होती तर त्या घराची मालकीण मावशीबाई व ती दुसरी सुईण—काय नांव तिचें ?—हो मैनाई, या दोघींच्याही दृष्टीला ती कशी पडली नाहीं ? हा साराच पोरखेळ नव्हे तर याला काय ह्मणावयाचें ? कुप्यासंबंधाचा फार्स ह्या

बाईनें सांगितला त्याला गारुड्याच्या हातचलाखीचा प्रकार ह्मणण्यास कसलीच हरकत नाहीं. लोकांच्या डोळ्यांत धूळ टाकून त्यांना कसें चकवावें हें ह्या बाईला चागलें माहीत आहे एवढें यावरून ह्मणतां येईल. पण आरोपीवर अपराध शाबीद करण्याच्या कामीं त्याचा काडीमात्र उपयोग होणार नाहीं हें ह्मणजे मी कोर्टास सुचवावयाला पाहिजे असें नाहीं. साहेबांच्या ध्यानांत सर्व गोष्टी आहेतच—"

"सारजाबाई त्यांच्या दृष्टीस पडली नाहीं याचें कारण त्या दोघीजणीही त्या वेळीं स्वयंपाकघरांत फराळ करीत होत्या. आपण त्यांना पाहिलें असें साक्षीदारानें सांगितलें आहे." असें फिर्यादीतर्फे रोडे वकील बिचकत ह्मणाले.

त्याबरोबर अमृतरावांनीं जरा खोंच मारली:—" मी माझें भाषण संपवितों. मग आपणाला काय कळवावयाचें असेल तें खुशाल कळवा. अजून पुष्कळ वेळ आहे. " नंतर ते कोर्टाकडे वळून ह्मणाले:—मी म्हणतों कीं सारजाबाईची साक्ष अगदींच विसंगत असून त्यांत जबर शंका घेण्यास पुष्कळच जागा आहे. ज्यांची विचारशक्ति सरळ व निर्मळ आहे, ज्यांचें मन विकाररहित आहे, त्यांना ही सारजाबाईची हकीगत केवळ स्वकपोलकल्पित आहे असेंच वाटेल! आपल्यावर येणारा आरोप दुसऱ्यावर जावा म्हणून ही निवळ बनावट रचना केलेली आहे असेंच दिसून येईल. पुरुषाचा वेष घेऊन ही बाई कोर्टांत कज्जा चाललेला ऐकण्याकरितां गेली होती त्यावरून व त्या एकंदर प्रकरणांत तिचें किती अंग आहे आणि ही किती लबाड व कारस्थानी बायको आहे याची सहज कल्पना होण्याजोगी आहे. जर बाळंतिणीच्या झोंपेच्या औषधांत कांहीं कमज्यास्त प्रकार झालाच असेल तर या कपटपटु कृष्णकारस्थानी सारजाबाईचेंच हें सर्व कृत्य असलें पाहिजे खास. याबद्दल, तसेंच ती विनाकरण दुसऱ्यावर आरोप लादण्याचा खोडसाळ प्रत्यन करीत आहे अशाबद्दल जरूर तर भरपूर पुरावाही सांपडेल. पण इतकी जबाबदारी आरोपीवर टाकण्यास तसें कारण दिसत नाहीं. साक्षीदार जो विलक्षण व अकल्पनीय असा मजकूर सांगते त्यावरूनच ती धडधडीत खोटें बोलते, तिच्या साक्षींत बिलकुल खरेपणा नाहीं हें अगदीं उघड आहे. माझें तरी असें मत आहे

कीं आरोपीविरुद्ध उपयोगी पडेल असा किमपिही पुरावा कोर्टापुढें आलेला नाहीं. आरोपीचें ह्मणणें असें आहे कीं ती तरुण स्त्री कलावती ह्या गांवांत आली तेव्हां इतरांप्रमाणें आपल्यासही ती अगदीं अपरिचित होती. ही गोष्ट खोटी म्हणण्यास किंवा कलावतीची व आनंदरावांची पूर्वींची ओळख होती असें मानण्यास बिलकुल पुरावा नाहीं. कोपऱ्यांत पडलेल्या एका यःकश्चित् क्षुल्लक साक्षीदाराच्या साक्षीवरून आनंदरावासारख्या सुप्रसिद्ध, हुषार, ऐपतदार व लोकप्रिय मनुष्यास अपराधी ठरवितां येणार नाहीं. साक्षीदार कोण, तर एक भिकार बाई. आणि ती हकीकत सांगते ती अशी कीं ती जर खरी असती तर पुष्कळ वर्षांमागेंच ती लोकांपुढें यावयाला पाहिजे होती. आरोपीचें व त्या बाळंतिणीचें जें थोडेंसें संभाषण झालेलें आपण ऐकलें असें ती म्हणते तेवढे शब्द सोडून दिले तर त्यांची एकमेकांची ओळख होती असें मानण्यास यत्किंचित् सुद्धां पुरावा नाहीं."

"कलावती येथें आली त्या रात्रीं तिनें आनंदरावांना लिहिलेलें पत्र आपण विसरलां वाटतें ?" असें मध्येंच मॅजिस्ट्रेटसाहेब, जें पत्र मोहनेला सांपडलें व ज्या पत्रामुळें हा सर्व प्रकार उघडकीस आला त्या पत्रास उद्देशून ह्मणाले.

वकीलांनीं आपल्या पाटलोणीच्या खिशांतून हात काढून धिटाईनें उत्तर दिलें:—" मी विसरलों नाहीं इतकेंच नव्हे तर तें पत्र पूर्णपणें माझ्या ध्यानांत आहे, किंबहुना माझ्या अगदीं दृष्टीसमोर आहे; परंतु तें पत्र आनंदरावांनाच पाठविलें होतें, किंवा तें त्यांच्या घरांतच होतें, यासंबंधानें कांहींच शाबिती झालेली नाहीं. फिर्यादी दर्याबाई म्हणते कीं तें पत्र इंदिरा आक्कासाहेबांकडून आपणास मिळालें व आक्कासाहेबांचें म्हणणें आहे कीं, आपल्या बहिणीनें—म्हणजे आरोपीचें कुटुंब मोहनाबाई यांनीं—आपल्याजवळ तें दिलें. पण यावरून काय निष्पन्न होतें? कांहींच नाहीं. मी माझ्या खिशांतून एक पत्र काढून कोर्टाजवळ देतों आणि सांगतों कीं मला ज्यानें हें पत्र आणून दिलें तो म्हणत होता कीं आपणास हें पत्र एका संस्थानच्या राजाकडून मिळालें आहे. त्यानें मला इतकें सांगितलें आणि त्याचीच री ओढून मीही कोर्टास तसेंच सांगतों. अर्थात् ही सर्व हकीकत खरी असूं शकणार नाहीं; सपशेल खोटी असेल. तसें—"

त्याबरोबर सर्व कोर्टभर हंशा पिकला. तो दबून सर्वत्र शांतता झाल्यावर वकीलांनीं जरा खाकरून खोंकून घसा साफ केला व नंतर त्यांनीं पुढें बोलण्याला सुरवात केली—

" आतां फिर्यादीतर्फे असें अनुमान काढण्यांत आलें आहे कीं, आरोपी हाच त्या बाळंतिणीचा नवरा. पण ही गोष्ट मुळींच शाबीद झालेली नाहीं. उलट हा आरोप अगदीं खोटा आहे. गिरीस लग्न झालें ह्मणून शाबीत करण्याकरितां एक कारकून आणलेला आहे, व त्याच्याकडून कीर्दखतावणी हजर केलेली आहे. परंतु मी ह्मणतों कीं यावरून काय शाबीत होणार? एकाच नांवाचीं अनेक माणसें असूं शकतात. मग तें जोडपें हेंच असें कशावरून? शिवाय गिरीस जाऊन कां लग्न केलें याचेंही कारण कोर्टास दाखविण्यांत आलेलें नाहीं. कारकून ह्मणतो कीं लग्न चोरटें असावें असा त्याच वेळीं आपणाला संशय आला. नुसत्या संशयावरून लग्न चोरटें म्हणतां येणार नाहीं. पुजाऱ्यांचे, उपाध्यायांचे हे कारकून. यांची विद्वत्ता किंवा पत केवढी जाडी असते हें सर्वांस महशूरच आहे. एका संभावित, लोकप्रिय व श्रीमत डॉक्टराविरुद्ध इतका न भूतो न भविष्यति असा आरोप कधींच कोणीं आणलेला नाहीं व आणणारही नाहीं. या तरुण स्त्रीला औषधोपचार करण्याकरितां आनंदरावांना बोलावून नेलें होतें; त्यांची तिची बिलकुल ओळख नव्हती. अशी स्थिति असतांना आनंदरावांनीं जाणूनबुजून आपल्या रोग्याचा आपणच घात करावा हें संभवनीय तरी आहे काय? शक्य तरी आहे काय?"

मॅजिस्ट्रेट मध्येंच म्हणाले:—" सारजाबाईनें त्यांच्या पहिल्या भेटीची जी हकीकत सांगितली आहे ती जर खरी मानली तर आरोपीची व त्या बाईची पूर्वींची ओळख होती असें होतें."

" बरोबर, अगदीं बरोबर, जर मानली तर. परंतु आनंदरावांच्या सांगण्यापेक्षां त्या कवडी किंमतीच्या सारजाबाईच्या सांगण्यावर कोर्टाचा जास्त विश्वास बसेल असें मला वाटत नाहीं. माझी अशी खात्री आहे कीं या सारजेची साक्ष जर बाजूस ठेवली तर आनंदरावांची व कलावतीची ओळख होती असें मानण्यास बिलकुल पुरावा नाहीं. संभवनीय गोष्टी, सृष्टि-

नियम व व्यवहार इत्यादिकांचा विचार केला तर उलट प्रकार दिसतो. भरपूर पुरावा असल्याशिवाय आरोपीवर चार्ज ठेवणें न्यायास अनुसरून नाहीं. डॉक्टर विश्राम बंधूप्रमाणेंच आनंदराव डॉक्टरही आपणास अपरिचित आहेत असें खुद्द कलावतीच म्हणाली होती. मावशीबाईनें हा मजकूर आपल्या साक्षींत सांगितला आहे.

" सारांश, कोर्टापुढें फिर्यादीतर्फे जी हकीकत आली आहे ती इतकी विलक्षण आहे कीं ती बनावट तरी असली पाहिजे एक, अगर बेभरंवशाची तरी असली पाहिजे एक. कशीही असली तरी त्यावरून आरोपीविर अपराधाचा चार्ज ठेवण्यास पुरे इतका दर्शनी पुरावा दिसत नाहीं. सबब कोर्टानीं कृपा करून आरोपीवर चार्ज न ठेवतां त्यास सोडून द्यावें अशी माझी कोर्टास सविनय प्रार्थना आहे. "

याप्रमाणें आरोपीतर्फे वकील अमृतराव यांनीं आपल्या अमृततुल्य रसाळ वाणीनें आपल्या तक्रारी कोर्टास कळविल्या. वकिलांनीं आपल्या अशीलाचें काम आरंभापासून अगदीं अखेरपर्यंत उत्साहानें चालविलें होतें. साक्षीदारांच्या साक्षींची पाहिजे तशी त्यांनीं ओढाताण केली, नाना प्रकारचे आक्षेप त्यांनीं आणले, बोलून बोलून त्यांचा आवाज बसून गेला, अशा रीतीनें वकीलांनीं आपल्याकडून शिकस्त केली खरी, पण व्यर्थ. लग्नाचा दाखला कोर्टापुढें आल्याबरोबर कज्जाचें सर्व स्वरूप एकदम पालटलें. ज्या बाईची आपणांस बिलकुल ओळख नव्हती असें आनंदराव म्हणत होते त्याच स्त्रीशीं त्यांचें लग्न झालें होतें, असा लेखी पुरावा पुढें आला. आणखी काय पाहिजे? आतां कसलाही संशय राहिला नाहीं. त्या स्त्रीचा, म्हणजे कलावतीचा आरोपी आनंदराव यानें बुद्धिपुरःसर खून केला, असेंच दिसूं लागलें व कोर्टात तशी चोहोंकडून कुजबूजही ऐकूं येऊं लागली. आनंदरावांनाही कळून चुकलें कीं व्हावयाचें तें शेवटीं झालेंच, आतां धडपड करून उपयोग नाहीं. तथापि, अजूनही सेशन कोर्टात खटपट करितां येईल, तुम्ही धीर सोडूं नका, सेशन कोर्टानें विरुद्ध निकाल दिला तरी अपील करितां येईल, अपील रद्द झालें

तरी तपासणी करण्याचा हक्क आहेच; तुह्मी कां घाबरतां! मी आहें! असें आश्वासन त्यांना त्यांचे वकील देत होतेच.

कोर्टाचा वक्त गुदरला. उभयपक्षीं तक्रारी ऐकून घेतल्यानंतर 'कागदपत्र' पाहून कज्जा सेशन कोर्टाकडे इनसाफाकरितां पाठवावयाचा किं कसें याचा निकाल उद्यां सांगतां येईल; तोंपर्यंत आरोपीस अटकेंत ठेवण्यांत यावें असा हुकूम करून कोर्ट उठलें.

---

# प्रकरण १८ वें.

—:o:—

## आरोपी नाहींसा झाला.



आनंदरावांना ज्या तुरुंगामध्यें अटकेंत ठेविलें होतें तो तुरुंग त्यांच्या घरापासून जवळच असून पूर्वीं या ठिकाणीं आजारी कैद्यांना औषध वगैरे देण्याकरितां आनंदराव पुष्कळ वेळां आले होते. त्या काळांत व या काळांत केवढें तरी अंतर पडलें हें! तेव्हां आनंदराव कैदी पाहण्यास जात, पण आतां ते स्वतःच कैदी होऊन गेले होते. ह्या तुरुंगामध्यें खुनासारख्या भयंकर गुन्ह्याच्या आरोपीकरितां एक निराळीच कोठडी असून ती जागा पक्क्या बंदोबस्ताची होती. एकदां या खोलींत कैदी घातला कीं मग त्याच्या पळून जाण्याची बिलकुल भीति रहात नसे. याच खोलींत आनंदरावांना आतां ठेवण्यांत आलें. वरील दिवशीं संध्याकाळीं अमृतरावांनीं आनंदरावांशीं बोलण्याची परवानगी मिळविली, व ते या खोलींत आले. आनंदरावांना ज्या संबंधानें एवढें गूढ पडलें होतें तोच विषय त्यांनीं वकिलाजवळ काढला.

आनंदरावः—" प्रथम मला असें सांगा कीं दर्याबाईनीं जें पत्र हजर केलें तें त्यांना कसें मिळालें ? कोठें होतें तें ? "

अमृतरावः—" अहो कोठें म्हणजे ? तुमच्याच पेटींत होतें. "

आनंद०:–"अगदींच अशक्य! तें पत्र माझ्या पेटींत मुळींच नव्हतें!"

अमृत०:—" आनंदराव, हा लपंडाव आतां पुरे करा. माझ्याशींच जर तुह्मीं प्रतारणा आरंभिली, तर परिणाम बरा होणार नाहीं. मला जर तुह्मीं कांहीं कळूं दिलें नाहीं, अंधारांतच ठेविलेंत, तर तुह्मांला ह्या संकटांतून मी कसा सोडवूं शकेन ? "

आनंदरावः—" वकीलसाहेब, मीच जर मुळीं अंधारांत आहें, तर तुह्मांला उजेड कुठला दाखवूं ? मी खरोखर सांगतों कीं तें पत्र माझ्या पेटींत केव्हांही नव्हतें. तें पत्र कोठून व कसें बाहेर आलें हेंच मला मोठें गूढ पडलें आहे. "

अमृतरावः—"पत्र तुमच्या पेटींतच होतें, व तुमच्याच राणीसाहेबांनीं तें बाहेर काढलें. तुह्मांला समजलें नाहीं ही गोष्ट निराळी. "

आनंदरावः—" कोणी ? माझ्या बायकोनें ? "

वकीलः–"होय, होय; त्याची हकीकत अशीः–तुमच्या कुटुंबाला अलीकडे अलीकडे तुमच्या वर्तनाबद्दल संशय येऊं लागला होता; म्हणजे—आलें कां ध्यानांत ? हं. तेव्हां त्या पेटींत तुह्मीं काय काय ठेविलें आहे हें पाहण्याची त्यांना साहजिक इच्छा झाली. म्हणून एके रात्रीं त्या खालीं गेल्या–म्हणजे या आठ दहा दिवसांतलीच गोष्ट–व ती पेटी त्यांनीं उघडून हें पत्र हुडकून काढलें. त्यांची नाहींशी झालेली बहीण कमळजा इचें अक्षर त्यांनीं ओळखलें. पण पत्रांतील मजकूर त्यांना नीट समजला नाहीं. त्यांना वाटलें कीं कांहीं तरी विलक्षण चूक होऊन तें पत्र तुमच्या नांवाच्या पाकिटांत गेलें असावें. म्हणून त्यांनीं तें पत्र इंदिरा आक्कासाहेबांना दाखविलें; आक्कासाहेबांनीं तें दर्याबाईजवळ दिलें आणि त्या बाईनीं शेवटीं हे गुण उघळले. आतां समजलें सगळें ? "

त्याबरोबर आनंदराव ताठ डोळे करून पाहूं लागले. आश्चर्यापेक्षां गतगोष्टींची आठवण त्यांना होऊं लागल्याचें त्यांच्या चेहऱ्यावरून दिसत होतें. आतां त्यांना पहिल्यांदा आठवण झाली कीं त्या दिवशीं संध्या-

काळीं—पुष्कळ वर्षांची गोष्ट—आपण भलतेंच पत्र त्या पेटींत नेऊन ठेविलें हीच गोष्ट संभवनीय आहे. वडिलांकडून आलेलें पत्र—म्हणजे जपून ठेवावयाचें होतें तें—आपण गडबडींत जाळून टाकलें असावें व हें भयंकर पत्र पेटींत नेऊन ठेविलें असावें हेंच खरें. ही गोष्ट ध्यानांत येतांच आनंदरावांना अत्यंत दुःख झालें. या दुःखास कारण कोण तर त्यांचीच बायको जिच्यावर त्यांची बहाल मर्जी, जिच्या ठिकाणीं त्यांचें निःसीम प्रेम, जिच्याशिवाय त्यांना घटकाभर देखील चैन पडावयाचें नाहीं, त्याच त्यांच्या बायकोनें—मोहनेनें—आनंदरावाचा—आपल्या नवऱ्याचा असा विश्वासघात करावा अं? 'स्त्रियश्चरित्रं पुरुषस्य भाग्यं देवो न जानाति कुतो मनुष्यः' ही गोष्ट अगदीं अगदीं खरी.

थोड्या वेळानें आनंदराव ह्मणालेः—"एकूण माझ्या बायकोनेंच तें पत्र बाहेर आणलें तर!" त्यांच्या मनाला मनस्वी दुःख झाल्याचें वकिलांना दिसलें.

वकीलः—"पण आनंदराव, तुमचा घात करावा अशा हेतूनें त्यांनीं आणलें नाहीं; त्या पत्राचा अर्थ काय, याची त्यांना कल्पनाही होईना. त्यांना वाटलें—मीं मघाशीं सांगितलेंच आहे, कांहीं तरी चूक किंवा अदलाबदल होऊन तें पत्र तुमच्या घरीं आलें असावें. त्यांनीं तें आक्कासाहेबांना दाखविण्याचें कारण इतकेंच कीं त्या पत्राचें हस्ताक्षर त्यांची बहीण कमळजा इचें होतें. हेंच कारण."

"मला ही गोष्ट कधींच समजली नाहीं, कधींही नाहीं." असें आनंदराव बरळले. पण कमळजा ही आपल्या बायकोची बहीण, हें त्यांना समजलें नाहीं, किंवा तें पत्र आपल्या पेटींतच होतें ही गोष्ट त्यांना समजली नाहीं, यांपैकीं त्यांच्या मनांत काय होतें तें कळलें नाहीं. तें अनुमानानेंच ताडलें पाहिजे.

नंतर वकील म्हणालेः—"खरोखर तें पत्र बाहेर कसें आलें हें मुळींच समजलें नसतें. परंतु त्या पत्रामुळेंच तुमच्यावर फिर्याद झाली व तुम्हांला पकडण्यांत आलें, असें जेव्हां त्यांना समजलें, तेव्हां त्या स्वतःला

लावून घेऊं लागल्या; त्यांत सर्व प्रकार समजून आला. तुह्मांला पोलिसांनीं पकडून नेल्यानंतर मैनाई सुईण तुमच्या घरीं गेली होती—कशाकरितां तें कांहीं कळलें नाहीं—व ती तेथें असतांनाच आक्कासाहेबही आल्या; तेव्हां मोहनाबाई त्यांच्या गळयाशीं पडून हंबरडा फोडूं लागल्या. आपण एक दाभण विकत आणून तळघरांत ठेवलेल्या पेटीचें कुलूप काढलें व त्या पेटींतून हें पत्र बाहेर काढलें वगैरे गोष्टी त्यांनीं प्रांजलपणें कबूल केल्या. मैनाईनें ती सर्व हकीकत ऐकून दर्याबाईना सांगितली. आणि अशा रीतीनें पत्रासंबंधाची हकीकत बाहेर फुटली. नशीबाचा खेळ म्हणतात तो हाच."

आणि खरोखरच हा नशीबाचा खेळच तर काय ? आपण तें पत्र खास जाळून टाकलें अशी आनंदरावांची आजपर्यंत पूर्ण समजूत—नव्हे, खात्री—असतां अशा विलक्षण रीतीनें तें पत्र त्यांच्याच पेटींत जपून ठेविलें जावें हा नशीबाचा खेळच होय !

आणखी थोडा वेळ बोलणें झाल्यानंतर वकीलसाहेब आनंदरावांचा निरोप घेऊन निघून गेले. ते गेल्यावर आनंदरावांच्या मनांत हजार विचार आले व त्यांची चित्तवृत्ति अगदीं भांबावून गेली. रात्रीं जेवणाकरतां ताट वाढून आणिलें. पण आपणास खाण्याची बिलकुल इच्छा नाहीं, असें तें म्हणाले. त्यानीं त्याला बोट सुद्धां लाविलें नाहीं. फक्त 'दऊत, लेखणी व कागद असें लिहिण्याचें सामान तेवढें आणून द्या.' असें त्यांनीं म्हटल्यावरून त्यांना तें आणून देण्यांत आलें. तें घेऊन आनंदराव कांहींसें लिहीत बसले.

तुरुंगावरील रखवालदार शिपायांत तालीमभाई नांवाचा एक शिपाई होता. तो मागें एकदां आजारी असतांना आनंदरावांनींच काळजीपूर्वक औषधपाणी देऊन त्या दुखण्यांतून त्याला बरें केलें होतें. आनंदरावांवर हा प्रसंग आलेला पाहून त्याला अत्यंत वाईट वाटत होतें.

मध्यरात्र उलटून गेली तरी आनंदराव लिहीतच होते. तालीमभाईचा पहारा बारापासून दोन वाजेपर्यंत होता. आनंदरावांनीं एक कागद लिहून तो एका पाकिटांत घातला व पाकीट बंद करून त्यावर पत्ता लिहून तें आपल्याजवळ ठेवलें. हा सर्व प्रकार तालीमभाईला गजांतून दिसत

होता. त्यानें जवळ जाऊन म्हटलें:—“ डॉक्टरसाहेब, रात्र फार झाली, दोन वाजायला आले, निजायचें नाहीं काय ? ”

आनंदरावांनीं तें पत्र त्याच्याजवळ देऊन म्हटलें:—“ एवढें हें पत्र सकाळीं उठल्याबरोबर आमच्या घरीं नेऊन पोंचतें कर. विसरूं नको. सकाळीं उठल्याबरोबर प्रथम हें काम कर. बरें का ! ”

तालीमभाईनें तें पत्र आपल्या खिशांत घातलें व तो आपल्या पहाऱ्यावर निघून गेला. आनंदरावही नंतर निजले.

तालीमभाई सकाळीं लवकर उठून पत्र पोंचतें करण्यासाठीं निघाला. निघते वेळेस पत्राचें उत्तर आणावयाचें कीं नुसतें पत्र देऊन यावयाचें, हें विचारावें ह्मणून तो पुनः आनंदरावांच्या खोलीजवळ गेला. पण ते जागे नसून त्यांना गाढ झोंप लागली आहे असें त्याला दिसलें. रात्रीं निजायला उशीर झाल्यामुळें जागे झाले नसतील, असें वाटून तो बाहेर पडला व थेट आनंदरावांच्या घरीं गेला. तेथें त्याला समजलें कीं, मोहनाबाई घरीं नसून इंदिराआक्कासाहेबांकडे राहण्यास गेल्या आहेत; ह्मणून तो तिकडे जाण्याकरितां निघाला. दरवाज्यांतील भय्यानें त्याला विचारिलें:—“ क्यंव जी तालीमभाई, हमारा मालिक कूं सजा होगा क्या ? ”

शिपायानें उत्तर केलें:—“ होईल किंवा न होईल त्याचा कांहींच नेम नाहीं. असल्या कज्जांत नेहमीं भरपूर पुरावा असत नाहीं. ह्मणून पुष्कळ वेळां आरोपी सुटून जातात; त्याप्रमाणें डॉक्टरसाहेबही सुटतील कदाचित् ! ” इतकें सांगून तो झपाझप पावलें टाकीत रावपुन्याकडे निघाला.

फुलबन बंगल्यांत येऊन त्यानें इंदिरेला तें पत्र देऊन म्हटलें:— ‘ आक्कासाहेब, सकाळीं उठल्याबरोबर हें पत्र नेऊन माझ्या कुटुंबाकडे दे असें मला आनंदरावांनीं सांगितलें होतें. ह्मणून मी ताबडतोब आलों. मोहनाबाई कोठें आहेत ? ”

इंदिरेनें पत्र घेऊन त्यावरील पत्ता वाचला. नंतर तिनें विचारिलें— आनंदरावांची तब्बेत बरी आहे ना ? ते काय करीत आहेत ? ”

" तब्येत बरी आहे. मी येतांना विचारून येणार होतों, परंतु ते अजून उठले नव्हते. त्यांना झोंप लागली होती."

" उठले नव्हते ! " इंदिरेनें आश्चर्यानें म्हटलें. इतका भयंकर आरोप आला असतां आनंदरावांना गाढ झोंप लागावी हें तिला खरें वाटेना.

तितक्यांत तालीमभाई शब्दांत सुधारणा करून ह्मणालाः—" निदान मी इकडे येण्याकरितां निघालों तेव्हां तरी त्यांना झोंप लागली होती. आतां जागे झाले असतील ह्मणा."

इंदिरा पत्र घेऊन निघाली व 'उत्तर दिलें तर आणून देतें,' असें ह्मणून आंत गेली. हें पत्र मोहनेला द्यावें कीं नाहीं, कदाचित् तिच्या दुःखांत भर पडेल, आंत काय मजकूर आहे कोणास ठाऊक, असा एक विचार तिच्या मनांत आला; पण नवऱ्यानें बायकोला पाठविलेलें पत्र मध्येंच दाबून ठेवणें बरें नव्हे असें वाटून तिनें तें पत्र मोहनेला नेऊन दिलें.

मोहना अजून अंथरुणावरच असून एकसारखे हुंदके देत होती. सारी रात्र तिनें रडून रडून गोंधळ केला होता इंदिरेनें व सारजेनें तिचें अनेक प्रकारांनीं समाधान करण्याचा प्रयत्न केला पण व्यर्थ. तिचें रडें कांहीं केल्या आवरेना. इंदिरेनें पत्र दिल्याबरोबर तें फोडून ती वाचूं लागली:—

" अनेक आशीर्वाद विशेष. पत्र लिहिण्यास कारण कीं हल्लीं मजवर जो प्रसंग गुदरला आहे त्यामुळें तुझी स्थिति फारच कष्टमय होईल, व तुला लोकांमध्यें तोंड दाखवायला सुद्धां जागा रहाणार नाहीं हें मी जाणून आहें; पण त्याला माझा इलाज नाहीं. ही वेळ फारच घोंटाळ्याची व संशयित स्थितीची आहे. तरी पण माझ्या स्वतःपेक्षां तुझ्याबद्दलच मला विशेष काळजी वाटत आहे. सध्यां माझ्यावर जें काम चाललें आहे त्या कामांत माझ्याकडून आजपर्यंत जें जें गैरवर्तन झालें असेल, तें सर्व मीं तुझ्याकरितां, प्रिये, केवळ तुझ्याकरितां केलेलें आहे. कोर्टापुढें जो लग्नाचा दाखला हजर झाला आहे त्याकडे लक्ष देतां मीं कमळजेबरोबर लग्न करून घेतलें होतें, ही गोष्ट मला नाकबूल करितां येत नाहीं, व करूनही कांहीं उपयोग नाहीं. परंतु तूं हें पक्कें ध्यानांत ठेव कीं तुझ्याजवळ मीं कांहींही

कबूल केलें तरी कोर्टापुढें अगर दुसऱ्या कोणाजवळही मी कबूल करणार नाहीं. शक्य असेल तर खरा प्रकार शोधून काढण्याकरितां लागतील तितके प्रयत्न त्यांना करूं देत;माझी कांहीं हरकत नाहीं.तिचें नांव कमळजा एवढेंच मला माहीत होतें. मास्तरिणीची नोकरी तिनें धरली असल्यामुळें तिचा जन्म थोर कुळांत झाला आहे हें मला कधींच समजलें नाहीं. आपलें घराणें व इतर आप्तइष्ट, सोयरेधायरे, यांच्यासंबंधानें ती नेहमीं मौनव्रत धरीत असे. तिचे आईबाप मेलेले असावेत. तिला कोणाचा आधार नसावा व ती अनाथ असावी असेंच मी समजत होतों. तिच्याविषयीं माझ्या मनांत फारच आदरबुद्धि वसत होती. तिच्याशीं मीं चोरटें लग्न केलें हा माझा मूर्खपणा झाला, व ही माझी मोठीच चूक झाली. पण तुझी व माझी ओळख होईपर्यंत ही चूक मला समजून आली नाहीं. माझी व तुझी दृष्टादृष्ट झाली व आपलें दोघांचें परस्परांवर प्रेम जडूं लागलें तेव्हां मला वाटूं लागलें कीं कमळजेबरोबर आपण लग्न केलें तें बरोबर झालें नाहीं.

"तुझ्यावर माझें केवढें उत्कट प्रेम बसलें होतें याची तूंच आठवण करून पहा. अजून तुला विसर पडला नसेल. पूर्वीं घाईघाईनें उरकून घेतलेलें लग्न कोणत्या रीतीनें मोडतां येईल याविषयींचा मी विचार करूं लागलों. इतक्यांत ती मुद्दाम आपण होऊन ह्या गांवांत येऊन दाखल झाली. ही बातमी समजतांच अंगावर वीज पडावी तसें मला झालें. ती आणि मी दोघेंही एकाच गांवांत! म्हणजे काय हें? आमचें सर्व कृत्य बाहेर पडेल, मला पूर्वींची एक बायको आहे ही गोष्ट तुला समजेल याचीच मला भीति वाटूं लागली. प्रिये, मी काय म्हणतों तें तूं नीट लक्ष्यांत घे. मागची सर्व आठवण झाली म्हणजे मला असें वाटूं लागतें कीं—व तेंच सत्य सत्य आहे,—कीं त्या वेळीं तुझ्यासंबंधानें मी अगदीं हताश झालों. इतका कीं, माझें देहभानसुद्धां मला राहिलें नाहीं. म्हणजे मी वेडा झालों. मग वेडा मनुष्य जसा आपल्या कृत्याबद्दल जबाबदार नसतो, तसाच मीही माझ्या कृत्याबद्दल जबाबदार नाहीं.

"याप्रमाणें हकीकत आहे. मी जेव्हां शुद्धीवर आलों—त्याच रात्रीं

मी शुद्धीवर आलों—तेव्हां मग सर्व गोष्टी चटकन् माझ्या लक्ष्यांत आल्या; पण गोष्ट होऊन गेली. ती दुरुस्त होणें अगदींच दुरापास्त होतें. मला मग जें कांहीं करतां येण्याजोगें होतें तें एवढेंच कीं ही गोष्ट अगदीं गुपचूप ठेवावयाची, कोणासही कळूं द्यावयाची नाहीं; व अशा रीतीनें कायद्याच्या कचाट्यांतून आपलें संरक्षण करून घ्यावयाचें. त्याप्रमाणें मी माझ्याकडून पूर्णपणें सावध राहिलों.

" पण प्रिये, सरतेशेवटीं तूंच माझें हें गुप्त कारस्थान उघडकीस आणलेंस. तूं माझ्यावर विश्वास ठेऊन स्वस्थ कां राहिली नाहींस ? नसती उठाठेव कशाला करावयाला गेलीस ! आपलें उभयतांचें लग्न झाल्यावर परस्परांमध्यें पुष्कळ वेळां खटका उडाला आहे, व किती वेळां तरी बेबनाव झालेला आहे ! पण मी शपथपूर्वक सांगतों कीं माझें तुझ्या ठायीं जें निःसीम प्रेम होतें त्या प्रेमांत एक केंसभर सुद्धां कधींहि बिघाड झालेला नाहीं. तुझ्या मनामध्यें अलीकडे माझ्याबद्दल बरेच वेळां संशय आलेला होता, पण त्या त्या वेळीं तो तुझा संशय घालवून मीं तुझ्या मनाचें समाधान केलेलें होतें व तुझा संशय अगदीं निराधार आहे अशी मीं तुझी खात्री करून दिली होती. तूं निष्कपट मनानें माझ्याकडे आली असतीस, व तळघरांतल्या लोखंडी पेटींत काय काय जिन्नस ठेवले आहेत तें मला पहावयाचें आहे असें ह्मणाली असतीस, तर मीं मोठ्या आनंदानें त्या पेटीची किल्लीच तुझ्याकडे दिली असती. माझ्या समजुतीनें तुला किंवा दुसऱ्या कोणालाही न दाखविण्याजोगें असें कांहीं त्या पेटींत नव्हतेंच. माझ्यावर जेणेंकरून भयंकर प्रसंग गुदरेल असें कांहीं त्या पेटीमध्यें असेल अशी माझी कल्पनाही नव्हती. कारण तुला जें पत्र सांपडलें तें पत्र फार दिवसांपूर्वींच मीं जाळून टाकलें असेंच मी समजत होतों. बरें, माझ्यापरोक्ष पेटींचें कुलूप काढून पत्र घेतलेंस तें घेतलेंस. पण नंतर तरी मजकडे येऊन मला तें दाखवून माझ्याकडून खुलासा करून घ्यावयाचा; तसें न करितां तें पत्र नेऊन आक्कासाहेबांजवळ दिलेंस, ते कां ! बहिणीपेक्षां नवऱ्याचें नातें जास्त जवळचें नव्हे का ? आतां एवढें खरें कीं मीं तुला सुद्धां खरी हकीकत सांगितली नसती, व मीं सांगावी हें

योग्यही झालें नसतें. तरी पण तुझ्या मनाचें समाधान होईल इतका खुलासा मीं केला असता. आणि मला तरी ही अश्रुतपूर्व गोष्ट कळली असती कीं कमळजा ही जहागीदारांची मुलगी व तुमची सर्वांची बहीण होती. लीलाताईच्या चेहऱ्यांत आणि तुझ्याही तोंडवळ्यांत मला केव्हां केव्हां असें कांहीं दिसे कीं त्यामुळें कमळजेची आठवण होऊन तिची मूर्ति माझ्या डोळ्यांसमोर उभी राही.

"तथापि प्रिये, तूं तें पत्र हुडकून काढलेंस असें जरी मीं वर म्हटलें आहे तरी तुला दोष देण्याकरितां मीं हा उल्लेख केलेला नाहीं. उलट निष्कपटपणानें व मनोभावानें तुझी क्षमा मागण्याकरितांच मीं हा उल्लेख केलेला आहे. माझी खात्री आहे कीं माझा विश्वासघात झाला तो तूं कांहीं बुद्धिपुरःसर केलेला नाहींस. तुला त्याबद्दल अत्यंत दुःख होत आहे हें मी जाणून आहें. प्रिये, त्याबद्दल मी प्रेमपुरःसर तुला क्षमा करतों.

"इतका खुलासा केल्याशिवाय मला झोंपच येईना. प्रिये, आतां माझ्याच्यानें जास्त कांहीं लिहवत नाहीं. सदय अंतःकरणानें माझ्या कृत्याचा तूं विचार कर. सर्व जग माझ्यावर रागावलें तरी हरकत नाहीं, पण तूं माझ्यावर राग करूं नकोस एवढेंच तुला शेवटचें सांगणें आहे. बहुत काय लिहिणें हें आशीर्वाद.

"तुझा हतभागी नवरा

"आनंदराव देशमुख."

पत्र वाचून झाल्यानंतर इंदिरेनें बाहेर येऊन शिपायाला सांगितलें कीं, "आत्तांच कांहीं उत्तर द्यावयाचें नाहीं, सबब तूं जा." त्याबरोबर तालीमभाई बंगल्यांतून बाहेर पडून तुरुंगाकडे जाण्याकरितां निघाला. तुरुंगापासून तो थोड्या अंतरावर येऊन पोंचला, इतक्यांत तुरुंगाच्या दरवाजांत बरीच मंडळी जमलेली त्याला दिसली व गोंगाटही बराच ऐकूं येऊं लागला. काय प्रकार आहे हें त्याला कळेना. लोक जिकडे तिकडे पळत सुटले. तालीमभाईनें एका इसमास धरून उभें केलें व त्यास काय

हकीकत आहे ह्मणून विचारिलें. त्यानें घाबऱ्या घाबऱ्या उत्तर दिलें कीं आनंदरावांसंबंधानें कांहीं भानगड आहे, तुरुंगांत मोठी दंगल उडून गेली आहे, आनंदराव गेले असें म्हणतात.

तें ऐकून तालीमभाई मोठ्या घोंटाळ्यांत पडला. आनंदराव गेले म्हणजे काय? सकाळीं आपण तेथून निघून आलों तेव्हां त्यांच्या कोठडीच्या दारास कुलूप लावण्याचें विसरलों कीं काय असा संशय त्याला आला. त्याबरोबर आतां परिणाम काय होतो कोण जाणे असें वाटून शिपाईबोवांची छाती धडधडूं लागली. तो धांवत पळत तुरुंगाकडे निघाला.

इकडे प्रतापराव डॉक्टर व अमृतराव वकील हे सकाळीं आनंदरावांची गांठ घ्यावी ह्मणून तुरुंगांत आले होते. आनंदराव अद्याप उठले नाहींत असें समजतांच प्रतापरावांना फार आश्चर्य वाटलें. खुनाचा आरोप झालेला मनुष्य इतका दिवस आला तरी स्वस्थ निजून राहील ही गोष्ट त्यांना फारच विलक्षण व असंभवनीय वाटली व ते तसें बोललेही. त्यांचें तें बोलणें ऐकून तुरुंगावरील मुख्य अधिकाऱ्यानें एका शिपायास हाक मारून सांगितलें कीं आनंदरावांच्या कोठडींत जाऊन त्यांना हालवून जागें कर व मंडळी भेटावयाला आली आहेत ह्मणून सांग. त्याप्रमाणें तो शिपाई गेला पण लागलीच कावराबावरा होऊन परत आला. त्याच्या चेहऱ्यावर मूर्तिमंत भीति दिसत होती. तो थरथर कांपत म्हणालाः—
"जेलरसाहेब, आनंदराव गेले.आतां कसला तुरुंग आणि कसली शिक्षा."

त्याबरोबर जेलर, प्रतापराव, अमृतराव वगैरे मंडळी खोलींत आनंदराव खरोखरच नाहींत कीं काय हें प्रत्यक्ष पहावें ह्मणून गडबडीनें तिकडे गेली. इकडे चौकीवरील शिपाई लोकांत 'आरोपी पळून गेला' अशी एकच हूल उठली व त्याला पकडण्याकरितां लोक सैरावैरा पळत सुटले. याच संधीला तालीमभाई पत्राची कामगिरी आटपून परत येत होता. त्याच्या कानावर ही बातमी पडतांच तो तीर मारल्यासारखा तुरुंगाच्या इमारतींत येऊन पोंचला. इतक्या भक्कम व पक्क्या बंदोबस्ताच्या जागेंतून आरोपी कसा पळून गेला हें त्याला समजेना, सबब प्रत्यक्ष डो-

ळ्यांनीं पाहून खात्री करून घ्यावी ह्मणून तोही आनंदरावांच्या कोठडीकडे गेला.

त्यानें गजांतून आंत पाहिलें तर खरेंच. आनंदराव गेले होतेच–म्हणजे खोलींतून बाहेर नव्हे तर इहलोक सोडून परलोकास गेले होते. प्राण निघून गेल्यामुळें त्यांचें जड शरीर निर्जीव व अस्ताव्यस्त असें पडलेलें होतें.

ही स्थिति पाहतांच मंडळींचा असा ग्रह झाला कीं आनंदरावांनीं विष खाल्लें खास. ह्मणून डॉक्टरांना बोलवा, डॉक्टरांना बोलवा, असें जो तो म्हणूं लागला. मुंबईचे सुप्रसिद्ध विद्वान् डॉक्टर प्रतापराव हे या वेळीं येथेंच आहेत ही गोष्ट त्या गडबडींत त्यांच्या कोणाच्या ध्यानांतच राहिली नाहीं. परंतु डॉक्टर येऊन तरी काय उपयोग होणार होता ? कांहीं नाहीं. आनंदरावांचें प्राणोत्क्रमण होऊन किती तरी तास लोटले होते ! तालीमभाई सकाळीं लवकर उठून त्यांच्या कोठडींत गेला व त्यांना गाढ झोंप लागली आहे असें त्याला वाटलें त्यापूर्वीं बराच वेळ त्यांचा प्राण निघून गेला होता.

जेलरसाहेबांना वाटलें कीं आनंदराव एकाएकीं मेले त्या अर्थीं त्यांनीं कांहीं तरी विष खाल्लें असलें पाहिजे, यांत संशय नाहीं. तें विष त्यांनीं आपल्याजवळ चोरून ठेवलेलें असावें, एरव्हीं त्यांना तें मिळण्याचा संभव नाहीं. असें त्यांच्या मनानें घेतलें. त्याबरोबर ते आपल्या हाताखालच्या माणसांवर सारखे तणतणूं लागले. तुम्ही लोक फार गाफील झाला आहांत, त्याबद्दल तुम्हांला चांगलें शासन झालें पाहिजे; आरोपीची झडती घेतांना विष लपवून ठेवलेलें तुम्हांला दिसलें नाहीं, तर झडती कसली घेतलीत ? तुम्ही झोंपेंत, धुंदींत, सुस्तींत काम करतां, तुम्हां सर्वांना एकदां सोडून दहा वेळ ताकीद दिली तरी तुमचें आपलें आहे तेंच आहे. तें कांहीं नाहीं, मी आतां रिपोर्ट करणारच; वगैरे सारखी त्यांची टकळी चालली होती. वास्तविक पाहतां आरोपीच्या अंग झडतीचें काम खालच्या लोकांवर न सोंपवितां जेलर यांनीं स्वतःच तें करावयाला पाहिजे होतें. पण जेलरसाहेबांच्या अंगावरील माशा घालवावयास सुद्धां शिपायाची जरूर लागत असल्यामुळें तुरुंगांत आल्यावर डुलक्या घेत बसण्यापलीकडे ते

दुसऱ्या कामांत कधीं लक्ष्यच घालीत नसत. आधल्या दिवशीं संध्याकाळीं ज्या शिपायानें आनंदरावांची झडती घेतली होती, त्यानें किती सांगितलें कीं आपण झडती बरोबर घेतली,कांहींही पाहवयाचें राहिलें नाहीं; तरी सुद्धां जेलरसाहेबांची खात्री होईना.

प्रतापरावांनीं आनंदरावांच्या प्रेताची तपासणी करण्याला प्रारंभ केलाच होता. ती संपल्यावर ते उठून बाहेर आले व ह्मणालेः—" जेलरसाहेब, आपण विनाकारण त्रास करून घेऊं नका. विष खाल्ल्यामुळें मरण आल्याचीं कांहींच चिन्हें दिसत नाहींत. माझी अशी समजूत आहे कीं, आनंदरावांना स्वाभाविकपणेंच झोंपेंत मरण आलें आहे. त्यांची मुद्रा किती शांत दिसत आहे पहा ! "

मनुष्य मेल्यावर यापेक्षां शांत मुद्रा दिसणें कधींच शक्य नाहीं. आश्चर्य एवढेंच कीं, अशा भयंकर गुन्ह्याचा आरोप आलेल्या इसमाचा चेहरा बाह्यतः इतका शांत कसा दिसावा ? डोळे मिटलेले होते, भिवया साफ होत्या, ओंठावर मंदस्मित होतें, केंसांची तुकतुकी, शरीराची कांति, तोंडावरील तेजी, सर्व कांहीं जसेंच्या तसें होतें. शारीरिक किंवा मानसिक कोणतेच क्लेश झालेले दिसत नव्हते. देह व आत्मा यांच्या वियोगयुद्धाची, कुडींतून प्राण निघून जातांना होणाऱ्या अंतकाळच्या यातनांचीं कांहींच चिन्हें दृष्टीस पडत नव्हतीं. आनंदराव पूर्ण विश्रांतिसुख अनुभवीत आहेत, ब्रह्मानंदांत निमग्न आहेत असेंच पाहणारास वाटूं लागलें.

प्रतापराव ह्मणालेः—" आनंदरावांना 'हार्ट डिसीज' (काळजाचा विकार) असला पाहिजे. व त्याचाच हा परिणाम. मला आठवतें. फार वर्षें झालीं. म्हणजे मी येथून मुंबईला जाण्याच्या पुष्कळ आधीं येथें एक गवळी रस्त्यानें जातांजातांच पडला व त्याबरोबर त्याचा प्राण गेला. त्याच्या प्रेताची तपासणी चालली असतां आनंदराव मला म्हणाले कीं, 'आपल्या छातींतही कधीं कधीं दुखतें. हार्ट डिसीज आहे कीं कसें समजत नाहीं.' ही गोष्ट मी इतके दिवस विसरलोंच होतों. आतां त्याची आठवण झाली. "

नंतर जेलरनें आनंदरावांच्या कोठडीला कुलूप लाविलें. हळू हळू सर्व

मंडळी बाहेर पडली. बातमी कळविण्याकरितां प्रतापराव रावपुऱ्याकडे निघून गेले.

तिकडे पत्र वाचून झाल्यानंतर मोहनेला अनिवार रडें कोसळलें, व धाडदिशीं बिछान्यावर तिनें आपलें अंग टाकिलें. हुंदके देऊन देऊन तिचा गळा दाटून आला होता. आनंदरावांचें तें मरतेवेळचें पत्र तिनें आपल्या हातांत घट्ट धरलें होतें. एकदां ती आनंदरावांवर मनस्वी रागावे; कांहीं वेळानें पहाव तों हा सर्व प्रकार बदलून ती त्यांच्यावर गुदरलेल्या भयंकर प्रसंगाबद्दल शोक करीत बसलेली, व त्यांच्या गुणांचें प्रेमळ शब्दांनीं वर्णन करीत असलेली दृष्टीस पडे. पुनः पहावें तर तें सर्व सोडून प्रस्तुत संकटाचें सर्व कारण आपणच म्हणून ती आपणास दोष लावून घेत असलेली दिसे.

पत्र वाचून इंदिरेलाही अत्यंत दुःख झालें. पण तिचा स्वभाव शांत व विचारी असल्यानें तिनें आपलें सर्व दुःख गिळून टाकिलें व ती मोहनेचें समाधान करूं लागली. इतक्यांत प्रतापराव आल्याची बातमी समजतांच ती त्यांची गांठ घेण्याकरितां गेली. त्यांनीं आनंदरावांच्या मृत्यूची बातमी तिला कळविली. ती ऐकतांच तिच्या दुःखाचा कडेलोट झाला. आतां ही बातमी मोहनेला कशी कळवावी हाच विचार तिला पडला. तथापि मन घट्ट करून ती मोहनेच्या बिछान्याजवळ कशीबशी गेली. पण दुःखातिशयामुळें मोहनेला वायूचा झटका आला होता व तिची दांतखिळी बसली होती. म्हणून ती शुद्धीवर येईपर्यंत इंदिरा तिच्या शेजारीं बसून राहिली.

आनंदरावांच्या आकस्मिक मरणानें ह्या गांवच्या लोकांचा बराच विरस झाला. आज फिर्यादीतर्फे आणखी कांहीं तक्रारी कळविण्यांत येणार होत्या, शिवाय आरोपीवर चार्ज होऊन खटला सेशन कमिट होणार होता; त्या वेळीं कलावतीसंबंधानें आणखी कांहीं मनोरंजक व विलक्षण हकीकत आपणांस ऐकावयास मिळेल असें त्यांना वाटत होतें. पण आनंदराव एकाएकीं इहलोक सोडून गेल्याकारणानें या सर्वांवरच विरजण पडलें.

इंदिरेकडे पाहिलें तरी तिच्या मतानें सुद्धां या एकंदर प्रकरणाचा पुरसा उलगडा झाला नव्हताच. कमळजेनें आपली खरी हकीकत म्हणजे आपलें घराणें, आडनांव, गांव वगैरे आनंदरावांना कसें सांगितलें नाहीं हें तिला कायमचेंच कोडें पडलें. आपल्या घरच्या मंडळीचीं आपल्या उच्च कुलासंबंधानें मतें काय होतीं याचा विचार करितां, तसेंच त्या वेळीं आनंदरावांचा धंदा चांगला चालत नव्हता, व लग्न करून घेणेंच त्यांना योग्य नव्हतें ह्या गोष्टी मनांत आणितां, कमळजेनें आपलें लग्न आपल्या घरच्या मंडळीपासून चोरून कां ठेविलें हें इंदिरेच्या लक्ष्यांत आलें. पण तिनें आपलें घराणें वगैरे नवऱ्यापासून सुद्धां कां गुप्त ठेवावें हें इंदिरेला समजेना. लग्नाच्या कायदेशीरपणास त्यामुळें थोडाच बाध येणार होता. मग असें करण्याचें कारण काय ? इंदिरेनें एक कारण आपल्या मनाशीं शोधून काढलें—तेंही पुळपुळीतच होतें ह्मणा—कीं आनंदरावांचा बस चांगला बसेपर्यंत ही गोष्ट त्यांना कळवावयाची नाहीं. आणि त्यांचा धंदा चांगला चालून त्यांना रगडून पैसे मिळूं लागले म्हणजे मग—“ मी कांहीं दिसतें तशी नाहीं, मीं मास्तरणीची हलकी नोकरी धरली ह्मणून माझें घराणें कांहीं हलकें नाहीं, मी सर्जेराव जहागीरदारांची मुलगी आहे ” असें सांगून त्यांना चकवावें, असा कदाचित् कमळजेचा बेत असावा. उलटपक्षीं खुद्द कमळजेसंबंधानें विचार केला तर, आपलें आडनांव किंवा घराणें कोणाजवळ प्रकट करावयाचें नाहीं असा तिनें घरांतून बाहेर पडतांनाच निश्चय केला होता व तशी तिनें शपथ घेतली होती. तेव्हां हें आपणांस कायमचें बंधनच झालें असें तिला वाटलें असेल काय ? कांहीं सांगतां येत नाहीं. लग्न गुप्त ठेवण्यांत आनंदरावांचा कोणता हेतु होता हें ह्या कथानकाच्या आरंभीं दिलेल्या कांहीं कांहीं उताऱ्यावरून कळून येणारें आहे. त्यांचे वडील त्यांच्या लग्नाच्या अगदीं विरुद्ध होते व आनंदराव तर वडिलांवरच पूर्णपणें अवलंबून होते. साधारणपणें कोणीही मनुष्यें—निदान आनंदरावांसारखीं शिकलींसवरलेलीं माणसें तरी एकाएकीं कोणत्याही वाईट कृत्यास प्रवृत्त होत नाहींत. कमळाबाई मास्तरिणीशीं लग्न करून घ्यावें असा विचार जेव्हां आनंदरावांच्या मनांत आला तेव्हां त्यांनीं त्यासंबंधानें

वडिलांचा आजमास घेतला. पण म्हाताऱ्यानें स्वच्छ सांगून टाकिलें कीं कमळाबाई—जरी तिचें वर्तन सभ्यपणाचें असलें तरी—फक्त मास्तरीण आहे; तिच्याशीं लग्न करून आपल्या कुळाला कमीपणा आणण्याचें कांहीं कारण नाहीं. ह्या वृद्ध गृहस्थांनीं सर्वतोपरी आपली अनुकूलता दाखविली असती तर पुढील सर्व दुर्धर प्रसंग टळला असता. कारण मग लग्न चोरून ठेवण्याचें कांहीं कारणच नव्हतें; लग्नाची गोष्ट मग जगजाहीर झाली असती. परंतु त्यांनीं तसें केलें नाहीं. 'मास्तरीण' हा शब्दच त्यांना बरा वाटेना. त्यांचा स्वभाव फारच संतापी व दुराग्रही होता. ते ह्मणाले:—" आनंदराव, तूं जर हिच्याशीं लग्न करून घेशील तर माझ्या इस्टेटीपैकीं एक छदाम देखील मी तुला देणार नाहीं. हें तूं खूप समजून ठेव." आनंदरावांनाहि वाटलें कीं, आपले वडील बोलल्याप्रमाणें करण्यास कधींच चुकणार नाहींत. ह्मणून पुढें लग्न झालें तें गुप्त ठेवणें जरूर पडलें. कमळजेनेंही या कामांत नवऱ्याला मदत केली. पण याचा पुढें काय परिणाम होईल हें यत्किंचित् तरी त्यांच्या लक्षांत आलें होतें काय? छे, बिलकुल नाहीं. मनांत होतें एक झालें भलतेंच. 'मनसा चिंतितं कार्यं दैवमन्यविच्चिंतयेत्' तसा प्रकार झाला!

---

# प्रकरण १९ वें.

—:०:—

## झालें.





झालें. यापुढची हकीकत विशेष महत्त्वाची नाहीं. आनंदरावांचें शव नंतर त्यांच्या मंडळीच्या स्वाधीन करण्यांत आलें. कुडींतून प्राण निघून गेल्यानंतर त्या मृत शरीराचा ताबा आपल्याकडेच ठेवण्याबद्दल कायदे कोर्टानें विशेषशी फिकीर केली नाहीं. घरच्या मंडळींनीं यथाविधि व यथाशक्ति प्रेताचे अंत्य संस्कार उरकून घेतले.

पुतळाबाई मुलाच्या प्रकृतीकरितां अद्यापि सोलापुराकडेच होत्या. छोट्या जहागीरदारसाहेबांची तब्येत आतां चांगली सुधारली होती; तरी पण आणखी थोडे दिवस तेथेंच रहाण्याचा पुतळाबाईचा बेत होता. परंतु मोहनेवर ओढवलेल्या भयंकर प्रसंगाची बातमी कानांवर पडतांच मुलाला घेऊन त्या दत्तापूर गांवास आल्या. बरोबर हैबती होताच. छोट्या साहेबांवर त्याचें फार प्रेम असून तो त्यांना जिव कीं प्राण करी. त्या मुलालाही हैबतीचा फारच लळा लागला होता. क्षणभर सुद्धां तो त्या इमानी व पिढीजाद हुजऱ्याला विसंबत नसे. दत्तापुरास थोडे दिवस राहून पुतळाबाई परत सोलापुराकडे गेल्या.

मोहना कांहीं दिवस इंदिरेजवळ राहिली. आपल्या घरीं रहावयाला ये, संकोच करूं नकोस, तुझेंच घर आहे, सुखानें रहा, म्हणून पुतळाबाईनीं मोहनेला पुष्कळ आग्रह केला, पण त्याचा उपयोग झाला नाहीं. इंदिरेजवळ कांहीं दिवस राहिल्यानंतर तिनें एक मुलींची शाळा घातली. 'डॉक्टर आनंदराव देशमुख शस्त्रवैद्य' अशी पाटी पूर्वीं होती ती जाऊन आतां तेथें 'मुलींची खाजगी शाळा' अशीं अक्षरें दिसूं लागलीं. व मोहनाबाई आतां 'सुशील व उत्तम मास्तरीणबाई' म्हणून बऱ्याच प्रसिद्धीस येऊं लागल्या.

मावशीबाई व मैनाई यांना गप्पा मारावयाला आतां आयताच विषय झाला. त्या कोठेंही व केव्हांही जावोत, कलावती, कमळजा, व आनंदराव यांच्यासंबंधानें कांहीं बोलणें निघालें नाहीं असें बहुधा होतच नसे.

दर्याबाई येथून इंदुराकडे राहण्यास गेल्या. त्यांचे यजमान तिकडेच वारले होते; पतीचें स्मारक म्हणून दर्याबाईनीं एक सुरेख व टुमदार असें केदारनाथाचें देवालय उभारून देवास नित्य नैवेद्य व नंदादीप यांची चांगली व्यवस्था केली त्यांनीं बाळगलेला मुलगा सोन्या हा गुडघ्याच्या दुखण्यानें वारल्यामुळें त्यांना आतां या भागांत मायापाश कांहीं राहिला नाहीं. अर्थातच दत्तापुरांतील सर्व बिऱ्हाड त्यांनीं मोडलें व उरलेले आयुष्याचे दिवस हरिहरि करीत त्या देवालयांत घालवावयाचे असा निश्चय करून त्यांनीं इंदुरचा रस्ता धरिला.

डॉक्टर प्रतापराव आपला मुलगा वसंतराव यास घेऊन मुंबईला गेले. वसंतरावांनीं आपल्या मातुश्रीस या प्रकरणाची एकंदर हकीकत सांगितली व नंतर 'मला आनंदरावांचा प्रथमपासूनच संशय आला होता तो किती यथार्थ होता पहा, माझ्या कल्पनेला तूं तर्कटी तारू म्हणत होतीस. पण ती तर्क किती बरोबर होता हें आतां तुझ्या ध्यानांत येईल.' असें ते म्हणाले. वसंतरावांची पुढें डॉक्टरकीची परीक्षा उतरली व आतां वडिलांस त्यांचा पुष्कळ उपयोग होऊं लागला. वसंतराव व लीला यांचें लग्न मागेंच होण्याचें ठरलें होतें. परंतु मध्यंतरीं उठलेल्या वावटळीमुळें तें कांहीं दिवस लांबणीवर पडलें.

इंदिरा या गांवांतच राहिली. रावपुऱ्यांतील बंगला तिनें कायमचाच आपल्या स्वाधीन ठेविला होता. सारजाही तिच्याजवळच होती. इंदिरेचे यजमान चंगीभंगी बनून देशोधडीस लागल्यापासून ती माहेरींच होती. पुढें थोडक्याच दिवसांत तिची आईही वारली. सर्जेरावांचा स्वभाव फार तापट व रखरखी. त्यापासून त्यांना स्वतःस सुख नसे व दुसऱ्यासही नसे. त्यांच्या कुटुंबानें मरतेसमयीं इंदिरेस जवळ बोलावून सांगितलें कीं — 'माझ्यामागें आतां माझा सर्व विश्वास तुझ्यावर आहे. तूं ह्यांच्याजवळ रहा, अंतर देऊं नकोस.' मातुश्रीची आज्ञा इंदिरेनें शिरसा मान्य केली. व ती वडिलांची सेवा करीत त्यांच्याजवळच राहिली. पुढें सर्जेरावही वारले. नंतर फुलबन बंगल्यांत ती कायमपणें राहूं लागली. वडिलांनीं तिला चांगली नेमणूक करून दिली होती. प्रपंचास खर्च होऊन जो पैसा उरे तो ती देवाधर्मांत घालवूं लागली.

माघ मास आला व गांवांत जिकडे तिकडे लग्नसमारंभांची एकच घाई उडून गेली. यांतच आमच्या वसंतराव व लीलाताई यांचा विवाह मोठ्या कडाक्यानें व थाटानें झाला. लीलेला चांगलें मनाजोगें स्थळ मिळालें ह्मणून इंदिरेला व पुतळाबाईंना मोठी धन्यता वाटली. लीला सासरीं जावयास निघाली तेव्हां इंदिरेनें तिला जवळ बोलावून पोटाशीं धरलें व प्रेमानें कुरवाळून तिला उपदेशाचे चार शब्द सांगितले:—

" ऐकलेंस लीलाताई, तूं तशी शहाणी आहेस, तुला दुसऱ्याच्या उपदेशाची गरज नाहीं, पण सांगितल्याशिवाय राहवत नाहीं ह्मणून सांगतें. तुझ्या दोघी बहिणींचें उदाहरण नेहमीं डोळ्यापुढें असूं दे. मोहनेनें व कमळजेनें वडील माणसांच्या मताविरुद्ध, त्यांना न विचारितां, लग्न करून घेतलें ह्मणूनच त्यांच्यावर असें अरिष्ट कोसळलें, हें तूं कधीं विसरूं नकोस. त्याचप्रमाणें त्यांनीं आपल्या नवऱ्यांच्या इच्छेविरुद्ध वर्तन केलें ह्मणून अशीं फळें त्यांना मिळालीं. कमळजा ह्या गांवांत आली नसती तर हजार दिवशांनीं तिचें तें भयंकर मरण टळलें असतें, हें खास. ती आपल्या नवऱ्याच्या आज्ञेस न जुमानतां इथें आली व अखेरीस असा परिणाम झाला ! त्याचप्रमाणें मोहनेनें केलें. आपल्या नवऱ्याची पेटी त्याला नकळत तिनें उघडली नसती तर ह्या सर्व भयंकर गोष्टी उघडकीस आल्या नसत्या व आनंदरावांच्या जिवावरही पण बेतली नसती. लीले, तूं तरी आतां सावध हो. आपल्या नवऱ्यावर प्रेम ठेव, त्याच्या सांगण्याप्रमाणें वाग, त्याला मान दे. नवऱ्यापासून कोणतीही गोष्ट चोरून ठेवूं नकोस व त्याच्या मर्जीविरुद्ध कधींहि वागूं नकोस. बायकांना नवऱ्यासारखें दुसरें दैवत नाहीं. समजलें? जा आतां. " असें ह्मणून इंदिरेनें लीलेला निरोप दिला.

वाचकहो, माझी गोष्ट येथें संपली तेव्हां मलाही आपला निरोप घेतला पाहिजे. एवढा वेळ आपण ही गोष्ट ऐकण्याची तसदी घेतलीत याबद्दल मला तुमचे आभार मानिले पाहिजेत. चला तर आपणही आतां विश्रांति घेऊं.

**समाप्त.**